# लोकमहर्षी भाऊसाहेब

## डॉ. पंजाबराव देशमुख गौरवग्रंथ




महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ

# लोकमहर्षी भाऊसाहेब
# डॉ. पंजाबराव देशमुख गौरव ग्रंथ

संपादन समिती

डॉ. सुभाष सावरकर (निमंत्रक)
प्रा. राम शेवाळकर.
डॉ. मा. गो. माळी
डॉ. वि. स.जोग
प्रा. शेषराव मोरे



महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई

**Lok Maharshi Bhausaheb**
**Dr. Punjabrao Deshmukh Gaurav Granth**

प्रथमावृत्ती : डिसेंबर १९९९

**प्रकाशक**
सचिव,
महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ
मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय इमारत, तिसरा मजला,
१७२, मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय मार्ग, दादर,
मुंबई-४०००१४.



**मुद्रक**
मायक्रोग्राफ
रामदूत, डॉ. भालेराव मार्ग,
गिरगाव, मुंबई - ४०० ००४.

किंमत : रु. १०० /-

# अनुक्रमणिका

# समाजक्रांतीचा उद्गाता

"विदर्भाचे भाग्यविधाते" म्हणून ज्यांचा अत्यंत गौरवपूर्ण उल्लेख केला जातो ते गेल्या पिढीतील थोर नेते डॉ. पंजाबराव देशमुख यांनी आयुष्यभर विविध क्षेत्रांत केलेले कार्य खरोखरीच सामान्य माणसाला थक्क करून टाकणारे आहे. सार्वजनिक जीवनात कार्य करणाऱ्या कार्यकर्त्याला तर अनेक दृष्टींनी ते स्फूर्तीदायक आहे. त्यांचे मुख्य क्षेत्र हे शिक्षण आणि कृषिवलांची उन्नती हे असले तरी इतरही अनेक क्षेत्रांत त्यांनी केलेली कामगिरी विसरता येण्यासारखी नाही. समाजातील अज्ञान, दारिद्र्य या मूलभूत समस्या दूर करावयाच्या असतील तर शिक्षणाविना अन्य पर्याय नाही हे त्यांनी अचूक ओळखले होते. त्या दृष्टीने त्यांनी शिक्षणसंस्थांचे एक जाळेच विदर्भात निर्माण केले आणि बहुजनसमाजात शिक्षणाविषयी प्रेम उत्पन्न केले. त्या दृष्टीने डॉ. पंजाबराव हे महात्मा फुले यांचे खरे वारसदार होत, असे जे म्हटले जाते ते यथार्थ आहे, यात शंका नाही. डॉ. पंजाबराव उपाख्य भाऊसाहेब हे स्वत: मोठे ज्ञानोपासक होते. १९२६ साली ऑक्सफर्ड विद्यापीठात त्यांनी सादर केलेल्या अभ्यासपूर्ण प्रबंधामुळे त्यांना डॉक्टरेट ही पदवी मिळाली. महिलांची उन्नती, स्वातंत्र्याची चळवळ, घटना समितीतील कार्य, सामाजिक सुधारणा इ. विविध क्षेत्रांतील त्यांचे योगदान हे उल्लेखनीय आहे. "जे का रंजले गांजले" यांचे तर ते पाठीराखेच होते. त्या दृष्टीने "समाजक्रांतीचा उद्गाता आणि प्रवक्ता" असा त्यांचा यथार्थ गौरव केला जातो. ज्ञान-कर्म-भक्ती यांचा त्रिवेणी संगम त्यांच्या व्यक्तिमत्वात झालेला होता असे जे एका लेखकाने म्हटले आहे ते वर्णन अतिशयोक्तीपूर्ण मुळीच वाटत नाही. भारताच्या अशा या थोर सुपुत्राच्या जन्मशताब्दीच्या निमित्ताने त्यांच्या कार्याचा गौरव करणारा एक ग्रंथ महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाने प्रसिध्द करण्याचे ठरवले हे उचितच झाले. काही अपरिहार्य कारणांमुळे हा ग्रंथ प्रसिध्द होण्यास विलंब लागला ही गोष्ट खरी, पण प्राचार्य राम शेवाळकर आणि प्रामुख्याने डॉ. सुभाष सावरकर यांनी त्यासाठी खूप परिश्रम घेतल्यामुळेच हा ग्रंथ आज पुस्तकरूपाने प्रसिध्द होत आहे. मंडळ या उभयतांचे मन:पूर्वक आभारी आहे.

सदर ग्रंथ लोकमहर्षी डॉ. भाऊसाहेब पंजाबराव देशमुख यांच्या येत्या १०१ व्या जयंतिदिनी म्हणजे दिनांक २७ डिसेंबर १९९९ रोजी प्रकाशित करण्याच्या दृष्टीने या ग्रंथाच्या छपाईचे काम मुद्रक, मायक्रोग्राफ, मुंबई यांनी अल्प कालावधीत करून दिल्याबद्दल तसेच या छपाईच्या कामात मंडळाचे सचिव श्री. चंद्रकांत वडे यांनी व्यक्तिश: लक्ष घातल्याबद्दल त्यांचेही आभार.

**द. मा. मिरासदार**,
अध्यक्ष,
महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ

बलिप्रतिपदा, दिवाळी १९९९
दिनांक - ९/११/१९९९

# संपादकीय

शिक्षण महर्षी डॉ. पंजाबराव देशमुख जन्मशताब्दी महोत्सव समिती अध्यक्षांच्य विनंतीवरून लोकमहर्षी भाऊसाहेबांच्या कर्तृत्वाच्या विविध पैलूंवर प्रकाश टाकणार अभ्यासपूर्ण गौरवग्रंथ प्रकाशित करण्याबद्दल महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाने ठराव पारित केला त्यावेळी डॉ. मधुकर आष्टीकर हे मंडळाचे अध्यक्ष होते व उपरोक्त गौरवग्रंथाच्या संपादनाची जबाबदारी प्राचार्य रामभाऊ शेवाळकर यांचेवर सोपविण्यात आली होती. परंतु प्रारंभी डॉ. आष्टीकरांचे प्रकृति-अस्वास्थ्य व नंतर त्यांचे निधन यांमुळे नियोजित गौरवग्रंथाचे काम वर्षभर रेंगाळत गेले. मंडळाचे नवे अध्यक्ष प्रा. द. मा. मिरासदार यांच्या कार्यकाळात त्या कामाला वर्षभराने पुन्हा वेग देण्यात आला व बहुतांश नियोजित लेखांचे हस्तलिखित ३ डिसें. ९८ रोजी नागपूर बैठकीत मुख्य संपादक प्राचार्य शेवाळकरांना सादर करण्यात आले; त्यांनी त्याची मुद्रितेही काढण्यास दिली.

परंतु पुढे प्राचार्य शेवाळकरांच्या प्रकृति-अस्वास्थ्यामुळे मे ९९ पर्यंत पुन्हा हे काम रेंगाळले. पुढे तर प्रा. शेवाळकरांनी मंडळाचा राजीनामाही दिला आणि ऑगस्ट ९९ मध्ये कच्ची डी. टी. पी. मुद्रित प्रत माझेकडे परत पाठविली व सोबतच 'ज्ञानयोगी हा त्यांचेकडून अपेक्षित लेखसुद्धा पाठविला. महिनाभरात आवश्यक त्या औपचारिकता पूर्ण करून छायाचित्रे, हस्ताक्षर-नमुने, सहयोगी लेखकांचा परिचय, अध्यक्षीय मनोगत यांसकट गौरवग्रंथाची मुद्रणप्रत तयार करून ती मुद्रणार्थ मंडळाच्या सुपूर्द करत आली. आज हा गौरवग्रंथ वाचकांचे हाती देताना कृतार्थतेचा आनंद अनुभवीत आहोत.

भाऊसाहेब उपाख्य डॉ. पंजाबराव देशमुख ही विदर्भाची एक अक्षय चेतना आहे. भारतीय समाजपुरुषाचे सत्त्व कष्टकरी कृषकात पाहाणाऱ्या आणि या कृषकाच्य आर्थिक विकासासाठी तसेच शैक्षणिक व सांस्कृतिक उत्थानासाठी उभे आयुष्य चंदनासारखे झिजविणाऱ्या भाऊसाहेबांनी प्रत्यक्ष राजकारणात पडून राजकीय सत्तेलासुद्धा

त्या कार्यासाठी अक्षरश: वाकविले. त्यांनी परिश्रमपूर्वक नावारूपास आणलेल्या शैक्षणिक संस्था, उद्योग प्रशिक्षण संस्था, क्रिडा प्रशिक्षण संस्था, कृषिशिक्षण तथा कृषिसंशोधन संस्था – इतकेच काय, आज नावारूपास आलेली कृषि विद्यापीठे – या साऱ्यांच्या रूपाने भाऊसाहेबांची स्मारके आज भारतभर विखुरलेली आहेत. महाराष्ट्र आणि मध्यप्रदेशातीलच नव्हेत; तर केन्द्र शासनातील मंत्रीपदावरून भारतभर त्यांनी राबविलेल्या कृषिविकासात्मक उपक्रमांमुळे पंजाबचेही शेतकरी 'पंजाब हमारा है' – म्हणून भाऊसाहेब पंजाबरावांना आपलेच मानत. 'जे का रंजले गांजले' – त्या गरीब, अशिक्षित, खेडूत कृषिवलांना आपलेपणाची माया देऊन धर्म–पंथ – पक्ष – प्रदेशातीत मानवधर्मी कणवेतून त्यांचे दु:सह जीवन सुसह्य करण्याचा व त्यात विकासाची बीजे रोवण्याचा प्रयत्न भाऊसाहेबांनी एखाद्या अखंड यज्ञासारखा तहहयात केला. राजकीय स्वातंत्र्याहूनही सामाजिक स्वातंत्र्य – आणि त्यासाठी शिक्षण व विकास यांना अधिक महत्त्व देणाऱ्या या क्रांतिकारी दृष्टीच्या दार्शनिकाने महात्मा फुल्यांचा वारसा पुढे नेत, विखरून नि:सत्त्व झालेल्या बहुजन समाजात शिक्षणाद्वारे अस्मितेची ज्योत चेतविली. स्वातंत्र्यप्राप्तीनंतरही त्यांचे हे कार्य अखंडितपणे सुरूच राहिले.

भारतीय राज्यघटनेची सिद्धता होत असताना भाऊसाहेब घटना मसुदा समितीवर होते, ते केवळ साक्षी म्हणून नव्हे. आवश्यक त्या त्या सर्व विचारवळणांवर मूलभूत अशा अंतर्दृष्टीसह विधायक सहभाग देत देत कृषिवलांची व दरिद्रनारायण अशा कष्टकरी जनसामान्यांची वस्तुस्थिती निश्चयेकरून लक्षात घेण्यास व त्यानुसार आपल्या राज्यघटनेत इष्ट तरतुदी करण्यास त्यांनी समितीला भाग पाडले; व एक संतुलित अशी राज्यघटना उभारली जाण्याच्या प्रक्रियेत जनसामान्यांचे प्रतिनिधी बनून त्यांनी भरीव योगदान दिले. जाती–पाती तथा अन्य मानव्यविघातक परंपरा व अंधश्रद्धा यांना सरसकट मोडीत काढणारी अंतरात्म्यातील प्रखर चेतना प्रकट करून सर्व अभावग्रस्त बहुजनसमाजात एकीची आणि राष्ट्रीयत्वाची भावना त्यांनी प्रज्ज्वलित केली. सामाजिक न्यायाच्या वेदीवर क्षुद्र सांप्रदायिकता ओवाळून टाकून; मानवी अधिकारांबरोबरच गुणवत्तेची महत्ता कायम राखण्यासाठी प्रसंगी उच्चतम पदांचा त्याग करूनही – एका उच्चतर पातळीच्या प्रगल्भ नेतृत्वाचा परिचय दिला. राजकारणाच्या आखाड्यातही अत्यंत खिलाडू वृत्तीने प्रतिपक्षीयांना नामोहरम करीत करीत ते या विदर्भाचे एक वादातीत असे मुक्तिकेन्द्र बनले व जनमानसाच्या सिंहासनावर निरपवादपणे विराजमान झाले. समकालीन विकासोन्मुख शक्तींना प्रोत्साहन देत व त्याचवेळी अंधश्रद्धांना तिलांजली देत समाजाला आधुनिक धर्मदृष्टी देणाऱ्या श्रेष्ठ संत गाडगे महाराज व राष्ट्रसंत तुकडोजी महाराज या संतद्वयाच्या बरोबरीनेच; पण वेगळ्या अशा शैक्षणिक, राजकीय व मानवाधिकारप्रेरित विधिसिद्धता – या पातळ्यांवर, केवळ विदर्भाचा

अगर महाराष्ट्राचाच नव्हे, तर एकूणच भारतीय जनजीवनाचा विकास साधण्याचे महत्कार्य या जनहितकारी प्रेरणेच्या आधुनिक भगीरथाने त्याच्या उण्यापुऱ्या ६७ वर्षांच्या आयुष्यात करून दाखविले आहे. (वरकरणी हे विधान अत्युक्तिपूर्ण वाटण्याचा संभव आहे; परंतु भाऊसाहेबांच्या कार्याचा एकंदर आवाका व शिक्षण तथा कृषिक्षेत्रात राष्ट्रपातळीवर त्यांनी पाडलेले लवादासारखे अभिनव क्रांतिकारी पायंडे ध्यानात घेणाऱ्यास या विधानाची सत्यता सहज पटेल.) – आणि आधुनिक विदर्भाच्या एकंदर जडणघडणीत तर, राष्ट्रसंत तुकडोजी आणि संत गाडगेबाबा यांच्या बरोबरीनेच भाऊसाहेबांचाही सिंहाचाच वाटा आहे.

अशा या कृषिवलभाग्यविधात्या भाऊसाहेब डॉ. पंजाबराव देशमुखांच्या कर्तृत्वाचे पवाडे त्यांच्या या गौरवग्रंथात प्रारंभी दोन समकालीन प्रतिभावंतांनी गायिले आहेत; तर अखेरीचा मुजरा आजच्या पिढीच्या प्रतिभावंताने बजावला आहे. त्या दोन समकालीन प्रतिभावंतांतील भाऊसाहेबांचे प्रथम चरित्रकार व प्रसिद्ध संतचरितसंशोधक **'सुदाम' सावरकरांनी 'शतवंदने'**तून ह्या चतुरस्त्र लोकमहर्षीची मानसपूजा बांधली आहे; तर आधुनिक मराठीत अभंगाचे पुनरुज्जीवन करणाऱ्या **'मधुकर' केचे** यांनी **'ज्ञानाग्नी'**तून भाऊसाहेबांनी चेतविलेल्या महाजाणिवेला त्याच जाणिवेचे अर्घ्य दिले आहे. ग्रंथाच्या समारोपस्थळी भाऊसाहेबांच्या स्मृतीला शतकाचा मुजरा करताना आधुनिक जनकवी **'सुधाकर' गायधनी** यांनी **'जनसंस्कृतीचा पोशिंदा'** म्हणून भाऊसाहेबांन जननायकत्व बहाल केले आहे.

अशा या काव्यपुष्पांच्या कोंदणात भाऊसाहेबांच्या व्यक्तिमत्वाच्या विविध पैलूंचे दर्शन घडवून देणाऱ्या शब्दबंधांची आरास मांडण्याचा नम्र प्रयत्न विविध क्षेत्रांतील अभ्यासक – लेखकांच्या सहाय्याने आम्ही केला असला; तरी त्या शब्दसुमनांजलीचे वास्तविक श्रेय त्या त्या ज्ञानक्षेत्रात अधिकार असणाऱ्या या गौरवग्रंथाच्या सहयोगी लेखकांनाच आहे.

या ग्रंथाच्या सुरुवातीस डॉ. पंजाबराव देशमुख नावाच्या **'मानवतेच्या महामेरू'**चे चरित्र संकीर्तन **डॉ. सुभाष सावरकर** व **प्रा. कृष्णकान्त पराते** या जननिष्ठ लेखकद्वयांनी औचित्यमर्यादेचे भान राखून बहुश: वस्तुनिष्ठ पद्धतीने केले आहे; तर भाऊसाहेबांच्या कर्तृत्व मंदिरातील विविध कार्यदालनांपैकी शैक्षणिक दालन उघडून दाखविण्याचे औचित्य शिक्षणक्षेत्रात आचार्य पदवीसाठी प्रबंध सिद्ध केलेल्या **प्रा. सौ. अनुप्रित देशमुख** यांनी सांभाळले असून भाऊसाहेबांची नात असलेल्या या प्राध्यापिकेने या लेखात सामाजिक न्यायाच्या आधारशिलेवर उभारलेली स्त्रीपुरुष संदर्भातील भाऊसाहेबांची समतादृष्टीही विशद केली आहे.

लेखकांच्या नव्या पिढीचे आशास्थान असलेले प्रसिद्ध वक्ते व समीक्षक प्राचा

**डॉ. श्रीकान्त तिडके** यांनी सुद्धा, बळीच्या राज्याचे स्वप्न साकार करू पाहाणाऱ्या भाऊसाहेबांचे पहिले लक्ष्य शिक्षणसंस्था व त्यानंतरचे कृषिशिक्षण – प्रशिक्षणसंस्था हेच असल्याचे स्पष्ट केले आहे. अकोल्याच्या डॉ. पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठाचे माजी कुलगुरू व कृषिविज्ञानाचे अधिकारी (स्व.) **हिं. ब. उलेमाले** यांनी, भाऊसाहेबांच्या जन्मकाळी असलेली ग्रामीण – कृषकांची दयनीय स्थिती व एकूणच पर्यावरण परिस्थिती स्पष्ट करून भाऊसाहेबांच्या चौफेर प्रयत्नांमुळे त्यांत आलेला बदलाव – इतकेच नव्हे तर कृषिवलाच्या विचारपद्धतीत आलेले अस्मितापूर्ण परिवर्तन स्पष्ट केले आहे; व गाडगेबाबांच्या झाडूबरोबरच भाऊसाहेबांचा खडूही डोळ्यांसमोर ठेवून वर्तमान पिढीला त्यांच्या कर्तृत्वाचा आदर्श गिरविण्याची कळकळीची विनंती केली आहे.

भाऊसाहेबांचा प्रत्यक्ष सहवास (व कृपाप्रसादही) लाभलेले समाजशास्त्राचे आचार्य **डॉ. मुरलीधर देशमुख** यांनी भाऊसाहेबांची मंत्री–पदग्रहणा पूर्वीची रचनात्मक शक्ती आणि त्यामागची त्यांची इच्छाशक्ती अधोरेखित केली आहे; तसेच मंत्रीपद ग्रहणानंतरची शासनातील त्यांची कार्यक्षितिजे विशद करतानाच त्यांच्या लोककल्याणकारी कार्यशैलीची व प्रशासनिक क्षमतेचीही सोदाहरण चर्चा केली आहे. कृषि आणि सहकार क्षेत्रांवरील त्यांचा भर, भारत कृषक समाजाची स्थापना व विस्तार, ग्रामीण महाविद्यालये, कस्तुरबा हेल्थ सेंटर, ग्रामीण महिला मंडळे, ग्रामोद्योग मंडळे, व्यायामशाळा आदि संस्थांची त्यांनी केलेली उभारणी, वेद–वाङ्मयापासून आधुनिक समाजशास्त्रांपर्यंतची त्यांची ज्ञानसाधना आणि भारताच्या संविधानास जनसामान्यांच्या आकांक्षांचा आरसा बनविण्यासाठी त्यांनी उभारलेली चर्चाविवादांची आरास, समाजक्रांतीच्या मार्गात त्यांनी वैयक्तिक जीवनापासून तर आंतरराष्ट्रीय क्षितिजापर्यंत घेतलेली गरुडझेप व अखेरीस त्यांनी संकल्पिलेली लोकविद्यापीठाची महाकल्पना – या साऱ्यांचा यथोचित ऊहापोह केला आहे.

नव्या दमाचे लेखक, कवी व समीक्षक **प्रा. नीळकण्ठ गोपाळ मेंढे** यांनी भाऊसाहेबांच्या कृतिपरतेचे सूत्र जनसंस्कृतीच्या प्रच्छन्न वैभवाशी जोडले असून त्यांचे संशोधन, त्यांची बॅरिस्टरी, त्यांचा मिश्रविवाह, अस्पृश्यता निवारणासाठी अमरावतीच्या अंबादेवी मंदिरात त्यांनी केलेले प्रयत्न, श्रद्धानंद छात्रालयाची त्यांनी केलेली स्थापना, हिंदुमहासभेच्या मानसिकतेला त्यांनी दिलेला काटशह, कर्जबाजारी कृषकांना नवजीवन देणाऱ्या कर्जलवाद बिलाची त्यांनी केलेली यशस्वी सिद्धता व उपयोजन, ब्राह्मणेतर पक्षालाही प्रकट विरोध करण्याचे त्यांनी दाखविलेले धैर्य, शिक्षण क्षेत्रातील त्यांचे असाधारण कार्य, हिंदु देवस्थान संपत्ती बिलाच्या सिद्धतेसाठी त्यांनी केलेले प्रयास, भारत सेवक दलाची निर्मिती, भारतीय राज्यघटना निर्मितीतील त्यांचा सहभाग, दिल्ली येथे अभूतपूर्व अशा 'कृषि प्रदर्शनी'चे त्यांनी केलेले अविस्मरणीय आयोजन – आणि

एवढ्या सगळ्या अचाट उपक्रमांनंतरही त्यांच्या वृत्तीत दिसून येणारा आतिथ्यशील खुलेपणा आणि मनाचा अहंकारविरहित उमदेपणा – हे संतांनाच शोभणारे अलंकार धारण करणाऱ्या या जननायकाची मानसपूजा बांधली आहे.

महानुभाव साहित्याचे व्यासंगी संशोधक **प्रा. पुरुषोत्तम नागपुरे** यांनी समकालीन विदर्भातील राजकीय नेतृत्वाच्या पार्श्वभूमीवर भाऊसाहेबांच्या नेतृत्वगुणांची वैशिष्ट्ये शोधताना ह्या नेतृत्वामागची प्रेरणा शुद्ध लोककल्याणाची असल्याची ग्वाही दिली आहे. नागर क्षेत्रातील अन्य पुढारी आणि ग्रामीण नेतृत्वाचे भाऊसाहेब यांच्यातील भेद स्पष्ट करताना, निखळ समाजोत्थानाचे कुंठित झालेले कार्यच भाऊसाहेब पुढे नेत होते हे त्यांनी स्पष्ट केले आहे. ब्राह्मणेतरांच्या ब्राह्मणद्वेषाची बाधा न झालेले भाऊसाहेबांचे नेतृत्व हे कृषकांच्या उत्थानकार्यामुळे त्यांना भौमर्षी बनवून गेले. नव्या पिढीच्या शिक्षण–संस्करणाकरिता प्रसंगी स्वत:चा बंगला गहाण टाकणारा हा कलंदर नेता जनतेच्या नावे प्रत्यक्ष सरकारवरही टीकास्त्र सोडायला कमी करीत नाही – हे लेखक येथे दाखवून देतात. राजकारणातल्या पक्षोपपक्षांच्या पलीकडे असलेले भाऊसाहेब प्रसंगी घटना समितीत व लोकसभेतही अत्यंत साक्षेपी, अभ्यासू व चिकित्सक मोहरे म्हणून जनहितार्थ सदैव लढत राहिले. या थोर लोकनेत्याच्या अशा सतत संघर्षशील सामर्थ्याचे रहस्य त्यांच्या आध्यात्मिक पिंडात असल्याचे अखेरीस ते स्पष्ट करतात.

शिक्षणशास्त्राचे थोर अभ्यासक तथा महात्मा फुले आणि सावित्रीबाई फुले यांचे चरित्रसंशोधक **डॉ. मा. गो. माळी** यांनी तर भाऊसाहेब हे महात्मा फुल्यांचे सच्चे वारसदार असल्याचे घोषित केले आहे. भाऊसाहेबांची कृषिविषयक अंतर्दृष्टी व औपचारिकच नव्हे तर औद्योगिक शिक्षणविषयक त्यांच्या कार्याचा झपाटा यांचा उचित संदर्भ घेऊन त्यांनी हेदेखील स्पष्ट केले की राजकीय क्षेत्रातील त्यांच्या स्पृहणीय यशाचाही उपयोग भाऊसाहेबांनी खुबीदारपणे जनसामान्यांच्या शैक्षणिक तथा कृषिविषयक विकासासाठी करून घेतला.

नव्या पिढीतले राज्यशास्त्राचे व्यासंगी प्राध्यापक व पत्रकार **प्रा. सुभाष गवई** यांनी भारतीय राज्यघटना–निर्मितीत भाऊसाहेबांचे योगदान स्पष्ट करताना शासकीय पातळीवर जातीविषयक उल्लेख गाळण्याबाबतचे विधेयक, संपत्ती करावरील विधेयक, राष्ट्रीय सैनिक दलासंबंधीचे विधेयक तसेच कृषकांच्या हिताविषयीची विधेयके या सर्वांविषयी भाऊसाहेबांनी घेतलेल्या प्रखर विधायक भूमिकांचा तपशील सादर करून भाऊसाहेबांनी संविधानावरील समारोपीय भाषणात केलेल्या अत्यंत परखड टीकेचेही महत्त्व या लेखातून विशद केले आहे. शिक्षण व कृषी यांबरोबरच तळागाळातील लोकांच्या विकासार्थ महात्मा फुल्यांचा पुरोगामी विचार भारतीय संविधानात रुजविण्यासाठी त्यांनी केलेल्या प्रयत्नांना ते मानाचा मुजरा करतात.

गेल्या पिढीतले मानव्यशास्त्रांचे चौफेर व्यासंगी व पुरोगामी समाजचिंतक **प्राचार्य पद्माकर काणे** यांनी भाऊसाहेबांच्या कार्यकर्तृत्वाचे आकलन सादर करताना त्यांच्या असाधारण अशा 'अंतर्दृष्टी' (Vision) वर भर दिला आहे. पोथीनिष्ठ विचार करण्याची मुळातच निकड न भासणाऱ्या भाऊसाहेबांनी या अंतर्दृष्टीच्या प्रकाशातच हिंदुधर्म, त्यातील रूढी-परंपरा, हैद्राबादच्या निझामाने देऊ केलेली देणगी, कर्ज लवाद विधेयकाची सिद्धता, सक्तीचे प्राथमिक शिक्षण, शिक्षणसंस्थांची व वसतिगृहांची उभारणी, अन्नधान्याची परदेशात निर्यात करण्यात मिळविलेले अभूतपूर्व यश, घटनासमितीत डॉ. आंबेडकरांशी झालेल्या शाब्दिक चकमकींत विवेकाला पटलेल्या समाजस्थितीचे निर्भीडपणे कथन करण्याची प्रज्ञा किंवा डॉ. वि. भि. कोलते - डॉ. ग. त्र्यं. देशपांडे - डॉ. श्री. भा. वर्णेकर व प्रा. कुसुमावती देशपांडे यांच्या प्रकरणी त्यांनी घेतलेली निरामय गुणवत्ता-पूजक भूमिका नीट समजून घेतली पाहिजे. डॉ. पंजाबराव हे ध्येयवादात अग्रणी राहिले, प्रयत्न व त्यागात अग्रभागी राहिले, सत्तासंघर्षात कटाक्षाने फक्त प्रतिगाम्यांशीच झुंजले; आणि त्यांच्या अंतर्दृष्टीने दृष्टिपथात आणून दिलेल्या चौफेर जनकल्याणाच्या ध्येयसिद्धीसाठीच त्यांनी सत्ताप्राप्तीचे प्रयत्न केले - हे एकंदरीत प्राचार्य काण्यांच्या विवेचनाचे सार आहे.

एकेकाळच्या झुंजार फॉरवर्ड ब्लॉकचे छात्रनेते व भूतपूर्व आमदार तथा महाराष्ट्राचे राज्यमंत्री **श्री. सुरेन्द्र भुयार** भारतीय स्वातंत्र्याच्या चळवळीत भाऊसाहेबांचे योगदान निश्चित करण्याचा प्रयास करताना - राजकीय स्वातंत्र्यापेक्षा सामाजिक उत्थान-समता व विकास या मूल्यांना भाऊसाहेब अधिक महत्त्व देत असल्याचे स्पष्ट करतात. त्याचवेळी, प्रत्यक्ष तुरुंगात न जाताही स्वराज्य प्राप्तीकरिता त्यांनी केलेले भरीव योगदान अधोरेखित करताना त्यांना - देवास संस्थानात संस्थानिक समुदायाला भाऊसाहेबांनी केलेले आवाहन, दुसऱ्या महायुद्ध प्रसंगी इंग्रजांना सैनिकी मदत न देण्याबाबत जनतेला त्यांनी केलेली जाहीर विनंती, आझाद हिंद सेनेच्या जगन्नाथराव भोसले यांची केस लढविताना त्यांनी दाखविलेली जिद्द, तीनदा लोकसभेवर निवडून गेल्यावर लोकसभा सदनात - तसेच घटनासमितीच्या बैठकींमध्येही त्यांनी उपस्थित केलेल्या चर्चा व लोकहितपर मुद्दे - या सर्वांमधून भाऊसाहेबांच्या राष्ट्रीय भूमिकेची उज्ज्वलता प्रतीत होते; इतकेच नव्हे तर साहित्यिकांना मार्गदर्शन करतानाही याच राष्ट्रीय जननिष्ठेचा वेळोवेळी पुरस्कार करताना भाऊसाहेब दिसतात. नव्या पिढीतले प्रसिद्ध कथाकार, कवी तथा विचारक **प्रा. सतीश तराळ** हे संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळीत भाऊसाहेबांचे स्थान निश्चित करण्याच्या प्रयत्नात प्रारंभी त्या चळवळीचा इतिहास कथन करून संपूर्ण राजकीय पार्श्वभूमीचा पट मांडून दाखवितात. संयुक्त महाराष्ट्राचा पुरस्कार करणाऱ्यांत भाऊसाहेबांबरोबर खेडकर; तर विरोधात बियाणी, कन्नमवार आदि महाविदर्भवादी

नेते असल्याचे सांगून, फाजल अली कमिशनचा अहवाल, नेहरू – स. का. पाटील – मोरारजीभाई यांची भूमिका विरोधी असताना देखील संयुक्त महाराष्ट्राची चळवळ ही जनआंदोलनाच्या विराटरूपात उभी करण्यात भाऊसाहेबांचे योगदान महत्त्वाचे असल्याचे स्पष्ट करतात. मात्र ज्या एका विश्वासाने भाऊसाहेबांनी हे सर्व केले होते, त्या त्यांच्या विश्वासालाच आज तडा गेला असल्याचे विदारक सत्य नमूद करायलाही प्रा. तराळ चुकत नाहीत.

भाऊसाहेबांचे स्वीय सचिव तथा भाऊसाहेबांच्या स्वप्नातल्या लोकविद्यापीठाचे पहिले सन्मान्य डि. लिट्., ज्येष्ठ सत्यशोधक **श्री. काकासाहेब** उपाख्य **दौलतराव गोळे** हे भाऊसाहेब व निजाम यांच्यामधल्या तथाकथित वादग्रस्त ठरलेल्या संबंधावर प्रकाशझोत टाकताना, समकालीन सामाजिक वातावरण व त्यात भाऊसाहेबांची शिक्षणसंस्था – विकासाची ईर्ष्या तसेच उद्दाम राजकीय धमक्यांना भीक न घालणारे भाऊसाहेबांचे धाडसी व्यक्तित्व यांचेही दर्शन घडवून देतात. निजामाकडून देणगी प्राप्त होताच 'पंजाबरावाने निजामाला वऱ्हाड विकला' – अशी राजकीय कोल्हेकुई त्याकाळी का व कशापायी उठली याबद्दल विवेचन करताना भाऊसाहेबांचे दुर्दान्त कणखर नेतृत्व व त्यांच्यासाठी जिवाची कुरवंडी करायला सिद्ध असलेल्या अनुयायांचे निष्ठापूत आचरण यांचेही मोठे मनोज्ञ दर्शन श्री. काकासाहेब या लेखाद्वारे घडवून देतात.

नव्या पिढीतले शिक्षणतज्ज्ञ तथा जनकथाकार–कवी व समाजचिंतक **प्राचार्य अनिल प्रांजळे** यांनी भाऊसाहेबांच्या निवडक व्याख्यानांचा उभा छेद घेऊन अत्यंत सूक्ष्म व संतुलित दृष्टीने त्या व्याख्यानांमधील जननिष्ठेची प्रत तपासण्याचा महत्त्वाकांक्षी प्रयत्न त्यांच्या प्रस्तुत लेखाद्वारे केला आहे. भारतीय संविधानाच्या मसुद्यातील त्रुटी दर्शविणाऱ्या भाऊसाहेबांच्या व्याख्यानांचा तर विचार यात केलेला आहेच; शिवाय रूढी–अंधश्रद्धांबाबतचे भाऊसाहेबांचे प्रखर चिंतन, शेतकरी मंच स्थापन करतानाची त्यांची भूमिका, लोकविद्यापीठ स्थापनेमागची त्यांची तळमळ – हे महत्त्वाचे घटकसुद्धा त्या त्या प्रसंगीच्या त्यांच्या व्याख्यानांमधून जोखून विशद केले आहेत. इतकेच काय, लोकसभा सदनात सादर करण्यात आलेल्या काही जनविरोधी प्रस्तावांना विरोध करतानाचीही त्यांची व्याख्याने यास्थळी या दृष्टीतून अभ्यासण्यात आली आहेत. भाऊसाहेबांच्या शिक्षणकार्याच्या वरदानाने परम पुनीत झालेल्या पहिल्या पिढीतल्या महिला विचारवंत तथा राष्ट्रीय सेवा योजनेच्या खंद्या मार्गदर्शक **प्रा. त्रिवेणी फरकाडे** यांनी भाऊसाहेबांच्या व्यक्तिमत्वाच्या एका आगळ्यावेगळ्या पैलूवर प्रकाशझोत टाकून भाऊसाहेबांची काव्यात्म वृत्ती आणि सौंदर्यदृष्टी विविध घटना–प्रसंगांवरून स्पष्ट केली आहे. भाऊसाहेबांच्या लेखी कलात्मक आविष्कार व सांस्कृतिक गतिविधी यांना फा

रचे स्थान होते. कलाक्षेत्रात त्यांना केवळ रुचीच नव्हे तर विलक्षण गतीही होती ही वस्तुस्थिती त्रिवेणीताईंनी यास्थळी स्पष्ट केली आहे. भाऊसाहेबांच्या कलाजाणिवांच्या ळाशी जी एक निरोगी मानसिकता, तन्मयता व आनंदभावना होती तिचा वेध घेताना जननिष्ठा, जीवननिष्ठा व जनसंस्कृतीबद्दल अपार भक्ती - या त्रिविध वैशिष्ट्यांचा यांनी यास्थळी आवर्जून उल्लेख केला आहे.

गेल्या पिढीचे संतसाहित्याभ्यासक **श्री. बाबा मोहोड** यांनी समकालीन लोकाभिमुख वैदर्भीय संत श्री. गाडगेबाबा व राष्ट्रसंत तुकडोजी महाराज यांच्या सोबतच राष्ट्रजाणिवेचे शिल्पकार महात्मा गांधी व महात्म्यांचे महात्मा जोतिबा फुले यांच्या तोलाचे कार्यकर्तृत्व धारण केलेल्या भाऊसाहेबांची गणना 'आधुनिक विदर्भाच्या जडणघडणीचे शिल्पकार' - या नात्याने उपरोक्त संतांच्या कोटीतच केली आहे.

गेल्या पिढीतले साक्षेपी विचारक तथा इतिहासाचे व्यासंगी अभ्यासक **प्रा. कृ. ल. महाले** यांनी भाऊसाहेबांनी १९२६ साली ऑक्सफर्ड विद्यापीठात डॉक्टरेटकरिता सादर केलेल्या प्रबंधाचे अंतरंग उकलून दाखवून विद्वत्ताप्रचुर अशा त्या इंग्रजी भाषेतील प्रबंधाचा परिचय सामान्य वाचकांना अत्यंत सुबोध अशा शैलीत घडवून दिला आहे. 'द ओरिजिन अँड डेव्हलपमेंट ऑफ रिलिजन इन वेदिक लिटरेचर' या त्यांच्या प्रबंधाबद्दल 'वक्ता दशसहस्त्रेशु' या वैशिष्ट्याने गौरवान्वित अशा **प्राचार्य राम शेवाळकरां**नीही भाऊसाहेबांच्या वैचारिक आवाक्याबद्दल धन्योद्गार काढीत भाऊसाहेबांना 'ज्ञानयोगी' हे समर्पक विशेषण बहाल केले आहे. एवढेच नव्हे तर भाऊसाहेबांच्या राजकीय, शैक्षणिक व कृषिविषयक अवतारकार्याचा पाया याच ज्ञानयोगात असल्याचा निर्वाळाही दिला आहे. भाऊसाहेबांचा हाच डॉक्टरेटचा प्रबंध अभ्यासून, मार्क्स - फुले - आंबेडकर विचारसमन्वयातून 'सत्यशोधक मार्क्सवादी' तत्त्वज्ञानाची मांडणी करणारे आधुनिक प्राच्यविद्येचे अधिकारी विद्वान **कॉ. शरद पाटील** यांनी मात्र भाऊसाहेबांच्या अन्वेषणपद्धतीला काळानुरूप पडलेल्या मर्यादांची नोंद घेतली असून त्यांच्या व्यक्तिगत, राजकीय व सामाजिक पातळीवरील समर्पित जीवनाचे सत्त्व जी तांत्रिकी श्रुती, ती ते या अन्वेषणपद्धतीत रूपान्तरित करू शकले नसल्याचे निरीक्षण नोंदविले आहे. त्यांच्या मते भाऊसाहेबांनी या प्रबंधाच्या उभारणीत अवलंबिलेली अन्वेषणपद्धती ही 'वैदिकी श्रुती' वर अधिष्ठित आहे. तसेच जादू, माया व धर्म यांच्यामधील मूलभूत संबंध, धर्मोगमाच्या घटकांचे विवरण, युरोपातून येथे आलेल्या आर्यांची संस्कृती, एतद्देशीयांच्या दैवतांची (निर्ऋती, दूर्गा, उषा इ.) व आर्यांच्या दैवतांची (वरुण, इन्द्र, विष्णू इ.) उत्पत्ती, प्रकृती व विकास, वर्णाची आर्य-अनार्यता, सुरापान निषिद्धता, वैदिक कालखण्डाचे दोन पक्ष, तत्त्वज्ञान व धर्म यांची अभिन्नता, उपनिषदांमधील ज्ञानाची "गुप्तता" - यांबाबतच्या भाऊसाहेबांच्या

विचारांमधील तृटी नोंदवून या साऱ्यांच्या मुळाशी भाऊसाहेबांनी अवलंबिलेली आर्यप्रधान एकप्रवाही अन्वेषणपद्धती हीच या तृटींना कारणीभूत असल्याचे कॉ. पाटील यांनी नमूद केले आहे.

नव्या पिढीतले कवी – समीक्षक व वक्ते **डॉ. रा. गो. चवरे** यांनी भाऊसाहेबांच्या व्यक्तित्वातील विविध पैलूंचा वेध घेऊन त्यांच्यात ज्ञानमहर्षी, कर्मयोगी व राष्ट्रभक्त यांचा सुखद संगम झाला असल्याची वस्तुस्थिती भाऊसाहेबांच्या आयुष्यातील नेमक्या प्रसंगांच्या आधारे स्पष्ट केली आहे. अखेरीस 'ज्ञानयज्ञाच्या पूर्ततेसाठी एका कर्मयोग्याची ही तगमग भक्ताच्या आर्ततेने परिप्लुत नाही का ?' – या वक्तृत्वपूर्ण प्रश्नालंकारासह भाऊसाहेबांच्या महान व्यक्तिमत्वापुढे डॉ. चवरे नतमस्तक झालेले आहेत. भाऊसाहेबांच्या शिक्षण प्रसार कार्याच्या फलस्वरूप तंत्रविज्ञानक्षेत्रात कार्यरत असणारे, साहित्य व समाजाचे साक्षेपी अभ्यासक इंजिनिअर **श्री. प्रकाश आमले** यांनी समकालीन संत, तत्त्वज्ञ व प्रतिभावंत यांच्या उद्गारांमधून भाऊसाहेबांच्या क्रांतिकार्याचे महत्त्वमापन केले आहे. हे करताना राष्ट्रसंत तुकडोजी महाराज, प्रा. अनंत काणेकर, न्या. एस. एस. भोसले, प्रा. या. वा. वडस्कर, न्या. के. टी. मंगलमूर्ती, प्रा. सुधाकर मोहोड, प्रा. वा. सी. काळे, श्री. द्वा. भ. कर्णिक, डॉ. शिवाजीराव पटवर्धन, श्री. माधव गडकरी, श्री. एम्. एस्. अणे, श्री. 'सुदाम' सावरकर, प्रा. भाऊ भालेराव, कवी श्री. पां. श्रा. गोरे, श्री. वा. न. घोरपडे, डॉ. पां. वि. भुगुल, श्रीमती नलिनीताई लंढके, डॉ. वि. भि. कोलते, डॉ. मधुकर आष्टीकर व प्रा. मधुकर केचे या विचारक/ लेखकांची यथोचित साक्षच त्यांनी काढली आहे; व या विराटरूपदर्शना अन्ती, अनेक कल्पनारम्य "शिव" तत्त्वे प्रत्यक्षात उतरविणाऱ्या भाऊसाहेबांच्या व्यक्तित्व आणि कर्तृत्वापुढे ते नतमस्तक झाले आहेत.

नव्या पिढीच्या नव्या दमाचे कवी – समीक्षक **श्री. गिरीश खारकर** यांनी भाऊसाहेबांच्या सार्वजनिक पातळीवरील कार्यशैलीची वैशिष्ट्ये स्पष्ट करताना त्यांच्या चरित्रातील कितीतरी तेजस्वी घटनांना उजाळा दिला आहे. उच्च पदावर असतानाही स्वत: एका सामान्य कार्यकर्त्याचा धर्म जोपासणाऱ्या भाऊसाहेबांना त्यांनी – 'उपेक्षितांना ज्ञानगंगेचा लाभ मिळवून देणाऱ्या आधुनिक भगीरथा'ची उपमा दिली आहे. भाऊसाहेबांच्या शैक्षणिक व सामाजिक कर्तृत्वावर ग्रंथनिर्मिती केलेल्या व त्यांचेवर एक चरित्रात्मक कादंबरीही लिहिण्याचा संकल्प सोडलेल्या **प्रा. सौ. कल्पना देशमुख** यांनी खाजगी पातळीवरील भाऊसाहेबांच्या जीवनशैलीची वैशिष्ट्ये कथन करताना तळागाळातल्या लोकांसाठी जीवन कष्टविणाऱ्या भाऊसाहेबांचे गौरवगीतच जणू गाइले आहे, व सम्यक् अभ्यासाअंती निष्कर्ष काढला आहे की, भाऊसाहेबांचे व्यक्तिगत जीवनसुद्धा समाज समर्पित झालेले होते. त्यामुळे भाऊसाहेबांना विदर्भाच्या मातीत

जन्मलेले एक 'पुरोगामी संत'च त्या मानतात.

वर निर्देशिलेल्या लेखकांपैकी किमान अर्धे तरी लेखक - कवी असे आहेत ज्यांनी भाऊसाहेबांचे कार्य ऐन भरात असतानाच्या जनचेतनेचा अनुभव घेतला आहे; आणि किमान दोन तरी लेखक असे आहेत ज्यांनी भाऊसाहेबांच्या क्रांतिकार्यात प्रत्यक्ष सहभाग दिलेला आहे. त्यांच्या मते तर भाऊसाहेब हा निसर्गाचा एक दैवदुर्लभ असा चमत्कारच (a rare phenomenon) होय! जनसामान्यांच्या उत्कर्षाचा ध्यास घेतलेले असे एक दुर्लभ व्यक्तित्व, जे स्वत:च्या अंतर्दृष्टीला भावले ते प्रत्यक्षात आणण्यात 'सत्य-असत्यासी मन केले ग्वाही' - अशा दुर्दान्त वृत्तीने आयुष्यभर केवळ झपाटल्यासारखे कार्यरत राहिले. या व्यक्तीकडे ना ज्ञानाची उणीव ना नेतृत्वगुणांची वानवा ना मानवभक्तीचे उणेपण.

अशा तुकाराम वृत्तीच्या - किंवा त्याहीपेक्षा खरे म्हणजे जोतिबावृत्तीच्या - महान् व्यक्तीला रात्रंदिनी युद्धाच्या प्रसंगाला तोंड द्यावे न लागले तरच नवल. आंतरजातीय विवाहामुळे सरंजामी वृत्तीच्या स्वकीयांपासून तुटलेल्या भाऊसाहेबांना जसा सततचा अंतर्गत संघर्ष द्यावा लागला तसाच वर्णवर्चस्ववादी समाजधारणेपायी बाहेरही सततच्या संघर्षाचेच दिव्य करावे लागले. अशा या सततच्या युद्धोन्मुखतेतही त्यांनी ज्या अभिनव क्रांतिकारी कल्पना प्रसृत केल्या आणि अंगची विविधांगी प्रज्ञाप्रतिभा व कार्यशक्ती पणाला लावून त्या मूर्तरूपात आणण्यासाठी जिवाचे रान केले, त्या कल्पना अभ्यासल्या आणि त्या अनुरोधाने भाऊसाहेबांनी आक्रमिलेली यशाची शिखरे न्याहाळली तरी 'A rare phenomenon' म्हणून भाऊसाहेबांचे अढळ स्थान मान्य करावेच लागेल.

प्राचीन भारतीय संस्कृतीच्या मूळ धर्मनिरपेक्ष साम्यवादी रूपावरचा त्यांचा अढळ विश्वास पाहिला आणि कालमानाने त्यात मिसळलेल्या हीणावर सरळ हल्ला चढवण्याचा त्यांचा पवित्रा पाहिला की जोतिबा फुल्यांच्या या एकमेव वैदर्भीय वारसाच्या महानतेपुढे आधुनिक विचारक व नेतेसुद्धा नतमस्तक व्हावेत.

भाऊसाहेबांनी पुरस्कारलेल्या क्रांतिकारी कल्पना म्हणजे लोकविद्यापीठ, ग्रामीण उद्योगविकास आणि कृषी/भूमी संशोधन. आज अस्तित्वात आलेली कृषिविद्यापीठे व कृषिसंशोधन प्रतिष्ठाने पाहिली; लोकविद्यापीठ व मुक्तविद्यापीठांची समूर्त साकार झालेली प्रतिष्ठाने न्याहाळली; आणि ग्रामीण उद्योगविकासाच्या मार्गावर धापा टाकत का होईना, पण पावले टाकत असलेली आजची शासन यंत्रणा अवलोकिली तर भाऊसाहेबांचे द्रष्टेपण अधिकच नेमकेपणाने मनावर ठसते. ३० डिसेंबर १९५० रोजी भारताचे राष्ट्रपती डॉ. राजेन्द्र प्रसाद यांच्या हस्ते श्री शिवाजी लोकविद्यापीठाचे उद्‌घाटन प्रसंगी भाऊसाहेबांनी लोकविद्यापीठाच्या ध्येयधोरणांचे विवेचन करताना म्हटले होते (पाहावे : परिशिष्ट १) - 'आपल्या परंपराप्रिय व कालविसंगत अशा शिक्षणपद्धतीमुळेच

आपल्यांत मतभेद व विसंवाद निर्माण झाला आहे. देशाचे व स्वतःचेही खरे हित कशात आहे हे ओळखणारे निर्भय व आशावादी स्त्री-पुरुष तयार करावयास हवेत. लोक कल्याणावर व देशावर नितान्त श्रद्धा असलेले अत्युच्च ध्येय व उत्कृष्ट नीतिमत्ता असलेले लोक आपणास हवे आहेत. निरक्षरता व अज्ञान, अंधश्रद्धा व भेकडपणा, अनीतिमत्ता व चारित्र्यहीनता यांवर कडाडून हल्ला करून जनसामान्यांस या सर्व सोयी या लोकविद्यापीठाद्वारे उपलब्ध करून देण्याचा माझा मानस आहे.'

या लोकविद्यापीठाच्या माध्यमातून भाऊसाहेबांनी जनता कॉलेज आणि रूरल इन्स्टिट्यूट हे दोन महत्त्वाचे प्रकल्प राबविले हे सर्वविदित आहे. या कल्पनेचे रूपांतर अखेरीस ग्रामीण विद्यापीठात व्हावे अशी भाऊसाहेबांची मनस्वी इच्छा होती. त्यांच्या कर्तबगार वारसांपुढे हे एक आव्हानच असून त्याची पूर्तता हीच भाऊसाहेबांना खरीखुरी श्रद्धांजली ठरेल, असे वाटते.

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाने अशा या महान लोकनेत्याचा गौरवग्रंथ काढून उद्याच्या कर्तृत्वसंपन्न, प्रज्ञाशील व मानवप्रेमी पिढ्यांपुढे नेमका आदर्श ठेवण्याचे मोलाचे कार्य केले आहे. मंडळाचे अध्यक्ष प्रा. द. मा. मिरासदार यांनी या कार्यात सर्वतोपरी सहकार्य तसेच योग्य मार्गदर्शनही वेळोवेळी दिले. मंडळाचे सचिव श्री चंद्रकांत वडे यांनी वेळोवेळी आलेल्या अडथळ्यांवर मात करून कार्य सिद्धीस नेले. लोकमहर्षी भाऊसाहेब जन्मशताब्दी महोत्सव समितीचे अध्यक्ष श्री. वसंतराव धो यांनी दुर्मिळ छायाचित्रे व माहिती उपलब्ध करून दिली. अतिथी सदस्य श्री. बा मोहोड व श्री. सुमंतराव बोंडे यांनी सर्वतोपरी सहकार्य दिले. मायक्रोग्राफ गिरगाव मुंबईच्या श्री. प्रभाकर देसाई यांनी अल्पावधीत सुबक व निर्दोष मुद्रण करून देऊ ग्रंथाची शोभा वाढविली. संपादन समिती या सर्वांचे हार्दिक आभार व्यक्त करते.

भाऊसाहेबांसारख्या जननेत्याच्या गौरवार्थ ग्रंथ प्रकाशित केल्याबद्दल जनसामान्यांच वतीने महाराष्ट्र शासनाचे, मंडळाचे तसेच सर्व संबंधितांचे पुनश्च एकदा आभार.

**डॉ. सुभाष सावरक**

**– संपादक ( निमंत्रक**

**दि. १६ ऑक्टोबर, १९९९**



# ठळक घटनांच्या चित्रमय आठवणी



*भाऊसाहेबांचे मातृपितृदैवत तथा प्रेरणास्त्रोत*



डॉ. भाऊसाहेब, सौ. विमलाबाई आणि पुत्र अनंत



केन्द्रीय कृषी-मंत्री म्हणून राष्ट्रपती डॉ. राजेन्द्र प्रसाद यांचेकडून शपथ दिली जात असताना भाऊसाहेब



पंतप्रधान पं. जवाहरलाल नेहरुंच्या सत्कारप्रसंगी ना. जगजीवनराम, ना. लालबहादूर शा
व अन्य मान्यवर नेत्यांसमवेत भाऊसाहेब



राष्ट्रपती डॉ. सर्वेपल्ली राधाकृष्णान यांचेसमवेत भाऊसाहेब सपत्नीक



श्रीशिवाजी लोकविद्यापीठाच्या उद्घाटन प्रसंगी डॉ. राजेन्द्र प्रसाद यांना स्मृती भेटचिन्ह अर्पण करताना भाऊसाहेब

चीनचे पंतप्रधान चौ एन लाय समवेत दुभाषांसह भाऊसाहेब



सो. रशियाचे पंतप्रधान श्री. ख्रुश्चेव्ह व अध्यक्ष मार्शल बुल्गानेन यांना भारतीय कृषीप्रगतीची वाटचाल समजावून देताना भाऊसाहेब



युगोस्लाव्हिया येथे अध्यक्ष मार्शल टिटो यांच्याशी कृषीविषयक चर्चा करताना भाऊसाहेब



जागतिक कृषी प्रदर्शनीच्या संस्मरणीय सोहळ्याचे प्रसंगी राणी एलिझाबेथ यांच्या समवेत भाऊसाहेब



जागतिक कृषि प्रदर्शनी ( नवी दिल्ली ) प्रसंगी पाहुण्यांशी भारतीय कृषी विकासासंबंधी चर्चा करताना



रौप्य महोत्सव समारोप प्रसंगी भारत सरकारचे अन्न आणि कृषीमंत्री ना. स. का. पाटील समवेत भाऊसाहेब

भारत कृषक समजाच्या अधिवेशनात थोर साहित्यिक व विचारक कन्हैयालाल मुन्शी यांचा सत्कार करताना भाऊसाहेब



पंतप्रधान श्री. लालबहादूर शास्त्रींसमवेत कृषीमंत्री भाऊसाहेब


केन्द्रीय संरक्षणमंत्री श्री. यशवंतराव चव्हाण यांचेसमवेत भाऊसाहेब


श्रीसंत गाडगे महाराज व अनुयायांसोबत भाऊसाहेब



राष्ट्रसंत तुकडोजी महाराज व भजनसार्थींसमवेत भाऊसाहेब



कृतार्थतेच्या हर्षभरित भावमुद्रेत भाऊसाहेब : स्थानिक कृषकांसमवेत

## डॉ. भाऊसाहेब देशमुख यांचा संक्षिप्त जीवनपट

ेंबर १८९८ – जन्म-गीताजयंती-पापळ (जि. अमरावती) माध्यमिक शिक्षण - कारंजा लाड. महाविद्यालयीन शिक्षण - फर्ग्युसन कॉलेज, पुणे.

गस्ट १९२० – उच्च शिक्षणासाठी इंग्लंडला प्रयाण. एडिनबर्ग विश्वविद्यालयातील बुद्धिमान विद्यार्थी. व्हान्स डनलॉप संस्कृत स्कॉलर.

-२६ – "वेद वाङ्मयातील धर्माचा उद्‌गम आणि विकास" - या प्रबंधावर डॉक्टरेट प्राप्त. बॅरिस्टर-अॅट-लॉ. मोर्शीच्या हिंदु सभेत अस्पृश्य बंदीचा निषेध.

९२६-२८ – मायदेशी आगमन. अस्पृश्यता निवारण व मध्यप्रदेश आणि वऱ्हाड- शेतकरी संघाच्या कार्याचा श्रीगणेशा. विमलाबाई वैद्य यांच्याशी मिश्र विवाह. 'श्रद्धानंद वसतिगृह' या मानसकन्येचा जन्म. अमरावती जिल्हा कौन्सिलचे अध्यक्ष. शैक्षणिक विकासार्थ शिक्षणकरात १८ पै. वरून २७ पै. पर्यंत वाढ.

ेंबर १९३० – सर मॉंटेग्यु बटलर मंत्रीमंडळात शिक्षण-कृषि-सहकार व लोककर्म खात्यांचे मंत्री. या कालात महाविद्यालयांतून ट्युटोरियलची पद्धती, शेतकरी, मजूर आणि दलितांच्या मुलांना शाळा-प्रवेशास प्राधान्य, खादी विक्री-पदयात्रा.

-३२ – शिवाजी एज्युकेशन सोसायटी या शिक्षणक्षेत्रातील अग्रगण्य संस्थेची स्थापना व नोंदणी.
– मध्यप्रांत वऱ्हाड स्पोर्टस् अॅथ्लेटिक बोर्ड स्थापन. (अध्यक्ष)

-४६ – श्री शिवाजी शिक्षण संस्थेच्या आजीव अध्यक्षपदाचा त्यांच्या अनुपस्थितीत घेतलेला ऐतिहासिक निर्णय.
– आझाद हिंद खटला चालविला.
– घटना परिषद व लोकसभेचे सभासद डॉ. आंबेडकरद्वारा गौरव.

-५२ – नागपूर विश्वविद्यालयाचे सभासद. विद्यापीठातर्फे एल्. एल्. डी. ही पदवी प्रदान. राष्ट्रपती डॉ. राजेंद्रप्रसाद यांच्या शुभहस्ते शिवाजी लोकविद्यापीठाचे उद्घाटन.

| | |
|---|---|
| १९५० | – अखिल भारतीय प्राथमिक शिक्षक संघाचे नागपूर अधिवेशनाचे (उद्घाटक – पं. नेहरू) अध्यक्ष. अखिल भारतीय अविकसित समाज संघटना – संस्थापक व अध्यक्ष. |
| १९५२ | – भारताचे कृषिमंत्री. भातशेतीच्या अभिनव जपानी पद्धतीचा अवलंब. |
| १९५३ | – अखिल भारतीय मधुमक्षिका पालन संघटनेची स्थापना. संस्थापक- अध्यक्ष. अ. भा. मराठा शिक्षण परिषद, कोल्हापूर चे अध्यक्ष. |
| १९५४ | – विश्व वन काँग्रेस, आंतरराष्ट्रीय धान्य मंडळ – स्थापना. |
| १९५५ | – (१) 'भारत कृषक समाज' व (२) 'असंख्यांकरिता अन्न' या संस्थांचे संस्थापक व अध्यक्ष. |
| १९५६ | – तरुण कृषक संघाची स्थापना. आंतरराष्ट्रीय तांदूळ परिषदेचे अध्यक्ष. |
| १९५७-५८ | – भारताचे सहकार मंत्री. 'भारतीय कृषि-यंत्र सामग्री' या संघटनेचे संस्थापक व अध्यक्ष. 'अखिल भारतीय ताडगूळ महासभा'चे संस्थापक व अध्यक्ष. |
| १९५८ | – राष्ट्रीय कृषिविषयक सहकारी खरेदी-विक्री-संघाचे संस्थापक व अध्यक्ष. F.A.O. परिषदेला हिंदी प्रतिनिधी मंडळाचे नेतृत्व. जपानला भेट. |
| १९५८-५९ | – भारतीय कृषक सहकारी अधिकोषाची स्थापना. भारतीय कृषिशास्त्र-संस्थेचे संस्थापक आणि अध्यक्ष.<br>पुत्र अनंतकुमार यांचा विवाह. |
| १९५९-६० | – जागतिक शेतकी प्रदर्शनाचे दिल्लीस आयोजन. अध्यक्ष. (याप्रसंगी आयसेन हॉवर, ख्रूश्चेव, डॉ. राजेंद्रप्रसाद आणि पं. नेहरूद्वारा मुक्तकंठाने गौरव.) |
| १९६० | – भारतीय घटक राज्यांतील शेतकी मंत्र्यांच्या मंडळाचे नेते म्हणून रशियास प्रयाण. एका वर्षात सात महाविद्यालये स्थापण्याचा जागतिक विक्रम. |
| २६/१२/१९६० | – महाराष्ट्राचे तत्कालीन लोकप्रिय मुख्यमंत्री श्री. यशवंतराव चव्हाण यांचे अध्यक्षतेखाली हीरक महोत्सवाचा नेत्रदीपक सोहळा. विमानातून पुष्पवृष्टी. |

१९६१ – आंतरराष्ट्रीय ग्रामीण युवक परिषदेचे अध्यक्ष. आफ्रो एशियन ग्रामीण पुनर्संघटन परिषदेची स्थापना. दिल्ली अधिवेशनाचे अध्यक्ष.

१९६२ – कैरो येथे १९६२ मध्ये भरलेल्या याच परिषदेच्या भारतीय प्रतिनिधी मंडळाचे नेते.

१९६३ – लंडन येथे छत्रपती शिवाजी एज्युकेशन ट्रस्टची स्थापना. भारत कृषक समाजाच्या कार्यासाठी न्यूझीलंडचा दौरा. शिवाजी शिक्षण संस्थेच्या सर्व शाखा–उपशाखांचे इतिहास-संकलन व 'स्मृति–पुष्प' लेखन.

१९६४ – विश्व कृषी मेळाव्याचे आयोजन.

१९६५ – रामनवमीच्या रात्री ११.३० वा. १० एप्रिल रोजी दिल्लीच्या विलिंग्डन हॉस्पिटलमध्ये देहावसान.



# शतवंदना

सुदाम सावरकर

हे महर्षी चिरंतना तुज वंदना। वंदना शतवंदना
अर्पिती भावांजली दाही दिशा शिवनंदना।। धृ.।।

पाउले विजयी तुझी उघडीत गेली दालने
उमटली आसिंधु ती या भारती विविधागुणे
देव केल्या खनि-शिला, खंदूनि कृषिवलवंदना।। १।।

मंत्रिपद भारावले, तव व्यक्ति-वैभव पावुनी
राजसत्ता राबली, जनसेवनी शुभ जीवनी
शक्त कोणि न अडविण्या या लोक-रविच्या स्पंदना।। २।।

निर्मिता शिवसृष्टिचा अन् रंजल्यांचा तू पिता
क्षुब्ध सिंधुस्पर्धि दीपस्तंभ तू निष्कंपिता
शारदेच्या भूषणा, अज्ञान रिपुदल कंदना।। ३।।

प्रेरिता सर्वाद्य तू अस्पृश्य अंबामंदिरी
लाख मोहां फेकुनी मानव्य पूजी संगरी
लोक चित्ती धगधगे, 'होमूनि दे तनु-चंदना'।।४।।

हे महर्षी चिरंतना तुज वंदना। शतवंदना
अर्पिती भावांजली दाही दिशा शिवनंदना।।

## ज्ञानाग्नी

मधुकर केचे

पंजाबराव नावाने
तेजाब जन्मले होते
जखमांच्या संगे अमुचे
जोडले तयाने नाते.

जातींचे गज मोडुनिया
पिंजऱ्यात वादळ शिरले
आमुचे रुढीचे मेवे
रागाने फेकुन दिधले.

आमुची सुखाची निद्रा
पाहवली नाही तयाला
त्वेषाने टोचत होता
टाकाचा करुनी भाला.

इंधनापरी तो जळला
चंदनापरी तो झिजला
ज्ञानाची टाके ठिणगी
अग्नी न अजुनही विझला.

# मानवतेचा महामेरू

- डॉ. सुभाष सावरकर
- प्रा. कृष्णकांत पराते

---

## इतिहासात डोकावताना....

डॉ. भाऊसाहेब पंजाबराव देशमुख यांचं जन्मगाव पापळ! आणि मूळ घराणं कदम! 'कदम' म्हणजे ज्या घराण्यानं इतिहासात चौफेर आपलं क्षात्रतेज उधळलं, राजवैभव भोगलं व मराठ्यांच्या लढवय्या वृत्ती ज्यांनी जोपासल्या, फुलवल्या, रुजवल्या व नावारूपाला आणल्या - ते घराणं.

पापळ हे गाव तसं लहान पण या गावाला फार मोठा जुना इतिहास आहे. इथं कदमांच्या पिढ्यान्-पिढ्या नांदल्या आहेत. पापहरा देवीचं ठाणं म्हणून हे गाव पापळ - एवढंच जरी असलं तरी इथं इतरही देवळं आहेत. त्यातीलच गोपाळकृष्णाचं देऊळ मुख्य, तसंच खाकीशा बाबाचा दर्गाही प्रसिद्धच. तसे महादेवाचे एक प्राचीन मंदिर पापळला आजही आपले अस्तित्व टिकवून आहे. आणि आत पायऱ्या-पायऱ्यांनी उतरता येणारी विहीरही आपले अस्तित्व आजही टिकवून आहेच. नदीवरचं गोमुख आज बंद दिसेल; पण पापहरेने तेथे सतत पाणी वाहताना पाहिल्याचं गावातले वयोवृद्ध आजही सांगतात.

'पापळ'वर औरंगजेब, निजाम, नंतर इंग्रज आणि आता आपल्या लोकशाहीत जनांची सत्ता असली तरी इथं खरी सत्ता होती दोन घराण्यांची - एक कदमांचं देशमुख घराणं आणि दुसरं देशपांडे घराणं. या दोनही घराण्यांनी एकेक सपूत या भारतमातेला अर्पण केला. देशपांडे घराण्यानं दिलेला सपूत म्हणजे डॉ. य. खु. देशपांडे, तर देशमुख घराण्यानं भारतमातेच्या चरणी अर्पण केलेलं अनमोल रत्न म्हणजे डॉ. पंजाबराव ऊर्फ भाऊसाहेब देशमुख होय.

या देशमुख घराण्यात नागोजीचा वंशज म्हणून शामरावांचा धाकट्या पुत्राच्या रूपानं जन्म झाला तो साधारण इ. स. १८६५ मध्ये. तसा एखाद्या घराण्यात एखाद्या पुत्राचा जन्म होणं ही सर्वसाधारण घटना; पण इथं असं नव्हतं. राजवैभव व सत्ता

भोगलेल्या देशमुख घराण्याचा हा पडता काळ होता. देशमुखीत आता राम उरला नव्हता. 'पाटील'कीत दम होता; पण ती गावातच दुसऱ्या घरात नांदत होती. त्यासाठी लागणारी साक्षरता नागोजीत जशी नव्हती तशीच नागोजीचे इतर पुत्र सोनबा व बाजीरावात देखील नव्हती. पण या दोनही ज्येष्ठ पुत्रांत आढळणारे ऐदी, ऐशोआरामी व अविवेकी गुण शामराव बापूत पापभीरू स्वभावाच्या नागोजींना दिसले नाहीत आणि म्हणून मनमिळाऊ, मेहनती, सालस, समजुतदार वृत्तीच्या, श्रमनिष्ठा सांभाळणाऱ्या शामराव बापूत नागोजींना आशेचा किरण दिसला. एरव्ही सारेच अंगठा बहाद्दर राहिले. शामराव मात्र चार वर्ग खात्रीनं शिकेल ही अपेक्षा आणि या अपेक्षेतून पाटीलकीचं घरात आगमन आणि त्यातूनच घरातील विवंचनांचं निराकरण - हा नागोजींचा स्वप्नमहाल. पण काळाचा महिमा अगाध. त्यामुळे इतरांप्रमाणे शामराव बापूंच्या गळ्यात प्रपंचाची माळ पडली आणि शेतीवाडीच्या व प्रपंचाच्या सर्व जबाबदाऱ्या सांभाळून शामराव बापूंना साक्षरतेची बाग मात्र फुलवता आली नाही. त्यातच अल्पावधीत लागोपाठ दोन कन्यांचा जन्म झाला आणि पाहाता पाहाता काळाच्या कोपात दोन्ही मुली एकामागोमाग वारल्या. त्या अनावर शोकाने मुलींची आई खचली आणि तीही अंथरुणाला खिळली ती परत न उठण्यासाठीच. शामराव बापूंच्या जीवनाचा सारीपाट हा असा अर्ध्यावर उधळला गेला तरी तो मात्र धीराचा माणूस ! सारा दु:खावेग आवरून त्यानं शिक्षण घेण्याचा मनोमन निर्धार केला.

शामराव बापूंचे सासरे म्हणजे सोनगावचे सूर्यभान पाटील सराड. अतिशय धनवान, व्यवहारदक्ष आणि चौफेर दरारा असलेली आसामी. त्यांनी आपल्या पुत्रासोबत शामराव बापूंनाही शाळेत घातले आणि तळेगाव दशासरच्या शाळेत शामराव बापू सारी शक्ती खर्चून विद्यार्जनात धन्यता मानू लागले.

'बापूं'च्या जीवनाचा सारीपाट अर्ध्या डावातच उधळला गेला याची सूर्यभान पाटलांना अतिशय चुटपुट लागून राहिली होती. या गोड माणसाचा संसार पुन्हा उभा करून द्यावा म्हणून त्यांनी आपले धाकटे बंधू लक्ष्मणरावांच्या कन्येचा हात त्यांच्या हाती सुपूर्द केला आणि 'शाम' लवकरच 'राधे'सोबत चतुर्भुज झाले.

पाटीलकीसाठी चौथा वर्ग पास होण्याची अट शुभमंगल झाले तरी शामराव बापूंना चैन पडू देईना. पाटीलकीची महत्त्वाकांक्षा बापूंच्या अभ्यासाची प्रेरक शक्ती बनली. ध्येय अगदी नजरेच्या टप्प्यात आले आले म्हणतानाच १८९६ चं साल अनेक विपदांना घेऊन सामोरं आलं. १८७६ च्या दुष्काळाचीच ती पुनरावृत्ती होती. जगाचा अन्नदाता शेतकरी दाण्यादाण्याला मोताद झाला आणि पाटीलकीचे स्वप्न असे अर्ध्यावर सोडून त्यांना शाळेचा त्याग करावा लागला.

नागोजींची तब्येत कधी तोळा कधी मासा अशी. आपल्या डोळ्यादेखत आपल्या

स्टेटीची हिस्सेवाटणी करून डोळे मिटावे ही त्यांची इच्छा, पण ती इच्छा या प्रेरणेने केली होती त्याचे फलित तर त्यांना मिळाले नाहीच उलट ज्येष्ठ हट्टापुढे त्यांना हात टेकावे लागले आणि बापूंच्या वाट्याला आली फक्त २५ गुंठे शेती, एक गोठावजा एकपाखी कौलारू पडवी आणि एक बैल. पण र बापूंचे आपल्या वडिलांना म्हणणे असे, 'तुमचा आशीर्वाद महत्त्वाचा; ाही महत्त्वाचे नाही. जे होतं ते आपल्या घरात राहिलं – थोडं इकडं कमी, ास्त एवढंच! नशिबात असेल आणि तुमचा आशीर्वाद असला तरी देव सारं हा देईल मला.'

ाव बापूंना खरी साथ होती ती त्या निरक्षर 'राधा' माऊलीची. आपण ऐश्वर्यात आता या दैन्यावस्थेत जगावे कसे – हा प्रश्न तिला कधीच पडला नाही. उलट माने बापूंच्या खांद्याला खांदा लावून, कमरेला पदर खोचून ती शामरावबापूंच्या उभी राहिली ती गेलेलं सारं वैभव परत मिळविण्यासाठी. आणि त्या जागरूक ा अथक परिश्रमाने व शामराव बापूंच्या अतूट श्रद्धेने त्यांना हवं ते मिळतही णि अशातच त्या उभारणीच्या काळात एक अपूर्व घटना घडली. 'राधा-पुत्रप्राप्ती झाली. तो दिवस होता शके १८२० मधील मार्गशीर्ष शुद्ध एकादशी दि. २७ नोव्हेंबर १८९८. गीताजयंतीचा हा दिवस. याच दिवशी नरवीर ऐन रणधुमाळीत रणांगणावर श्रीकृष्णाने गीतेचा उपदेश केला होता. जणू ोगाचे बाळकडू पिऊनच बाल 'पंजाब' आधुनिक भारतात अवतीर्ण झाला ातकऱ्यांचे, गावकऱ्यांचे दुःख निवारण करून त्यांच्यामध्ये शिक्षणाची गंगोत्री करायला.

ायंतीसारख्या शुभमुहूर्तावर जन्म पावलेल्या बाळ पंजाबची जन्मकुंडली तयार आली. पंडित गंगाधर जोशींनी त्याची सामुद्रिक चिन्हे पाहिली, जन्मकुंडली ी तेव्हा त्याला जाणवले की हे नक्षत्रासारखे बाळ आपल्या ज्योतिष ज्ञानाला ाहन करीत आहे. त्याने आकडेमोड केली, ग्रहांना आपापल्या ठाण्यात ा केले आणि ठासून सांगितले की 'बाळाचे ग्रह फार प्रबळ आहेत. ज्या त घालेल तिथं यश त्याचंच आहे. लोककल्याणकारी होईल. राजदरबारी मरातब मिळवील व आपल्या अफाट कर्तृत्वाने घराण्याचं व गावाचं नाव करून जनसामान्यांच्या गळ्यातला ताईत होईल.'

ाब बाळावर चहुकडून प्रेमवर्षाव होत होता. त्याचे हरप्रकारचे लाड पुरविले ाले. सर्वांना तो जीव की प्राण वाटू लागला पण या जपणुकीसोबतच

राधामायच्या वात्सल्याचा एक कठोर पैलू वारंवार डोकावू लागला. कोवळ्या रोपट्याच्या विकासाला पाण्याइतकीच उन्हाची गरज असते आणि हाच पैलू पुढे बाळाच्या विकासाला उपकारक ठरत गेला.

अचकट विचकट निरर्थक बोलणे, भलतेसलते खाणेपिणे राधामायने कधीच खपवून घेतले नाही. 'घरी काय पाहिजे असेल ते करून माग पण रस्त्यावरचा, उघड्यावरचा चटोरेपणा मुळीच नको' असा तिचा कडक कायदा! एकदा असाच गावात बाजार भरला होता. मुलां-मित्रांसमवेत पंजाबही बाजारत भटकला. मुले खाऊ घ्यायला लागली तसा त्यालाही मोह झाला व एका घरोब्याच्या इसमाजवळून त्याने दोन पैसे खाऊसाठी मागितले. राधाला हे कळताच तिच्या अंगाचा तिळपापड झाला. कसली ही भिकार सवय? तिने ताबडतोब घरी मिठाई करून त्याला पोटभर खाऊ घातली व असं पुन्हा होऊ नये म्हणून ताकीद दिली. मग तसला प्रकार पुन्हा करण्याची कोणाला हिंमत होणार?

घरामागच्या गल्लीत लहूजी नावाचा एक पट्टीचा ढोलकवादक राहायचा. त्याची ढोलकी रंगात आली की येणारे जाणारे त्याच्या ढोलकीचा आनंद लुटायला चालता चालता थबकायचे. असेच एकदा दिवाळीच्या मोसमात त्याचे शाहिरी पोवाडे झंकारू लागले. बालगोपालांची झुंबड उडाली. मुळातच संगीताची आवड असल्याने पंजाबही तिकडे न वळता तर नवल. कुणीतरी ही घटना राधाबाईच्या कानी घातली. मुलाला भलतेसलते छंद लागू नये या सदिच्छेतून त्याचा हा अपराध तिच्यासाठी अक्षम्य ठरला आणि रागाच्या आवेशात तिने बाल पंजाबला ओल्या धांड्याने सडकत घरी आणले. रात्री उपाशीपोटीच उसासे टाकीत झोपलेल्या चिमण्यावर तिच्या नेत्रांनी कितीवेळ अश्रूंचा अभिषेक केला हे तिचे तिलाच ठाऊक. पण पंजाबला शिस्तीचे बाळकडू अशा प्रसंगांमधून मिळाले व पुढे भविष्यात इकडे तिकडे न भरकटता ध्येयवेडे होता आले ही या प्रसंगांची पुण्याई असावी.

### विद्यामंदिरात

आपल्या बाळाने खूप खूप शिकावे, शिकून कोणीतरी मोठे व्हावे ही जशी आईची इच्छा, तशीच शिक्षणाचे सर्व बेत मनातल्या मनात दाबून ठेवावे लागलेल्या शामराव बापूंचीही एक आंतरिक इच्छा. जे आपण करू शकलो नाही त्या आपल्या इच्छा आपल्या मुलानं पूर्ण कराव्या ही त्यांची माफक मागणी, आणि त्यात पंजाब मुळातच कुशाग्र बुद्धीचा. त्याचा चुणचुणीतपणा सर्वांचे लक्ष वेधून घेई. त्यांच्या घराण्यातीलच एकमेव शिक्षित वामन दत्तोबा देशमुखांसारखं पंजाबनेही नाव कमवावं. वामन दत्तोबासारखा गौरव प्राप्त करावा असे बापूंना वाटणे स्वाभाविक होते.

गावात तिसरीपर्यंतची एकशिक्षकी प्राथमिक शाळा सन् १८७४ सालीच उघडली गेली होती आणि बापूंनी त्या शाळेच्या १९०६ सालच्या रजिस्टरात 'पंजाब शामराव कदम' हे नाव पहिलीत घातलं त्यावेळी पंजाब साडेसात वर्षांचा झाला होता. पंजाबला शाळेत घालायचे वेळी बापूंची आर्थिक स्थिती पुष्कळ स्थिरावली होती. चौकाचं माडीचं घर उभं ठाकलं होतं. शेत जमिनींनी भरभरून पिकं दिल्यानं लक्ष्मी घरात नांदत होती आणि अशा संपन्नावस्थेत पंजाबचं शाळेत जाणं एक शुभशकुन होता. त्यामुळेच त्यांनी आपल्या नव्या माडीवर गोसावी नावाच्या एका शिक्षकाची पंजाबच्या शिक्षणासाठी व्यवस्था केली होती. गोसावी मास्तर बापूंच्या माडीवर कित्येक वर्षे कृतज्ञ प्रेमाने राहिले. ते स्वभावाचे सच्चे तसेच शिस्तीचे भोक्ते होते. वेळ मिळेल तेव्हा पंजाबला शिकविणे व शाळेत जाताना पंजाबला सोबत शाळेत घेऊन जाणे हा त्यांचा नित्यक्रम होता.

आईची कडक शिस्त, वडिलांचा प्रेमळ दाब आणि शिक्षकाचा जागरूक वचक या तिहेरी पाशांनी भाऊंचे जीवनच बदलून गेले. आपण भले की आपला अभ्यास भला अशी त्यांच्या स्वभावाची जडणघडण होऊन बसली; आणि हीच शिस्तीची बाळगुटी भारताला एक तळमळीचा शिक्षणमहर्षी देण्यास कारणीभूत ठरली.

आपल्या मुलाबरोबर इतरांच्या मुलांनीही खूप शिकावे, मोठे व्हावे अशी बापूंची सदिच्छा ! आजूबाजूला शाळा नसल्याने कित्येक शेजारच्या खेड्यांतील लोक आपापल्या मुलांना पापळला आणीत. बापूंच्या प्रेमळपणामुळे गाड्याही बापूंच्या वाड्यात सोडीत व खुशाल आपल्या मुलांना राधाबाईच्या व बापूंच्या भरवशावर सोडून देत. गावाच्या शेजारची पायी येणारी शाळकरी पोरं वाड्यातच शिदोऱ्या खायची. पाण्यापावसाच्या दिवसांत मग त्यांना वाड्याच्या कुशीतच आसरा घ्यावा लागायचा. अशावेळी जात-पात, पंथधर्म यांच्यापुढे जाऊन राधाबाई या साऱ्या मुलांचं करायची आणि बापूंच्या हृदयातील सुप्त कोपरा सुखावून जायचा. अशा रीतीने अनेकांना शिक्षित करण्यात या दाम्पत्याचा अप्रत्यक्ष असलेला हात भाऊसाहेबांच्या भावी आयुष्याच्या कार्यपद्धतीचे बीजारोपण करीत होता असे म्हणावयास आज तरी काही हरकत नसावी.

मातापित्यांचे हे असले व्यवहार नि वैशिष्ट्यपूर्ण स्वभाव भाऊंवर नकळत संस्कार घडवीत होते. वास्तविक भाऊंच्या तीर्थरूपांची जीवनसाधना ही अगदी सरळमार्गी होती. सचोटी न सोडता व हृदये न तोडता आपला संसार फुलवायचा. स्वतः कुणाला फसवायचे नाही. दिला शब्द मोडायचा नाही. एका पापभीरू वृत्तीने साधुसंतांचं जीवन जगायचं व आपल्या कुटुंबासोबतच इतरांचाही उद्धार साधायचा - ही त्यांची जीवनपद्धती !

एकदा एका शेतकऱ्याने बापूंकडे शंभर रुपयांची एक थैली ठेवायला दिली. बापूंनी

ती जशीच्या तशी संदुकात ठेवून दिली. काही दिवसांनी त्या शेतकऱ्याला पैशांची गरज भासली. बापूंनी जवळची शंभराची नोट त्याच्या हवाली केली. पुढे कधीतरी तो संदूक उघडला तेव्हा बापूंनी थैलीतील पैसे मोजले. ते ११०रूपये भरले. वाढलेले दहा रुपये त्यांना अलगद पचविता आले असते. पण कसचे काय ? त्यांनी तडक त्या शेतकऱ्याचे घर गाठले आणि दहा रुपये त्याच्या हवाली केले. असा त्यांचा सरळ, स्वच्छ स्वभाव. याच सदाचाराने त्यांनी लोकांची मने जिंकली. गावोगावचे लोक म्हणूनच गावगाड्याच्या कारभारात आस्थेनं त्यांचा सल्ला घेत. भाऊबंदकीत त्यांची दृष्टी विशाल होती. तोडण्यापेक्षा जोडण्यावर त्यांचा भर असल्याने व दोनही पक्ष त्यांचे शब्द झेलायला तयार असल्याने लोक त्यांना अशा कामासाठी निमंत्रणे पाठवीत; आणि बापूही पापळ सोडून इतर ठिकाणची असली समाजाची कामे मोठ्या आस्थेनं आपल्या शिरावर घेत.

'पापळ' हे मात्र राधाबाईचं कार्यक्षेत्र असावं. बापूंचं इकडे कटाक्षानं दुर्लक्ष असायचं. लहानसहानच नव्हे तर बाणीचे बिकट प्रसंग देखील राधाबाई सहज सोडवीत. कोणीही तिच्याकडे गाऱ्हाणे न्यावे, राधाबाई दोन्ही पक्षांना एकाचवेळी समोरासमोर बोलवी आणि आपल्या सहज बुद्धीने सारासार पटेल तो मार्ग सुचवी. राधाबाईनं दिलेला निवाडा लोक सहजपणे शिरोधार्य मानीत. तिच्या सहजपणातही एक वजन होते आणि साध्या व्यवहारातही एक प्रकारचा करारीपणा होता. म्हणूनच उभा गाव तिला मानायचा. तिच्या न्यायीपणावर सर्वांचा गाढ विश्वास होता.

एकदा दाजीपंतावर मोठी आपत्ती आली. दाजीपंत म्हणजे कृष्णराव गोविंदराव देशपांडे- निवृत्त रेव्हिन्यू निरीक्षक. सज्जन नि श्रद्धावान माणूस. ब्रह्मचारी महाराजांनी बांधलेल्या शिवमंदिराचा जीर्णोद्धार केला तो त्यांनीच. सभामंडप, हौद बांधला, पायऱ्यांच्या विहिरीला रहाट लावून बगीचा फुलविला. त्यांचे काका माधवराव ऊर्फ भाईजीपंत हे कृष्णाजी वाण्याचे दिवाणजी होते. कृष्णाजींचे दुकान म्हणजे आजूबाजूच्या शेतकऱ्यांची भारदस्त बँक. लोक आपल्या ठेवी तिथे ठेवीत आणि लागला पैसा उचलीत. पण कधी कुणाचा घात झाला नाही. पुढे कृष्णाजी वारले तरी भाईजीपंतांनी आपली पत तिळमात्र ढळू दिली नाही. पण भाईजीपंतांचाच अंतकाळ आला. मूर्तिजापूरच्या प्रेसमध्ये रुई विकली त्याचा अमाप पैसा हाती होता. पण विश्वासू माणसाकरवी रातोरात त्यांनी पैशाची थैली कृष्णाजींच्या घरी पाठविली आणि मगच प्राण सोडला.

कृष्णाजीची शेवटची पत्नी काशीबाई. तिचा बंधू बाळाभाऊ हा भाईजीनंतर कारभारी झाला. त्याच्याच मुलाला काशीबाईने दत्तक घेतले. याविरुद्ध कृष्णाजीच्या प्रथम पत्नीच्या मुलीने दावा टाकला. दाजीपंतांनी तिची बाजू उचलून धरली. त्यामुळे बाळाभाऊला हे सहन झाले नाही व त्यांनी दाजीपंतांवर सूड उगविला. त्यांची दुकानात असलेली

हजारोंची ठेव तर नाकारलीच पण देवस्थानच्या हिशेबाची कोर्टातून रीतसर मागणी केली. हिशेब दाखल करण्याचा कोर्टाचा हुकूम आला आणि हिशेब तर बाळाभाऊ सावकाराच्या दुकानात अडकून पडलेले. अशा बिकट परिस्थितीत दाजीपंतांनी राधाबाईंकडे धाव घेतली. राधाबाईने बाळाभाऊकडे बोलावणे पाठविले. तिचा शब्द अव्हेरणे त्या मातब्बर सावकारालाही शक्य नव्हते. गावपंचासमक्ष राधाबाईने त्याला प्रश्न केला, "बोला, मरू देता का दाजीपंताला ? त्याच्या जिवाचं काही बरंवाईट झालं तर फार महागात पडेल तुम्हाला. एकटा दाजीपंतच वैरी हवा का साऱ्या गावाचं वैरीपण हवंय् तुम्हाला ?" राधाबाईचा हा सडेतोड प्रश्न तितकाच प्रभावी होता. या माऊलीच्या एका शब्दाने संपूर्ण गाव आपल्या विरुद्ध उभं ठाकेल याची पुरती कल्पना घेऊन चुकली होती बाळाभाऊला. पाण्यात राहून मगराशी वैर जमण्यासारखं नव्हतंच कारण सर्वच गोष्टी काही पैशांनी विकत घेता येत नव्हत्या. राधाबाईच्या निर्णयापुढे त्यानं शरणागती पत्करली आणि ठरल्या तारखेस कोर्टात स्वत:च हिशेब दाखल केले. दाजीपंत सहीसलामत या सर्व आपत्तीतून वाचले आणि पुन्हा असली भानगड नको म्हणून त्यांनी मंदिराच्या व्यवस्थापनांचे त्यागपत्र दिले. पण राधाबाईंनी त्यांनाही तो निर्णय फिरवायला सांगितले. राधाबाईचं म्हणणं होतं, 'चुलीनं हात भाजला म्हणून स्वयंपाकच करायचा नाही, हे कुठलं शहाणपण ? चांगल्या कामाचे चालक चांगले लोक राहिले नाही तर वाईटांना आपोआपच रान मोकळं होईल ! हे काम तुम्हीच केलं पाहिजे. गावातल्या पक्षपार्टीच्या भानगडीपासून मात्र जपून राहा.' राधाबाईंचा हा उपदेश जाणत्या दाजीपंतांनी अक्षरश: शिरोधार्य मानला !

राधाबाईचे व्यक्तिमत्व हे असे प्रभावशाली होते आणि मातापित्याच्या या व्यक्तिमत्त्वाचा ठसा भाऊंच्या कोऱ्या करकरीत हृदयपटलावर खोलवर रुतून बसला होता. भाऊंसाठी शालेय शिक्षणापेक्षा हे गृह-विद्यालयाचे शिक्षण लाखमोलाचे होते. आणि बापूंच्या कृषिभक्तीने तर भाऊंना वेडच लावले होते.

पापळला त्या काळी मराठी तीन वर्गांचीच प्राथमिक शाळा होती. ही तीन वर्षे भाऊंची वाऱ्यासारखी उडून गेली. पण तो चवथीत गेला तेव्हा गावात चवथा वर्ग शिकायची सोयच नव्हती. त्यांच्या कुशाग्र बुद्धीला व निग्रही मनाला असा आलेला अचानक थांबा भावला नाही. त्यांनी एक वर्ष गुरुजींकडून पुढील शिक्षण आत्मसात करणे सुरू केले. अवांतर पुस्तके वाचली. पण त्याची शिक्षणाची भूक भागविणे गरजेचे होऊन बसल्याचे पाहाताच बापूंनी व इतर प्रतिष्ठित गावकऱ्यांनी पुढील वर्षी खटपट करून चवथ्या वर्गाची परवानगी आणली आणि भाऊचा चवथ्या वर्गाचा मार्ग प्रशस्त झाला. अशा प्रकारे भाऊंच्या प्राथमिक शिक्षणाची सांगता झाली.

## माध्यमिक शिक्षण

चवथा वर्ग पास होऊन चूप बसणाऱ्यांपैकी पंजाबराव नक्कीच नव्हते. पण 'आपला बाबू मनासारखा हुशार निघाला ! तेव्हा त्याला आता काहीही झालं तरी पुढं शिकवलं पाहिजे' याच एका कल्पनेनं बापूंना पछाडलं होतं आणि त्यातून एक मार्ग निघाला की ५ वा वर्ग भाऊंनी सोनेगावला राहून चांदूर रेल्वेच्या शाळेत शिकावा. चांदूरपासून तीन मैलांवरील सोनेगावहून चांदूरच्या शाळेत जाणे भाऊला सहज शक्यही होते. सोनेगाव हे भाऊचे मामेगाव असल्याने भाऊंना फारसे अपरिचितही नव्हते.

सोनेगावला जाण्यासाठी भाऊंनी घेतलेला पापळचा निरोप त्यांना व त्यांच्या आप्तजनांना क्लेशकारक ठरला होता. गाडी अगदी वळणाहून वळेस्तोवर आई भरल्या डोळ्यांनी हुंदके गिळीत 'जपून वाग' म्हणून खुणावीत होती तर पांदणीत दूरवर शाळासोबती नि गावगडी 'नको नको' म्हटले तरी धावत्या गाडीचा पाठलाग करीत होते. या पाठलागाची आठवण जेवढी विसरायचा प्रयत्न केला तेवढ्या अधिक तीव्रतेने ती भाऊंना सतत आठवीत राही.

सोनेगावात भाऊ रमले. चांदूरच्या शाळेतही त्यांचं मन रमलं. नानासाहेब चोरे, शंकरराव पांडे, मोहनलाल वर्मा असे काही वर्गमित्रही त्यावेळी बरोबर असत. अभ्यासात चुणचुणीत असल्यामुळे शिक्षकांसह सर्व मित्रांची सहानुभूतीही भाऊंना मिळायची. दररोजची पायपीट, अभ्यासाचा शीण यांनी भाऊंची प्रकृती बिघडली आणि तशातच पाचवीची परीक्षा दार ठोठावून निघून गेली. भाऊला तापामुळे शुद्धही नव्हती. अभ्यास झालेला असून देखील भाऊंना परीक्षा देता आली नाही. सारे परिश्रम वाया गेले. केवढा हा विरस ! किती यातना सहन कराव्या लागल्या असतील त्या बाल जीवाला !

शिक्षणाच्या वाटचालीत असा खंड जसा बापूंना क्लेशदायक होता तसाच भाऊसाहेबांनाही अपेक्षित नव्हता. म्हणून अखेर नवा पर्याय समोर आला. भाऊला कारंजा लाड येथे ठेवायचे व पुढील शिक्षण चालू ठेवायचे. 'स्टॅंप व्हेंडर'चे काम करणाऱ्या भाऊच्या मावसभावाकडे – कृष्णरावदादा देशमुखांकडे भाऊंना ठेवायचं ठरलं; कृष्णराव दादांनी ते तत्परतेनं मान्यही केलं, आणि १९१२ साली भाऊने कारंजात पहिलं पाऊल ठेवलं. कारंजाला ए. व्ही. स्कूलमध्ये दाखल झाल्या झाल्या भाऊंची राहिलेली पाचवीची परीक्षा कृष्णराव दादांच्या प्रयत्नांमुळे सर्वप्रथम घेण्यात आली आणि त्यात उत्तीर्ण झाल्याने लगेच त्यांना सहाव्या वर्गात प्रवेश मिळाला.

भाऊंची स्मरणशक्ती अतिशय दांडगी. जवळ जवळ एकपाठी असा हा विद्यार्थी. त्याचा अभ्यासूपणा नि चुणचुणीतपणा मुलांचे लक्ष सहजच वेधून घेई आणि त्यांच्या स्वभावातला गोडवा नुसत्या परिचयाला गाढ मैत्रीचे रूप प्रदान करी. अशाच मित्रांमध्ये प. दा. संगई, बाबूलाल हलवाई, रामभाऊ डाकवाले, वामनराव शेळके, अण्णासाहेब

काण्णव इत्यादि मित्रांचा समावेश होत होता. कारंजाच्या शाळेनंही भाऊंना अतिशय प्रेम दिलं. चांगले शिक्षक लाभल्याने त्यांची अभ्यासातील प्रगती अधिक झाली. सहावीचं पहिलं वर्ष सोडलं तर सातवीपासून मात्र त्यांनी पहिला क्रमांक कधी सोडला नाही. आठव्या वर्गात असताना अमरावती येथील हिंदू हायस्कूल (सध्याचे ॲकॅडेमिक हायस्कूल) मध्ये होणाऱ्या चाचणी परीक्षेला भाऊ बसले. ही चाचणी परीक्षा सरकारी शिष्यवृत्तीसाठी घेतली जात असे. गणितातील प्रगतीने चाचणी परीक्षेत भाऊंना उत्कृष्ट गुण मिळवून दिले; पण व्याकरणाच्या घोळाने त्याला गालबोट लागले आणि प्रथम क्रमांकाची सहा रुपयांची शिष्यवृत्ती भाऊंना मिळू शकली नाही; मात्र दुसऱ्या क्रमांकाच्या दोन रुपयांच्या शिष्यवृत्तीवर भाऊंना समाधान मानावे लागले.

थोड्याच दिवसांत आठव्या वर्गाच्या परीक्षेसोबत भाऊंचे कारंजाचे वास्तव्य संपले. भाऊंच्या त्या वाढत्या संस्कारक्षम वयात कारंजाच्या जीवनाने अनेकविध मौलिक बीजांची पेरणी भाऊंच्या सकस मनोभूमीत केली आणि जीवनाला एक नवा अर्थ प्राप्त होऊन पंखात नव्या उमेदीचे नवे वारे भरून भाऊसाहेबांनी पुढच्या पडावासाठी तेथून उंच भरारी घेतली - पण जड अंत:करणाने!

### हायस्कूलसाठी अमरावतीत

हायस्कूलच्या शिक्षणाची सोय अमरावती शिवाय नजरेच्या टप्प्यात त्यावेळी कुठेही नव्हती आणि भाऊच्या शिक्षणावरील प्रेमाला तर आता खरा बहर आलेला. अशातच जून १९१५ मध्ये भाऊने अमरावती गाठली. नानासाहेब चोरे नावाच्या आपल्या जुन्या शाळासोबत्याबरोबर भाऊने एक खोली भाड्याने घेतली आणि अमरावतीत आपला शैक्षणिक संसार थाटला.

भाऊसाहेबांची वृत्ती अभ्यासू होती तसाच चिंतनशीलता हा महत्त्वाचा विशेष भाऊंच्या वृत्तीत स्पष्ट दिसून यायचा. चिंतन म्हणजे हृदयसागराचे मंथन. वरवरच्या शंखशिंपल्यांचा मोह टाळून धैर्याने खोल बुडी घेईल तोच मौल्यवान ज्ञानमोती मिळवील. स्वामी विवेकानंदांनी म्हटले आहे, 'शिक्षणाचे केंद्र हे बाहेर नसून ते आत आहे!' पण ते गाठण्याची एकाग्रता आणि चिकाटी हवी. आणि हे गुण तर भाऊंना सहजसाध्य झालेले. याविषयीची एक आठवण फारच हृदयस्पर्शी आहे. लोणीचे काही विद्यार्थी अमरावतीला छात्रालयात शिकत, त्यांना भेटायला डॉ. मालपे आले. भाऊ देखील यावेळी त्या छात्रालयातच होता. डॉ. मालपे मोठे तल्लख बुद्धीचे. इतरांना कोडे घालून त्यांच्या बुद्धीचा कस पाहायचा हा त्यांचा आवडता छंद! आपल्या कूटप्रश्नांच्या दुर्मिळ संग्रहातून एक कूटप्रश्न गणिती कोड्याच्या रूपात विद्यार्थ्यांपुढे ठेवून ते नाट्यप्रयोगाला निघून गेले. विद्यार्थ्यांनी तास-दीड तास जंगजंग पछाडले पण त्यांना

काही उत्तर सापडेना. निराश होऊन त्यांनी तो नाद सोडला आणि झोपी गेले. रात्री तीनचारच्या सुमारास जिकडे तिकडे सामसूम असताना एक छात्र कसल्यातरी चिंतनात गढल्याचे चित्र त्यांना बघायला मिळाले. त्यांनी उत्सुकता म्हणून त्याची चौकशी केली तेव्हा त्यांना कळले की तो विद्यार्थी आपण दिलेले गणिती कोडे सोडविण्यात अजून दंग आहे. ते त्या विद्यार्थ्याला म्हणाले, 'आता हे पुरे झाले. तू झोप आता, नाहीतर मला वाईट वाटेल.' तो आज्ञाधारक विद्यार्थी निमूटपणे झोपायला गेला, पण त्या कूट प्रश्नाने त्याचा पिच्छा काही सोडला नव्हता.

दुसरे दिवशी डॉक्टर झोपेतून उठत नाही तोच तो विद्यार्थी दत्त म्हणून उभा! त्यावर डॉक्टर म्हणाले, 'आता मात्र खात्रीने तुला उत्तर मिळाले आहे.' त्यावर तो विद्यार्थी विनम्रपणे बोलला, 'आपल्याला कसं कळलं हे?' डॉक्टर उद्‌गारले, 'त्यात काय कठीण आहे? तुझ्या प्रसन्न मुद्रेवरच वाचलं मी सारं. खरं म्हणजे रात्रीच मला माझ्या प्रश्नाचं उत्तर मिळालं होतं. इतक्या जिद्दीनं आणि निग्रहानं एखाद्या प्रश्नामागं लागावं हेही माझ्या कूटप्रश्नाचं एक महत्त्वाचं उत्तर होतं. तुझ्या बुद्धिमत्तेबद्दल मला आता निश्चितपणे वाटते की, जीवनात कोणताही अवघड प्रश्न तू हाती घेतलास तरी त्यात खात्रीनं तू यशस्वी होशील.' ... हा असामान्य चिकाटीचा जिद्दी विद्यार्थी होता भाऊ देशमुख.

त्यावेळी भाऊची चिंतनशीलता त्याच्या जीवनाला एक वेगळा घाट देऊ पाहात होती. कुठल्या तरी अज्ञात प्रेरणेनं आणि आंतरिक ओढीनं त्याला कमालीचं अंतर्मुख बनविलं होतं. पापळमध्ये मातापित्याच्या छत्रछायेत त्याच्या जीवनाला एक विशिष्ट घडण मिळाली. कारंजाला बागडत्या जीवनात दडपण संपून मित्रमंडळीच्या सान्निध्यात त्यानं विकासाच्या दिशा धुंडाळल्या आणि अमरावतीचे वास्तव्यात एका आत्मनियंत्रणाच्या रूपात तो अभिव्यक्त होऊ लागला. जाणीवपूर्वक आत्मप्रगतीची वाटचाल एका विशिष्ट जबाबदारीने इथे सुरू झाली.

## राष्ट्रभक्तीचा अंकुर

अमरावतीच्या वास्तव्यातच योगायोगाने ७ फेब्रुवारी १९१७ साली श्रीमंत बाबासाहेब खापर्डे यांच्या कन्येच्या विवाहाच्या निमित्ताने भाऊंची भेट लग्नाला आलेल्या महाराष्ट्र केसरी लोकमान्य टिळकांशी झाली. भाऊंचं ते वय म्हणजे विभूतिपूजेचं वय. लोकमान्यांनी भाऊच्या चेहऱ्यावरील कोणते भाव वाचले, कुणास ठाऊक. पण मुद्दाम स्वत:हून त्याची चौकशी केली आणि त्याला मोठ्या आस्थेने खापर्डेकडील स्टेजकोचमध्ये आपल्याजवळ बसवून घेतले. उभ्या अमरावतीतून भारतमातेचा जयघोष करीत तो त्यांच्यासोबत हिंडला. जोग चौकात मुद्दाम उभारलेल्या व्यासपीठावर

लोकमान्यांचे भाषण झाले. प्लेगचे वातावरण असून लोकगंगेला महापूर आला होता. यावेळी भाऊच्या अंगी विलक्षण स्फुरण चढले होते आणि वृत्ती राष्ट्रभक्तीने बहरून आल्या होत्या.

भाऊंची मॅट्रिकची परीक्षा झाली. त्यावेळी 'अलाहाबाद विश्वविद्यालयाची' ही परीक्षा अतिशय कडक असायची. पण भाऊला त्यात विशेष प्रावीण्य मिळाले. मध्यप्रदेश सरकारने भाऊला प्रति मास चौदा रुपयांची शिष्यवृत्ती जाहीर करून दुधात साखर घातली. टप्प्याटप्प्यावर मिळणाऱ्या अशा प्रोत्साहनाने भाऊचा उत्साह द्विगुणित झाला. मातापित्यांना आकाश ठेंगणं झालं आणि सर्वांच्याच महत्त्वाकांक्षेला नवनवी वसंतपालवी फुटत गेली.

## फर्ग्युसन कॉलेज पुणे

भाऊ मॅट्रिक तर झाले पण अमरावतीत महाविद्यालयीन शिक्षणाची सोयच नव्हती. विदर्भ महाविद्यालयाचाही पाया त्यावेळी रोवल्या गेला नव्हता. मॅट्रिकमधील विशेष साफल्यामुळे मध्यप्रदेश सरकारची शिष्यवृत्ती भाऊंना मिळाली होती. तिचा फायदा घेऊन मध्यप्रदेश सरकारच्या कक्षेतील महाविद्यालयात प्रवेश घेता आला असता; पण भाऊंच्या मनात काही वेगळंच शिजत होतं. त्याकाळी पुणे हे उत्कृष्ट विद्यापीठ मानले जाई. काँग्रेसच्या जन्मवर्षीच म्हणजे १८८५ सालीच लो. टिळक व आगरकरांनी तेथे 'फर्ग्युसन कॉलेज'ची स्थापना केली होती आणि त्या कॉलेजला उज्ज्वल परंपरेची एक प्रभावळ लाभली होती. अशा विद्यानगरीच्या मुकुटमण्याने भाऊसाहेबांसारख्या विद्यालालसी ताऱ्याला आपल्याकडे आकर्षित न केले तरच नवल. त्यामुळेच भाऊंनी स्कॉलरशिपची पर्वा न करता, सर्वोत्कृष्ट समजल्या जाणाऱ्या 'फर्ग्युसन कॉलेजात' जायचा निर्धार केला आणि मुलाच्या निर्णयाला बापूंनी व आईनेही उत्साहाने पाठिंबा दर्शविला.

पुण्याच्या वातावरणात भाऊंच्या प्रगतीला अधिकच पोषक असे क्षेत्र लाभले. अखिल महाराष्ट्राचे सांस्कृतिक केंद्र असलेल्या पुण्याने भाऊसाहेबांच्या जडणघडणीत कसलीही कसर ठेवली नाही. तो काळही तसाच होता. आता-आताशा डॉ. भांडारकर, न्या. रानडे, महात्मा फुले, लोकहितवादी, विष्णुशास्त्री चिपळूणकर, गो. ग. आगरकर, गो. कृ. गोखले आदि महान राष्ट्रभक्तांनी समाजात विविध सुधारणांचे वारे पसरविले होते. सामाजिक सुधारणांच्या खांद्याला खांदा लावून राजकीय घडामोडीही या सुशिक्षित, जागृत व पुढारलेल्या नगरीत हिरिरीने चालू होत्या. भाऊंचे संवेदनशील व जिज्ञासू मन अशा वातावरणाची उपेक्षा करण्याची सुतराम् शक्यता नव्हती. या सर्व घडामोडींचे सूक्ष्म निरीक्षण करून योग्य त्या नोंदी घेण्याचे कार्य त्यांची जागरूक बुद्धिमत्ता

अखंडपणे करीतच होती. यातूनच स्वत:ची अशी एक स्वतंत्र विचारवृत्ती आकार घेऊ लागल्याने कुठल्याही राजनैतिक, सामाजिक अथवा साहित्यिक कार्यक्षेत्रातील पुढाऱ्यांच्या लोंढ्यात ते वाहूनही गेले नाहीत.

पहिले महायुद्ध १९१८ साली संपले; पण लगेच इन्फ्ल्यूएन्झाचा महाभयंकर तडाखा साऱ्या जगाला बसला. पुण्याला या विध्वंसक साथीने कहर केल्याने पुण्याचे सारे व्यवहार ठप्प झाले. कॉलेजचीही दारे बंद झाली. भाऊ ही संधी पाहून पापळला आले खरे; पण विदर्भातही या रोगाने रौद्ररूप धारण केलेले. पापळ देखील याला अपवाद नव्हतेच. त्यांना गोरगरिबांचे हाल पाहवेना. पण तेथे डॉक्टर कुठले? अशावेळी हे कार्य भाऊला करावे लागले. वायुवेगाने आपली घोडी दामटीत २० मैलांवरील बडनेराला यावे व तेथे औषधे खरेदी करून पापळचा रस्ता धरावा. आजारी झालेल्यांना स्वत: काळजीपूर्वक औषध द्यावे. भाऊंची ही धडपड पाहून राधाबाईंना कौतुकही वाटायचं आणि काळजीही. तिचं मातृहृदय कळवळून बोलायचं – "बाबू, इतकाला पल्ला एखाद्या दिवशी आंगावर येईल का राहील?" घामाघूम झालेल्या भाऊंनी घोडी बांधीत हसून उत्तर द्यावं, "आई, आपला विश्वास बचावला, भागाबुढी वाचली, डाखोळे अन् बलकडे सुधरला. किती चांगली गोष्ट झाली माझ्या थोड्याशा त्रासामुळे?"

"तं सारं कबूल, पण तुला कशानं काही झालं तर काय करीन मी?"

"काळजी करू नकोस. आई, मी हे सारं जपून करीन."

... आणि त्यांची लोकसेवा वायुवेगाने अविरत चालू राहायची.

साथीचे वादळ विसावले. कॉलेज पुन्हा उघडले. भाऊंचा अभ्यास पूर्ववत् नियमित सुरू झाला. याच काळात 'मराठा विद्यार्थी संघ', 'सी. पी. ॲन्ड बेरार स्टुडंट असोसिएशन' इत्यादि संघटनांच्या निर्मितीत भाऊंनी पुढाकार घेतला. प्रा. वा. ब. पटवर्धनांची तर त्यांच्यावर विशेष मर्जी असायची. त्यांची अध्यापन शैली व विद्यार्थ्यांशी वागणूक यामुळे त्यांनी प्राचार्य आर. पी. परांजपेंहूनही विद्यार्थ्यांची हृदयं काबूत आणली होती. भाऊंच्या एकंदरीतच अंगी बाणलेल्या गुणवैशिष्ट्यांमुळे ते त्यांच्या विकासाकडे अधिक जिव्हाळ्याने लक्ष पुरवीत असत.

भाऊ जेव्हा इंटरच्या वर्गात शिकत होते तेव्हा देशातील राजकीय जीवनात प्रचंड लाटा उठत होत्या. जहाल पक्षाच्या वर्चस्वाने लोकानुवर्ती राज्यशासनाची जोरदार मागणी करणारे लोकमत तयार झाले होते. जालियनवाला बागेतील हत्याकांडाने आगीत तेल ओतल्यासारखे झाले होते. १९१८ सालीच टिळक चिरोल खटल्यानिमित्ताने विलायतेला गेले होते ते १९१९ च्या अखेरीस परत आले. 'स्वराज्याची भूक सुराज्याने कधीही भागायची नाही' – ही सिंहगर्जना सर्वत्र निनादू लागली होती. काँग्रेस आंदोलनाच्या जोडीनेच मुस्लिमांची खिलाफतची चळवळ जोम धरू लागली होती.

या साऱ्यांचे प्रतिध्वनी पुण्यात अधिक प्रखरतेनं उठत आणि अशा काळात भाऊंचे वास्तव्य पुण्यात असल्याने त्यातून त्यांचं संवेदनशील व्यक्तित्व विशिष्ट प्रकारे घडत गेलं होतं. आणि म्हणूनच 'आपण कुठे जावे ?' याचा ते सावधपणे वेध घेत होते.

## विलायत गमनाचा भुंगा

परीक्षा जवळ आलेली. अभ्यासाची चिकाटीही वाढलेली. पण याचवेळी त्यांच्या मनात आत कुठेतरी विलायत गमनाचा भुंगा गुणगुणू लागायचा. विलायत यात्रेच्या या सुप्त मनीषेची जपणूक गेल्या दोनेक वर्षांपासून तरी ते करीत आले होते. आणि त्यामुळेच त्या दिशेनं त्यांची अभ्यासाची पावलंही पडत आली होती. विलायत यात्रेचे आकर्षण वाटावे अशी काही प्रभावी बीजे तत्कालीन परिस्थितीत होती. मध्ययुगातील काही तथाकथित धर्मग्रंथांनी समुद्रयात्रा निषिद्ध ठरविली होती. त्यामुळे जगाशी संबंधविच्छेद करून कूपमंडुक बनलेल्या भारतीयांची अपरिमित हानी झाली. हे पाहूनच राजा राममोहन रॉय, स्वामी विवेकानंद, स्वामी रामतीर्थ आदि महापुरुषांनी साता समुद्रापलिकडे झेप घेतली. स्वामी विवेकानंद म्हणायचे, 'हे अमृतपुत्रांनो, आपण अन्य देशांशी दुरावलो हेच आपल्या अध:पतनाचे कारण. जगत्प्रवाहाशी समरस होणे हाच यावर उत्तम उपाय. जीवनाची खूण म्हणजे गतिमानता! आजची आपली ही कृत्रिम नि संकुचित कोशावस्था झुगारून साऱ्या विश्वात संचार करा. आपले अध्यात्मज्ञान देशोदेशी पोहोचवून त्यांचे भौतिकज्ञान आत्मसात करा!' त्यांचे हे दिव्य उद्‌गार व्यर्थ ठरले नाहीत आणि तेव्हापासून कितीतरी भारतपुत्र विदेशी जाऊ लागले.

पूर्वी विदेशातून भारतात ज्ञानसत्रांचा लाभ घ्यायला लोक येत. आता परिस्थिती बदलली आहे. बदलत्या परिवेषात ज्ञानसूर्य पश्चिमेकडे तळपू लागल्याने जाणत्यांनी 'विदेशी जाऊन उच्च शिक्षण मिळवा' हा कानमंत्र नव्या पिढीला दिल्याने उदयोन्मुख पिढीत विलायतेच्या सफरीसाठी एक अनुकूल वातावरण तयार झाले आणि ते स्वाभाविकही होते.

बॅ. रामराव ऊर्फ अण्णासाहेब देशमुख विलायतेहून बॅरिस्टरीची पदवी घेऊन आले, तेव्हा त्यांच्या सत्कार समारंभात भाऊंच्या मनात बहुतेक विलायत यात्रेने घर करायला सुरुवात केली. महत्प्रयासाने बापूंची व आईची परवानगीही त्यांनी मिळविली. पण 'पैशाचे काय ?' – हा प्रश्न शेवटी जमीन गहाण टाकूनच सोडवावा लागला. आपली धरतीमाता गहाण टाकताना बापूंना झालेली पायपीट व यातना बापूच जाणे.

भाऊ इंग्लंडमध्ये शिकायला जाणार म्हणून भाऊंच्या मित्रांनी व प्राचार्य-प्राध्यापकांनी भाऊंचा सत्कार करायचे ठरविले. पण नेमके याचवेळी, सत्काराच्या आदल्याच रात्री लो. टिळकांचे मुंबईत निधन झाले आणि सत्काराचा कार्यक्रम रद्द करावा लागला.

भाऊंची मुंबईहून निघण्याची तारीख निश्चित झाली. आता पापळला जाऊन आईवडिलांचा आशीर्वाद घेणे अगत्याचे होते. सातासमुद्रापार जाणाऱ्या आपल्या गावसपूताला गावानं दिलेला निरोप म्हणजे हृदय हेलावणारी घटना होती. गावातल्या आया-बहिणींनी, दादा-काकांनी भाऊंना दिलेला १६४।। रुपयांचा खाऊ म्हणजे भाऊंना लाखमोलाचा वाटावा एवढे त्यात प्रेम होते, आणि त्या प्रेमानेच त्यांचा पुढील प्रवास सुकर होणार होता.

## गोऱ्यांच्या भूमीत

त्या गजबजलेल्या ऐश्वर्यनगरीत लंडनच्या व्ही. टी. स्टेशनवर भाऊसाहेब फक्त एक रात्र राहिले आणि त्यांना कल्पना येऊन चुकली, इथलं राहणीमान किती महागडं आहे ते. पण दुसरेच दिवशी भाऊ केंब्रिजला गेले. विदर्भातील चार-सहा विद्यार्थी त्यावेळी तेथे शिकत होते. अमरावतीच्या रा. ब. तात्यासाहेब मुधोळकरांचे चिरंजीव राजाभाऊ देखील तेथे होते. ते भाऊंचे शाळासोबती. त्यांचे सोबत (बॅ.) एच्. एम्. देशमुखही भाऊंना भेटले. या नवपरिचित मित्रांनी भाऊंना खोली शोधण्यापासून तर तेथे स्थिरस्थावर होईपर्यंत बरीच मदत केली.

बॅरिस्टरीच्या परीक्षेचा तोंडवळा परिचयाचा झाल्यावर हा गड आपण जिंकणार याची त्यांना मनोमन खात्री झाली. पण इतक्या दूर येऊन केवळ बॅरिस्टर होऊन परतणे हे त्यांचे ध्येय मुळीच नव्हते. 'जे जे उत्कट ते ते घ्यावे' - याप्रमाणे त्यांनी 'आय्. सी. एस्.'च्या परीक्षेला बसायचा निर्णय घेतला.

त्यावेळी 'व्हॅन्स डनलॉप संस्कृत रिसर्च स्कॉलरशिप' दरसाल संस्कृतच्या सर्वोत्तम विद्यार्थ्याला देण्यात येत असे. ही शिष्यवृत्ती १०० पौंडांची (सुमारे १५०० रुपयांची) असायची. भाऊंना पैशांची चणचण असायचीच. अशावेळी संस्कृतचे प्रा. ए. बी. कीथ यांच्या मदतीने त्यांनी ही शिष्यवृत्ती मिळवायचा चंग बांधला व तो पूर्णत्वास देखील नेला. यासाठी भाऊंनी दिवसाची रात्र व रात्रीचा दिवस केला आणि एका सुप्रभाती 'व्हॅन्स डनलॉप स्कॉलर' म्हणून पाश्चिमात्य वृत्तपत्रांनी त्यांचा गौरव केला. ती जागतिक कीर्तीची शिष्यवृत्ती या संस्कृत परायण ग्रामीण ऋषिकुमाराला मिळाली. यात केवळ आर्थिक लाभाचाच प्रश्न नव्हता; तर भाऊंच्या भाषाप्रभुत्वाचे व बौद्धिक सामर्थ्याचे ते एक प्रमाण होते.

या परीक्षेच्या आगेमागे भाऊंची बॅरिस्टरीची परीक्षा पार पडली. संस्कृत विषयांचे एम्. ए. ऑनर्स हीही परीक्षा पास झाल्याने एडिंबरो विद्यापीठाने त्यांचा सानंद गौरव केला.

त्यांना शिष्यवृत्ती मिळाली ती संस्कृत विषयात. संशोधनासाठी त्या मार्गाने जायचे

तर आय्. सी. एस्.चा नाद सोडणे भाग होते. किंवा आय्. सी. एस्. करायचे तर शिष्यवृत्तीवर पाणी सोडणे भाग होते. पण सद्य:परिस्थितीत भाऊ शिष्यवृत्तीला नाकारू शकतच नव्हते. त्यामुळे त्यांनी आय्. सी. एस्. होण्याचा संकल्प मनातून हद्दपार केला आणि भाऊंनी आपले संशोधन आरंभिले. विषय होता – 'वैदिक वाङ्मयात धर्माचा उद्‌गम, विकास व त्यांचा पारस्परिक संबंध!'

मध्यंतरी आर्थिक विवंचनेने भाऊंना मायदेशीही परतावे लागले. पण श्रीमंत बोक्यांच्या आर्थिक पाठबळाने व शिष्यवृत्तीच्या हातभाराने ते सावरले. त्यांनी आपल्या प्रबंधातील पहिला भाग – 'वैदिक वाङ्मयात धर्माचा उद्‌गम व विकास' एवढ्यावरच आपला प्रबंध सीमित केला; आणि तेवढ्याच भागाची मौलिकता जाणून व 'पारस्परिक संबंधा'वर दोन पेपर्स घेऊन त्यांना ऑक्स्फर्ड विद्यापीठाने डॉक्टरेटची 'डी. फिल्.' ही पदवी बहाल केली.

याप्रमाणे विद्वज्जनांच्या कसोटीत उतरणारे ज्ञानसामर्थ्य संपादून भाऊंनी आपल्या सहा वर्षांच्या परदेश यात्रेचे सार्थक केले व एम्. ए. (ऑनर्स), डी. फिल्., बार-ॲट-लॉ या पदव्यांनी विभूषित होऊन १५ जुलै १९२६ रोजी भारताच्या 'गेटवे'वर पुनश्च पाऊल ठेवले.

विलायतेच्या वास्तव्यातच, भाऊंपेक्षा केवळ एक-दीड वर्षांनी मोठे असलेल्या सुभाषचंद्र बोस यांच्याशी त्यांचा संबंध आला. त्यावेळी ते केंब्रिज विश्व विद्यालयाची 'मानसशास्त्र व नीतिशास्त्र' या विषयाची पदवी परीक्षा देत होते. १९२० सालीच ते चौथ्या क्रमांकाने आय्. सी. एस्.ची परीक्षाही उत्तीर्ण झाले होते. मायदेशी परतून गलेलठ्ठ पगाराची नोकरी करण्याचा त्यांच्या आईचा मानस ते जाणून असूनही देशाच्या एकंदर परिस्थितीशी ते संधान बांधून होते. त्यांच्या इतर मित्रमंडळी सोबतच्या बैठकीही भाऊंच्याच खोलीत व्हायच्या. ते आपल्या मनातील संघर्ष बरेचदा मित्रांना बोलून दाखवायचे. त्यांनी भाऊंच्या खोलीत बसूनच आय्. सी. एस्.च्या पदवीचा त्याग केला. म्हणाले– 'माझ्या भारतमातेची व ब्रिटिशांची अशी दोघांचीही सेवा एकाचवेळी करता येणे शक्य नाही म्हणून मी आय्. सी. एस्.च्या पदवीचा स्वखुशीने त्याग करीत आहे.' भाऊंचीही अवस्था त्यावेळी सुभाषचंद्रांसारखीच होती. म्हणूनच आय्. सी. एस्. होता आले नाही याची त्यांना मुळीही खंत वाटली नाही.

पण सुभाषचंद्रांच्या सान्निध्याने, त्यांच्या वास्तव्याने भाऊंमध्ये देशाप्रति एक धनात्मक बदल घडून आला आणि मनातील कित्येक संघर्षांनीही यावेळी निश्चित निर्णयाचे पैलतीर गाठले.

## सामाजिक चळवळीत प्रवेश

आंग्लविद्याविभूषित होऊन पंजाबराव मायदेशी परतल्याचा राधाबाई व श्यामराव

बापूंना जेवढा आनंद झाला त्याहीपेक्षा अधिक, मातृभूमीच्या दर्शनाने डॉ. भाऊसाहेबांच्या वृत्ती उचंबळून आल्या होत्या. अमरावतीचे प्रसिद्ध समाजभूषण काशीराव बापू देशमुख यांनी निवडक कार्यकर्त्यांच्या उपस्थितीत स्वत:च्या घरी मोठ्या प्रेमादराने भाऊसाहेबांचा सत्कार केला. सत्काराच्या भाषणात ते म्हणाले, "आजवर बहुदा गर्भश्रीमंतांचीच मुलं विलायतेला गेली, पण पापळच्या एका सामान्य शेतकऱ्याने आपल्या सुपुत्राला विलायतेला पाठवावे आणि त्यानेही आपल्या बॅरिस्टरीबरोबरच डी. फिल्. सारख्या पदवीने विभूषित होऊन यावे ही घटनाच मोठी अभिमानास्पद व अभिनंदनीय आहे!" उत्तरादाखल भाऊसाहेबांचं म्हणणं होतं, "मी जरी बॅरिस्टर झालो तरी पण माझ्यासारखे अनेक बॅरिस्टर जर झाले नाहीत तर माझ्या एकट्याचा काहीच उपयोग होणार नाही. माझा विलायतचा अनुभव हेच सांगतो की आपल्या रक्ताचा एकेक थेंब - एकेक कण सर्वांच्या अभ्युदयाकरिता खर्च करीत राहा, ज्ञानयज्ञ अखंड चालू दे!"

... भाऊसाहेबांची तळमळ ही अशी व्यक्त होत होती. डॉ भाऊंची दृष्टी खऱ्या अर्थाने डोळस होती. आकोटच्या टिळक राष्ट्रीय विद्यालयाचे शिक्षक व सुविख्यात कार्यकर्ते श्री. हरिहरराव देशपांडे लिहितात, 'ते साल बहुदा २६-२७ असावे. आकस्मिक योगायोगानेच माझी व भाऊसाहेबांची भेट झाली. प्रथमदर्शनीच मला जर कोणती गोष्ट जाणवली असेल तर ती म्हणजे त्यांची भेदून जाणारी दृष्टी! समोर बसलेल्या प्रत्येक माणसाच्या आरपार ते पाहात असावेत, किंबहुना त्याच्याही पलिकडील कोणत्या तरी वस्तूचा वेध त्यांची दृष्टी घेत असावी! त्यांच्या दृष्टीतील ही नैसर्गिक भेदकताच त्यांच्या जीवनातील पुढील यशाला कारणीभूत झाली असावी.'

भाऊसाहेबांची दृष्टी केवळ पारदर्शीच नव्हे तर थेट भविष्याचा वेध घेणारी होती. प्राचार्य आर. एन. खर्चे यांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या भाऊसाहेबांच्या ५८ व्या वाढदिवशी प्रकांडपंड़ित प्रा. डॉ. श्री. ह. अत्तरदे यांनी आपल्या रसाळ भाषणात म्हटले होते - "भाऊसाहेबांचे जुने कार्यकर्ते रेवशाचे श्री. काशीराव बापू वाकोडे यांनी दीर्घकाळ जपून ठेवलेला भाऊसाहेबांचे हातचा कागद मिळाला. त्यात परदेशाहून परत आल्यावर भाऊसाहेबांनी काय काय करायचे ठरविले होते याची मुद्देसूद नोंद आहे. त्यावरून भाऊसाहेबांचे द्रष्टेपण व समाजोन्नतीची तळमळ व्यक्त होते. भाऊसाहेब ही अनन्यसाधारण अशी एक महान् व्यक्ती आहे. त्यांना विद्या शिकत असतानाच व्यापक सामाजिक कार्याची स्वप्ने पडत होती. त्यांचे त्यावेळचे मनोगत या जुन्या कागदाच्या ओळीओळीतून व्यक्त होते. त्यावेळी त्यांनी ज्या कल्पना केल्या होत्या त्याचा पडताळा आज इतक्या वर्षांनंतर प्राप्त झालेल्या परिस्थितीशी ताडून पाहावा. त्यातील एकेक गोष्ट स्पष्टपणे विधायक स्वरूपात मांडलेली दिसेल. देश, राष्ट्र, समाज असे मोठमोठे नुसतेच कर्णमधुर पण अव्यक्त अर्थाचे शब्द न वापरता त्यांनी शेतकरी समाज हा निश्चितपणे

आपल्या डोळ्यापुढे ठेवला होता. भाऊसाहेब हे सच्चे सेवक आहेत. त्यांना खरी समाजवादी समाजरचना निर्माण करायची आहे.''

ज्या कागदाच्या आधारे डॉ. अत्तरदे यांनी वरील उद्‌गार काढले त्याचे शीर्षक आहे – 'फार्मर्स फोर्टिन पॉइण्टस्!' त्यात शेतकऱ्यांच्या मुलांना मोफत शिक्षण देणे, शासकीय संस्थांमध्ये व नोकरीत त्यांच्यासाठी ८० प्रतिशत जागा राखून ठेवणे, शेतकऱ्यावरील कर्जाचा बोजा नाहीसा करणे इत्यादि महत्त्वाच्या गोष्टी तर आहेतच; पण त्याहूनही अधिक महत्त्वपूर्ण व क्रांतिकारक असे मुद्दे पुढीलप्रमाणे आहेत –

(१) विशिष्ट उत्पन्नाची वगैरे अट न ठेवता प्रत्येक प्रौढाला मतदानाचा अधिकार मिळायलाच हवा. (२) शेतकऱ्यांची बँक स्थापन केली जावी आणि तिच्या द्वारे शेतकऱ्यांना कमी व्याजाने लांब मुदतीची कर्जे देण्यात यावी. (३) देवस्थानच्या मालमत्तेचा उपयोग शिक्षणासाठी व रुग्णालये उघडण्यासाठी व्हावा (४) लष्करी शिक्षण हे सक्तीचे केले जावे. (५) जमिनीची समान वाटणी व्हावी. (६) सरकारी अधिकारी व वकील वगैरेंच्या संपत्तीची योग्य तऱ्हेने मोजदाद करण्यात यावी, इत्यादि.

### वकिलीचा व्यवसाय

विलायतेहून परतल्यावर सामाजिक तळमळीबरोबरच आणखी एक तुफान भाऊसाहेबांसमोर घोंघावत होते आणि ते म्हणजे कर्जाचे. सदतीस हजार रुपये व्याजासह देण्याची जबाबदारी त्यांचेवर येऊन पडली होती आणि ही रक्कम चुकती करायला त्यांनी काहीतरी हातपाय हलविणे आवश्यक होऊन बसले होते. या पार्श्वभूमीवर त्यांच्या नावाची पाटी इर्विनकडून स्टेशनकडे जाणाऱ्या रस्त्याने एकदाची झळकली.

भाऊसाहेबांच्या वकिलीची सुरुवात झाली ती गुलाबराव नायगावकरांच्या अत्यंत गाजलेल्या खटल्याच्या रूपाने. नायगावकरांचा 'सत्यशोधक जलसा' त्याकाळी मोठा प्रख्यात झाला होता. बहुजनांच्या जागृतीसाठी म्हणूनच हे प्रभावी माध्यम सत्यशोधकांनी निवडले होते. या तमाशातून लोकजागृतीची गाणी म्हटली जात आणि ब्राह्मणांनी निर्माण केलेल्या सामाजिक भेदांवर अत्यंत तीव्र टीका केलेली असे. शंभर व्याख्यानांपेक्षा एक जलसा प्रचारदृष्ट्या भारी पडत असल्याने विरोधकांनी नायगावकरांच्या तमाशात दंगल माजविली आणि पोलिसांनी गुलाबराव व त्यांचे साथीदारांवर फौजदारी खटला भरला. हा खटला म्हणजे गुलाबरावांच्या इभ्रतीवर आलेले एक भयानक गंडांतर होते. शिवाय गुन्हा हुल्लड माजविणाऱ्यांचा असताना दोषी मात्र नायगावकर ठरविले गेले होते. ब्राह्मण–ब्राह्मणेतर या वादातून उद्भवलेल्या या तंट्यात ब्राह्मण वकील निष्पक्ष न्याय देईल यावर गुलाबरावांचा विश्वास नव्हता म्हणून त्यांच्यासमोर हा खटला चालवायला दिसले ते नव्या दमाचे भाऊसाहेब; आणि भाऊसाहेबांच्या वकिली जीवनाची

ती सुरुवात ठरली.

भाऊसाहेबांनी वकील या नात्याने या प्रकरणाचा सखोल अभ्यास करून मजबूत व आक्रमक पवित्रा घेतला आणि मोठ्या शिताफीनं विजयश्री खेचून आणली.

भाऊसाहेब जसे कायदेपंडित तसेच तत्त्वज्ञानाचेही पंडित होते आणि त्याहूनही अधिक ते धीराचे तर होतेच; पण मानवतेचेही पुजारी होते. एक छोटासा प्रसंग. दिवाणी कोर्टात त्यांचा पहिलाच खटला होता. तेथे रेकॉर्ड कीपर एक मुसलमान कारकून होता. स्वभावाने तुसडा व उर्मट. भाऊसाहेब पावणेदोनच्या सुमारास आपल्या पक्षकारासह आत प्रवेशले. त्या कारकुनाच्या टेबलावर आपल्या पक्षकाराची फाईल पाहाताच भाऊसाहेबांनी ती उचलली. रेकॉर्ड इन्स्पेक्शनचे तिकीट रजिस्टर आधीच भरले होते. पण लगेच तो रेकॉर्डकीपर खेकसला – ''रेकॉर्ड रख दो वहाँ! अभी दो नही बजे और चले हाथ लगाने!'' भाऊसाहेबांनी ते निमूटपणे खाली ठेवले आणि जवळच्याच खुर्चीवर विराजमान झाले. तिथे उपस्थित असलेले सीनिअर वकील काशीनाथपंत चंदावरकर मात्र चिडून गेले. त्यांनी रेकॉर्डकीपरची खडसून हजेरी घेतली. पण भाऊसाहेब त्यांनाच शांत करीत म्हणाले – ''चूक खरोखर आपली आहे. रेकॉर्डस्च्या नियमाप्रमाणे अजून वास्तविक दोन वाजलेले नाहीत. कायदा वकिलांनीही पाळायचा नाही तर मग कुणी ?'' त्यांचा संयम पाहून चंदावरकर म्हणाले, ''कमाल आहे बुवा तुमची! अहो पण काही माणुसकीचाही प्रश्न असतो की नाही ?'' यावर भाऊसाहेबांनी उत्तर दिले, ''तो प्रश्न जसा त्याला तसा आपणालाही लागू आहे. प्रकरण लांबलं तर नुकसान आपलं होणार नाही, हा म्हातारा मात्र नोकरीला निश्चित मुकेल. त्याच्या त्या त्रासाच्या मानानं आपला हा त्रास काहीच नव्हे! तेव्हा शांत राहाणंच ठीक!'' या नव्या रक्ताच्या शांतिदूताकडे चंदावरकर आश्चर्याने बघतच राहिले.

भाऊसाहेबांचे नावे एक दिवस अचानक एक दरबारी थाटाचे पत्र आले. ते पत्र होते ग्वाल्हेर संस्थानचे. सोबत काही रक्कमही पाठविली होती. श्री. गुलाबराव नायगावकरांची 'केस' यशस्वीपणे हाताळल्याबाबत भाऊसाहेबांचा गौरव करून त्यांना ग्वाल्हेर दरबारी निमंत्रित केले होते.

ग्वाल्हेर संस्थानात श्रीमंत आंग्रे यांनी भाऊसाहेबांचा दरबारी थाटात सन्मान केला व त्यांनी आपला मानस व्यक्त करताना सांगितले, ''आपल्यासारख्या कर्तबगार व सुशिक्षित व्यक्तीची कायद्याच्या कामासाठी ग्वाल्हेर दरबाराला आवश्यकता आहे. आपण दरबारातील ही मानाची नोकरी स्वीकारल्यास मला अतिशय आनंद होईल!'' भाऊसाहेबांनी त्यांच्या सदिच्छांबाबत आभार मानून स्पष्टपणे सांगितले की, – ''नोकरीच्या पोलादी चौकटीत माझ्या भावना नि माझे विचार गुदमरून जातील. मी आपणास शक्य तितके सहाय्य हवे तेव्हा करू शकेन, पण नोकरी सध्या तरी शक्य

नाही.''

भाऊंच्या या वक्तव्याने श्रीमंत आंग्रे यांचा त्यांच्याविषयीचा आदर अधिकच दुणावला आणि पायाशी चालून आलेला दरबारी मानमरातब व धनवैभवाचा ठेवा बेगुमानपणे बाजूस सारून भाऊसाहेब परतले. समाजसेवेचं व दु:खी-कष्टी लोकांच्या उद्धाराचं काकण बांधलेल्या भाऊंचं सोनेरी पिंजऱ्यात मन रमणार तरी होतं का?

## शिक्षण क्षेत्रात प्रवेश

बॅ. भाऊसाहेबांनी ज्या दिवशी वकील म्हणून बाररूममध्ये प्रवेश केला त्याचवेळी त्यांच्यातल्या डॉ. भाऊसाहेबांनी 'शिवाजी मराठा हायस्कूल'मध्ये शिक्षक म्हणून पदार्पण केलं, आणि तेही विनावेतन. त्याला कारणही तसेच होते. भाऊसाहेबांचा पक्का विश्वास होता की आपल्या दैन्याच्या मुळाशी असलेलं प्रमुख कारण म्हणजे अज्ञान हे होय. आणि या साऱ्याचा नायनाट करायचा असेल तर सर्वांना शिक्षणाची दालनं खुली करून दिली पाहिजेत. सर्वांना शिक्षणाच्या समसमान संधी उपलब्ध झाल्या पाहिजेत. काम पर्वतप्राय मोठं होतं. कुठेतरी सुरुवात करणं आवश्यक होतं, आणि याच प्रेरणेतून त्यांच्यातला तत्त्वज्ञ बॅरिस्टरी झगा उतरवून शिक्षणाचं सिंचन करायला पुढं आला होता. खेड्यातून शिकायला येताना आणि आल्यावर देखील या गरीब विद्यार्थ्यांना केवढ्या बिकट परिस्थितीला तोंड द्यावे लागते आणि शहरी व संपन्न विद्यार्थ्यांच्या स्पर्धेत या ग्रामीण विद्यार्थ्यांना आपले स्थान टिकविण्यासाठी किती भयंकर कष्ट पडतात याचा प्रत्यक्ष अनुभव स्वतः भाऊसाहेबांनी घेतलेला होताच. आणि म्हणूनच खऱ्या अर्थाने त्यांच्या मनात विद्यार्थ्यांविषयीची एक कारुण्यात्मक जिवंत अनुभूती उचंबळत होती... 'या विदर्भाच्या मातीचे ऋण मला फेडायलाच पाहिजे. कष्टातून शिक्षण घेणाऱ्या या बांधवांना सारी शक्ती वेचून सहाय्य न केले तर मी माझ्या कर्तव्यास चुकलो असे होईल' - ही विनम्र सेवाबुद्धी त्यांच्या रोमारोमात संचार करीत होती आणि याच वृत्तीने या बॅरिस्टर व डॉक्टर झालेल्या पुरुषास निर्वेतन शिक्षक होण्यास भाग पाडले होते. शिक्षकाच्या जबाबदारीसंबंधीच्या त्यांच्या कल्पना तशाच उदात्त होत्या. श्री. भ. रा. जवादे मास्तरांना एडिंबरोहून दि. ५-९-२२ ला पाठविलेल्या पत्रात त्यांनी लिहिले होते, 'शिक्षकाची आपल्या विद्यार्थ्यांसंबंधीची जबाबदारी त्यांच्या आईबापांपेक्षाही कितीतरी पटींनी जास्त आहे. कारण लहानपणी आईबापांच्या हयगयीमुळे किंवा अज्ञानामुळे मुलावर झालेले दुष्परिणाम हे शिक्षणानेच दूर होऊ शकतात.'

## श्रद्धानंद छात्रालय

एका धर्मवेड्या मुसलमानाने कपटाने महात्मा श्रद्धानंदांची क्रूर हत्या केली होती.

समाजक्रांतीचे बीजारोपण करणाऱ्या महात्म्याची अशी हत्या म्हणजे त्यांच्या 'हे विश्वची माझे घर' या संकल्पनेलाच तडा. अमृतसरच्या गाजलेल्या अधिवेशनातील स्वामी श्रद्धानंदांचे जिव्हाळ्याचे बोल प्रेरणादायी होते. ते म्हणाले, ''आपल्या अस्पृश्य बांधवांच्या मुलांना तुमच्या मुलांबरोबर शिक्षण घेऊ द्या, त्यांच्या कुटुंबांना तुमच्या कुटुंबात वावरायास वाव द्या....'

... आणि श्रद्धानंदांच्या हत्येनंतर श्रद्धानंद छात्रालयाच्या रूपात श्रद्धानंदांचे विचार साकार झाले होते. या प्रयोगात जातिभेदाच्या बुरुजांना सुरुंग लावून मांग-महार-मराठा-मुलसमान-चांभार-माळी सारे विद्यार्थी एकत्र आणून सामाजिक विषमतेची व जातीयतेची धारच बोथट करून टाकली होती. पुढे या छात्रालयानं मागासलेल्या समाजातून अनेक माणिक मोती निवडून, त्या हिऱ्यांना पैलू पाडून समाजाच्या व राष्ट्रउभारणीच्या कार्याला हातभार लावला होता.

## शेतकरी संघ

शेतकऱ्याचे अपार दुःख-दारिद्र्य भाऊसाहेबांनी आजन्म अनुभवले होते. अज्ञान, दारिद्र्य व व्यसनांनी वेढलेल्या या विराट समाजाच्या मुक्तीची आत्यंतिक गरज त्यांना वाटत होती. या भूमिपूत्रांच्या दुःखांकडे सामाजिक महत्त्वाची आस्था म्हणून अजून कुणीच कसे बघितले नाही याचे भाऊंना आश्चर्य वाटत होते. कृषिप्रधान देशात कृषकाची चाललेली ही अक्षम्य उपेक्षा हीच आपल्या ऱ्हासाची कारणे होत हे त्यांच्या पारदर्शी नजरेला कळत होतं. आणि म्हणूनच त्याच्यासाठी काहीतरी केले पाहिजे ही कल्पना भाऊंना अस्वस्थ करीत होती. याच आस्थेतून शेतकरी संघाचा उदय झाला. हा पक्ष शेतकऱ्यांचा होता... सर्वांचाच होता. या पक्षाबद्दल ज्येष्ठ साहित्यिक श्री. पां. श्रा. गोरे यांनी लिहिले आहे – 'शेतकरी पक्ष हा त्यावेळी बराच गाजला होता आणि राजकारणातही आघाडीवर होता. कारण त्या पक्षाचे सारे कार्यकर्ते तरुण रक्ताचे होते, बुरसटल्या बुद्धीचे नव्हते. या पक्षाने शेतकऱ्यांचे अगदी भरीव कार्य केले.'

## मोर्शीचे अधिवेशन

लाला लजपतराय या पंजाबसिंहाच्या अध्यक्षतेखाली हिंदु महासभेने एप्रिल १९२७ च्या सुरुवातीस अ. भा. स्वरूपाचे अधिवेशन विदर्भातील ब्राह्मणेतर चळवळीचे अग्रस्थान असणाऱ्या मोर्शीत आयोजित केले होते; आणि मुख्य म्हणजे या अधिवेशनात ब्राह्मणेतर चळवळीच्या नेत्यांना व अस्पृश्यांना प्रवेशबंदी करण्यात आली होती. आपल्या बालेकिल्ल्यात नाकावर टिचून घेण्यात आलेल्या त्या सोवळ्या ब्राह्मणी अधिवेशनाकडे ढुंकून देखील पाहायचे नाही असा ब्राह्मणेतर चळवळीचे नेते श्री. नानासाहेब अमृतकर

ांचा निश्चय होता; तर हे असले असहकारी अलिप्ततेचे धोरण भाऊसाहेबांना मुळीच टत नव्हते. त्यांच्या मते, 'अन्याय करणाराइतकाच त्याला संमती देणारा नि तो घड्या डोळ्यांनी पाहाणारा दोषी असतो.' भाऊसाहेबांच्या मते किमान हिंदू या ात्याने तरी तेथे जाण्याचा आपणा प्रत्येकाचाच हक्क आहे. अस्पृश्य बांधवांच्या प्रवेशाचा क्क नाकारला जातो त्याकडे दुर्लक्ष करणे हा त्यावरील इलाज नसून आपण प्रत्यक्ष अधिवेशनात जाऊन ते अधिवेशनच काबीज करून तेथून या प्रश्नाला वाचा फोडणं रजेचं आहे.

... सायंकाळी भाऊसाहेब आपल्या शिष्टमंडळासह लाला लजपतराय यांना त्यांच्या निवासस्थानी भेटले आणि अधिवेशनातील 'अंदरकी बात' त्यांनी लालांच्या कानावर ातली. त्यावर लाला भाऊंना म्हणाले, ''हे सारे मला माहीत असते तर मी अध्यक्षस्थानच स्वीकारले नसते.''

भाऊसाहेबांनी लालाजींना शहरात पाचारण केले. भाऊसाहेब गुंड वगैरे मंडळींनी ालविलेल्या मराठा बोर्डींगमध्ये त्यांचे मानपत्र देऊन स्वागत करण्यात आले. भाऊंच्या ार्यावर खूष होऊन त्यांनी त्यांचे मनापासून कौतुक केले व भरल्या हृदयानं त्यांच्यापासून ोर आकांक्षा व्यक्त केल्या.

दुसऱ्या दिवशी लालाजींनी सर्व हिंदूंना प्रवेश देण्याचा व्यवस्थापकांना आदेश दिला. सभामंडप अगदी भरून गेला. भाऊसाहेब व त्यांच्या सहकाऱ्यांना लालाजींनी यासपीठावर बसवून घेतले व कोणाच्याही विरोधाला न जुमानता आपले विचार ांडण्याची त्या क्रांतिपुत्राला संधी दिली. भाऊसाहेबांना कुठल्याही पक्षाची व ळवळीची तरफदारी करायची नव्हती. त्यांना हवा होता एक भेदभावविरहीत आदर्श माज! आणि म्हणून त्यांनी बहुजनसमाजापासून स्वतःला वेगळे व विशेष समजणाऱ्या ोवळ्या सनातन्यांचा संकुचित बुरखाच आपल्या छोटेखानी भाषणात फाडून टाकला ाणि 'हिंदू तितका बंधू' ही व्यापक भावनाच राष्ट्रभावना होऊ शकते यावर भर दिला.

भाऊसाहेबांच्या भाषणानंतर ''चातुर्वर्ण्यजन्य जातिभेद व तज्जन्य अस्पृश्यता'' ांचा निषेध करणारा ठराव मांडला व बहुमताने पारित करून घेतला. हा ठराव ांडणारे श्री. दादासाहेब घोरपडे यांच्याच शब्दात सांगायचे तर 'सारे अधिवेशन ापल्या ताब्यात घेण्याच्या या चमत्कारामुळे या प्रदेशातील लोकमताचे बलाबल जपतरायांना चांगलेच कळून आले. हा प्रसंग म्हणजे भाऊसाहेबांच्या धाडसी व ुसंडी स्वभावाचे प्रत्यंतर! त्यावेळचा तो संघटित जोम व ते प्रत्यक्ष यश हे सारे ाऊंच्या प्रेरणेचे फळ होते.

पंजाबकेसरी लालांनी आपल्या अध्यक्षीय भाषणात याच विचारांचा पुरस्कार करीत हटले होते, - ''हिंदू हा शब्द निंद्य नसून गौरवास्पद आहे. पण त्याचा गौरव आम्ही ापल्या वर्तनाने अधिक वाढविला पाहिजे. धर्माच्या दृष्टीने, माणुसकीच्या दृष्टीने व

राष्ट्रहिताच्या दृष्टीने हिंदूंनी अस्पृश्यतेला मूठमाती दिली पाहिजे...''

... याप्रमाणे 'ब्राह्मणेतर' कार्यकर्त्यांना शह देण्यासाठी भरविलेले हे 'ब्राह्मणी' अधिवेशन हे दोन्ही पक्षांपासून अलिप्त असणाऱ्या एका स्वतंत्र विचाराच्या तरुणाने गाजविले, यातून दिसली ती भाऊसाहेबांची निखळ मानवतावादी विचारसरणी होय.

## मंदिर-प्रवेशाचा सत्याग्रह

अस्पृश्यता निवारणाचा एक आद्य प्रयत्न म्हणून या सत्याग्रहाचे नाव घेता येईल. १९२७ च्या नोव्हेंबर पर्यंत अस्पृश्यांना अंबादेवीच्या देवळात प्रवेशबंदी होती. प्रश्न मूर्तिपूजेचा नव्हता. तो होता सामाजिक विषमतेचा आणि अस्पृश्यतेचा. एका बापाची चार लेकरं स्पृश्य-अस्पृश्य कशी ? - हा भाऊंचा सवाल. त्याचे प्रत्युत्तर म्हणून मंदिर प्रवेशाच्या सत्याग्रहाची तारीखही निश्चित झाली. या गोष्टीला अडथळ्यांना काही कमी नव्हती. घरचेही तसेच अन् दारचेही तसेच अशी गत झालेली. विरोधक होती प्रसिद्ध राष्ट्रभक्त व थोर मुत्सद्दी श्रीमंत दादासाहेब खापर्डे, वाय्. जी. देशपांडे आदि प्रथितयश वकिलांची व कितीतरी बुवा-पंडितांची कसलेली बुद्धिमत्ता, केवले-चिमोटे सारख्यांची श्रीमंती व त्याच्याच जोडीला व्यायामप्रेमी युवकांची संघटित शक्ती. बुद्धिभ्रंश झालेला भाविक बहुजनसमाज देखील त्यांचीच बाजू घेणार होता. आणि या सर्वांच्या विरोधात रणशिंग फुंकणार होता एक २९ वर्षांचा कर्जबाजारी आणि पोरसवदा बॅरिस्टर - भाऊराव देशमुख.

मंदिरप्रवेशाच्या सत्याग्रहाचा भाग म्हणून नोव्हेंबरच्या मध्यंतरात सत्याग्रहींची विदर्भ प्रांतिक परिषद आयोजित करण्यात आली होती. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांना या परिषदेचे अध्यक्ष नियोजित केले होते. परिषदेच्या निमित्ताने भाऊसाहेबांच्या तुफानी प्रचार दौऱ्याचा परिपाक म्हणून गावोगावचे सत्याग्रही जत्थे अमरावती नगरीत शिरू लागले. देवीच्या महाद्वारी मोर्चे नेऊन हजेरी देऊ लागले. श्रीमंत दादासाहेब खापर्डे हे अंबादेवी संस्थानचे प्रमुख विश्वस्त होते. त्यांचे पुराणमतवादी सहकारी हट्टाला पेटले होते व मोर्चेकऱ्यांमुळे परिस्थितीला अनिष्ट वळण लागण्याची शक्यता होती. त्यांनीच डॉ. बाबासाहेबांना पत्र दिले, 'येत्या तीन महिन्यांत आमच्या विश्वस्तांची मने वळवून मी हे मंदिर सर्वांसाठी खुले करून देतो.' डॉ. बाबासाहेबांनी शांततापूर्ण हृदय परिवर्तनाचा मार्ग स्वीकारून सत्याग्रह लांबणीवर टाकण्यास रुकार दिला. पुढे बऱ्याच कालावधीनंतर या मंदिराची दारे सर्वांसाठी खुली करण्यात आली.

... आणि भारतात मंदिरप्रवेशाचे नवे पर्व सुरू झाले.

## जिल्हा कौन्सिलवर

त्यावेळी जिल्ह्यात दोन पक्ष होते. ब्राह्मणेतर पक्ष आणि राष्ट्रीय पक्ष. राष्ट्रीय पक्षाचे

बलाबल अधिक असल्याने सत्ता नेहमी त्यांच्याच मुठीत राहायची. बॅ. रामराव देशमुखांची निवड राज्यमंत्रीपदी झाल्याने जिल्हा कौन्सिलची जागा रिक्त झाली होती. या जागेसाठी डॉ. भाऊसाहेबांनी उभं राहावं या डॉ. आबासाहेब खेडकरांच्या प्रस्तावाचे शेतकरी संघाने स्वागत केले आणि राष्ट्रीय पक्षाचे ॲड. शेवडे विरुद्ध शेतकरी संघाचे डॉ. भाऊसाहेब देशमुख असा सरळसरळ सामना रंगला. राष्ट्रीय पक्षाशी उभा दावा असणाऱ्या ब्राह्मणेतर पक्षाने आपले समर्थन भाऊंना देऊ केल्याने इतरही कौन्सिल सदस्यांचा विवेकी कौल भाऊसाहेबांकडे झुकू लागला. विजयाची शंभर टक्के खात्री झाली आणि पचमढींहून तार आली – '३१ मे १९२७ ची निवडणूक रद्द ठरविण्यात आली आहे' निवडणूक रद्द होणार नव्हतीच. फार तर ती लांबली असती पण राष्ट्रीय पक्षाने भाऊसाहेबांच्या उमेदवारीलाच आव्हान केले. न्या. चांदूरकरांनीही शहरात राहणाऱ्या भाऊसाहेबांना ग्रामीण भागात उभं राहाता येणार नाही असा निर्वाळा दिला. वर्षभर हे प्रकरण गाजवून भाऊसाहेबांनी आपणास कायदेशीर अधिकार असल्याचे सिद्ध करून दिले; आणि १९२८ च्या सुरुवातीच्या काळात नाकावर टिच्चून निवडणूक घ्यावी लागली. भाऊसाहेबांसह त्यांच्या सहकाऱ्यांना विजयश्री मिळाली आणि सत्तेचे हे सिंहासन धनदांडग्यांची मिरास आहे, ही जनमानसात रूढ असलेली समजूत मुळासकट उपटून फेकली गेली.

आपल्याला मिळालेलं सिंहासन हे शोभा वाढविण्यासाठी नसून जनसेवेचं व्रत सफल करण्यासाठी आहे हे भाऊंना ठाऊक होतं, त्यामुळेच त्यांनी या पदाचा जनकल्याणार्थ अधिकाधिक फायदा करून घेतला. त्यांच्या या कारकीर्दीत आसरा-अमरावती, इटकी-दर्यापूर परिसरासाठी 'पाणी पुरवठा योजना' आली; 'सक्तीचे शिक्षण' या योजनेअंतर्गत ११ वर्षाखालील मुलामुलींना शिक्षण अनिवार्य करून गावोगावी प्राथमिक शाळा उघडल्या गेल्या व प्राथमिक शाळांवर स्त्री शिक्षिका नेमण्याचा उपक्रम फलद्रूप झाला. इतकेच काय, अस्पृश्यांच्या पाणवठ्याची योजना, खादी प्रचार यात्रा, इत्यादि अनेक कल्याणकारी योजना नियमांच्या कक्षेत राहून कधी स्वत: प्रत्यक्ष तर कधी आपल्या सहकाऱ्यांकरवी भाऊंनी अंमलात आणल्या.

## निवडणुकीच्या रणांगणात

१९३० सालच्या मध्यप्रदेश कायदेमंडळाच्या निवडणुका जाहीर झाल्या आणि जिल्हा कौन्सिलवर कार्यरत असणाऱ्या भाऊंना प्रांतीय स्तरावर जाऊन सत्ता हाताळता आल्यास अधिक जनकल्याणकारी व अधिक जनताभिमुख होता येईल असा विश्वास वाटला; आणि याच कळकळीने प्रेरित होऊन भाऊसाहेबांनी मध्यप्रदेशाच्या कायदेमंडळाची निवडणूक लढण्याचा निर्णय घेतला.

आधीच मंत्रीपदी विराजमान असलेल्या बॅ. रामराव देशमुखांची फळी मजबूत होती; आणि निवडणूक लढविण्याची त्यांची तशी इच्छाही नव्हती. परंतु राजकीय क्षेत्रातील हितचिंतकांनी त्यांना प्रोत्साहित केले. बॅ. रामराव आणि बॅ. भाऊसाहेब यासारख्या विद्याविभूषितांमध्ये सरळ सामना व्हावा हे विचारवंतांना पटेना आणि मागासलेल्यांच्या विकासासाठी अहोरात्र झटणाऱ्या भाऊंनी माघार घ्यावी हेही पटेना. म्हणून बापूसाहेब देशमुखांसारख्या निकटवर्तीयांनी बहुजनांमधील संभाव्य फूट टळावी म्हणून बॅ. रामराव देशमुखांना परावृत्त करण्याचा प्रयत्न केला पण दोघांमध्ये सरळ सामना अखेर जाहीर झालाच.

शेतकरी संघाची वेगळी चूल मांडल्याने ब्राह्मणेतर पक्षातील दुखावलेली मंडळी भाऊसाहेबांना पाठिंबा देऊ नये या विचाराने प्रेरित होऊन भाऊसाहेबांविषयी अपप्रचार करू लागली. पण ब्राह्मणेतर पक्षाचे अध्वर्यू रा. ब. के. एस्. नायडू सारख्या त्यागी व सज्जन कार्यकर्त्यांच्या मध्यस्थीने व भाऊसाहेबांच्याच उमेदवारीने अधिक जनकल्याण अपेक्षित असल्याने ब्राह्मणेतर पक्षाचा विरोध मोडून काढला आणि ब्राह्मणेतर पक्ष व शेतकरी संघ यांचे संयुक्त पाठबळ घेऊन भाऊसाहेब निवडणुकीच्या रिंगणात उतरले.

तसा हा संग्राम सोपा नव्हता. बॅ. देशमुखांची फळी तन-मन-धनाने सज्ज होती; तर भाऊसाहेबांजवळ मोजक्या बिनीच्या कार्यकर्त्यांशिवाय अधिक काहीच नव्हते. बॅ. रामरावांकडे मोटारगाड्यांचा ताफाच्या ताफा तर भाऊसाहेबांचे पायदळ दौरे-अशी गत. पुढे तुटपुंजी निवडणूक सामग्री ही भाऊसाहेबांच्या वाट्याला आली. पण ती बाब दुय्यम ठरली. भाऊसाहेबांच्या कार्यकर्त्यांजवळ भाऊसाहेबांबद्दल लोकांना सांगायला भरपूर होते. जिल्हा कौन्सिलमधील भाऊसाहेबांची भरीव कामगिरी जनतेची दृष्टी वेधून घेत होती.

प्रचाराच्या रणधुमाळीत निवडणुकीचा दिवस उगवला आणि भाऊसाहेब ८०० मतं अधिक घेऊन विजयाचे मानकरी ठरले. १४ डिसेंबर १९३० रोजी 'म. प्र. विदर्भाचे मंत्री' म्हणून भाऊसाहेबांचा शपथविधी पार पडला. मंत्रीपदी आरूढ झाल्यावर देखील पंजाबराव आधी सर्वांचे 'भाऊ' आणि नंतरच 'साहेब' होते.

योग्यतेचा सन्मान झालाच पाहिजे, ज्याचे श्रेय त्याला मिळालेच पाहिजे - या मताचे होते नामदार भाऊसाहेब. मंत्री झाल्या झाल्या गाजलेल्या डॉ. वि. भि. कोलते व सौ. कुसुमावती देशपांडे यांच्या नियुक्त्या सुद्धा त्याचा पडताळा देतील.

ना. भाऊसाहेबांची मंत्री या नात्याने पावणेतीन वर्षांची कारकीर्द चांगलीच गाजली. त्यात त्यांनी केलेल्या कामाचा आलेख हा सतत उंचावणारा होता. त्यातील व्हिलेज पंचायत बिल, सहकारी सोसायट्यांना उत्तेजन, अस्पृश्यतानिवारण बिल, रोगप्रतिबंधक कायदा ही काही महत्त्वाची कार्ये होत. पण खरा कळस गाठला तो डॉ. भाऊसाहेबांनी

आणलेल्या 'कर्ज लवाद' कायद्यामुळे. विदर्भ-मध्यप्रदेशचा बहुतांशी शेतकरी सततच्या ओल्या-कोरड्या दुष्काळांत भरडत असल्यामुळे त्याच्यावरील कर्जाचा डोंगर काही केल्या कमी होत नव्हता. कर्जापोटी गहाण टाकलेली शेती त्यामुळे सावकाराच्या घशात जाऊ लागली. मुद्दलापेक्षा दहा पट अधिक व्याज देऊनही आणि बापाचं कर्ज फेडण्यात मुलाचा जन्म खर्ची घालूनही केवळ १०० रुपयांच्या कर्जापोटी शेतंच्या शेतं सावकारी पाशात आवळू लागली. शेतसाराच भरणे जिथे अवघड तिथे तो कर्जाचे हसे चुकवणार कसा? आणि त्यातच जागतिक मंदीने शेतीमालाच्या भावाची अभूतपूर्व घसरण झाली आणि कर्जाचे डोंगर अधिकाधिक वाढू लागले.

पद्धतशीरपणे रचलेला हा चक्रव्यूह भेदणे आवश्यक होते; अभिमन्यूची वाट होती; आणि भाऊसाहेबांच्या रूपानं तो चक्रव्यूह भेदायला अभिमन्यू तत्पर होता.

वास्तविक या कायद्यामुळे वकील व सावकार यांचीच कुरणं कमी होणार होती आणि त्यांचे भक्ष्य बनलेल्या जनतेच्या दृष्टीने ते योग्यही होतं, पण झालं उलटच. ज्यांच्या फायद्यासाठी झटायचे तेच विरोध करीत होते. म्हणून भाऊसाहेबांनी सभागृहा खेदाने उद्‌गार काढले होते - "आपला शेतकरी इतका भोळा आहे की पुष्कळदा तो नकळत आपल्याच कल्याणाच्या विरोधात हात उगारतो."

या बिलाविरुद्ध काहूर माजलं. विसंवादी सूर काढणाऱ्या तारांचा प्रयत्नपूर्वक खच पाडला गेला... 'हे बिल घाईघाईने मंजूर करून घेतल्याने फार दूरगामी गंभीर परिणाम होतील.... समाजातील भावनात्मक ऐक्याला त्यामुळे तडे जातील... धनको व ऋणको संबंध बिघडतील... करोडो रुपयांचा प्रश्न असल्याने त्यात धसमुसळेपणा उपयोगाचा नाही...' असे सूर सभागृहात देखील हमरीतुमरीवर येऊन गुंजत होते.

पण भाऊसाहेब व त्यांची कार्यकर्तामंडळी हे जितके साहसी तितकेच सावधही होते. विरोधाचं आग्यामोहोळ उठणार हे त्यांना प्रथमच अपेक्षित असल्याने त्यांच्या शेतकरी संघाने दक्षतेने तुफानी प्रचारदौरे सुरू केले होते; आणि शेतकऱ्यांच्या झोपडी झोपडीत विधेयकाचे अंतर्नाद घुमविले होते. एकेका दिवशी ५५ दौरे अन् एकेका कार्यकर्त्याने ५०-५० सभा घेऊन प्रचंड जनजागृती करून मोठा शेतकरी वर्ग विधेयकांच्या बाजूने उभा केला होता. स्वतः भाऊसाहेबांनीही आपल्या युक्तिसंगत भाषणांनी असेम्ब्ली हॉल ढवळून काढला होता. अखेर विरोधाच्या किल्ल्याचे बुरूज ढासळून हे विधेयक कायदेमंडळात पास करून घेतले गेले. कायदेमंडळाने संमत करताच हे बिल - '१९३३ चा कर्ज लवाद कायदा' - या नावाने कायद्यात रूपांतरित झाले.

या कायद्याप्रमाणे स्थानिक सरकारद्वारे एक वर्षाकरिता लवादाच्या सदस्यांची एक समिती निर्माण करण्यात आली होती. धनको व ऋणको या दोहोंपैकी कोणीही

आपली तक्रार लवादापुढे मांडणार होते. लवादाला यात विपुल अधिकार दिले गेले होते. एकंदर परिस्थितीचा सूक्ष्म विचार करून स्वतःच्या विवेकाला व सहृदयतेला पटेल असा निर्णय देण्याची मुभा लवादाला दिली गेली होती. हजारो कर्जबाजारी शेतकऱ्यांची ९० टक्क्यांहून अधिक शेती या लवादामुळे वाचविता आली होती; जी गेली तीही कर्जाच्या किस्ती फेडल्यावर परत मिळणार होती.

कधीही वर येण्याची शक्यता नसलेला शेतकरी अलगद वर आणण्यासाठी भाऊनं टाकलेल्या पवित्र्यानं जनमानसात त्यांची ईश्वरसमकक्ष प्रतिमा उभी होऊ लागली होती. आणि भाऊसाहेबांच्या कर्तृत्वाचे हे सुवर्णपान भाऊंना मानवतेचा महामेरू बनवून गेले होते.

## सहकारी बँक

अमरावती येथे १९१२ च्या सुमारासच 'अमरावती सेंट्रल को-ऑपरेटिव्ह बँक लि.' ही सहकारी संस्था काही विचारवंतांनी स्थापन केली होती. शेतकऱ्यांना सवलतीच्या दराने कर्ज उपलब्ध करून देणे व त्याला सावकाराच्या जुलमी पाशापासून मुक्त ठेवणे हा या बँकेच्या स्थापनेमागील उद्देश होता. पण झाले मात्र उलटेच! जागतिक मंदीच्या लाटेत कापसाचा भाव २५० रुपयांवरून ३०रु.खंडीवर आला. सर्वच शेतमालाच्या किंमती बेभाव घटल्या. तळहातावरची पोटं जगवून आता कर्जाचे हप्ते कसे फेडणार? शेत विकायला गेलं तर शेतीच्याही किंमती बेसुमार पडलेल्या. शे-दोनशे रुपये तिफणीशिवाय त्याला गिऱ्हाईक भेटेना. त्यामुळे शेतकरी आपल्या कर्जापोटी आपल्या पोटच्या शिदोरीला बँकेच्या हवाली करू लागले. त्यावेळच्या 'एकासाठी सर्व व सर्वांसाठी एक' या सूत्रानुसार एकाच कर्जासाठी त्या पेढीच्या सर्वच सभासदांची मालमत्ता गहाण समजली जायची. त्यामुळे कर्जफेडीस असमर्थ शेतकऱ्यांवर बँकेने कारवाईचा वरवंटा फिरविला तेव्हा एकेकासाठी १०-२० शेतकरी त्यात भरडले जाऊ लागले. गावेच्या गावे पतपेढीच्या कर्जाने बरबाद होऊन हाहाःकार उडाला.

शेतीच्या किंमती मातीमोल धरून बँकेने शेतकऱ्यांना एकीकडे लुटणे तर दुसरीकडे चतुर कारभाऱ्यांनी त्या लुटीवर आपली दिवाळी साजरी करणे चालविले होते.

भाऊसाहेबांनी हे चित्र पाहिल्यावर त्यांना चूप बसणे शक्य नव्हते. वास्तविक बँकेचे बहुसंख्य सदस्य गावोगावचे शेतकरीच होते; पण त्यांची गत मेंढरांची होती. बँकेच्या संस्थापकांमध्ये रा. ब. मुधोळकर, रा. सा. मोटे, ब्रह्म, भट, बोधनकर, केतकर, देशपांडे, खरे, दामले, जोशी, दोन-तीन देशमुख व एक शेठजी अशी कायदेपंडित व कार्यकर्ती मंडळी होती.

आगीत होरपळणाऱ्या या शेतकऱ्यांना मुक्त कसे करायचे हा पेच भाऊसाहेबांना पडला व त्यांनी ही बँकच ताब्यात घेण्याचा मनोमन निश्चय करून स्वत:ला सर्वप्रथम बँकेचा साधा सभासद करून घेतले. वार्षिक सभेच्या दिवशी सर्व चोख बंदोबस्त असतानाही मोटारी भरभरून आपले कार्यकर्ते आणले व डायरेक्टर बोर्डावर २७ पैकी १८ लोक भाऊसाहेबांनी निवडून आणून एक अशक्यप्राय गोष्ट शक्य करून दाखविली. अल्पमुदतीच्या कर्जांना दीर्घ मुदतीच्या कर्जांत परिवर्तित करून शेतकऱ्यांना त्यांनी जप्तीपासून अभय दिले.

सहकारी बँकेप्रमाणेच 'कॉटन मार्केट'मध्ये सुद्धा भाऊंनी क्रांती घडवून आणली आणि दलाल व अडत्यांच्या एकाधिकार शाहीतून व 'करू ते पूर्व' या झोटींगशाहीतून शेतकऱ्याला वर आणले.

१९२८ पासून अर्ध्या-एका तपाच्या कालखंडात जिल्हा कौन्सिल, प्रांतीय कायदेमंडळ, सहकारी बँक आणि कापूस बाजार - अशा बहुविध क्षेत्रांवर प्रत्यक्षाप्रत्यक्ष आपली पकड निर्माण करून भाऊंनी असंख्य लोकहिताची कामे करवून घेतली व क्षणाक्षणाला त्यांच्याद्वारे भाऊंच्या सेवाभावाचं व मानवतेचं दर्शन घडत राहिलं.

## मानवतेचं दर्शन

१९३७ च्या निवडणुकीत काँग्रेसचा समेटाचा हात झिडकारून बहुजनांच्या हितासाठी भाऊसाहेबांनी 'शेतकरी संघाचे' उमेदवार स्वतंत्रपणे व ठिकठिकाणी उभे केले. अमरावतीतून दे. भ. गणेशराव देशमुख यांच्या विरोधात भाऊसाहेबांनी स्वत:ची उमेदवारी भरली. या निवडणुकीतली ही आठवण अत्यंत मौलिक आहे -

डॉ. पटवर्धन आपल्या सहकाऱ्यांसह भाऊसाहेबांविरुद्ध प्रचारार्थ आष्टीस जात होते. पण त्यांची मोटार अचानक बंद पडली. आजुबाजूला जंगल. अंधार पडलेला आणि मागून मोटार येण्याची चिन्हे दिसेना. इतक्यात आष्टीहूनच भाऊसाहेब आपला प्रचारदौरा आटोपून परतत होते. त्यांनी आपली मोटार थांबवली व पटवर्धनांना म्हणाले, "मीही आष्टीहूनच प्रचारसभा घेऊन आलोय. तुमची सभा होणार हेही तिथेच कळले!" डॉ. पटवर्धन म्हणाले, "पण आता कसे शक्य आहे? हे केंद्र आम्हाला नक्की गमवावं लागणार." त्यावर भाऊसाहेब म्हणाले, "छे! भलतंच! माझी मोटार घेऊन जा, त्यात काय!" आणि त्यांनी आपली मोटार डॉ. पटवर्धनांच्या ताब्यात दिली. डॉक्टरसाहेब व त्यांचे सहकारी सद्‌गदित झाले. त्यांनी भाऊसाहेबांना विचारले, "तुम्ही कसे जाणार?" त्यावर भाऊसाहेब म्हणाले, "मी शेतकरी आहे. पायी चालायची सवय आहे मला. भुकेच्या वेळेपर्यंत आम्ही पुढलं गाव गाठू शकतो. माझं काम संपलं आहे. तुमचं राहिलेलं मतप्रचाराचं काम अवश्य उरकून घ्या." भाऊसाहेबांच्या या

दिलदारपणाचे कौतुक करत डॉक्टरसाहेब पुढे निघून गेले.

विरोधकाला कैचीत पकडणे ही निवडणुकीची चाल प्रतिस्पर्धी गट खेळत असताना कैचीत सापडलेल्या प्रतिस्पर्ध्याची मदत करण्यात धन्यता मानणारे भाऊसाहेब निश्चितच मानवतेचं एक उत्तुंग उदाहरण होय.

डॉ. भाऊसाहेबांच्या कामाचा उरक इतका जबरदस्त होता की त्यांच्या त्या झपाट्यापुढे सामान्य माणूस दबकून जाई. मनात आलेला विचार आणि त्यावर केलेली कृती यांतील अंतर केवळ वीज कडाडताना दिसणारा उजेड व ऐकू येणारी मेघगर्जना एवढाच असायचा. त्यांनी याच त्यांच्या अफाट कार्यशक्तीतून भारत सेवक दल, भारत कृषक समाज, शिवाजी शिक्षण संस्था, शिवाजी व्यायाम प्रसारक मंडळ, श्रद्धानंद छात्रालय या आणि अशा अनेक संस्था नावारूपास आणल्या.

शिवाजी शिक्षण संस्थेच्या सुरुवातीच्या काळात आपल्या कर्तृत्वाच्या जोरावर व आपल्या असीम प्रभावामुळे संस्था उभारणीत सच्च्या कार्यकर्त्यांच्या मदतीनं त्यांनी अनेकविध कामं केली. गावोगाव झोळ्या घेऊन पैसे, धान्य मागण्यासोबतच निजामच्या दरबारातून शिवाजी संस्थेसाठी अडीच लाख रुपयांची मोठी रक्कम मिळविली. त्यांची मागण्याची पद्धतच अशी होती की देणाऱ्याला देण्याचा आनंद ती देऊन जायची. वैयक्तिक स्वार्थाच्या पलिकडे जाऊन केवळ मानवतेच्या कारुण्याच्या स्तरावर त्यांनी जनहितासाठी काम केलं. त्यांनी केलेलं काम - मग ते जिल्हा कौन्सिलचं असो, प्रांतीय मंत्री म्हणून असो, देवासचे राज्यमंत्री म्हणून असो की भारताचे कृषि मंत्री म्हणून असो, ज्याच्यासाठी काम करायचं ती सामान्य जनता त्यांनी सतत मध्यवर्ती कल्पून हा सारा सारीपाट मांडला होता. त्यांनी केलेलं शेतकऱ्यांच्या उत्थानाचं, निरक्षरांना साक्षर करण्याचं, अडलेल्याला मदत करण्याचं, फसलेल्याला बाहेर काढण्याचं काम हे एका असामान्य व्यक्तीच्या मानवतेवर असलेल्या असीम श्रद्धेचं प्रतीक होय.

त्यांच्या पायानं पावन झालेल्या या भूमीत शिक्षणाची गंगा अवतरली, सामान्याच्या झोपडीपर्यंत शिक्षणसरिता जाऊन पोहोचली आणि एक पिढीची पिढी अंधाराच्या खाईतून वर येऊन राष्ट्र निर्माणासाठी प्रेरित आणि सिद्ध झाली. भाऊसाहेबांची प्रेरक शक्ती इथल्या कणाकणातून ईश्वरी चैतन्यशक्ती सारखी आजही वास करीत आहे आणि उद्धाराचा मंत्र देणाऱ्या त्या 'मानवतेच्या महामेरू'ला लवून मुजरा करीत आहे.



# शैक्षणिक तथा महिलोन्नति विषयक कार्य

प्रा. सौ. अनुप्रीता देशमुख

---

*'हे लोक महर्षि, युगपथदर्शी विजयी नाम अनोखा*
*लो प्रणाम कोटी जनों का*
*है अमर तुम्हारा नाम जहाँ में बाग खिला सुमनोंका*
*लो प्रणाम कोटी जनों का'*

**–सुदाम सावरकर**

भारतात १८३५ साली इंग्रजी पद्धतीने शिक्षण देण्याची सुरुवात झाली. भारतभर इंग्रजांनी ज्या शिक्षणसंस्था काढल्या त्या शिक्षण संस्थांमधून देण्यात येणारे शिक्षण हे संपूर्णपणे इंग्रजी माध्यमाद्वारे देण्यात येत होते व त्याची पद्धतीही पाश्चात्य धर्तीवर होती. या संपूर्ण शिक्षणपद्धतीचा उद्गाता मेकॉले हा होता. स्वातंत्र्य–संग्राम आणि त्या काळामध्ये असलेली अपुरी शिक्षणव्यवस्था आणि त्याला पूरक ठरणारी खाजगी शिक्षणव्यवस्था - यांमुळे १९ व्या शतकाचा उत्तरार्ध व २० व्या शतकाचा पूर्वार्ध हा कालखंड अतिशय महत्त्वाचा आहे, कारण याच कालखंडामध्ये महात्मा गांधी, डॉ. आंबेडकर, जोतिबा फुले, वि. दा. सावरकर, सुभाषचंद्र बोस, रवींद्रनाथ टागोर, विवेकानंद, राधाकृष्णन्, जवाहरलाल नेहरू यांच्यासारखे विचारवंत भारतात निर्माण झाले आणि या सर्व व्यक्तींनी सामाजिक, आर्थिक, शैक्षणिक क्षेत्रांत मौलिक कामगिरी केली. याच कालखंडामध्ये डॉ. पंजाबराव उपाख्य भाऊसाहेब देशमुख यांचाही जन्म झाला.

शिक्षण महर्षी भाऊसाहेबांनी बहुजनसमाजाच्या उत्थानाचे कार्य श्री शिवाजी शिक्षण संस्था स्थापन करून केले. भाऊसाहेबांचे कार्य राजकीय, शैक्षणिक, सामाजिक, कृषी या सर्व क्षेत्रांत आपल्याला दिसून येते. परंतु शिक्षण क्षेत्राला त्यांनी आपल्या कर्तृत्वाची जरीकाठाची झालर लावलेली आपल्याला दिसून येते. त्यांच्या या कलाकुसरीची

जाणीव त्यांनी दिलेल्या शिक्षण-विषयक पुढील विचारांवरून होऊ शकेल-

'प्रतिकूल परिस्थिती देखील मनुष्याला हरप्रकारांनी फायदेशीर होते, असे मी म्हटले तर ते चमत्कारिकपणाचे वाटेल. परंतु माझे असे प्रामाणिक मत बनले आहे की, लहानपणापासून - विशेषत: शिक्षण प्राप्त करून घेताना ज्या अडचणींना व संकटांना मला तोंड द्यावे लागले, त्या अडचणी व संकटे ही माझ्या मार्गात आडवी आली नसती तर, आज कोणतेही कार्य करायची जी बेसुमार हौस माझ्यात आहे व निष्ठेने सार्वजनिक हिताची कामे करायची जी दुर्दम्य इच्छाशक्ती तरुणपणापासून माझ्यात निर्माण झाली ती हौस व इच्छाशक्ती माझ्या अंगी मुळीच दिसून आली नसती. या क्षणास मी दवाखान्यातील खाटेवर पडलो आहे. याच अवस्थेत पडलो असताना, श्री शिवाजी लोकविद्यापीठाच्या पाक्षिक पत्रिकेच्या दिवाळी अंकासाठी मी काहीतरी लिहावे अशा विनंतीचे संपादक प्रा. अत्तरदे यांचे पत्र मिळाले. माझ्या डोळ्यावर गंभीर स्वरूपाची शस्त्रक्रिया करण्यात आली आहे. शस्त्रक्रिया केलेल्या डोळ्यावर ताण पडेल म्हणून दुसऱ्या डोळ्याचा उपयोगही मी करू नये अशी डॉक्टरांची इच्छा आहे. मी बोलूही नये, आणि शक्यतो कसल्याच कामकाजात लक्ष घालू नये. डॉक्टरांच्या या साऱ्या सूचनांचे तंतोतंत पालन करणे ही मोठीच जबर शिक्षा म्हणावी लागेल व ही शिक्षा मुकाट्याने सहन करणे माझ्या शक्तीबाहेरचे आहे. म्हणूनच या सूचनांचे उल्लंघन करून दवाखान्यातल्या या माझ्या वेळात, माझे विचार विस्कळीत स्वरूपात का होईना, शिवाजी पत्रिकेसाठी नमूद करणे मला शक्य होत आहे. श्री शिवाजी शिक्षण संस्थेच्या कार्यकर्त्या नोकरवर्गासाठी व विद्यार्थ्यांसाठीच नव्हे तर बाहेरील जनतेसाठीही हे विचार मनात आले तसे मी इथे मांडीत आहे! वस्तुत: गेल्या वर्षीच काय ती सरकारची आर्थिक मदत आपल्या संस्थांना मिळू शकली. दुर्दैवाने आपल्या कैक संस्थांना सरकारी कृपादृष्टीचा लाभ होण्यास वर्षानुवर्षे वाट पाहावी लागल्यामुळे संस्थेच्या मर्यादित आर्थिक कुवतीवर फार मोठा ताण पडला. तथापि आपण एकही संस्था बंद न करता व एकाही चळवळीचा व्याप कमी न करता या दिव्यातून यशस्वी रीतीने पार पडलो हे सांगायला मला अतिशय आनंद होत आहे. शाळां (हायस्कूल) मध्ये प्रत्येक ठिकाणी विद्यार्थ्यांची संख्या वाढत जात आहे. ६-७ हायस्कुलांमध्ये ५०० च्या आसपास येऊन ठेपली आहे. वर्धा, मोर्शी, यवतमाळ व चिखली इथल्याशाळांची भरभराट विशेषेकरून यंदाच चांगली झाल्याचे दिसत आहे व त्यातील संख्याही समाधानकारक आहे. वरूड येथील पार्वतीबाई धर्माधिकारी कन्याशाळा या शाळेमध्ये विद्यार्थिनींची संख्या चांगलीच वाढली आहे. कॉलेजांकडे नजर टाकली तर दिसून येईल की वाणिज्य विषयाकडून कला विषयांकडे विद्यार्थ्यांचा ओढा वाढला तो यंदा अधिकच नजरेत भरण्याइतका दिसतो. खालच्या वर्गाची

विद्यार्थीसंख्या वाढली तशीच ती एम्. ए. च्या वर्गाचीही बरीच वाढली. आपल्या अमरावतीच्या कॉलेजात व आपल्याच इतरही संस्थांत हैदराबाद राज्यातीलच नव्हे तर खानदेश व सुदूर मध्यप्रदेशांतीलही विद्यार्थी शिकत आहेत हे अभिमानाने नमूद करण्यासारखे आहे यात शंका नाही. अमरावतीसारख्या ठिकाणी प्रत्येक संस्थेतील अध्यापकांची व विद्यार्थ्यांची पथके येऊन त्यांनी दहाएक दिवसांची व्याख्याने, क्रीडा व इतर गोष्टींचा कार्यक्रम दरसाल करण्याचा प्रघात पाडावा, अशा रीतीच्या योजनेवर काही वर्षांपासून मी विचार करीत आहे. साधारणपणे 'श्री शिवाजी छात्रसमारोह' असे त्याचे स्वरूप असावे व हा समारोह दरसाल साजरा करण्यात यावा. लायक माणसे ही योजना संघटित करून समाधानकारक रीतीने कृतीत उतरविण्यास पुढे येतील तर या योजनेचा काही खर्च संस्था नि:संशय करील. भारत सरकारला युवककल्याण व युवकसंघटना याबद्दल अतिशय आस्था आहे. या बाबतीत आपल्या संस्था उदासीन न राहाता उत्साह दर्शवतील अशी आशा मी बाळगतो.''

*-(श्री शिवाजी पत्रिका, दिवाळी १९४५)*

## शिक्षण महर्षी डॉ. पंजाबराव देशमुख यांचे शैक्षणिक तत्त्वज्ञान

शिक्षणमहर्षि डॉ. पंजाबराव देशमुख यांनी प्राथमिक शिक्षण, माध्यमिक शिक्षण, विद्यापीठीय शिक्षण, स्त्री शिक्षण व प्रौढ शिक्षण यांबाबत निरनिराळ्या प्रसंगी विचार व्यक्त केले आहेत. या विचारांचे एकत्रीकरण म्हणजे भाऊसाहेबांचे शैक्षणिक तत्त्वज्ञान होय. त्यांचे शिक्षणविषयक विचार पुढीलप्रमाणे :

पूर्व प्राथमिक शाळांच्या विषयीच्या त्यांच्या कार्याकडे पाहिल्यास, शेतीला जीवन तसेच समाजाला शिक्षण हे विकासार्थ आवश्यक आहे, हा भाऊसाहेबांचा बीजमंत्र होता. शिक्षण हेच समाजाच्या उन्नतीचे एकमेव महाद्वार, पण अनेक अडचणींच्या महाशिलांनी ते रोधून टाकलेले ! अशा स्थितीत या अविकसित समाजात शिक्षणप्रवृत्ती निर्माण करून शिक्षणाच्या सोयी उपलब्ध करून देणे हाच सर्वाधिक मूलभूत प्रश्न होता. हा प्रश्न सोडविण्यासाठी केवळ एकच पर्याय भाऊसाहेबांना दिसत होता. सक्तीचे शिक्षण ! पण ते समाजावर लादायचे तर त्यासाठी अनेक शिक्षणसोयी उपलब्ध करून दिल्या जाणे अगत्याचे होते. हा प्रश्न वारेमाप खर्चाचा होता. सक्तीच्या प्राथमिक शिक्षणासाठी जिल्हा कौन्सिलचे उत्पन्न वाढवायचे तर कर आकारणीत वाढ करणे हाच एक मार्ग होता. कर आकारणीत विरोधकांचा सामना करून वाढ केली व जिल्हा कौन्सिलच्या अर्थकोषात ४।। लाख रुपयांचे सरोवर बनले. या नव्या बळातून सक्तीच्या शिक्षणाची १०० केंद्रे उघडली. त्यांच्या कक्षेतील ११ वर्षांखालील मुलामुलींना शिक्षण अनिवार्य झाले. न शिकविणाऱ्या पालकास दंड नि शिकणाऱ्या

मुलांना बहुपरींचे सहाय्य! मोडकळीस आलेल्या इतर शाळांच्या इमारतींनाही नवे तेज चढले. खेड्यांमध्ये नव्या शाळा उघडल्या. इतक्या मोठ्या प्रमाणावर सक्तीचे प्राथमिक शिक्षण प्रथमच सुरू करणाऱ्या या जिल्हा कौन्सिलच्या अध्यक्षाने आपल्या अपूर्व कामगिरीने जिल्हा कौन्सिलच्या कार्येतिहासाला एक सोनेरी पान जोडले. तीस वर्षे वयाच्या तरुणीची ही अचूक सामाजिक दृष्टी, प्रगल्भ कर्तव्यबुद्धी व अप्रतिहत साहसी वृत्ती अतिशय गौरवास्पद होती. विदर्भाच्या घुटमळत्या प्रगतीला त्यामुळेच एक जोराचा धक्का दिला गेला. सातारचे कर्मवीर भाऊराव पाटील यांना ज्या प्राथमिक शिक्षणाच्या प्रचारप्रसारासाठी जवळ जवळ उभी हयात वेचावी लागली ते प्रारंभिक कार्य भाऊसाहेबांनी जिल्हापातळीवरील या शासन यंत्रणेकडूनच करून घेतले होते. कालांतराने शिक्षणप्रसारात अमरावती जिल्ह्याच्या ग्रामीण विभागाने संपूर्ण भारतात दुसरा क्रमांक पटकावला. या श्रेयमंदिराचा शिलान्यास भाऊसाहेबांच्या त्या शिक्षण योजनेनेच केला होता! शिक्षण सार्वत्रिक, स्वस्त व सुलभ करण्याचा हा पहिला धडाडीचा उपक्रम! सक्तीच्या शिक्षणाबरोबरच इतर शैक्षणिक सुधारणांकडेही त्यांनी लक्ष पुरविले. प्रारंभीच हिंदू हायस्कूलच्या स्कूलकमिटीवर भाऊसाहेबांची निवड झाल्याने माध्यमिक शिक्षणापर्यंतचे क्षेत्र त्यांना मोकळे झाले होते. शैक्षणिक मानसशास्त्रदृष्ट्या योग्य ठरणारा, प्राथमिक शाळांवर स्त्री-शिक्षिका नेमण्याचा उपक्रम त्यांनी सुरू केला. मिड्लस्कूलच्या प्रश्नपत्रिका सर्वत्र एकच असाव्यात असाही प्रयत्न केला. १५-१२-२८ ला 'जिल्हा कौन्सिल शिक्षक संघा' ने घेतलेल्या अधिवेशनातील ठरावाचा सन्मान करून शिक्षकांना कार्यालयीन प्रवास भत्ता देण्याचा पाया घातला. फिरती वाचनालये व बोर्डाचे दवाखाने यांची योजना करून ती कार्यान्वित केली. खेडोपाडी शाळा आदींच्या उद्‌घाटनास जाऊन करवाढीबाबत ग्रामीणांची क्षमायाचना करीत त्यांना शिक्षणाचे महत्त्व पटवून दिले.

१८५७ च्या स्वातंत्र्ययुद्धाच्या शतसांवत्सरिक स्मृतिवर्षी म्हणजे १९५७ साली भाऊसाहेबांच्या नेतृत्वाखाली प्राथमिक शिक्षण संस्थांची सुरुवात झाली. नागपूरला श्रद्धानंद बालमंदिर सुरू झाले तर वरूड येथे जवाहर कॉटन मार्केट फंड कमेटीचे विद्यामंदिर. श्री शिवाजी शिक्षण संस्थेवरील संत गाडगे महाराजांच्या वरदहस्ताची स्मृती म्हणून त्याच वर्षी गाडगे महाराज प्राथमिक शाळा शिवाजी नगर अमरावती येथे सुरू करून गाडगे महाराजांच्या कीर्तनातील दुसऱ्या महत्त्वाच्या उपदेशाला ('साऱ्यांनी शिक्षण घ्यावे') मूर्तस्वरूप दिले. त्यामुळे अर्थातच श्री शिवाजी मूलोद्योगी प्रशिक्षण संस्थेला स्वतःची अशी प्रात्यक्षिक शाळाही लाभली. याचवर्षी नागपूरची 'सरस्वती नाईट प्राथमिक शाळा'ही श्री शिवाजी शिक्षण संस्थेला येऊन मिळाली. ज्यांना शाळेचे मुखसुद्धा पाहाता आले नाही अशी दुर्दैवी मुलेही काही कमी नाहीत. अशा मुलांकरिता

त्यांनी 'नाईट स्कूल' चालविली. प्राथमिक शाळांचा सर्वांगीण विकास घडवून आणण्याकरिता केंद्रीय शिक्षण मंत्रालयाने देशभर जी विस्तारसेवा केंद्रे सुरू केली, त्यांपैकी एक केंद्र चालविण्याचे कार्यही रूरल इन्स्टिटय़ूटकडेच आले. १९९५-९७ या आजच्या कालखंडात श्री शिवाजी शिक्षण संस्थेमध्ये प्राथमिक व पूर्वप्राथमिक शाळांची एकूण संख्या व विद्यार्थी - संख्या पुढे दर्शविली आहे :

माध्यमिक शाळांच्या विषयीच्या १९४६ ते १९४९ या कालखंडात श्री शिवाजी शिक्षण संस्थेच्या माध्यमिक शिक्षण विभागानेही आपले विस्तारकार्य जोमाने सुरू ठेवले होते. मोर्शी-वर्धा-शिरजगाव बंड येथील शाळा श्री शिवाजी संस्थेला येऊन मिळाल्या. शिरजगाव बंड येथील शाळा १८८४ मध्ये स्थापन झालेली वऱ्हाडातील पहिली माध्यमिक शाळा आहे. तीसुद्धा शिवाजी संस्थेला येऊन मिळाली. शक्य तेथे व जमेल त्या पद्धतीने माध्यमिक शाळा उघडण्याचे कार्य वेगाने चालू असतानाच भाऊसाहेबांच्या मनात लोकशिक्षणाच्या दृष्टीने संस्था स्थापन करण्याचे विचार येऊ लागले होते. प्राथमिक शिक्षण पूर्ण झाल्यावर खेडे विभागातील विद्यार्थ्यांना जवळच्या मोठ्या गावी माध्यमिक शिक्षण घेण्याची सोय उपलब्ध व्हावी अशा आंतरिक तळमळीतून श्री शिवाजी माध्यमिक शाळांचा उदय झाला. या संस्थेतील सर्वच माध्यमिक शाळांना लागून वसतिगृहे आहेत व त्याच ठिकाणी व्यायामशाळाही आहेत. १९८२ पर्यंत संस्थेमध्ये माध्यमिक मुलांच्या शाळेची संख्या ३१ असून - माध्यमिक मुलींच्या शाळेची संख्या ८ एवढी आहे. ९५-९६ या सत्रामध्ये संस्थेतील माध्यमिक शाळांची संख्या (अमरावती, अकोला, नागपूर, यवतमाळ, बुलढाणा, वर्धा, चंद्रपूर संपूर्ण) ३१ एवढी आहे. माध्यमिक कन्या शाळांची संख्या ७ जिल्हे मिळून ८ एवढी आहे. मुलांच्या शाळेमध्ये विद्यार्थिनींची संख्या ४,८४७ एवढी आहे, तर विद्यार्थी मुलांची संख्या १८,३२३ एवढी आहे.

भाऊसाहेब डॉ. पंजाबराव देशमुख यांनी बहुजन समाजातील बालकांना ज्ञानगंगेचे पाणी मनसोक्त प्राशन करता यावे म्हणून १९४६ साली श्री शिवाजी शिक्षण संस्थेची निर्मिती केली. १९४६ ते १९६४ या १८ वर्षांत या शिवाजी शिक्षण संस्थेचा एखाद्या प्रचंड व विविध शाखोपशाखांनी युक्त अशा अक्षय वटासारखा विस्तार झालेला आढळतो. श्री शिवाजी महाविद्यालय हे विदर्भातील पहिले खाजगी महाविद्यालय होय. नंतर नागपूर येथे असेच एक विद्यालय उघडण्यात आले. १९४७ साली भाऊसाहेबांनी वाणिज्य व कायदा या दोन ज्ञानशाखांची महाविद्यालये उघडण्याचे ठरविले. २४ ऑक्टोबर १९४८ ला विजयादशमीच्या मुहूर्तावर त्यावेळचे मध्यप्रांत-वऱ्हाडचे गव्हर्नर ना. मंगलदास पक्वासा यांचे हस्ते श्री शिवाजी महाविद्यालयाचे उद्घाटन झाले. त्या प्रसंगी उपस्थित असलेल्या जनतेसमोर ना. पक्वासा यांनी भाऊसाहेब

डॉ. पंजाबराव देशमुख यांच्या शिक्षणक्षेत्रातील गौरवास्पद कार्याबद्दल प्रशंसोद्‌गार काढून संस्थेला सुयश चिंतिले. श्री शिवाजी वाणिज्य महाविद्यालयाच्या कला, वाणिज्य, विधी, विज्ञान व कृषी या पाच शाखा अमरावतीला स्वतंत्रपणे व जोमाने ज्ञानदानाचे कार्य करीत आहेत.

## श्री शिवाजी लोकविद्यापीठ

भारतातील तळागाळातील व ग्रामीण विभागातील लोकांना महाविद्यालयीन शिक्षणाचे दरवाजे बंद आहेत ही वस्तुस्थिती भाऊसाहेबांच्या मनाला अस्वस्थ करीत होती. म्हणून श्री शिवाजी लोकविद्यापीठाची अभिनव व सर्वांगपूर्ण योजना कार्यान्वित करण्याचा त्यांनी धाडसी प्रयत्न केला. भारताचे त्यावेळेचे उपराष्ट्रपती डॉ. राधाकृष्णन् यांच्या अध्यक्षतेखाली नेमल्या गेलेल्या विद्यापीठीय शिक्षण मंडळाचा अहवाल प्रसिद्ध झाला. त्या अहवालात ग्रामीण विद्यापीठांची आवश्यकता प्रतिपादन केलेली आढळली. लोकविद्यापीठासंबंधीच्या आपल्या प्रबंधात भाऊसाहेब म्हणतात, 'अत्यंत उच्च श्रेणीच्या विद्वानांची मालिका आपल्या देशात नेहमीच तयार होत आली आहे पण त्यामुळे कोट्यवधी देशवासियांची शैक्षणिक किंवा बौद्धिक पातळी मात्र उंचावली नाही - इतर विद्यापीठांना 'महामानव' निर्माण करण्याकरिता सर्व शक्ती व पैसा वेचू द्या, माझे विद्यापीठ मात्र अज्ञान, दारिद्र्य, कुचंबणा व घृणास्पद अवस्था यांच्या काळ्याकुट्ट अंध:कारात चाचपडत पडलेल्या कोट्यवधी स्त्री-पुरुषांमधून समाजसेवक व देशभक्त निर्माण करण्याकरिता झटत राहील. या लोकविद्यापीठाची स्थापना करताना त्याची एकूण २० उद्दिष्टे ठरविण्यात आली होती. आज जर या लोकविद्यापीठाचा व्याप बघितला तर भाऊसाहेबांच्या दूरदृष्टीचा प्रत्यय येतो. हे लोकविद्यापीठ म्हणजे आजचे मुक्त विद्यापीठ होय, म्हणजे मुक्तविद्यापीठाची खरी संकल्पना ही भारतातच, भाऊसाहेबांनीच मांडली असे म्हटले तर अतिशयोक्तीचे होणार नाही. श्री शिवाजी लोकविद्यापीठाचे उद्‌घाटन ३० डिसेंबर १९५० ह्या दिवशी भारताचे पहिले राष्ट्रपती डॉ. राजेंद्रप्रसाद यांच्या शुभहस्ते करण्यात आले. डॉ. राजेंद्रप्रसाद यांनी श्री शिवाजी लोकविद्यापीठाचे उद्‌घाटन झाल्याचे निदर्शक म्हणून एक विद्युतकळ दाबली त्याबरोबर 'तमसो मा ज्योतिर्गमय' हे बोधवाक्य विद्युत्‌दीपांच्या झगमगाटात प्रेक्षकांच्या दृष्टीस पडले. या प्रसंगी भाऊसाहेबांनी अत्यंत भावस्पर्शी भाषण केले. ते म्हणाले, ''आपल्या परंपराप्रिय व कालविसंगत अशा शिक्षणपद्धतीमुळेच आपल्यात मतभेद व विसंवाद निर्माण झाला आहे. देशाचे व स्वत:चेही खरे हित कशात आहे हे ओळखणारे निर्भय व आशावादी स्त्री-पुरुष तयार करावयास हवे. लोककल्याणावर व देशावर नितांत श्रद्धा असलेले, अत्युच्च ध्येये व उत्कृष्ट नीतिमत्ता असलेले लोक आपणास हवे

आहेत. निरक्षरता व अज्ञान, अंधश्रद्धा व भेकडपणा, अनीतिमत्ता व चारित्र्यहीनता यांवर कडाडून हल्ला करून जनसाधारणास या सर्व सोयी श्री शिवाजी लोकविद्यापीठाद्वारे उपलब्ध करून देण्याची आमची इच्छा आहे.''

डॉ. राजेंद्रप्रसाद आपल्या भाषणात म्हणाले, ''माझा या संस्थेशी संबंध आला, मला फार आनंद वाटला. आपणास अशाच संस्थांची गरज आहे. मी ही संस्था व तिच्या शाखांना सुयश चिंतितो.'' या लोकविद्यापीठा अंतर्गत विविध लोकशिक्षणाच्या संस्था स्थापन करण्यात आल्या. जनता कॉलेजची स्थापना १९५१ मध्ये करण्यात आली. या जनता कॉलेजमध्ये साधारणत: १८ ते ३० वर्षे वयाच्या ग्रामीण प्रौढांसाठी शिक्षणाची व्यवस्था प्रथमत: केली गेली. १९५२ च्या ऑगस्टमध्ये मॅट्रीक उत्तीर्ण झालेल्या पण गावातच राहून कार्य करू इच्छिणाऱ्या तरुणांसाठी ग्रामसंघटकांचा वर्ग उघडण्यात आला. जनता कॉलेजचे महत्त्व ग्रामीण विभागाला पटले आहे. एक वर्षाच्या व दोन वर्षांच्या कृषिवर्गात प्रवेश घेण्याकरिता इच्छुक विद्यार्थ्यांची गर्दी दिवसेंदिवस वाढतच आहे. गांधी ग्रामोद्योग मंदिर, विद्यापीठ क्लब, व्याख्यानमाला, कस्तुरबा मेडिकल अँड वेल्फेअर सेंटर, -शिवाजी पत्रिका इ. विविध व लोकाभिमुख लोकशिक्षणात्मक उपक्रम श्री शिवाजी लोकविद्यापीठाने १९५१ ते १९५६ या पाच वर्षांत सुरू केले व ते आजही व्यवस्थितपणे सुरू आहेत.

### रूरल इन्स्टिट्यूट - एक नवीन प्रयोग

रूरल हायर एज्युकेशन कमेटी नावाचे एक मंडळ भारत सरकारने नियुक्त केले. या मंडळाने डिसेंबर १९५४ मध्ये श्री शिवाजी शिक्षण संस्थेला भेट दिली. भाऊसाहेबांनी या मंडळाला जनता कॉलेज, गांधी ग्रामोद्योग मंदिर इ. संस्थांचे कार्य दाखविले. त्याचप्रमाणे श्री शिवाजी शिक्षण संस्थेचे हे लोकशिक्षणाचे भव्य विधायक कार्य अवलोकिल्यावर रूरल इन्स्टिट्यूटचा अभिनव व क्रांतिकारी प्रयोग करून पाहाण्याकरिता या संस्थेसारखी योग्य प्रयोगभूमी या भागात तरी दुसरी नाही याबाबत मंडळाची खात्री पटली. म्हणून मंडळाने आपल्या अहवालात श्री शिवाजी शिक्षण संस्था व तिचे अध्यक्ष डॉ. पंजाबराव देशमुख यांच्या कार्याबद्दल गौरवपूर्ण उल्लेख करून या भागात रूरल इन्स्टिट्यूट चालविण्याची जबाबदारी श्री शिवाजी शिक्षणसंस्थेकडे सोपविण्याची शिफारस केली.

९ जुलै १९५६ ला अमरावतीला श्री शिवाजी लोकविद्यापीठाच्या नियंत्रणाखाली रूरल इन्स्टिट्यूट सुरू झाले. आजच्या परिस्थितीमध्ये या इन्स्टिट्यूटमध्ये अनेक अभ्यासक्रम राबविले जात आहेत :

१) मुलांचे तंत्रनिकेतन

२) मुलींचे तंत्रनिकेतन

३) डिप्लोमा इन मेडिकल लेबॉरेटरी टेक्नॉलॉजी

४) ज्युनियर कॉलेज ऑफ सायन्स अँड व्होकेशनल

५) कृषिविज्ञान पदविका सेंटर

६) पशुसंवर्धन व दुग्ध व्यवसाय

७) किमान कौशल्यावर आधारित अभ्यासक्रम

८) प्रॉडक्शन कम ट्रेनींग

९) पंचायत राज प्रशिक्षण केंद्र

१०) अंगणवाडी कार्यकर्ता प्रशिक्षण

११) जनता कृषि विद्यालय

१२) ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र

१३) अंगणवाडी सेविका केंद्र

या सर्व संस्था मिळून विद्यार्थी संख्या ३,२४० इतकी आहे.

१९४९ ते १९५७ या कालखंडात भाऊसाहेबांचे इतर शैक्षणिक कार्य म्हणजे नवीन ठिकाणी शाळा उघडण्याच्या योजना. गावोगावी दौरा करून ते तेथील प्रतिष्ठित मंडळींना विचारीत- ''काय ? तुमच्या गावात आपल्या संस्थेची शाळा उघडता का ? शिक्षणाचा प्रसार हा झालाच पाहिजे. तुम्ही आहातच, सांभाळून घ्या- अडीअडचणीच्या वेळी. आपले सर्वांचे काम आहे हे.'' भाऊसाहेबांविषयी अपार आदर बाळगणारे ते गृहस्थ अंतःकरणपूर्वक आश्वासन देत आणि त्यांच्या गावी शाळा उघडली जात असे.

## संस्थेचा रौप्य महोत्सव

दि. २८ जानेवारी ते २ फेब्रुवारी १९५८ या सात दिवसांत भरगच्च रौप्य महोत्सवी कार्यक्रम आयोजित केले गेले. थोर तत्त्वज्ञ असे तेव्हाचे भारताचे उपराष्ट्रपती डॉ. राधाकृष्णन् या रौप्य महोत्सवाच्या उद्‌घाटनाला उद्‌घाटक म्हणून उपस्थित होते.

## शिक्षणामध्ये शैक्षणिक सहलीचे महत्त्व

श्री शिवाजी शिक्षण संस्थेच्या अनेक शाखांतील सुमारे ४०० विद्यार्थी-विद्यार्थिनी व शिक्षक खास गाडीने काश्मीरची सहल करून आले. वाटेत त्यांनी भाऊसाहेबांच्या दिल्ली येथील निवासस्थानी मुक्काम केला. दिल्लीमध्ये त्यांना डॉ. राजेंद्रप्रसाद, डॉ. राधाकृष्णन व पंतप्रधान नेहरू यांच्या भेटीचा लाभ झाला. भाऊसाहेबांनी अत्यंत जिव्हाळ्याने त्यांच्या सोयी-गैरसोयींची दखल घेतली. काश्मीरहून परतताना त्यांना सर्व सोयींनी युक्त असा नवीन खास डबा उपलब्ध करून दिला. याकरिता सरकारकडून

एक लक्ष रुपयांचे अनुदान भाऊसाहेबांनी मिळवून दिले. लगेच दुसऱ्या वर्षी शैक्षणिक सहलीच्या आयोजकांनी सिलोनकडे मोर्चा वळविला.

अमरावतीला स्नातक व स्नातकोत्तर शिक्षण महाविद्यालय बी.एड्., एम.एड्. सुरू केले. त्याप्रमाणे सी.पी.एड्. हा शारीरिक शिक्षणाचे प्रमाणपत्र देणारा अभ्यासक्रम सुरू करून शारीरिक शिक्षण महाविद्यालयांची पायभरणी केली. भाऊसाहेबांच्या श्री शिवाजी शिक्षण संस्थेने व भारत कृषक समाजाच्या मदतीने जागतिक-कृषिप्रदर्शनी स्मारक श्री शिवाजी महाविद्यालय दिल्ली जवळील भटियाला येथे सुरू केले. याच काळातील एक विक्रम म्हणजे १४ माध्यमिक शाळा उघडण्याचा. १९६३ साली लंडन येथे श्री शिवाजी वसतिगृह स्थापन करण्याचा नेत्रदीपक विक्रम करण्यात आला.

## संविधान समितीतील कार्य-

संविधान समितीत भाऊसाहेबांनी १९४६-५० या कालखंडात कार्य केले. भारताची भावी राज्यघटना निर्माण करण्याच्या या ऐतिहासिक कार्यात भाऊसाहेबांनी अत्यंत जिव्हाळ्याने व व्यापक जनहिताच्या दृष्टीने भाग घेतला. डॉ. आंबेडकर, डॉ. राजेंद्रप्रसाद, पं. जवाहरलाल नेहरू, अनंतशयनं अय्यंगार, श्री. ह. वि. कामथ, श्री. आर. के. सिध्वा, श्री. रंगराव दिवाकर, प्रो. रंगा, श्री. मिनू मसानी आदि मंडळी घटना समितीत होती. या सर्वांनी भाऊसाहेबांच्या वक्तव्याची व त्यांच्या जनहितदृष्टीची मुक्तकंठाने प्रशंसा केली होती. ''हरिजनादि पददलित जातींव्यतिरिक्त भारतात आणखीही काही अत्यंत दुर्लक्षित, असहाय व दलित अशा जाती आहेत, यांची जाणीव घटना समितीतील बहुसंख्य सभासदांना भाऊसाहेबांमुळे झाली. म्हणून त्यांच्याही प्रगतीकरिता भारतीय राज्यघटनेत काही तरतूद करून ठेवता आली'' -या आशयाचे उद्‌गार भारतीय-राज्यघटनेचे प्रमुख शिल्पकार डॉ. आंबेडकर यांनी घटना निर्मितीनंतर केलेल्या समारोपीय भाषणात काढले. जातिवाचक उल्लेख सरकारी कागदपत्रांतून गाळून टाकण्यासंबंधीचे विधेयक १७ फेब्रुवारी १९४८ व ११ ऑगस्ट १९४८ या दोन दिवशी आले. डॉ. भाऊसाहेबांनी घटना समितीत वरील विधेयकावर अत्यंत परिणामकारक भाषणे केलीत. हे विधेयक ना. रंगराव दिवाकर यांनी घटना समितीत आणले होते. भाऊसाहेबांनी या विधेयकाला विरोध केला. या विधेयकावर बोलताना त्यांनी जातिभेद समूळ नष्ट करण्याचे मार्गही सांगितले. शिक्षणाचा प्रसार हेच जातीयता नष्ट करण्याचे एकमेव प्रभावी साधन होय; उच्च शिक्षण घेतलेले युवक व युवतीच जातीयवादाचा विषारी फणा चिरडून टाकणार आहेत - असे त्यांनी प्रतिपादित केले.

शेतकऱ्यांच्या हितसंरक्षणासंबंधीचे विचार डॉ. पंजाबरावांनी ३ सप्टेंबर १९४९ ला घटना समितीत भाषण करताना व्यक्त केले. सरकारच शेतकऱ्यांची अक्षम्य उपेक्षा करीत आहे, असा आरोप करताना ते म्हणतात-केवळ संख्याबळामुळे नव्हे तर श्रेष्ठतम कार्यामुळे या भारतवर्षात कृषकांना पूर्वापर प्राधान्य मिळत आले आहे. त्यामुळेच

भारत कृषकांचा देश म्हणून सर्वत्र प्रसिद्ध आहे. हे कृषकच भारतवर्षाचे खरेखुरे स्वामी आहेत. तरीसुद्धा त्यांच्या कल्याणाची कोणालाच आस्था नाही. कामगार-वर्ग व शेतकरीवर्ग यांच्या परिस्थितीचे तुलनात्मक दर्शन घडवून भाऊसाहेब पुढे म्हणतात, 'ज्या प्रचंड मानवसमूहाच्या - कृषकांच्या - निढळाच्या घामावर आपण जगतो, उन्नती साधतो, त्यांच्याकरिता अजूनसुद्धा एकही कल्याण अधिकारी नेमला नाही ही केवढी आश्चर्याची गोष्ट आहे!

भारतीय राज्यघटनेतील आणखीही काही विधेयकांच्या मांडणी व मान्यतेमध्ये भाऊसाहेबांचे भरीव योगदान लाभले. जसे-

(१) विश्वस्त संस्थांची संपत्ती सरकारजमा करण्यासंबंधीचे विधेयक

(२) विकास योजनांकरिता परदेशी कर्ज घेण्यासंबंधीचे विधेयक

(३) संपत्ती करावरील विधेयक

(४) राष्ट्रीय सैनिक दलासंबंधी विधेयक

(५) बालविवाह प्रतिबंधक कायद्यात दुरुस्ती सुचविणारे विधेयक

(६) कर चुकविणाऱ्या व काळाबाजार करणाऱ्यांना शिक्षा करण्यासंबधीचे विधेयक.

(७) सैन्य विधेयक

(८) ट्रॅक्टर प्रकरणावरील विचार

(९) विश्वभारती विधेयक

(१०) गोसंवर्धन विधेयक

(११) पंजाबमध्ये गव्हर्नरांचे शासन सुरू करण्यासंबंधीचे विधेयक.

२२ नोव्हें. १९४९ रोजी संविधान तयार झाल्यावर त्याच्या एकंदर स्वरूपावर भाऊसाहेबांनी केलेले भाषण संस्मरणीय आहे. त्यात संविधान सभेने स्वतंत्र व सार्वभौम भारताला साजेशी राज्यघटना अतिशय परिश्रमपूर्वक तयार केली याबद्दल त्यांनी सर्व सभासदांचे अभिनंदन केले, बदलत्या परिस्थितीनुसार व आवश्यकतेनुसार या घटनेस वेळोवेळी दुरुस्त्या जोडाव्या लागणार असे भाकितही त्यांनी त्यावेळी केले. इतकेच नव्हे तर यामुळे ही घटना फार दिवस टिकली नाही तर आपणास आश्चर्य वाटावयाचे नाही असेही त्यांनी निर्भीडपणे सभागृहास सांगतले.

## 'महिलांच्या उन्नती संदर्भातील दृष्टिकोन'

भाऊसाहेबांनी कृषी, सामाजिक, शैक्षणिक, राजकीय या सर्वच क्षेत्रांत फार मोठी भरीव कामगिरी करीत असताना गरीब-श्रीमंत, लहान-मोठा, शहरी-ग्रामीण या प्रकारचा भेद केला नाही. त्याचप्रमाणे त्यांनी स्वतंत्रपणे स्त्री-पुरुष हा भेदसुद्धा केलेला शोधूनही सापडत नाही. त्यांच्या कार्यामध्ये एकच सूत्र होते, ते म्हणजे पुरुषाचे कर्तव्य/कार्य व या कार्याला यश देणारी ती माता किंवा स्त्री. ज्या ठिकाणी पुरुष हाच

मुळात मागासलेला आहे, त्याची कोणत्याच प्रकारची उन्नती नाही - तिथे महिलांचा प्रश्नच येत नाही, हे भाऊसाहेबांनी नेमकेपणी हेरले व त्यांनी सर्वप्रथम संपूर्ण समाज शिक्षित व्हावा म्हणून शिक्षणाची सोय केली. विशिष्ट जाती-समाजाकरिता नव्हे, तर बहुजन समाज, तळागाळातील लोक या सर्वांकरिता ही सोय होती. यातूनच स्त्रियांची उन्नती त्यांनी घडवून आणली. महिलांच्या उन्नतीचे कार्य हे भाऊसाहेबांनी दुसऱ्यांवर त्या कार्याची जबाबदारी सोपवून केले नाही, तर स्वत:च्या विचारांना कृतीची जोड घालून केले. त्याच बरोबर, कोणत्याही कार्याची सुरुवात ही स्वत:पासून करावी म्हणून भाऊसाहेबांनी या कार्याची सुरुवात देखील स्वत:च्या कुटुंबापासून केली.

भाऊसाहेबांचे स्वत:च्या आईवर व आईचे आपल्या मुलावर खरे प्रेम होते. हे प्रेम आंधळे नव्हते, डोळस होते. आपल्या कुळाचा हा दीपक - फार मोठ्या नवसाने झालेला मोठा मुलगा - त्याला खूप जपावं हा विचार मनात न येऊ देता शिक्षणाकरिता स्वत:चे संपूर्ण दागदागिने विकून व शेती गहाण ठेवून पुढचा-मागचा व इतर पाल्यांचा विचारही न करता शिक्षणाकरिता परदेशात पाठवणारी ती माता भाऊसाहेबांच्या वडिलांना हिंमत देत भाऊंच्या पाठीशी जणू विद्यादेवीची शक्तीच बनून उभी ठाकली. भाऊसाहेबांचे खरे प्रेरणास्थान हीच त्यांची माता ठरली. जणू त्या माऊलीला माहीत होते की, आपला मुलगा भविष्यात शिक्षणमहर्षी व्हायचा आहे. यातूनच महिलांच्या उन्नतीचे पवित्र कार्य भाऊसाहेबांच्या हातून घडून आले.

भाऊसाहेबांच्या कुटुंबियांसमवेत त्यांच्या काकूंच्या भगिनी सुद्धा राहात होत्या. त्या विधवा होत्या. त्यांच्या सासरच्या लोकांनी पतिनिधनानंतर त्यांना घरातून काढून दिले होते. त्यामुळे त्या बहिणीच्या आश्रयाने राहात होत्या. भाऊसाहेबांनी त्यांचे दु:ख जवळून पाहिले होते. बॅरिस्टर होऊन आल्याबरोबर भाऊसाहेबांनी त्यांच्या सासरच्या लोकांवर कोर्टात खावटीचा दावा टाकला व स्वत: ती केस लढवून त्यांना खावटी मिळवून दिली. एवढेच करून ते थांबले नाहीत; तर पापळजवळ असलेल्या एका खेडेगावी मुलांच्या वसतिगृहावर निरीक्षिका म्हणून त्यांना नियुक्तही केले. त्यांच्या स्वत:च्या पत्नी ह्या मॅट्रिक पास होत्या. विवाहानंतर भाऊसाहेबांनी त्यांना एलएल्. बी. पर्यंत शिकविले. बाईसाहेबांनी काही दिवस तर मुलींच्या शाळेवर शिक्षिकेचे काम सुद्धा केले. भाऊसाहेब नेहमी म्हणायचे - 'स्त्री ही स्वतंत्र असली पाहिजे.' माझी आई (म्हणजे भाऊसाहेबांच्या धाकट्या भावाची मुलगी) भाऊसाहेबांच्या छत्रात वाढली. ती सांगते - भाऊसाहेब पापळला आले की, त्यांच्या दोन-तीन काकींची ते भेट घेत. संपूर्ण विचारपूस करीत व निघताना काही पैसेही देत. भाऊसाहेब म्हणायचे - खर्च करायला काही पैसे महिलांच्या हाताशी असावे लागतात.

भाऊसाहेब आप्तेष्टांच्या घरी जात तेव्हा ते त्या घरच्या मुलींची, बाईंची विचारणा करीत. शिक्षणाविषयी संपूर्ण माहिती मिळवीत. जर काही अडचणींमुळे शिक्षण घेता आले नाही तर त्या अडचणी स्वत:हून दूर करून पुढे शिकण्याची प्रेरणा देत. कित्येक

स्त्रियांनी त्यांचे हे अनुभव वेगवेगळ्या पुस्तकांमध्ये लेखांच्या रूपात लिहिले आहेत. त्यांना स्त्रीच्या जीवनाचा केवढा बारीक विचार होता हेच त्यांतून दिसून येते. हेच विचार मनाशी धरून त्यांनी आपल्या श्री शिवाजी शिक्षण संस्थेमध्ये स्त्रियांच्या शिक्षणाच्या वेगवेगळ्या सोयी व अभ्यासक्रमांची निर्मिती केली. हायस्कूल स्तरावर मुलींची शाळा सुरू केली. गृहशास्त्राचा स्वतंत्र विभाग सुरू केला. भाऊसाहेबांच्या शैक्षणिक कार्यातील एक महान् कार्य म्हणजे स्त्रीच्या योग्यतेचा सन्मान. सौ. कुसुमावती देशपांडे ह्या बी.ए. ऑनर्स होत्या. इंग्रजी विषयात त्यांचा हातखंडा. त्यांच्या नावासमोर सिलेक्शन कमिटीने लिहिले होते – 'ह्या महिला आहेत. 'कॉलेजिएट मेन्स ब्रँच' या शब्दांतूनच स्पष्ट होते की, महाविद्यालयात प्राध्यापिकांची नियुक्ती होऊ शकत नाही.' भाऊसाहेबांनी त्यावर निर्णय दिला : 'उमेदवार योग्य की अयोग्य एवढे ठरवणेच कमिटीचे काम. ज्या अर्थी उमेदवाराची योग्यता प्रमाणित ठरली, त्या अर्थी 'महिला म्हणून नियुक्ती होऊ नये' – हा सल्ला मंत्र्याचे अधिकारावर अतिक्रमण करणाराच नव्हे का?' शेवटी भाऊसाहेबांनी कुसुमावतीबाईंचीच नियुक्ती केली. त्यामुळे सभासदांनी काहूर उठविले. यावर भाऊसाहेबांनी भाष्य केले की, ''सामाजिकदृष्ट्या स्त्री व पुरुष हे दोन्ही समान घटक. शिक्षणक्षेत्र म्हणजे विद्यादेवीचे क्षेत्र. तेथे स्त्री-पुरुष भेद व्यर्थ आहे! पुरुषाच्या तोडीची योग्यता प्राप्त करणाऱ्या स्त्रीला कोणत्या तोंडाने तुम्ही कमी लेखणार? केवळ ती स्त्री आहे या सबबीवर तिची निर्वाहाची नोकरी, पर्यायाने तिची योग्यता नि तिचा न्याय्य अधिकार मी कोणत्याही प्रकारे हिरावून घेऊ शकत नाही.'' हा प्रतिष्ठेचा प्रश्न बनवून नागपूर विद्यापीठाच्या कुलगुरूंनी त्यागपत्र दिले. तरी सुद्धा कोणत्याही विघ्नबाधेची पर्वा न करता भाऊसाहेबांनी प्रश्न धसास लावला आणि तेव्हापासूनच महाविद्यालयांमध्ये प्राध्यापिका नेमल्या जाऊ लागल्या. याप्रमाणे त्यांनी एका स्त्रीच्या योग्यतेचा सन्मान करून विदर्भातल्या स्त्रीमुक्तीची मुहूर्तमेढ रोवली.

श्री शिवाजी शिक्षण संस्था स्थापन झाल्यानंतर सुरुवातीला त्या संस्थेमध्ये अनेक शिक्षक बिनपगारी सेवा करीत. त्यांमध्ये स्त्रियांची संख्या बरीच होती. पुढे त्या स्त्रियांना त्याचा मोबदला म्हणून प्रशिक्षणाकरिता परदेशात पाठविले. त्यांचा संपूर्ण खर्च संस्थेने केला. परदेशातील स्त्रिया ज्याप्रमाणे शिक्षणाचे कार्य करीत आहेत, त्याप्रमाणे आपल्या भारतीय स्त्रियासुद्धा प्रशिक्षित झाल्या पाहिजेत हाच त्यामागील मूळ उद्देश. ज्या स्त्रिया विधवा, अनाथ आहेत त्यांच्याकरिता एका वसतिगृहाची स्थापना त्यांनी अमरावतीला केली. त्यांच्याकरिता रोजगार उपलब्ध व्हावा म्हणून संस्थेमध्ये तशीही व्यवस्था भाऊसाहेबांनी करवून घेतली.

महिलांच्या उन्नतीच्या वरील संपूर्ण कार्याचा आढावा घेतला तर आजच्या शासनाने ज्या सोयी महिलांच्या उन्नतीकरिता आज केल्या आहेत, त्यांची उभारणी भाऊसाहेबांनी स्वतःच्या कार्यातून ५० वर्षापूर्वीच केली होती, हे स्पष्ट होते.



# कृषकांच्या अभ्युदयास समर्पित व्यक्तित्व

-डॉ. श्रीकान्त तिडके

माणसाच्या उत्क्रांतीत रानटी अवस्थेनंतर स्थैर्याची कृषी अवस्था येते. मानवी संस्कृतीचा तो अभ्युदय आहे. पुरुष शिकारीसाठी रानोमाळ भटकू लागले. गर्भारावस्था व प्रसूतीमुळे स्त्रीला अशी भटकंती न परवडणारी होती. सुरक्षेसाठी तिने गुहेचा आश्रय शोधला. अशा काळात उदरनिर्वाहासाठी शोधकपणे तिने बिया-फुले ओल्या मातीत रुजवली आणि शेतीसृष्टीचा उदय झाला. सृजनाचा-कृषीचा आणि स्त्रीचा असा अन्योन्य संबंध आहे. शिकारीहून परतलेल्या पुरुषांना तिने सृजनाचे नवे दालन उघडून दाखविले. पण तरी 'स्त्री' परावलंबी राहिली. स्त्रीने घडविलेल्या कृषिसृष्टीलाही अनादि काळापासून परावलंबी, पराधीन राहाण्याचा जणू शाप लाभला. शेतीचे हे परावलंबित्व भारतासारख्या कृषिप्रधान देशातही कायम झाले आहे.

विदर्भातल्या यवतमाळ जिल्ह्यातील कळंब परिसरातल्या गृत्समद ऋषीने कापसाचा शोध लावला असा पौराणिक संकेत आहे. काळ्याशार मातीत पांढरे सोने पिकविणारी इथली जमीन; आणि कृषक तरीही उपेक्षित राहिले. भौतिक सुधारणापर्वात इंग्रजी राजवटीतही शेतकरी उपेक्षितच होता. जोतिराव फुले यांनी कष्टकरी शेतकऱ्यासारखे अर्धनग्न अवस्थेत जाऊन इंग्लंडच्या राणीला जे निवेदन दिले होते त्यात उमटलेला शेतकऱ्याचा आत्मस्वर 'शेतकऱ्याचा आसूड' घेऊन मुखरित झाला होता. शेतकऱ्याच्या दुरवस्थेची जी मीमांसा त्यांनी केली त्यात शेतकऱ्यांच्या सर्वांगीण शोषणाची साखळीच त्यांनी दाखवून दिली. आणि शेवटी 'एवढे अनर्थ एका अविद्येने केले' - असा सारांश त्यांनी काढला. भाऊसाहेब पंजाबराव देशमुख हे शेतकऱ्याच्या दुरवस्थेची सर्वांगीण चिकित्सा करणारे दुसरे डॉक्टर होते.

**बळीचं राज्य ?**

पावलीच्या पर्वात बलिप्रतिपदा मोठ्या श्रद्धेने साजरी करतात. 'इडा पिडा टळो,

बळीचं राज्य येवो'- अशी प्रार्थना ते करतात. पण पाताळात गाडलेले (अज्ञान-उपेक्षेच्या) 'बळीचे-राज्य' हे ग्रामीणांचे एक स्वप्न आहे- शेकडो वर्षांपासून त्यांच्या डोळ्यात तरळणारे पंजाबराव देशमुख यांनीही बालपणापासून असे स्वप्न पाहिले होते. या स्वप्नाच्या पूर्ततेसाठी त्यांनी खडतर साधना केली. तिसरी पास झालेल्या पंजाबरावांना पुन्हा तिसरीतच बसावे लागले. कारण काय तर त्यांच्या पापळ गावात चवथीचा वर्गच नव्हता! पुढे आजोळी सोनगावी तीन-चार किलोमिटर अंतर तुडवीत त्यांनी चांदूररेल्वे येथे चौथीची परीक्षा पास केली. कधी कारंजा (लाड) तर कधी अमरावतीचे हिंदू हायस्कूल अशी शिक्षणासाठी भ्रमंती त्यांना करावी लागली. शिक्षणाचा, ज्ञानाचा आणि शेतकऱ्याचा जणू संबंधच अमान्य होता. ज्याच्या हाती राष्ट्रीय उत्पन्नाचा महत्त्वाचा व्यवसाय - शेती सोपविला आहे तो शेतकरी अडाणी असणे, अज्ञानी असणे देशविकासाच्या दृष्टीने किती अनिष्ट आहे! पिढ्यान्‌पिढ्या नांगर हाकणाऱ्या शेतकऱ्याच्या हाती पुस्तक कधी येईल ? हे शल्य उरात बाळगून या आधुनिक एकलव्याने शिक्षणासाठी स्वत: किती घाटांतून आणि वळणांतून प्रवास केला हे त्यांच्या चरित्रातून लक्षात येते.

## पहिले लक्ष्य शिक्षणसंस्था

१९२६ साली ऑक्सफर्ड विद्यापीठाची डी.फिल्. (डॉक्टरेट) व त्याच दरम्यान 'बॅरिस्टर' पदवी घेऊन पंजाबराव नावाचा बहुजनसमाजातील मेधावीछात्र आपल्या मायभूमीत परतला. आपल्या बुद्धिमत्तेच्या जोरावर खोऱ्याने पैसा मिळविण्याचे नाकारून कष्टकऱ्यांचा वकील म्हणून बाररूममध्ये त्यांनी ज्या दिवशी प्रवेश केला त्याच दिवशी एक शिक्षक म्हणून शिवाजी मराठा हायस्कूलमध्ये पदार्पण केले. 'अमृतं तु विद्या' - विद्या हेच खरे अमृत! या विचाराने प्रेरित होऊन ग्रामीणांच्या 'नांगर संस्कृती' ला नागर संस्कृतीचा प्रकाश त्यांनी दाखविला. मातंग-मुस्लिम-मराठा-माळी सारे विद्यार्थी शिक्षण हेतूनेच नव्हे; तर समविचारी करण्याचा धाडसी प्रयत्न श्रद्धानंद छात्रालयाच्या माध्यमातून त्यांनी केला. श्रमजीवी समाजाला जीवनाची सर्व क्षेत्रे खुली करून देण्याच्या प्रयत्नातले शिक्षण हे महत्त्वाचे सूत्र त्यांनी प्रथम हाती घेतले. जोतिराव, विठ्ठल रामजी शिंदे, कर्मवीर भाऊराव पाटील या प्रयत्न परंपरेची एक भक्कम गाठ पंजाबरावच्या रूपाने पुन्हा पडलेली दिसते.

निर्मितीचे काम शेतकरी करतो आणि खरी वाढ शेतीतच होते. एका सरकीपासून एक कापसाचे झाड, एका दाण्यापासून ज्वारीचे कणीस. गुणाकार गतीने उत्पादन करण्याच्या या राष्ट्रीय कार्यात शेतकरीच कार्यरत असतो. कारखानी उद्योगात केवळ रूपांतर घडते, मूळ उत्पादन वाढत नाही. देशाची आर्थिक समृद्धी, समता शेती उत्पादनाशी संबंधित आहे. विकासाचा वेग शेतीतून ठरतो हे महात्मा गांधींना कळले

होते. भाऊसाहेबांनी तर हे आपले जीवितकार्यच मानले होते. जिल्हा कौन्सिलच्या अध्यक्षपदावर तरुण भाऊसाहेब आरूढ झाल्याबरोबर त्यांनी खेड्यातील अकरा वर्षाखालील मुलामुलींना प्राथमिक शिक्षण सक्तीचे केले.

## कृषकांचा कैवार

१९३२ साली मध्यप्रांत वऱ्हाडच्या कायदे कौन्सिलसमोर हिंदू देवस्थान संपत्ती बिल (Hindu Endowment Bill) आणले. देवस्थानची संपत्ती आरोग्य, शिक्षण यांसारख्या कामासाठी खर्च करावी हा त्यामागचा अट्टाहास. देव आणि दैववादाच्या पाशातून श्रमजीवी माणसाला मुक्त करण्याचा प्रयत्न या बिलामार्फत त्यांनी केला. त्यात यश आले नाही, पण भाऊसाहेबांच्या समाजहितैषी राजकीय दृष्टीचा परिचय त्यातून घडतो. त्यापूर्वी अमरावतीच्या अंबाबाईचे मंदिर अस्पृश्यांसाठी खुले व्हावे म्हणून कायद्याचा बडगा दाखवून त्यांनी अनुकूल परिणाम घडवून आणला. मंदिर बिलासाठी संकेश्वर पीठाचे शंकराचार्य, डॉ. कुर्तकोटी यांसारख्या धर्ममार्तंडानी विरोधाचा वणवा पेटवला व बिल फेटाळून लावण्यात यश मिळविले. शेतकऱ्यांच्या, कष्टकरी बहुजनांच्या गुलामगिरीच्या सर्व शृंखला भाऊसाहेबांना तोडायच्या होत्या. खरी कृषकक्रांती शेतकऱ्याला पुरोहितशाही व भांडवलदारांच्या जोखडातून मुक्त केल्याशिवाय सफल होणार नाही म्हणून सामाजिक समता व आर्थिक समतेचा लढा त्यांनी एकाचवेळी चालविला.

१९२० नंतर कापूस बाजारात मंदीची प्रचंड लाट आली. कापसाचा भाव २५० रुपयांवरून २५ रुपयांवर आला. त्यापूर्वीच्या १९१८ च्या दुष्काळाने शेतकरी आधीच जर्जर झाला होता. सावकार कोर्टात 'डिक्री' मिळवून शेतकऱ्याच्या घरातील भांडीकुंडी, बैल, म्हशी जप्त करून हर्रास करायला निघाले. या पार्श्वभूमीवर त्यांनी कर्ज लवाद बील (Debt Conciliation Bill) मांडले. या विधेयकाचे स्वरूप अत्यंत वैशिष्ट्यपूर्ण होते. वास्तविक हा कृषक वर्गाच्या ऋणमुक्तीचाच कायदा होता. या लवाद कोर्टात एक प्रथमश्रेणीचा वरिष्ठ शासकीय अधिकारी व बाकी लोकांमधून नियुक्त केलेल्या तीन सदस्यांचा समावेश होता. एका वर्षाकरिता या कायद्यान्वये एक समिती नियुक्त करण्यात आली होती. धनको व ऋणको यांपैकी कोणालाही कर्जाच्या निकालासंबधी अर्ज करण्याचा अधिकार होता. लवाद कोर्टाला कर्जाचा निर्णय करण्यासंबंधी पूर्ण अधिकार दिले होते. लवाद कोर्टाच्या निर्णयासंबंधी दुसऱ्या कोर्टात अपील व रिव्हीजन करण्याचा अधिकारच ठेवला नव्हता. वकील नाही, शिवाय कर्जफेडीचे सुलभ हप्ते – असा शेतकरी हिताचा चाणाक्ष विचार करून हे बिल भाऊसाहेबांनी मांडले. अस्मानी, सुलतानी आणि सावकारी संकटांतून त्यांनी शेतकऱ्याला कायदेशीररीत्या मुक्त केले, अभयदान दिले.

सावकाराच्या ऋणातून मुक्त झालेला शेतकरी पुढे सहकारी बँकेच्या कर्जाच्या ओझ्याखाली गुदमरू लागला, कारण सहकारी बँका कर्ज लवादाच्या कक्षेत येत नव्हत्या. १९३४ साली ते मंत्रीमंडळात असल्याने बँकेकडे जप्त करण्यात आलेल्या शेतीची समस्या सोडविण्यासाठी सरकारला एक चौकशी समिती नेमायला लावून बँका म्हणजे सावकारी पेढ्या नव्हे - ही जाणीव रुजविली. भाऊसाहेबांचे कृषी कर्जासंबंधीचे धोरण व दृष्टिकोन आजही उद्बोधक आहे.

## पहिले शेतकरी संघटन

जोतिराव फुले यांच्या सत्यशोधक विचारांचा प्रभाव असूनही ते ब्राह्मणेतर चळवळीत फारसे रमले नाहीत. त्यांनी जोतिरावांच्या कृषिविषयक विधायक विचारांचा मार्ग अधिक प्रशस्त करण्याचे व्रत स्वीकारले. १९२७ साली बॅरिस्टर मोतीरामजी तिडके यांच्या विवाहसोहळ्यात म्हणजे वर्धातीरी असलेल्या भुमरे यांच्या कांदेगावी शेतकरी समाजातील अनेक कर्ते लोक आले होते. या विवाहसोहळ्याला भाऊसाहेबांनी सार्वजनिक रूप देऊन 'शेतकरी संघ' स्थापन केला. त्याच दरम्यान ग्रामीण शेतकरी समाज निर्व्यसनी व बलशाली करण्यासाठी 'भारत सेवकदल' स्थापन केले. वऱ्हाडातल्या जिल्ह्या-जिल्ह्यात शेतकरी संघाच्या शाखा स्थापन झाल्या. वार्षिक परिषदांनी वऱ्हाडचे वातावरण ढवळून निघाले. सर्व ज्ञाती व स्तरांतील, इतकेच काय मुस्लिम शेतकरीही या संघाच्या कामात सहभागी झाले. त्याच दरम्यान या संघटनेचा आवाज बुलंद व्हावा, त्याला व्यासपीठ मिळावे म्हणून त्यांनी 'महाराष्ट्र-केसरी' हे वृत्तपत्र स्थापन केले.

सत्ता हे प्रबोधनाचे साधन आहे, साध्य नाही - हे जाणून असलेले पंजाबराव मध्यप्रांताच्या मंत्रिमंडळात मंत्री झाले. त्यांनी शेतकऱ्याच्या मुलांसाठी व मागास जातीतील विद्यार्थ्यांसाठी सवलतीचे विशेष धोरण आखले. खेडूत विद्यार्थ्यांसाठी फी-माफी केली. 'मध्यप्रदेश प्राथमिक शिक्षण कायदा' दुरुस्त करणारे बिल मांडले. सक्तीच्या प्राथमिक शिक्षणावर भर देऊन उत्तेजनार्थ आर्थिक अनुदाने दिली. जिल्हा कौंसिलांना शिक्षणप्रसार करता यावा म्हणून शिक्षणावर खर्च होणाऱ्या रकमेचा पाऊण भाग अनुदान रूपाने सरकारने द्यावा असा कायदा करून घेतला.

३० डिसेंबर १९५० साली भारताचे त्यावेळचे राष्ट्रपती डा. राजेंद्रप्रसाद यांच्या हस्ते त्यांनी श्री शिवाजी लोकविद्यापीठाची मुहूर्तमेढ केली. या लोकविद्यापीठाच्या उद्दिष्टांमध्ये ग्रामीण अर्थव्यवस्था व शेतकरी यांनाच केंद्रस्थानी ठेवले होते. त्याची फलश्रुती म्हणून या लोकविद्यापीठाला १९५६ साली 'रूरल इन्स्टिट्यूट' देण्यात आले. ग्रामीण सेवा, कृषी विज्ञान, ग्रामीण यंत्रविज्ञान या उद्दिष्टांना पुढे ठेवून 'रूरल इन्स्टिट्यूट'चा अभ्यासक्रम आखण्यात आला. 'शेती' आणि शेतकरी यांना लक्ष्य मानूनच शिक्षणाची

पुनर्रचना व्हावी असा दृष्टिकोन अनेक परीने त्यांनी रुजविण्याचा प्रयत्न केला.

## कृषिपुत्र ते कृषिमंत्री

भारताच्या संविधान मसुदा समितीत भाऊसाहेबांनी १९४६ ते १९५० या कालखंडात कार्य केले. ग्रामीण जनता, शेतकरी, मागासलेला खेडूत यासंबंधी आस्था ठेवणाऱ्या या लोकनेत्याने घटनासमितीत याच हितांचे रक्षण केले. म्हणून समितीचे अध्यक्ष डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी समारोपाच्या भाषणात त्यांच्या भूमिकेचा गौरवपूर्ण उल्लेख केला आहे. १९५२ साली कृषिमंत्री झाल्यावर त्यांच्या कर्तृत्वाला नवी दिशा लाभली. शेतकरी विकासाच्या योजना आखून त्यांचा उपयोग शेतकऱ्यांनी करून घ्यावा म्हणून त्यांनी जनजागरणही केले.

'जपानी पद्धतीने भातशेती' या प्रयोगशील उपक्रमाद्वारे कमी भातबियाणे वापरून विशिष्ट पद्धतीने कोळपणी व खताची मात्रा देऊन अधिक उत्पादनाचा विक्रम त्यांनी शेतकऱ्यांकडून करवून घेतला. म्हणून तर १९५३ च्या आंतरराष्ट्रीय अन्न व कृषिपरिषदेत त्यांचा विशेष गौरव झाला. शेतीशी संलग्न उद्योगधंद्यांची नवी दिशाही त्यांनी शेतकऱ्यांना दावून दिली. 'भारतीय मधुमक्षिका पालन संघटना', 'आंतरराष्ट्रीय धान्य मंडळ' इ. स्थापन केले. कृषकांच्या कल्याणाकरिता आपल्या शासकीय अधिकारात करता येण्यासारखे सारे प्रयोग त्यांनी केले. त्यातही 'भारत कृषक समाज' व 'जागतिक कृषी प्रदर्शनाचे आयोजन' या विधायक उपक्रम व कार्याला विशेष महत्त्व प्राप्त होते.

भारत कृषक समाजाची उद्दिष्टे आजही विचारप्रवृत्त करणारी ठरतात. ती अशी आहेत -

(१) शेतकऱ्यांच्या सामाजिक, आर्थिक आणि सांस्कृतिक इ. प्रश्नांचे अध्ययन करणे.

(२) सरकार व इतर संस्थांच्या सहकार्याने शेतकऱ्यांना आधुनिक पद्धतीने शेती करण्याचे शिक्षण देणे तसेच कृषिविषयक उपयुक्त अशा नवनवीन प्रयोगांची माहिती करून देणे.

(३) शेतकऱ्यांच्या कल्याणार्थ राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय स्तरावर कृषिविषयक धोरण आखणे.

(४) कृषिविषयक प्रदर्शने, चर्चासत्रे, संमेलने व समारंभ आयोजित करणे.

(५) भारतातील विविध राज्यांतील तसेच परदेशांतील शेतकऱ्यांना परस्पर भेटीगाठीची संधी प्राप्त करून देऊन ज्ञानाची देवाणघेवाण करणे.

भारत कृषक समाजाच्या विचारमंथनातूनच पुढे (अ) राष्ट्रीय कृषी सहकारी खरेदी-विक्री संघ (ब) कृषी सहकारी अधिकोष (क) आफ्रो-आशियन ग्रामीण पुनर्रचना संघटना - अशा विधायक संस्था व संघटना गतिशील करून त्यांनी विकासकार्य घडवून आणले. शेतकऱ्यांना रस्त्यावर आणून आंदोलने करायला लावण्यापेक्षा त्यांच्या

विकासाचे प्रत्यक्ष कार्यक्रम भाऊसाहेबांनी शेतकऱ्यांना दिले. या शिवाय कृषी सहाय्यक यंत्र संघटना, 'लाखोंकरिता अन्न संघटना' (Meals for Millions) यांद्वारे त्यांनी जीवनसत्त्वयुक्त खाद्यान्नाचे महत्त्व पटवून देण्याचा प्रयत्न केला. त्यांच्या सर्वच उपक्रमांना यश प्राप्त झाले असे नाही. त्यांच्या हयातीनंतर तर या उपक्रमांना उपचाराचे रूप प्राप्त झाले. पण धर्मचिकित्सा, समाजप्रबोधन, शिक्षण, कृषिविकास अशा अनेक दिशांनी त्यांनी कृषकांच्या सर्वांगीण विकासाचे प्रयत्न केले.

कृषकांच्या विकासाचा असा सर्वांगीण प्रयत्न जागतिक इतिहासामध्ये एकूण दुर्मिळ आहे.



# 'जे का रंजले - गांजले'

- हि. ब. उलेमाले

---

भाऊसाहेबांचा जन्म २७ डिसेंबर १८९८ चा, तोही पापळ या खेड्यात. पक्क्या रस्त्यांची सोय नाही, दुखण्यासुपण्यावर गावठी उपाय. त्याकाळची बाळंतपणेही तशीच विळ्यांनी नाळ कापण्याची. कुणाला माहीत होते- निर्जंतुकरण? सर्व दैवाधीन, 'माझ्या पोरीला सोडव रे देवा बापा' ह्यापलीकडे उपाय नाही. पण त्याही काळात लोक जगलेच की नाही? लोक जगले. पण बालमृत्यू किती असायचे! एखादी पोक्त बाई म्हणायची, -माय मले दाहा झाले पण देवानं दोनच ठेवले.' जे दैवयोगाने मेले नाहीत तेच वाचले. मृत्यूचे जिवाणू प्रत्येक जीवाभोवताल घोंघावत होतेच; पण सर्व्हायवल ऑफ दि फिटेस्ट - 'फीट' तेच वाचले अशी त्याकाळची म्हणजे १८९८ सालची पर्यावरण परिस्थिती व 'होम हेल्थ सेंटरचा' जमाना होता.

भाऊसाहेब जन्मले तेच मुळी पारतंत्र्यात. पारतंत्र्य काय सुखकर असते? त्यातल्यात्यात खेडे, नदी नाल्यांनी वेढलेले. कोण बांधणार होते बेंबळा नदीवर पूल? कोण करणार होते गिट्टीचा रस्ता? गावात शाळा नाही म्हणून कारंजा लाड व चांदूर रेल्वे येथे भाऊसाहेबांचे प्राथमिक शिक्षण झाले. त्यांच्या कुशाग्र बुद्धीमुळे ते विलायतेपर्यंत पोहोचले. पण असे कित्येक पंजाबराव वावरात खपूनच मेले असतील.

त्यावेळेसची शेती आजच्या सारखीच निसर्गावर अवलंबून. जुनी बियाणे, ज्वारीवर कान्ही रोग यायचा. ८० टक्के कणसे दाण्यांनी भरायचीच नाही, ज्वारी पण काळी. काही कान्हींनी उरली सुरली ज्वारी पण काळी व्हायची. पऱ्हाटीवर भुरी रोग, गव्हावर तांबेरा, चण्यावर घाटे अळी, तुरीवर शेंगा पोखरणारी अळी. त्याकाळचे जंतू व कीटकनाशके म्हणजे गोमूत्र शिंपडायचे व चुलीतली राख धुरळायची. त्यावेळेला टमाटे आणि पालक भाज्यांचा जन्मच व्हायचा होता. भाऊसाहेबांचे पापळ गावी आणि परिसरात मिरची व वांगी व्हायची, पण पुढे तीही लुप्त झाली. असे का झाले म्हणून तेव्हा भाऊसाहेब आम्हाला विचारायचे! एकूण अशा 'प्रिमीटीव्ह एज'मध्येच

भाऊसाहेबांचा जन्म झाला.

ग्रामीण जीवन, तोडी, अंधश्रद्धा, आत्यंतिक गरिबी, दुष्ट सावकार व पठाणी सावकारशाही, रोजगार-उद्योग-बाजारपेठ यांचे नाव नाही, सार्वजनिक आरोग्य नाही. शिक्षणाची सुलभ सोय नाही, दुष्काळ ओला जास्त, सुखा कमी, पण दोन्ही होतेच. मोठेपण, दुसऱ्यावर विश्वास, कोर्ट-कचेऱ्या, मार्गदर्शन नाही. विफल समाज, समाजासमाजात विषमता, देवभोळेपणा, व्रत-वैकल्ये, धर्ममार्तंडांचे जोखड- किती वर्णन करावे ? रयतेला जिवंतपणी कैद-असा सारा जमाना होता. भले भले भूमिहीन झाले. पडलेल्या घराच्या भिंती बांधू शकत नव्हते पण माणुसकीची भीती ही समदुःखी व गरीब जनतेत कायम होती,

प्रामाणिकपणा होता. रामोशी होते; पण भुरटे चोर नव्हते. अश्राप निराश्रित जनता चोहीकडे होती. जाती-व्यवस्था चोख सांभाळली जात होती. सांभाळणारे हजर होते. व्यवस्था पाळणारे कडक होते. पण छेद देणारे कमजोर, दुबळे होते, जाती-व्यवस्थेचे भीषण चटके साऱ्यांनाच बसत होते.

अशी भयावह पार्श्वभूमी असताना भाऊसाहेबांचा जन्म व त्या परिस्थितीत त्यांनी केलेले कार्य हे तुम्हा-आम्हाला देदीप्यमान वाटले नाही तरच नवल!

पण माझ्या मनात आणखीही एक नवल आहे. भाऊसाहेबांना महात्मा जोतिबा फुले, राजर्षी शाहू महाराज, भारतीय घटनेचे शिल्पकार डॉ. बाबासाहेब आंबेडकर, यांच्या शृंखलेतील एक शिरोमणी असे मानतात खरे, पण भाऊसाहेबांच्या नावाचा लौकिक व प्रसिद्धी त्यामानाने फार तोकडी आहे. त्यांनी केलेली अचाट कृषिक्रांती- उभारलेल्या 'भारत कृषक समाज' सारख्या संघटना, शेतकऱ्यांची बँक, जागतिक कृषिप्रदर्शन, 'श्री शिवाजी शिक्षण संस्थे'सारखी उभारलेली मातब्बर शिक्षण संस्था, मुक्त विद्यापीठ स्थापना, सामाजिक कार्य, अंबादेवी संस्थानच्या मागासवर्गीयांच्या प्रवेशाचा प्रश्न, देवालयाच्या संपत्तीचे खाजगीकरण बील व त्याचा शिक्षणासाठी विनियोग, शेतकऱ्यांची कर्जमुक्ती, शेतकऱ्यांसाठी व ओबीसींसाठी शिष्यवृत्त्या, परदेश गमनाच्या व भारतभ्रमणाच्या शेतकऱ्यांना सोयी, निराश्रितांसाठी बोर्डिंगांची साखळी, राजर्षी शाहू महाराजांचे लाभलेले आशीर्वाद व शैक्षणिक मार्गदर्शन, त्यांना मिळालेली जागतिक व भारतातील कीर्ती, 'पंजाब हमारा है' - असे म्हणणारे शेतकरी शिख बांधव, श्रीमती राधाबाई बुधगावकर या तमाशा करणाऱ्या बाईचा सत्कार करणारे भाऊसाहेब, पाणी अडवा-जिरवा व पूलवजा बंधारे बांधा- या कल्पनेचे जनक भाऊसाहेब, गरीब श्रद्धानंद बोर्डिंगच्या विद्यार्थ्यांसाठी खिशात बोरे, चिंचा व मिरच्या आणणारे भाऊसाहेब, कुणा शेतकऱ्यांच्या खळ्यावर जाऊन ज्वारी, गहू, तूर, बाजरी मागणारे भाऊसाहेब, रेल्वे गाडीत चढले पण प्रवासासाठी खिशात

पैसे हवेत याचे भान हरपलेले भाऊसाहेब, सभा घेता घेता उशीर झाला तो सायंकाळी ७ वाजता ठरलेले खेड्यातील गावजेवण सकाळी चार वाजता थंडच जेवण जेवणारे भाऊसाहेब, श्री शिवाजी कृषि कॉलेजच्या ज्या सांडांनी शेतकऱ्यांची गाडी एका धडकेत उचलून फेकली तो शक्तिशाली सांड माझ्या संस्थेचा आहे म्हणून अभिमान बाळगणारे भाऊसाहेब, महाराष्ट्रात प्रथमच जागतिक पैशावर उभारले जाणाऱ्या कृषि विद्यापीठाचा प्रस्ताव व मंजुरी घेऊन आलेले भाऊसाहेब व हे कृषिविद्यापीठ नको म्हणणारे त्याकाळचे महाराष्ट्राचे मुख्यमंत्री व कृषिमंत्री–ह्या सर्व गोष्टी आठवतात. भाऊसाहेबांच्या व्यक्तिमत्वावर जिवंतपणी अन्याय झाला, कारण त्यांची कामाची उभारी व शेतकऱ्यांचे संघटन बघून केंद्रात खळबळ झाली व या माणसास वेळीच खच्ची केलेले बरे म्हणून त्यांचे मंत्रीपदही हिरावले गेले... पण मरणोपरान्त तरी त्यांची घ्यावी तेवढी दखल घेतली गेली का नाही ? – ही कटू पण सत्य वस्तुस्थिती आहे.

एकदा प्रख्यात दलित साहित्यिक प्रा. पाणतावणे हे ‘भाऊसाहेब व्याख्यानमाले’साठी अमरावती सिटी लायब्ररीत आले असता, चर्चेमध्ये श्री. दादासाहेब गोळे यांनी प्रश्न केला की ‘पाणतावणेसाहेब, आपण डॉ. पंजाबराव देशमुखांवर जितके बोलायला पाहिजे तितके बोलत नाही, किंबहुना सर्वच साहित्यिक भाऊसाहेबांवर खूपसे बोलताना दिसत नाहीत, अति अभावाने बोलतात – हे कसे ?’ याचे उत्तर प्रा. पाणतावणेंनी मोठे मार्मिक असे दिले. ‘एक तर तुम्ही मला भाऊसाहेबांवरील लिखाण पाठविले नाही. किंबहुना भाऊसाहेबांवर, त्यांच्या कार्याच्या प्रत्येक पैलूवर लिखाण नाही. लिखाणासाठी जी जाग व आग पाहिजे ती येथील लोकांत दिसत नाही.’ श्री. पाणतावणे पुढे म्हणाले ‘आम्ही तर बेसहारा होतो व आम्हाला काहीतरी समाजातून मिळविल्याशिवाय गत्यंतर नव्हते. आम्हाला तर रात्रंदिवस युद्धाचाच प्रसंग होता. तसा तुमच्यावर प्रसंग दिसत नाही.’ ही बाब अंतर्मुख होऊन बघण्यासारखी आहे. आम्हीच खरोखर भाऊसाहेबांना, त्यांच्या कार्याला व विचारधारेला विसरलो आहोत की काय ? विसरलो नसू तर मग लिखाण व्हायला पाहिजे व सर्वच विषयांवर हजारो छोटी–मोठी पुस्तके लिहिली गेली पाहिजेत. विश्लेषणात्मक वर्णनापेक्षाही विवेचनात्मक पुस्तके ही हवी आहेत. भाऊसाहेबांचे त्याकाळचे विचार आजच्या संदर्भातही तेवढेच ताजेतवाने आहेत, कारण त्यांनी मांडलेल्या त्यावेळच्या समस्या व त्यावरचे उपाय ह्यांनी आज गंभीर स्वरूप धारण केलेले आहे.

स्व. वसंतराव नाईक प्रतिष्ठान मुंबईला आहे. तेथे दरवर्षी एक जुलै रोजी एम्.एल्.ए. होस्टेल जवळच्या के.सी. कॉलेजमध्ये त्यांचा स्मृती कार्यक्रम होतो व शेती–संशोधन आणि गैरसरकारी संस्थांनी पर्यावरणावर केलेल्या कामाचा गौरव होऊन व्यक्ती अथवा संस्थेला बक्षिसे देऊन गौरविले जाते व स्व. वसंतरावांचाही गौरव होऊन

त्यांच्या विचारांचे प्रसारण होते. तसेच प्रत्येक विद्यापीठात वसंतराव नाईक भाषणमाला होते. त्याकरिता प्रत्येक विद्यापीठात काही निधी ठेवलेला आहे. असे काही भाऊसाहेबांच्या स्मृतिप्रीत्यर्थ करता येणे शक्य आहे. श्री शिवाजी शिक्षण संस्थाच ह्या बाबतीत पुढाकार घेऊ शकते. सरकारही हातभार लावू शकते. महाराष्ट्रात, भारतात आणि विदर्भात भाऊसाहेबांचे नाव दुमदुमले पाहिजे. तसे विदर्भातील वर्तमानपत्रांमध्येही भाऊसाहेबांच्या पावन स्मृतीस अभिवादन व एक फोटो आवर्जून असतोच, पण त्यांच्यावर संपादकीय लिहिलेले दिसत नाही.

भाऊसाहेबांनी जागतिक कृषि प्रदर्शन भरविले. जगातील सर्व देशांच्या कृषि प्रगतीची वाटचाल भारतीय शेतकऱ्यांना भारतात-दिल्लीला पाहाता आली. शेतकरी खरा प्रभावित झाला तो उन्नत बी-बियाणे बघून. आपले एक बी पाव किलो उत्पन्न देते; तर परकीय एकच बी एक किलो उत्पन्न देते. भाऊसाहेबांना शेतकऱ्यांना उन्नत व स्वस्त बियाणे द्यायची होती. 'शुद्ध बीजापोटी फळे रसाळ गोमटी' म्हणूनच त्यांनी श्री. बद्रीप्रसाद बारवाले, श्री. अन्वीकर (दोघेही मराठवाड्याचे) यांना परदेशात पाठवून प्रोत्साहित करून बीजोत्पादन कंपनी काढावयास लावली. श्री. गनेडीवाल वलगाव यांना पण प्रोत्साहित केले आणि त्यांनी पण सीड कंपनी काढली. त्यानंतर शेकडो सीड कंपन्या निघाल्या. जालना जिल्हा तर बीजोत्पादनाचे माहेरघरच बनला. शेतकरी लखोपती झाले. महाराष्ट्र सरकारनेही 'महाबीज' ही बीजोत्पादन करणारी स्वायत्त संस्था स्थापन केली. तिची वाटचाल यशस्वीपणे चालू आहे. भाऊसाहेबांमुळे संकरवानांचा व जपानी पद्धतीने भातशेतीचा जमाना आला. पण भाऊसाहेबांचे हे स्वप्न साकार होत असताना 'स्टेट व्हेरायटी'चे भाव पण किमान शंभर रुपये किलो व्हावेत, ही अतिशय दुर्दैवाची गोष्ट झाली आहे. बी हा शेतीचा महत्त्वाचा घटक असून, ते उगवेल तरच पुढची निंदन, खुरपन, वरखते, ओलीत, कीटकनाशके यांचा प्रश्न येतो. बी उगवलेच नाही तर पुढची कास्तकारी आपोआप बंद होते. पण शेतकरी आज शेतीत टाकावयाच्या 'इनपुट'मुळेच हैराण आहे. इतकी महाग बी, खते, औषधी शेतकऱ्यांना देताना भाऊसाहेबांनी आज पाहिले असते तर त्यांचे पित्त खवळले असते. सीड कंपन्यांचे त्यांनी कान उपटले असते. खतावरची सबसिडी बंद केली नसती, शेतीला भांडवलाची चणचण भासू दिली नसती. आई आपले भरण-पोषण करते ना, मग तिला त्रास होईल असे काही आपण करू नये हा निसर्गनियम आहे. मग जो शेतकरी आपल्याला अन्न, भाजीपाला, दूध, फळ-फळावळे देतो त्यालाच त्रास द्यायचा, हैराण करायचे ही बाब मुळीच पटण्यासारखी नाही. म्हणून समाजात शेतकऱ्यांच्या कैवाऱ्याची गरज आहे. त्यांच्यावर उपकार नकोत; पण अन्याय तरी व्हायला नको! आज दिल्लीत आझादपूर येथील देशपातळीच्या फळाच्या बाजारात नियंत्रण नाही. देशाच्या राजधानीत 'रेग्युलेटेड

मार्केट' नाही. सर्वत्र मनमानी, दलालाचे राज्य, दिवसाढवळ्या शेतकऱ्यांची लुबाडणूक. दोन महिन्यांनी मालाचे पैसे मिळणार मग शेतकऱ्याने खर्च भागवायचा कसा? दिल्लीस्थित दलालांचे हे राज्य भाऊसाहेबांनी खपवून घेतले असते काय? मुळीच नाही! रंजल्या गांजल्या, कर्जबाजारी व मोडकळीस आलेल्या शेतकऱ्यांचे हित आता कोण जपणार? शेतकरी साऱ्यांनी वाऱ्यावर सोडला आहे. तो संघटित नाही. त्यांची संघटना 'भारत कृषक समाज' शेतकरी–द्रोह्यांनीच खिळखिळी व निष्प्राण केली आहे. म्हणूनच भाऊसाहेबांचे विचार, त्यांनी दिलेले कार्यक्रम, संघटना आजही दिनमान–सापेक्ष आहे.

भाऊसाहेब हयात होत तेव्हा श्री. लोंढेमामांचा षष्ठ्यब्दपूर्ती कार्यक्रम व्हायचा होता. भाऊसाहेब रूरल इन्स्टिट्यूटच्या कार्यालयात बसले होते, अचानक महाराष्ट्राच्या गृह खात्याकडून टेलिग्राम आला की, श्री शिवाजी संस्थेने त्यांच्या ताब्यातील मिलीटरी बरॅक पोलिसांसाठी खाली कराव्यात; –त्याही ताबडतोब! ह्या बराकींचाही इतिहास आहे. दक्षिणेत आंध्रप्रदेशात एक अमरावती गाव आहे. तिथे मिलीटरीसाठी बरॅक बांधायच्या होत्या. पण त्यावेळेसच्या मध्यप्रदेशातील वऱ्हाडच्या अमरावतीला त्या बांधल्या गेल्या. कालांतराने ही चूक लष्कर प्रमुखांच्या लक्षात आली. परंतु तोपर्यंत ह्या बराकी बांधून झाल्या होत्या व येणारे लष्कर येथे आलेच नाही. यातील बऱ्याचशा बराकी भाऊसाहेबांनी शाळेसाठी व गरीब शेतकऱ्यांच्या श्रद्धानंद होस्टेलसाठी मागून घेतल्या त्या त्यांना मिळाल्या. लष्कराची चूक भाऊसाहेबांच्या पथ्यावर पडली, अजूनही त्या ऐतिहासिक बराकी श्री शिवाजी शिक्षण संस्थेजवळ आहेत. कित्येक वर्षांपासून मुले त्यात राहात होती. काही बराकी पोलीस खात्याला वापरासाठी मिळाल्या होत्या. वर नमूद केलेला टेलीग्राम वाचताच भाऊसाहेबांचा पारा चढला. ते अतिशय संतप्त झाले होते. त्या रागाच्या भरातच म्हणाले की, महाराष्ट्राच्या गृहमंत्र्यांना फोन लावा. मीच तो लावला. त्या टोकावरून आवाज आला "बाळासाहेब देसाई बोलतोय." भाऊसाहेबांनी फोनवरून खडसावले "हे आमचे बाप कुठे राहातील? दोन अडीचशे मुले बराकीत राहातात. काही बराकींत वर्ग भरतात. तुमचा टेलीग्राम आत्ताच्या आत्ता रद्द करा." तिकडून कळले की, टेलीग्राम रद्द झाला. भाऊसाहेब खुष झाले. कारण मुलांची होणारी ससेहोलपट थांबली होती. त्यावेळी भाऊसाहेब व बाळासाहेब देसाईंची तेवढी ओळख नसावी. पण बाळासाहेबांनी एकदा मुंबई भेटीत श्री. बाबासाहेब घारफळकरांना विचारले होते "लोककल्याणार्थ भाऊसाहेबांइतका तापट नेता मी पाहिला नाही. पण खरंच का हो भाऊसाहेब एवढे तापट आहेत?" बाबासाहेबांनी सांगितले –"भाऊसाहेब समुद्रासारखे शांत पण आहेत."

भाऊसाहेबांचा अधिकारच एवढा मोठा होता की सर्व नेते त्यांना मानीत असत.

विरोधकही मानीत असत. त्यांचे एकच नि:स्वार्थ ध्येय होते –गरीब शेतकऱ्यांची व गरीब मुलांची सेवा. एकाचे दैन्य दूर करणे तर एकास शिक्षित करणे. शिक्षणापासून कुणीही वंचित राहू नये व शेतकरी दैन्यात राहू नये.

भाऊसाहेब गाडगे महाराजांना फार मानीत असत, कारण बरेच संत झाले पण गाडगे बाबांसारखा द्रष्टा संत केवळ गाडगे बाबाच होत. अज्ञानी, अडाणी जनांचे लोकशिक्षण गाडगे बाबांनीच केले. 'बापहो, देव दगडात नाही, तो गरिबात हाये, त्याची सेवा करा.' मियाँ बिस्मिल्लाखानानी साधी सनई आपल्या कलेने जागतिक कीर्तीवर पोहोचवली तसा साधा झाडू, जो स्वच्छता ठेवण्याचे साधन आहे-तो गाडगेबाबांनी सर्वांच्या हाती देऊन त्यांचे सार्थक केले, जागतिक कीर्ती मिळवली. 'बोला-गोपाला गोपाला देवकीनंदन गोपाला'! हे गाडगेबाबा पण भाऊसाहेबांकडे शेतकऱ्यांचा एवढा मोठा शिकलेला मुलगा म्हणून मोठ्या अभिमानाने बघत. भाऊसाहेब भारतीय सरकारात जेव्हा कृषिमंत्री झाले व ही सुखद बातमी वाऱ्यासारखी अख्ख्या विदर्भात पसरली आणि भाऊसाहेबांचे अमरावतीत पहिले आगमन होणार ही बातमी गाडगेबाबांना कळली तेव्हा त्यांनी गाडगेनगर चौक स्वच्छ झाडून काढला, मोर्शी रोड चौकापासून रहाटगावपर्यंत झाडत नेला, पाण्याचा सडा टाकला. ते जनतेला म्हणाले ''लेकहो,शेतकऱ्याचा पोरगा राजा झाला, तो आपल्याले भेटाले येत आहे.'' गाडगेबाबांच्या आनंदाला पारावर राहिला नव्हता. ते साक्षात् चैतन्यमूर्ती असूनही त्यांच्या अंगात त्यावेळी वेगळेच चैतन्य संचारले होते. भाऊसाहेबांची गाडी आली. गाडगेबाबांनी भाऊसाहेबांना साष्टांग दंडवत घालण्याचा प्रयत्न केला व भाऊसाहेबांनी पण. दोघांच्याही डोळ्यांत अश्रू होते. ऊरभेट झाली आणि जमलेल्या जनतेच्या डोळ्यांत पण अश्रू तरळले. भावविभोर असा प्रसंग होता. दोघेही परमश्रेष्ठ. त्यांची भाषा त्यांनाच कळो. पण हा प्रसंग ज्यांनी पाहिला ते विसरू शकत नाहीत. दोघांचीही बातचीत झाली. भाऊसाहेब जेव्हा केव्हा अमरावतीच्या सर्किट हाऊसवर येत तेव्हा तेव्हा गाडगेबाबा त्यांना भेटायला येत. त्यांचेही काम असेच –शाळा, धर्मशाळा, गोरक्षण इत्यादी. बाबांची कामे भाऊसाहेब तत्परतेने करीत. दोघेही ध्येयवेडे. वऱ्हाडात जन्मले पण वऱ्हाडापलीकडे मानवतेच्या कल्याणासाठी चंदनासारखे झिजले, व सामान्यांसारखेच मरण पावले. अशांचीच स्मारके बनतात, पुतळे उभारले जातात. ते जनताजनार्दनाच्या मार्गदर्शनासाठी, स्फूर्तीसाठी. विटंबनेसाठी नाही!

येथपर्यंत ठीक झाले. आता आपण स्वत: काय करणार? भाऊसाहेब वा गाडगेबाबा परत यायचे नाहीत; पण एक धगधगता निखारा तर दुसरा झाडू – गाडगेवाला. दोन्ही पर्याय आपल्या समोर आहेत!



# समाजक्रान्तीचा उद्गाता व प्रवक्ता

– डॉ. मुरलीधर देशमुख

---

मानवप्रेम समाजप्रेम या एकाच नाण्याच्या दोन बाजू आहेत असे नेहमीच म्हटले जाते. डॉ. पंजाबराव ऊर्फ भाऊसाहेब देशमुख पापळकर यांच्या बाबतीतला पहिला अनुभव मला १९५५ ला आला. मी दिल्ली विद्यापीठातील 'दिल्ली स्कूल ऑफ सोशल वर्क' महाविद्यालयाचा विद्यार्थी. घरची आर्थिक परिस्थिती जेमतेमच. परंतु शिवाजी शिक्षण संस्थेमधील श्रद्धानंद छात्रालयाचा विद्यार्थी, त्यात एन्.सी.सी. व स्पोर्टस्‌मधे चमकणारा असल्यामुळे अमरावतीला भाऊसाहेबांच्या शिवाजी महाविद्यालयात बरेचदा मी त्यांच्या नजरेसमोर आलो. त्याचा फायदा घेऊन जुलै १९५५ मध्ये १२, जनपथ, या त्यांच्या दिल्लीस्थित सरकारी बंगल्यात पेटीबिस्तरा घेऊन सरळ घुसलो. प्रथमच एवढा मोठा बंगला व त्यातील गालिचे पाहाण्याचा योग आला होता. मराठी बोलणाऱ्या 'साधुबुवा' नावाच्या शिपायाने मला एक सुंदर गालीचा अंथरलेल्या खोलीमधे जागा दिली. रात्री दहा वाजता भाऊसाहेब घरी आल्यावर मला प्रथम भेटले. मी म्हटले – ''डॉ. गोरे – प्राचार्य असलेल्या या संस्थेत माझा प्रवेश पूर्णपणे झालेला नाही. प्रतीक्षा यादीत माझे नाव आहे.'' आश्चर्य हे की दुसऱ्या दिवशीच मला त्या आंतरराष्ट्रीय कीर्तीच्या संस्थेत प्रवेश मिळाला. आणि तो मिळाला तो प्राचार्यांना गेलेल्या भाऊसाहेबांच्या फोनमुळे.

घटना लहान; पण या प्रसंगाने माझ्या तरुण मनावर फार परिणाम झाला. मी 'मराठा' लिहिणारा माणूस जेव्हा 'कुणबी' लिहू लागलो तेव्हा मला दिल्लीला राहाण्याचा छात्रालयातील खर्च व महाविद्यालयांची 'फी' पूर्णपणे मध्यवर्ती सरकारद्वारा प्राप्त झाली. मराठा ही जात नाही; कुणबी ही जात आहे – असे त्यांचे भाषण मी १९५४ साली शिवाजी महाविद्यालयाच्या स्नेहसंमेलनात ऐकले होते. तेव्हा माझ्या सर्व मित्रांनी इतर मागासवर्गीय म्हणून प्रमाणपत्र मिळवून ह्या सवलती मिळविल्या. ही भाऊसाहेबांची दूरदृष्टी. या त्यांच्या प्रयत्नाने व मार्गदर्शनाने विदर्भातील हजारो गरीब शेतकऱ्यांच्या

मुलांना उच्चशिक्षणाच्या वाटा मोकळ्या झाल्या. हेच तर त्यांचे समाजप्रेम. हे प्रेम 'सत्यशोधक' म्हणून मानवतेच्या प्रेमापायी त्यांनी आयुष्यभर हृदयाशी जोपासले. पण फक्त हृदयात जोपासूनच ते थांबले नाहीत; तर आयुष्यभर त्याला स्वत:च्या घामाचे पाणी घातले व आयुष्यभर एक समाजसेवेचे साधन समजून व जनताजनार्दनातच ईश्वर आहे अशी मनाशी खूणगाठ बांधूनच त्यांनी आपले मंत्रीपद भूषविलेले दिसते.

स्वराज्यप्राप्तीनंतर विदर्भाची ग्रामीण जनता सुशिक्षित व सुसंस्कृत बनली पाहिजे अशी त्यांची फार इच्छा. नैतिकताच राजकारणाचा पाया असला पाहिजे व राजकारणातही आत्मशुद्धीतत्त्व कायम ठेवून समाजकार्य हेच राजकारणातील नैतिकतेचा आधार असला पाहिजे असे त्यांना सतत वाटत होते. शेतकरी कुटुंबात ज्या हिंदुधर्मात त्यांचा जन्म झाला, त्या धर्माची तत्त्वे हाच धार्मिक आचारसंहितेचा राजमार्ग त्यांना वाटे. 'धर्मात् अर्थश्च कामश्च स धर्मः किं न सेव्यते.' धर्मभावनेनेच लौकिक व आध्यात्मिक सुख प्राप्त होते; परंतु त्यात समाजप्रेम हवे – आत्मशुद्धीची चळवळ हवी–व देशभक्ती हेच साध्य हवे असे भाऊसाहेबांना लहानपणापासून वाटत होते. सर्व धर्मांत अहिंसातत्त्व सांगितले असताना त्यात वाद कशासाठी ? हा प्रश्न त्यांना नेहमी पडत होता. '१९४६ साली हैदराबादच्या निजामाकडून मला महाविद्यालयाकरिता दोन लाख मिळाले, याचा अर्थ जर विद्वान ब्राह्मणांनी मी निजामाला विदर्भ विकत आहे असा लावला तर हा त्यांच्या विद्वत्तेचा अतिरेक आहे' असे म्हणणारे भाऊसाहेब मी पाहिले. 'त्यांना कोल्हेकुई करू द्यावी; मी माझ्या रचनात्मक शक्तीद्वारा राजशक्तीवर वर्चस्व स्थापित करीन' असे म्हणणारे डॉ. पंजाबराव देशमुख मी मंत्रीपदापूर्वी पाहिले.

त्यांना सर्वांगपरिपूर्ण लोकशाही समाजरचना हवी होती. अशा समाजात दारिद्र्य, वर्णभेद, वंशभेद, पंथभेद व स्त्रीपुरुषभेद नष्ट झालेला असेल. समाजातील नागरिक भयग्रस्त स्थितीत वावरू नयेत, सेवाभाव हाच राजधर्म, स्वैराचार म्हणजे स्वातंत्र्य नव्हे; सहकार हाच शेतकरी जीवनाचा स्थायीभाव. शेतीनिष्ठा व सहकारनिष्ठा हीच शेतकरी समाजातील मानवी मूल्यांची कळ असायला हवी. राजा हा सुशिक्षित असलाच पाहिजे असे नव्हे, पण तो सुसंस्कृत मात्र असायलाच पाहिजे; भ्रष्ट नसावा. मतभिन्नता हवी परंतु ती हानिकारक होऊ नये असे त्यांचे धोरण होते. मी त्यांचे खाजगी सचिव श्री. कोंडे यांच्याजवळ बसलो असताना त्यांच्या शेतीविषयातून सहकारखाते तत्कालीन पंतप्रधानांनी जेव्हा अलग केले होते, त्या सुमारास त्यांनी लिहिलेल्या पत्राचा मसुदा मला वाचायला मिळाला. त्यात त्यांनी सरळसरळ आरोप लावलेला होता की, सहकारखाते जर शेतीखात्यातून अलग केले तर शेतकऱ्याचा आत्माच अर्धमेल्यासारखा होईल कारण ही प्रगतिपथावरील जगन्नाथाच्या रथाची दोन चाके आहेत. एक जर अलग झाले तर हा शेतकऱ्यांचा रथ कसा चालेल ?

बरेचदा मला दिल्लीला असताना त्यांची भाषणे ऐकण्याचा प्रसंग आला. कधी संसदभवनात तर कधी बाहेरही. त्यांचे इंग्रजीवरील प्रभुत्व बिनतोड होते. एकदा महाविद्यालयात बोलताना स्वातंत्र्य हे शेतकऱ्याला दिले खरे; पण त्यात त्यांच्या चुकाही होतील, मतभिन्नताही असेल, पण त्या साध्याभोळ्या शेतकऱ्यांची लोकशाहीवर एकदा का निष्ठा जडली तर मग भारतातील जातिसंस्था नष्ट होऊन 'पंचायत राज'सारख्या संस्था प्रभावीपणे उदयाला येतील. त्यात मतभिन्नता असेल पण सत्तेच्या वाटेत हे अशिक्षित शेतकरी सार्वजनिक मूल्ये जोपासण्यावर जोर देतील. लोकशाहीच्या बुरख्याखाली भांडवलशाही सत्ताधीश होण्याची शक्यता असल्यामुळे शेतकऱ्यांच्या चुका होतील. त्यांच्यात मतभिन्नता असेल पण त्यांची लोकशाहीवरील निष्ठा ही अत्यंत खोलवर रुजलेली असेल, असे चित्र भविष्यात पाहावयाला मिळेल हा त्यांचा आत्मविश्वास त्यांच्या भाषणातून प्रदर्शित होत होता.

भाषणस्वातंत्र्य, सभास्वातंत्र्य व वृत्तपत्रस्वातंत्र्याची गरज समाजाला आहे असे म्हणणाऱ्या ह्या माणसाने एकदा भाषणात भाकित केले 'समाजात असलेली उच्च-नीचतेची भावनाच भविष्यात लोकशाहीला मारक ठरेल. हिंदुधर्मात बोकाळलेले जातीजातींमधील भेदभाव, हिंदुमुसलमानांचे अलगत्व हे हिंदुसमाजाला मान्य नाही असे ते मानत. समान हेतू, समान दुःखे यांच्या आधारे समाजातील घटकांनी कार्यरत राहायला हवे; कोठे हिंदू समाजातील वर्णाश्रम व श्रेष्ठ-कनिष्ठतेची भावना यांतून निर्माण झालेली अस्पृश्यता यांच्या वाढीकरिता कोणीही प्रचार करू नये; त्याचा त्याग करायला हवा. जातीयवादाच्या भावनेला खतपाणी घालणाऱ्या राज्यकर्त्यांची व समाजधुरंधरांची राक्षसी नशा तरुणांनी उतरवावयास हवी - असे म्हणणारे भाऊसाहेब मी फार जवळून पाहिलेत. संस्कृत भाषेवर प्रभुत्व गाजविणाऱ्या पंजाबरावांची इंग्रजी भाषा इतकी प्रभावी कशी झाली याला एकच उत्तर मला दिसले. ते म्हणजे त्यांची समाजकार्यावरील निष्ठा व या कार्याकरिता इंग्रजी शिकण्याची लालसा. जेव्हा मी त्यांचे 'The origin and Development of Religion in Vedic literature' हे पुस्तक वाचायला घेतले तेव्हा त्यातील 'धर्मायते इति धर्मा' हे वाक्य वाचायला मिळाले. जे सर्वांना एकत्र आणून घट्ट धरून ठेवते, ज्यात नीतिमत्ता, रूढी, परंपरा, आचारनियमावली व कायद्याच्या स्वरूपातील बंधने समाजातील व्यक्तींवर लादल्या जातात असे महाभारत सांगते - असे जेव्हा वाचायला मिळाले तेव्हा वाटले की भाऊसाहेबांचा संस्कृतातील अभ्यास व त्याचा स्पष्ट अर्थ लावण्याची बुद्धिमत्ता त्यांच्या प्रतिभेचे प्रतीक आहे. या पुस्तकातील इंग्रजी भाषा ही भारदस्त असून तीच त्यांच्या मुखाने कायदेमंडळातील भाषणातून प्रस्फुटित झालेली दिसून येते.

'पापळ' या लहानशा गावात कोठे संस्कृत आणि कोठे इंग्रजी? या भाषांचा

लवलेशही नसलेल्या अशा वातावरणात त्यांचे बालपण गेले. पाटील-देशमुखांच्या कुळीच्या मध्यम शेतकरी कुटुंबात त्यांचा जन्म. शामरावबापू वडील व राधिकाबाई त्यांची आई. १८९८ ते १९१६ पर्यंत त्यांचे बालपण पापळ, चांदूररेल्वे व अमरावती या गावी गेलेले. परंतु त्यांना १९२० साली मुंबईच्या सरदार अतिथिगृहात लोकमान्य टिळकांचा मृत्यू झाला हे समजल्याबरोबरच पुण्याला शिकणारा हा तरुण प्रेतयात्रेला काय निघतो व नंतर इंग्लंडमधील ऑक्स्फर्ड विद्यापीठातून शिकून आल्यानंतर स्वामी श्रद्धानंदांचा वध झाल्यानंतर १९२४ साली त्यांच्या नावे अमरावतीला सर्व जातींच्या गरीब मुलांच्याकरिता निःशुल्क छात्रालय काय उघडतो. ही दुसरी तिसरी काही नसून या तरुणाने बालपणीच समाजपरिवर्तनाच्या क्रान्तिपर्वात घेतलेली बेलाग उडीच होय. पुढील आयुष्यात कायदेमंडळ व लोकसभेतील सभासद म्हणून वाट्याला येणाऱ्या बाबी म्हणजे एक सुंदर असा योगायोगच समजला पाहिजे.

महाराष्ट्रातील विदर्भ हा फार प्राचीन तसेच अत्यंत आधुनिक काळातील महान त्यागी संतांचा भूप्रदेश. त्यात त्यांच्या हयातीत जन्मान्ध संत गुलाबराव महाराज माधानकर, महान् त्यागी संत गाडगेबाबा व राष्ट्रसंत तुकडोजी महाराज होते. या सर्वांच्या संपर्कात डॉ. भाऊसाहेब देशमुख आलेले होते. आईवडील पंढरपूरच्या विठ्ठल-रूक्मिणींना मानणारे वारकरी. स्वतःच्या कृषक समाजाकरिता काही करावे ही भावना अत्यंत प्रभावी व स्वतःला त्रास कितीही झाला तरी इतरांच्या भल्याकरिता आपला जन्म झालेला आहे ही वारकरी भावना अत्यंत प्रकर्षाने दिसून येत होती. भाऊसाहेबांचे व्यक्तित्त्व दिवसेंदिवस अशा पार्श्वभूमीवर विकसित होत गेलेले होते.

तत्कालीन शेतकऱ्यांची सामाजिक स्थिती अत्यंत हलाखीची. कर्जबाजारीपणा बोकाळलेला, मुलीच्या लग्नाकरिता प्रत्येक शेतकरी सावकाराकडे जाऊन जीवघेण्या व्याजाने खर्चाकरिता पैसे स्वीकारायचा व नंतर व्याजापायी आपले शेत गमवायचा, अशी कितीतरी उदाहरणे भाऊसाहेबांना ऐकायला मिळाली. त्यांच्या कुटुंबावरही असे आघात झालेले होते. या पार्श्वभूमीवर डॉ. पंजाबराव देशमुखांचे व्यक्तित्व उभारले गेले. या पार्श्वभूमीवर त्यांचा जीवनप्रवाह सुरू झाला. त्या प्रवाहाला बरेचदा दडपायचा, नष्ट करायचा, झोडपून काढायचा प्रयत्न झाला. पण ती समाजक्रान्तिकाऱ्यांची चिरंतन भविष्याकडील वाटचाल होती. सत्यनिष्ठेवर आधारित पापळच्या धुळीतून जन्म पावलेले हे व्यक्तित्व होते. या व्यक्तिमत्वाला परत धुळीतच जायचे आहे याचीही जाणीव सतत होती. तेव्हा सतत जीवनाची धूळ करीत राहावी यातच खरा आनंद आहे, त्याकरिता केलेले कार्य हे महान् कार्य आहे, यावर त्यांची निष्ठा होती.

इंग्लंडमधील ऑक्सफर्ड विद्यापीठातून १९२४ साली परतल्यावर आंतरजातीय विवाह, शेतकऱ्याकरिता पंधरा कलमी कार्यक्रम, श्रद्धानंद स्वामींच्या नावे गरीब

मुलांकरिता नि:शुल्क छात्रालय, अंबादेवी मंदिरात सर्व जातीच्या लोकांना प्रवेश, वऱ्हाड शेतकरी संघाची स्थापना-ह्या सर्व बाबी त्यांनी १९२५ ते १९३० या पाच वर्षात म्हणजे आयुष्याच्या तीस ते पस्तीस वर्षांच्या वयात करवून घेणे म्हणजेच एका बुलंद समाजक्रांतिकारकाची, त्याच्या त्यागमय जीवनाची सुरुवातच होती हे बरेच जणांना कळले नाही. नंतरच्या काळात छत्रपती शिवाजी महाराजांच्या नावाने २६० च्या वर शैक्षणिक संस्था काढणे, साठ कोटींच्यावर शैक्षणिक वार्षिक बजेट असणारी प्रचंड संस्था उभी करणे व स्वत:च्या कौटुंबिक स्थैर्याचा विचार न करता संस्थेला स्वत:च्या मुलीप्रमाणे जोपासणे - हे अतुलनीय कार्य फक्त सहासष्ट वर्षे आयुष्य लाभलेल्या माणसाद्वारे ईश्वर करवून घेतो-यालाच दिव्यभव्यता म्हणावे.

लोकविद्यापीठ, भारत कृषक समाज, ग्रामीण महाविद्यालये, कस्तुरबा हेल्थ सेंटर, ग्रामीण महिला मंडळे, तरुणांकरिता ग्रामोद्योग मंडळे, व्यायामशाळा इत्यादि संस्था निर्माण करून त्यांनी स्वत:च्या जीवनात बहुआयामी झेप घेतलेली होती. त्यातच ज्ञानाच्या मक्तेदारी विरुद्ध बंड पुकारणे व मागासवर्गीय समाजाला जीवन जगण्याकरिता कृतिशील मार्गदर्शन करून निरनिराळ्या संस्थांद्वारे वाटा निर्माण करणे हे खऱ्या अर्थाने महान् कार्य होय.

त्यांना समाजातील उच्च वर्णीयांचा अहंगंड व नीचवर्णीयांचा न्यूनगंड मुळीच मान्य नव्हता. समाजातील सुज्ञ माणूस हा परिश्रमाद्वारेच मोठा व्हावयाला पाहिजे यावर त्यांचा विश्वास होता. कृतिशीलता हा त्यांच्या जीवनातील स्थायीभाव होता. 'शेतकऱ्यांची सहकारी बँक का?' या विषयावर १९५१ साली भाषण देताना शेतकऱ्यांकरिता सहकारी बँका निर्माण केल्याने शेतकऱ्यांच्या जीवनात आर्थिक स्थिरता आणल्यासाखे होईल असे त्यांनी सांगितले. लवकरच प्रत्यक्ष कृती करून हिज हायनेस श्री. यादवेंद्रसिंग, पतियाळा यांच्या अध्यक्षतेखाली 'द फार्मर्स कोआपरेटीव्ह बँक' नावाची बँक रजिस्टर केली व त्यात बोर्ड ऑफ डायरेक्टरमध्ये सी. डी. देशमुख, के. डी. शर्मा व गंगालाल कासेवा यांच्यासारख्या प्रसिद्ध व्यक्ती घेतल्या. यावेळेला भाऊसाहेब कृषिमंत्री सुद्धा नव्हते; भारत सरकारच्या घटना समितीचे ते सामान्य सदस्य होते. यांतील त्यांची भाषणे निरनिराळ्या विषयांवर फारच गाजलेली होती.

डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी घटनेतील मुख्य अधिकाराचे प्रकरण हाताळले व घटनेचा मसुदा ज्या समितीपुढे सादर केला, त्या समितीमध्ये डॉ. पंजाबराव देशमुखही होते. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी मसुदा उप-समितीचे अध्यक्षपद भूषविलेले होते. १७ फेब्रु. १९४८ श्री. आर. आर. दिवाकर यांच्या 'जातीसंस्था स्वातंत्र्यात नष्ट करण्यात याव्यात' - या ठरावावरील भाऊसाहेबांचे भाषण फार गाजले.

'In the begining sir, I would like to assure my honourable friend

Mr. Diwakar that, I am one with him so far as he aims at the elimination of this poison from the Hindu Society, .........In the year 1927, I married out of caste and at considerable sacrifice ....... elimination of caste distinctions must come about out of the development of the society and merely compulsory primary education will not do ....... Inter-caste marriages will start in right earnest ..... My friend is talking about non-mention of caste only in Government records and for purposes of services ...... My friend has not studied the subject and he is not the representative to represent everybody and every interest of this country. Those people who are shouting against it today, they are the creators of caste.'

म्हणून प्रथम शिक्षण व नंतर आंतरजातीय विवाह यांना प्रोत्साहन देऊन जातिसंस्था नष्ट कराव्यात असा त्यांचा आग्रह होता

ठरावाला विरोध करीत असताना तो कसा करावा, कोणती उदाहरणे द्यावीत आणि भाषेची मोडणी कशी असावी हे वरील वाक्यरचनेवरून दिसून येते. तत्कालीन पंतप्रधानाने भविष्यातील मंत्रिमंडळात घेतले पाहिजे याचा मोह न बाळगता स्वत:च्या विचारासह ठाम निश्चयाने उभे राहाणारे डॉ. पंजाबराव देशमुख हे विलक्षण कणखर व्यक्तित्व दिसून येते.

पुढे जाऊन ते म्हणतात की, संस्कृत भाषा ही सर्वसामान्यांची भाषा नाही. ज्यांना ही भाषा समजते त्यांनाच जातिसंस्थाही स्वत:चे वर्चस्व कायम ठेवण्याकरिता आवश्यक वाटते. त्यांनी सर्वसामान्य जनतेला हिंदुधर्माची खरी भूमिकाच कळू दिलेली नाही व संस्कृत भाषेला स्वत:पुरतीच मर्यादित ठेवली. म्हणूनच हिंदुधर्मात जातिसंस्था कायम ठेवून त्याची बांधणीही मजबूत केलेली दिसते.

दुसऱ्या भाषणात बोलताना शेतकरी समाज भारतात एक विशाल समाज आहे, त्याच्या कल्याणाची दखल सरकारने घेतली पाहिजे, मिनिस्ट्री ऑफ ॲग्रीकल्चर खात्यामध्ये शेतकरी कल्याणाची शाखा असली पाहिजे व ज्याप्रमाणे कारखान्यातील मजुरांना घरे, संडास, आरोग्यकेंद्रे, बालकमंदिरे बांधून देण्याची गरज वाटते (व त्याची कायद्याने दखलही घेतलेली आहे) त्याचप्रमाणे कृषि मंत्रालयात एक विशेष शाखा निर्माण करून त्यात शेतकरी व शेतमजूर कल्याणकारी अधिकाऱ्याची नेमणूक करून भारतातील शेतकऱ्यांकरिता कल्याणकारी योजना राबविण्यात याव्यात. शेतकरी कुटुंबाकडे सहानुभूतीने न पाहाता त्या कुटुंबाचे भारतात राष्ट्रनिर्मित मानाचे स्थान असायला पाहिजे. त्यांच्या उन्नतीकरिता, ध्येयपूर्तीकरिता, त्यांच्यात शिस्त येण्याकरिता, त्यांचे शौर्य वाढविण्याकरिता या समाजाची बांधणी करण्यात यावी - हे सत्य उमजून डॉ. भाऊसाहेबांनी शेतकरी समाजाच्या उन्नतीकरिता निरनिराळ्या संस्था

काढून रचनात्मक समाजक्रान्तीची बीजे त्यांद्वारा परिसरात पेरली.

अमरावती जिल्हा कौन्सिलचे अध्यक्षपद त्यांनी शेतकऱ्यांच्या हिताकरिता व संघटना बांधण्याकरिता उपभोगिले. मध्यप्रदेश व वऱ्हाडप्रांताच्या मंत्रीमंडळात असताना शिक्षणकरात १८ पै वरून २७ पै पर्यंत वाढ करून ग्रामीण भागातील शेतकऱ्यांच्या मुलांकरिता शाळेत सोयी करवून घेतल्या. देवस्थान संपत्ती बिल १९३२ साली पास करवून घेऊन देवस्थानच्या अनुपयुक्त जमिनी वाहतीखाली आणल्या. कर्जलवाद बिल १९३३ साली पास करवून ऋणको शेतकऱ्यांना कर्जबाजारीपणातून मुक्त केले. हे सर्व इंग्रजांच्या राजवटीत करण्यास केवढी धिटाई लागते! भारतातील परकीयांच्या राज्यातील विसाव्या शतकातील हा राजकीय घडामोडींचा काळ. त्यात लोकमान्य बाळ गंगाधर टिळकांसारख्यांना अतोनात यातना भोगाव्या लागल्या. महात्मा गांधींना प्राणांतिक उपोषण करावे लागले. राज्यकर्त्यांविरुद्ध जहाल भाषा वापरणाऱ्यांना तुरुंगवासात डांबणाऱ्यांचा हा काळ. यातही ज्या समाजाकरिता सामाजिक क्रांतीची गरज आहे त्या बहुसंख्य शेतकरी समाजाला शैक्षणिक, सामाजिक व राजकीय क्षेत्रांत उतरवून पुढे नेण्याचे कार्य या महान् नेत्याने केलेले दिसते. त्यांच्याकरिता संस्था काढल्या, दिशा दाखविली व जीवनाचे अवरुध्द मार्ग मोकळे केले.

शेतकरी समाजाची सर्वांगीण उन्नती व्हावी हे त्यांचे अंतीम ध्येय होते. कायदेमंडळात सदस्यत्व मिळाल्यानंतर २२ नोव्हें. १९४९ च्या भाषणात ते म्हणतात– 'भारतीय घटना निधर्मी (Secular) असावी; याचा अर्थ हिंदू धर्माला विसरणे असे नव्हे. माझा हिंदुधर्म इतका विशाल आहे की त्यातील सर्वसमावेशकता जगातील इतर धर्मालाही लाजवील म्हणून निधर्मी (Secular) या शब्दाच्या भाराने हिंदुधर्मातील मोठेपणाचा शेवट होऊ नये याची काळजी घ्यावी.'

'भारत एक निधर्मी राष्ट्र म्हणून प्रसिद्ध व्हावे असे जर बहुमतांनी ठरत असेल तर त्याला माझी ना नाही' – असे त्यांनी ठामपणे सांगितले. त्यांच्याच शब्दात 'I have not the slightest doubt that the Constitution would have required as secular as we wanted it to be, because there is no religion on earth which is more secular in character than Hinduism.' दुसऱ्या एका भाषणात भारतीय घटनेवर भाष्य करताना – प्रकर्षाने भारतीय घटनेतील महत्त्वाच्या दोषांचे दिग्दर्शन करताना–'गरीब शेतकऱ्यांच्या भावनेची कदर यात दिसत नाही' असे म्हटलेले आहे. स्वातंत्र्य, समता, बंधुता या त्रयींचा उदोउदो करीत ही घटना तयार झाली असली तरी भारतातील सामान्य गरीब शेतकऱ्यांकरिता आम्ही या घटनेद्वारा काय संरक्षण दिलेले आहे? शहरवासीयांना बऱ्याच सुखसोयी निर्माण केल्या. शहरी जीवनाकरिता बांधण्यात आलेल्या भव्य संरचनांची (Superstructure) या देशाला आज गरज नाही. 'The Superstructure should not remain as it is

perpetually...' I would not be surprised if this constitution does not last long, because it does not answer the aspirations of the man in the street.' सामान्य जनतेच्या आवाजाचे प्रतिनिधित्व या कायदेमंडळात हवे असे म्हणणारे भाऊसाहेब पुढे इशारा देतात- जर जनप्रतिनिधी खरे प्रतिनिधित्व करीत नसतील तर सरकारातील प्रतिनिधी भविष्यात वाद निर्माण करू शकतात, आणि रस्त्यावरील तळागळातील माणसाचे प्रतिनिधित्व या कायदेमंडळात असल्यासच भारतातील लोकशाही जिवंत राहू शकते.

दिल्लीच्या राज्यकर्त्यांनी भारत हा प्रामुख्याने शेतकऱ्यांचा देश आहे हे विसरता कामा नये. व कायदेमंडळच प्रभुत्व गाजवील व राष्ट्राध्यक्ष हा नामधारी असेल तेव्हा या कायदेमंडळात येणारे प्रतिनिधी हे प्रामुख्याने शेतकरी समाजाचेच प्रतिनिधी असायला हवे. कारण हा समाज दारिद्र्यात खितपत पडलेला आहे; इतकेच नव्हे, तो सामाजिक व शैक्षणिक दृष्ट्याही मागासलेला आहे. तो गरीब,अर्धवट उपाशी राहाणारा व निकृष्ट स्वास्थ्य लाभलेला मागासवर्गीय समाज आहे (त्यात शेतमजूरही येतात) हे सत्य राज्यकर्त्यांनी दडपून ठेवू नये. त्यांच्या प्रतिनिधीजवळ ती सत्ता असायला हवी असे स्पष्ट प्रतिपादन त्यांनी घटनेवर भाष्य करताना केले. दुसऱ्या एका भाषणात राष्ट्रीय सैनिक दलाची आवश्यकता का आहे यावर आपले विचार मांडताना आपणाला आंतरिक शांतता हवी असेल तर प्रत्येक नागरिकाला या शिक्षणाची गरज भासते. शिक्षणाद्वारे 'बळी तो कान पिळी' ही भावना समाजातून नष्ट होईल. म्हणून हे शिक्षण स्वयंप्रेरित न ठेवता सक्तीचे असावयाला हवे. यातून राष्ट्रीयत्व, शिस्त व एकात्मता टिकवून ठेवता येईल. अंतर्गत व बाह्य आक्रमणे थोपविण्याकरिता याची गरज आहे. संरक्षण-सिद्धता प्रत्येक नागरिकात असणे आवश्यक आहे. म्हणून एन्. सी. सी. ची गरज त्यांनी ठामपणे सांगितली.

४ एप्रिल १९४९ ला 'चाइल्ड मॅरेज रिस्ट्रेन्ट अॅक्ट' वर विचार मांडताना पाश्चिमात्यांचे अनुकरण करण्यापेक्षा हिंदुधर्मात मान्यता दिलेले मुलीचे वय चौदा असणे आवश्यक आहे. वैदिक वाङ्मयाचा अभ्यास केल्यास या वयाला पुष्टी मिळते. अमेरिकेसारख्या देशात मुलीचे लहान वयात लग्नानंतर निर्माण होणाऱ्या प्रश्नांचा आपण अभ्यास करायला हवा. एकदा १९४९ साली अन्नधान्य भाव वाढीबाबतच्या विषयावरील चर्चेत भाग घेताना त्यांनी शेतकऱ्यांना शिक्षण देऊन 'अत्याधुनिक पध्दतीने शेती करून अन्नधान्य वाढीला प्रोत्साहित करा'-असे प्रतिपादले. सर्व राज्यांत सध्या कांग्रेस या एकाच पक्षाचे राज्य आहे. समाजवादी कल्पनेशी जर जवळीक करायची असेल तर शेतकऱ्यांना संघटित करणे आवश्यक आहे. पडित जमिनी लागवडीखाली आणून त्यांमधून अतिरिक्त पिके काढावयास हवी. जास्त श्रीमंत व जास्त गरीब हा भेद नष्ट व्हावयाला हवा. पडीत जमिनीचे गरीब शेतकऱ्यांना व्यवस्थित वाटप करून

मगच समाजवादी साम्यवादाचे स्वप्न पाहिलेले बरे.

२५ मार्च १९५२ ला 'Punishment on Tax evadors and Black marketeer Bill' वर चर्चा करताना कर न भरणाऱ्याला व काळाबाजार करणाऱ्याला जबरदस्त शिक्षा कायद्याद्वारे करायला हवी, यातच जर निष्पाप व्यक्तीचा बळी जात असेल तर हे मला मान्य होणार नाही, हे ठामपणे प्रतिपादन करणारे भाऊसाहेबच होते. निष्पाप जिवांवर ही बंधने लादली गेली तर प्रसंग पडल्यास मी त्यांची बाजू घेईन. 'You are penalising honesty by trying to compromise with one whom you are not in a position for various reasons to catch hold of and after catching you are inclined to let him off with a compromise.' प्रामाणिक माणसाला पकडून शिक्षा द्यावयाची व भ्रष्टाचाऱ्यांशी संगनमत करायचे, भ्रष्टाचाऱ्याला पकडल्यानंतर त्यांच्यांशी संगनमत करून नंतर सोडून दिले जात असेल तर त्या कायद्याला अर्थ राहाणार नाही. करबुडव्यांना शिक्षा झालीच पाहिजे; त्यामध्ये तडजोड नको–असे म्हणणारे भाऊसाहेब जेव्हा ३० एप्रिल १९५१ साली 'विश्वभारती विद्यापीठा'चे बील पारित झाले त्या बिलासंबंधी बोलताना रवींद्रनाथ टागोरांच्या स्मृती जर आपणाला जागृत ठेवावयाच्या असतील तर त्यांना अभिप्रेत असणारा 'मानवी मनाचा' अभ्यास करणारा अभ्यासक्रम या विद्यापीठात हवा. पाश्चिमात्य व पौर्वात्य विद्यापीठांचे अंधानुकरण नको. यात जगातील तरुण वर्ग स्वखुषीने शिकायला आला पाहिजे व हे विद्यापीठ प्राध्यापकांचे व विद्यार्थ्यांचे नंदनवन (Paradise) व्हावयाला हवे. ही संस्था मुक्त शिक्षणाकरिता, सांस्कृतिक शिक्षणाकरिता प्रसिद्धी पावेल असा अभ्यासक्रम निर्माण करायला पाहिजे. यातून पास होणाऱ्यांनी नोकरी देणाऱ्या केंद्रामधे गर्दी करायला नको. नोकरी शोधणाऱ्यांच्या लोकसंख्येस या विद्यापीठाने मदत करू नये. श्री. रवींद्रनाथ टागोरांच्या व्यक्तिमत्वाला शोभेल असे भव्य वास्तू उभे करायला हवे असे स्पष्टपणे त्यांनी प्रतिपादन केले. त्यांच्याच शब्दात - 'The original idea of the mind be nurtured and where the various aspects of truth will be studied and discussed, where the cultures of not only the east and the west but of all the nations of the world be brought together,where the synthesis of welfare and human philosophy would be evolved, should be kept separate. I feel that the way in which this bill has been framed leaves very little scope for it.' इतक्या स्पष्ट विचारांचे भाऊसाहेब म्हणजे या विदर्भालाच नव्हे तर भारतालाही भूषणावह ठरेल असे व्यक्तिमत्व. त्यांच्या विचारांची ओळख करवून घेणे ही काळाची गरज आहे. इंग्रजी भाषेवरील प्रभुत्वाचा फायदा

घेत भविष्यातील वैयक्तिक 'प्रगती'च्या स्वार्थापोटी वाहून न जाणारा हा महामानव, स्वत: कृतिशील राहून दुसऱ्याकरिता शिक्षण व सामाजिक संस्था स्थापण्याचा संकल्प करणारे हे व्यक्तिमत्त्व म्हणजेच कृतिशील समाजक्रान्तिकाऱ्यांचे भव्य स्वरूप होय.

भाऊसाहेबांची लोकविद्यापीठाची संकल्पना ही आजही अमर्त्य स्वरूपाची वाटते. कृषिविद्यापीठ संदर्भात त्यांचे नाव 'कृषकांचा कैवारी-' म्हणून झाले असले तरी सर्वसामान्य जनतेकरिता आयुष्य-शिक्षणाच्या नवीन ज्ञानाची दालने त्यांच्या घरापर्यंत पोहोचविण्याचे कार्य करणाऱ्या शिक्षण संस्था विद्यापीठीय स्तरावर असणे त्यांना आवश्यक वाटले. १९५० साली याच लोकविद्यापीठने 'सामान्य ज्ञान' विषयात सर्व महाविद्यालयांतील विद्यार्थ्यांकरिता सामान्य परीक्षा घेतलेली होती. सुप्रसिद्ध संस्कृत साहित्यिक डॉ. जी. टी. देशपांडे हे या विद्यापीठाचे रजिस्ट्रार होते. मी सर्वप्रथम आल्याबद्दल मला डॉ. मुल्कराज आनंद यांच्या हस्ते पहिले बक्षीस प्रदान करण्यात आले. तेव्हा असे वाटत होते, पुढचे शिक्षण याच लोकविद्यापीठात आपण घ्यावे व आयुष्यभर शिकत राहावे. आजचे नाशिक येथे स्थापण्यात आलेले 'मुक्त विद्यापीठ' म्हणजे तरी हीच कल्पना होय. डॉ. पंजाबराव देशमुखांनी १९५० साली तत्कालीन प्रथम राष्ट्रपती डॉ. राजेंद्रप्रसादांना बोलावून त्यांच्या हस्ते हिचीच मुहूर्तमेढ केलेली होती. या विद्यापीठात 'जगता जगता शिका' व 'कमवा आणि शिका' हेच धोरण असल्यामुळे समाजबांधिलकी करिता अशा संस्थांची गरज त्यांना वाटली. भाऊसाहेबांचे हे एकविसाव्या शतकातील स्वप्न होते.



**संदर्भ ग्रंथ :**

(१) Selected Speeches of Dr. P. S. Deshmukh, Ed.- Londhe, Gole, Kale, Chore

(२) The Farmer's Co-op. Bank of India -why?

(३) जीवन योगी (खंड १०) - ले. सुदाम सावरकर

(४) The origin and Development of Religion in Vedic Literature - By Dr. P. S. Deshmukh

# जनसंस्कृती आणि डॉ. भाऊसाहेब

नीळकंठ गोपाळ मेंढे

म. जोतिराव फुले, लोकहितवादी, न्या. रानडे व आगरकर आदिंनी महाराष्ट्रात जे समाजसुधारणेचे युग सुरू केले, त्या युगाची पताका समर्थपणे पेलून फडकवीत ठेवण्याचे महान् कार्य कर्मवीर डॉ. भाऊसाहेब पंजाबराव देशमुखांनी केले.

पांडित्य आणि विद्वत्ता जनकारणी लागल्याशिवाय त्या मौलिक गुणांची किंमत होत नसते. समाजक्रांती आणि राज्यक्रांती यांतला भेद स्पष्ट करताना प्रा. भाऊ फालेराव म्हणतात, – ''लोकमान्य टिळक होणं सोपं आहे; आगरकर होणं मात्र सोपं नाही. विष्णुशास्त्री होणं कठीण नाही; पण जोतिबा होणं अति कठीण आहे.'' कारण राज्यक्रांती, सैन्यशक्ती व कावेबाज चातुर्य यांमुळे करणे सोपे आहे, त्यात परक्यांशी लढावे लागते; पण समाजक्रांतिकारकाला स्वकीयांशीच लढावे लागते. कुठलाही समाज स्थितिप्रिय असून तो बौद्धिकतेपेक्षा परंपरा जोपासत असतो. त्यांच्या रुढीप्रिय मेंदूवरील अंधःकाराचे किटण खरडून काढताना आपलेच हृदय खरडून निघते – रक्तबंबाळ होते.

१९२० साली आपल्या मुलाच्या शिक्षणासाठी आपल्या पोटाची शिदोरी गहाण ठेवायची असामान्य हिंमत शामरावबापूंनी दाखविली व २१ ऑगस्ट १९२० साली डॉ. पंजाबराव इंग्लंडला गेले. तेथे अेडिनबर्ग विश्वविद्यालयात त्यांनी पौर्वात्य भाषा व तत्त्वज्ञान या विषयाचा अभ्यास केला. ''वैदिक वाङ्मयात धर्माचा उद्गम, विकास व त्याचा पारस्परिक संबंध'' या त्यांच्या डॉक्टरेटच्या विषयाचे मार्गदर्शक, 'वैदिक मायथॉलॉजी' नामक ग्रंथ लिहिणारे प्रा. मॅगडॉनल हे होते. प्रबंधाचा विषय अत्यंत जटिल आणि व्यापक. अशा या विषयात ऑक्स्फर्ड विद्यापीठाने डॉक्टरेटची डी. फिल्. ही पदवी त्यांना बहाल केली त्यांच्या वयाच्या केवळ सत्ताविसाव्या वर्षी!

भाऊंचा हा प्रबंध पुढे जून १९३३ मध्ये ऑक्स्फर्ड युनिव्हर्सिटी प्रेसने मुद्रित स्वरूपात प्रसिद्ध केला. धार्मिक युगापूर्वी पृथ्वीवर आधी मांत्रिक (जादुई) युग सुरू

होते, या पाश्चात्य विचारातील फोलपणा भाऊसाहेबांनी ऋग्वेदाचा आधार घेऊन सिद्ध केला आहे. सुबोध, रसाळ व प्रवाही अशा इंग्रजी भाषेत सप्रमाण केलेले हे विवेचन एका नव्या दृष्टिकोनातून ऋग्वेदाची गौरवध्वजा फडकविणारे आहे.

भाऊंची बॅरिस्टरीची शेवटची परीक्षा प्रबंध लेखनाचे काम चालू असतानाच झाली. आणि त्यातही ते उत्कृष्टपणे सफल झाले. २५ जाने. १९२१ ला लंडनच्या 'लिंकन इन' मध्ये हा पदवीदान समारंभ साजरा झाला. त्यावेळी पंतप्रधान लॉर्ड ऑस्क्वीथ हे या समारंभाला मुद्दाम उपस्थित होते.

डॉ. पंजाबराव देशमुखांच्या सुधारणावादी मनाने मिश्रविवाह करण्याचा निर्णय घेतला. कु. विमलाबाईंच्या मैत्रीण कु. कृष्णाबाई बोरकर यांचे मनोनीत पती श्रीमंत गुलाबराव यांनी हा विवाह घडवून आणण्यास हातभार लावला. डॉ. पंजाबराव मराठा तर विमलाबाई सुवर्णकार – अशा या विवाहाला समाजातून विरोध होणार हे निश्चितच होते. कु. विमलाबाईंचे वडील हे पुण्याजवळील तळेगाव-दाभाडे या गावचे सधन शेतकरी होते, पण अलिकडे ते मुंबईलाच मुक्कामाला असायचे. ते सुधारणावादी होते व मुंबईला १८६७ सालापासून सुरू असलेल्या 'प्रार्थना समाजाचे' कार्यवाह होते. जातीयतेची प्रतिगामी बंधने त्यांना मुळीच मान्य नव्हती. पण १९२७ साली हा विवाह म्हणजे एक मोठा सामाजिक स्फोट ठरणार होता.

डॉ. पंजाबरावांनी आपल्या वडिलांचे मत विवाहासाठी कसेबसे तयार केले तरी आईच्या जुनाट विचारांची धार त्यांना कमी करता आली नाही. पण एकदा निर्धाराने टाकलेले पाऊल भाऊसाहेबांनी मातृविरोधाच्या कारणासाठी देखील मागे घेतले नाही. जातिप्रधान सरंजामशाही समाजव्यवस्थेतील 'देशमुखी प्रतिष्ठे'ला मूठमाती देण्याचे हे पराक्रमी कार्य होते! मिश्र विवाहाने नाराज झालेल्या आपल्या आईला ते त्यांच्या वडिलांच्या श्राद्धदिनी सुद्धा संतुष्ट करू शकले नाही. मरणोत्तर विधींवर त्यांचा विश्वास नव्हता. तरीपण आईच्या आग्रहाखातर ते श्राद्धासाठी आले. परंतु पारंपरिकतेला फाटा देऊन जातबांधवांच्या पंगती न उठवता त्यांनी पितर म्हणून अस्पृश्यांना निमंत्रित केले व त्यांनाच मिष्टान्न भोजन दिले. जननिष्ठेची कावड आपल्या खांद्यावर घेतलेल्या या महामानवाने उथळ जननिंदा व पारंपरिक जनमत यांचा आपल्या तत्त्वनिष्ठेसमोर कधीच विचार केला नाही.

अमरावती डिस्ट्रिक्ट कौन्सिलचे अध्यक्ष असताना, आपल्या काही मित्रांच्या सहकार्याने ते आपली सर्व शक्ती पणाला लावून 'अस्पृश्यतेचे उच्चाटन' करण्याच्या कामाला लागले होते. अस्पृश्यांच्या वापरासाठी त्यांनी अनेक विहिरी खुल्या केल्या, एवढेच नव्हे तर पुष्कळशा नवीन विहिरी खणून दिल्या.

याच संदर्भात 'श्रद्धानंद छात्रालय' हा एक अभूतपूर्व प्रयोग होता. त्याकाळी

प्रत्येक जातिविशिष्टांची आपापली छात्रालये होती. अशा स्थितीत मुळात जातिव्यवस्थेला मूठमाती देण्याचे धाडसी पाऊल म्हणजे अमरावती येथील 'श्रद्धानंद छात्रालय'. मांग-महार, माळी-मराठा, मुसलमान अशा सर्वच जातिधर्मांतील विद्यार्थ्यांना एकत्र आणून जातिविषमतेची धार बोथट करण्याचा तो प्रयत्न होता. याच धर्तीवर नागपूरला 'श्रद्धानंद अनाथालय' - सुद्धा स्थापन करण्यात आले.

अमरावतीला नवरात्रात अंबादेवी व एकवीरा देवीच्या दर्शनासाठी प्रचंड गर्दी व्हायची. पण अस्पृश्य भक्तांना मात्र तेथे प्रवेश नव्हता. हा अन्याय दूर करण्यासाठी डॉ. पंजाबरावांनी गावोगाव प्रचारसभा घेऊन जनजागृतीचा गदारोळ उठवून दिला, आणि अस्पृश्यांच्या मंदिर प्रवेशासाठीच सत्याग्रह करून दाखविला. त्यानंतर मंदिर प्रवेशाच्या अशा सत्याग्रहांची एक लाटच महाराष्ट्रात सुरू झाली. त्यानंतरचे भाऊंचे पुढचे पाऊल म्हणजे, 'सफल सहभोजन' - हे होते. श्रद्धानंद छात्रालयात हा प्रयोग यापूर्वीच सुरू झाला होता. त्यामुळे विषमतावादी बुवाबाज आणि अप्रामाणिक देशभक्तांनी जनतेचा बुद्धिभेद करण्याची ही संधी घालविली नाही. ''देवळे बाटविणारे नि जातीपाती मोडणारे हे डॉ. पंजाबराव देशमुख भ्रष्टाचार-प्रवर्तक व धर्मबुडवे आहेत.''- अशी कोल्हेकुई वृत्तपत्रांतून व व्यासपीठांवरून जोरजोराने होऊ लागली. भाऊसाहेबांच्या नातेवाईकांतही त्यावेळी मोठा असंतोष निर्माण झाला. त्यांच्या माता-पित्यांकडून त्यांचेवर दबाव आणण्याचे प्रयत्न झाले. पण भाऊसाहेब कर्तृत्वाला कधी हटले नाहीत आणि तत्त्वनिष्ठेपासून कुठे ढळले नाहीत.

१९२६-२७ साली मोर्शी (जि. अमरावती) येथे हिंदु महासभेचे अधिवेशन, देशभक्त लाला लजपतराय यांच्या अध्यक्षतेखाली भरणार होते. या अधिवेशनाचे स्वागताध्यक्ष हिंदु महासभेचे श्रीमान दादासाहेब खापर्डे हे भूषविणार होते. वरूड, बेनोडा, शेंदुर्जनाघाट व मोर्शी या भागातील लोक म. जोतिराव फुल्यांच्या सत्यशोधक विचाराने झपाटलेले होते. नानासाहेब अमृतकरांच्या ब्राह्मणेतरी भावनेचा अग्निरस तेथे सदाच वाहात असायचा. त्यामुळे नानासाहेब व त्यांचे सहकारी या अधिवेशनाकडे ढुंकूनही पाहाणार नव्हते. त्यावेळी डॉ. पंजाबरावांना इंग्लंडहून परत येऊन २-३ वर्षे झाली असावी. तेथील समतेचे विचार त्यांच्या डोक्यात घोळत होतेच. तेव्हा, आपण या हिंदु महासभेच्या अधिवेशनावर बहिष्कार घालण्यापेक्षा ते अधिवेशनच आपण काबीज का करू नये ? आपणही हिंदू आहोत या नात्याने तो आपला हक्कच आहे - असे त्यांना वाटले. पण भाऊसाहेबांचा हा धाडसी विचार काहींना पटला नाही, तर काहींना तो अव्यवहार्य वाटला. त्यावेळी त्या अधिवेशनास गेलेल्या तरुण मंडळीत डॉ. चौबळ, बॅ. बागवे, बॅ. तिडके, श्री. दादासाहेब वाटाणे, श्री. वामनराव घोरपडे इ. लोक होते पण हे सर्व मित्र व खुद्द भाऊसाहेबदेखील ब्राह्मणेतरी चळवळीचे

रीतसर सभासद नव्हते.

पण, हिंदुमहासभेच्या मंडपात सरळ प्रतिनिधीचे तिकीट खरेदी करून जाऊ इच्छिणाऱ्यांना महासभेच्या चालकाकडून एकदम प्रवेशबंदी करण्यात आली. त्यामुळे सबंध मोर्शीत खळबळ माजली. त्यामुळे अधिवेशनाला हजर राहिलेच पाहिजे, अशी उचल सर्वांच्या मनाने घेतली.

लाला लजपतराय हे आर्यसमाजी असल्यामुळे इरसाल चातुर्वर्णी सनातनीपणा त्यांच्यात नव्हता. तेव्हा भाऊसाहेब आपल्या चारपाच जणांच्या शिष्टमंडळासह त्यांना भेटले व त्यांनी सर्व हिंदूंना त्या अधिवेशनास प्रवेश देण्याचा आदेश परिषदेच्या चालकांना दिला.

... आणि डॉ. देशमुखांच्या प्रेरणेवरून चातुर्वर्ण्य, जातिभेद व अस्पृश्यता याचा निषेध करणारा ठराव, श्री. वा. न. घोरपडे - माजी संपा. राष्ट्रदूत - यांनी भाऊसाहेबांच्या वतीने मांडला. हिंदुमहासभेच्या तत्कालीन पुढाऱ्यांना मुळीच मान्य होण्यासारखा नसतानाही, तो ठराव प्रचंड बहुमताने पास झाला. असा चमत्कार व धाडस समाजहिताची जागृत जाण असणारा जनसंस्कृतीचा पोशिंदाच करू शकतो.

त्यावेळी ब्राह्मणेतर चळवळीची प्रचंड लाट उसळली होती. पण तो भावनेचा केवळ लोंढा होता. कारण ब्राह्मणेतर पुढाऱ्यांना स्वतःच्या स्वार्थापलिकडे बहुजन समाजाचे कोणतेच हित साधता आले नाही. म्हणून भाऊसाहेबांना त्या चळवळीत कधीच रस वाटला नाही. त्यांनी आपला स्वतंत्र 'शेतकरी पक्ष' स्थापन केला आणि या पक्षाचा खेडोपाडी प्रचार करण्यासाठी 'महाराष्ट्र केसरी' हे साप्ताहिक सुरू केले.

१९३० च्या कायदेमंडळाच्या निवडणुकीत भाऊसाहेब हे शेतकरी पक्षाच्या वतीने नागपूर कायदे कौन्सिलात निवडून आले. त्यावेळी भारतातील सर्व मंत्र्यांत ते वयाने लहान असले तरी कर्तृत्वाने महान् होते. पुढील आव्हानाची जाणीवपूर्वक नोंद घेऊन आणि संपूर्ण बौद्धिक चातुर्य पणाला लावून त्यांनी 'कर्ज लवाद बील' पास करून घेतले.

हजारो वर्षे सेठ-सावकारांच्या पाशात अडकलेल्या गरीब शेतकऱ्यांना, या कायद्यामुळे मुक्ती मिळाली. त्यातून शेतकऱ्यांची नव्वद टक्क्याहून अधिक शेती सेठ-सावकारांच्या घशातून वाचली. शेतकऱ्यांसाठी सहानुभूतीचे झुकते माप ठेवण्यात आले. शक्य तेवढे कर्ज आधीच घटविण्यात आले. सोयीस्कर असे बिनव्याजी हप्ते देण्यात आले. शेकडा ४६ टक्के सूट हा सर्वसाधारण नियम होता. त्याचा लाभ देशपांडे-ब्राह्मण, माहेश्वरी-मारवाडी यांनाही मिळाला. 'शेतीचा नम्र उपासक' - ही एकच 'जात' तेथे होती.

भाऊ भालेरावांनी सांगितलेल्या एका हकीकतीनुसार, ''खामगावच्या त्या

गृहस्थाजवळची १०० एकर जमीन ३०० रु. साठी मारवाड्याच्या घशात गेली होती. त्या ३०० रु. चे ३००० रु. कसे झाले देवच जाणे! परंतु भाऊसाहेबांनी मध्यप्रदेश असेंब्लीत केलेल्या कायद्यामुळे, त्या गृहस्थाने कर्जाची शेवटची किस्त १९५० साली भरली आणि तो त्या मारवाड्याच्या पंज्यातून सुटला. असे अनेक तरले असतील.''

पण कायदेमंडळातील भाऊसाहेबांचे वाढते यश लक्षात येताच, भाऊसाहेबांना बहुमताच्या जोरावर कायदेमंडळातून हुसकावून लावण्याचे प्रयत्न ब्राह्मणेतर पक्षाने आरंभिले होते. त्या संदर्भात ब्राह्मणेतर पक्षाच्या ध्येयधोरणांवर सही करण्यापेक्षा त्यांनी आपल्या मंत्रीपदाचा राजीनामा दिला पण ते तत्त्वापासून ढळले नाहीत.

शिक्षण हे जीवनाचे जीवन आहे. पण त्याकाळी शिक्षण क्षेत्रात व शासकीय नोकऱ्यांत सुद्धा बहुजनांतील विद्यार्थ्यांना अतिशय कमी वाव होता. एखाद्या शहरी वकील-डॉक्टराच्या मुलाची व खेड्यात काम करणाऱ्या विद्यार्थ्यांची अभ्यासातील प्रगती समान असणे शक्य नाही. अशावेळी गुणवत्तेच्या आधारे किती ग्रामीण विद्यार्थ्यांना महाविद्यालयात प्रवेश मिळणार होता ? गुणांवर आधारलेल्या सवलती सुद्धा या ग्रामीण विद्यार्थ्यांना मिळणार नव्हत्या. परिणामी त्यांना भविष्यात नोकरी देखील मिळणे अशक्यच. यासाठी भाऊसाहेबांनी पावले उचलली. ज्ञान-विज्ञान महाविद्यालयांतून ग्रामीण बहुजन समाजाच्या विद्यार्थ्यांना केवळ गुणवत्तेच्या आधारे न घेता; त्यांचेसाठी विवक्षित प्रमाणात जागा राखून ठेवल्या पाहिजेत, म्हणून त्यांनी फर्मान काढले. शाळा-कॉलेजला जोडून असलेल्या वसतिगृहात परगावच्या व विशेषत: खेड्यातील विद्यार्थ्यांना प्रामुख्याने प्रवेश व सवलती देण्याचे धोरण त्यांनी शिक्षण खात्यात प्रचलित केले. त्यामुळे अनेक विद्यार्थी नागपूरच्या सायन्स कॉलेजमध्ये जाऊ शकले.

मुलांना शहरात शिकवितो म्हटले, तर शेतकऱ्यांना महिन्याकाठी २५-३० रु. भुर्दंड सोसावा लागत होता; नाही तर मुलांना शिक्षणाविना घरी बसावे लागत असे. हा विचार भाऊसाहेबांनी सरकारला पटवून दिला. आणि समाजवादी दृष्टीतून भाऊसाहेबांनी 'शेतकऱ्यांची सवलत' म्हणून खेडूत विद्यार्थ्यांना काही प्रमाणात फी माफी दिली व हायस्कूल-कॉलेजसाठीही हा नियम लागू केला. तसेच शिक्षण विभाग सुधारण्यासाठी इतरही अनेक योजना आखल्या.

'हिंदु देवस्थान संपत्ती बिल' आणून, त्यातून देवस्थानची व्यवस्था सरकारने नीट चालवून, उर्वरित संपत्तीचा उपयोग सामान्य जनतेच्या शैक्षणिक कार्यासाठी करून घ्यावा आणि त्यातून हे पटवून द्यावे की मंदिरे ही उत्तम संस्कारकेंद्रे बनू शकतात- असा त्यांचा आग्रह होता.

म. गांधींच्या खुनानंतर ब्राह्मण जातीतील लोकांना नोकरीत घेऊ नये असे सरकारी गुप्त आदेश असतानाही डॉ. पंजाबरावांनी डॉ. ग. त्र्यं. देशपांडे व डॉ. श्री. भा. वर्णेकर

यांच्या नियुक्तीप्रकरणी गुणवत्तेलाच स्थान दिले, जातीवादाला नाही!

१९३१-३२ मध्ये डॉ. पंजाबराव देशमुखांनी 'शिवाजी शिक्षण संस्थे'ची स्थापना व नोंदणी केली. या संस्थेच्या उन्नती-विकासासाठी त्यांनी अनेक धनिकांकडून, संस्थानिकांकडून निधी गोळा केला; प्रसंगी आपला बंगलाही संस्थेसाठी गहाण ठेवला. पण त्यागाची व निष्ठेची ही परंपरा पुढे जरी टिकली नाही, तरी आज हा वटवृक्ष २६२ शाळा कॉलेजेसच्या रूपाने विदर्भात विस्तारित झालेला दिसून येतो. "डॉ. पंजाबराव देशमुख यांनी अनेक वर्षे बहुजन समाजाच्या उन्नतीसाठी जे चिंतन केले व अनेक हालअपेष्टा सहन करून, गंगेच्या उगमाप्रमाणे अनेक लहान लहान गवती चापांच्या झोपड्यांतून शिक्षणाच्या कामाला सुरुवात केली व कठीण परिस्थितीशी झगडून मानवतेच्या विशाल दृष्टिकोनातून जे आज विराट रूप शिवाजी शिक्षण संस्थेच्या रूपाने धारण केले, ते कुणालाही नजरेआड करता येणार नाही" असे सार्थ उद्‌गार राष्ट्रसंत तुकडोजी महाराज यांनी काढले आहेत.

श्री. भाऊसाहेबांच्या शैक्षणिक कार्याचा हा वारसा जोतिराव फुले यांच्या परंपरेतील आहे. पश्चिम महाराष्ट्रात कर्मवीर भाऊराव पाटील यांनी जसे कार्य केले, त्या तोडीचे कार्य श्री. भाऊसाहेबांनी विदर्भात केले. बहुजन समाजाला शिक्षणाभिमुख करून राष्ट्रकार्याच्या उभारणीत बिनीचे सैनिक बनविण्याचे कार्य भाऊसाहेबांनी केले.

अमरावतीला 'विदर्भ विद्यापीठ' व्हावे ही डॉ. पंजाबरावांची इच्छा होती. त्यासाठी त्यांनी तत्कालीन राष्ट्रपती डॉ. राधाकृष्णन यांचेकडे प्रयत्न चालविले होते, परंतु त्योवळी त्यांस यश आले नाही.

भाऊसाहेबांच्या प्रेमासाठी जिवाचेही मोल देऊ पाहाणाऱ्या व्यक्तींसंबंधीचा एक प्रसंग सांगताना प्रा. मधुकर केचे लिहितात, 'आकोटची शाळा शिवाजी संस्थेच्या ताब्यात आली, आणि त्या अमक्यानेच कारवाई केल्यामुळे आपल्या हातून शाळा निसटली, म्हणून एक गृहस्थ तावातावाने तेथल्या भेंडे गुरुजींच्या अंगावर धावून आले. त्याच्या भाराने छाती चेपून त्या शिक्षकाचा श्वास कोंडला आणि तरीही, त्या क्षणीही तो आनंदी दिसत होता. मी त्याबद्दल विचारले तेव्हा, उत्तर मिळाले, "भाऊसाहेबांसाठी याहूनही जास्त त्रास सोसण्याचे भाग्य मला देवाने द्यावे!" जनमानसात व कार्यकर्त्यांत असा खोलवर ठसा भाऊसाहेबांचा होता.

भाऊसाहेब हे सुरुवातीपासूनच सामर्थ्याचे उपासक होते. समाजात व्यायाम, खेळ-क्रिडा व सैनिकी शिक्षण यावर ते भर देत. त्यातून त्यांनी १९३७ साली 'भारत सेवक दला'ची स्थापना केली. 'भारत सेवक दल' हे केवळ शारीरिक शिक्षण घेणारे मंडळ न राहाता, ते कार्यकर्त्यांची खाण ठरावी; राष्ट्रीय वृत्तीचे तरुण त्यातून तयार व्हावे ही त्यांची इच्छा होती. त्यासाठी शिक्षणपद्धतीत योग्य ते बदलही करण्यात आले. या

दलाचा महिला विभाग सौ. विमलाबाईंच्या नेतृत्वाखाली स्वतंत्रपणे काम करीत होता. १९३९-४० मध्ये भारत सेवक दलाने भरविलेल्या उल्लेखनीय शिबिराचा वृत्तांत ऐकून म. गांधी म्हणाले, "डॉ. पंजाबराव यह बडा अच्छा कार्य कर रहे हैं। विभिन्न जातियों के अधिकारी देखकर मुझे बडी खुशी हुवी।" आचार्य कृपलानी व आचार्य धर्माधिकारी यांनीही या दलाच्या कार्याबद्दल समाधान व्यक्त केले. पं. जवाहरलाल नेहरूंच्या सदिच्छेप्रमाणे हे दल काँग्रेसच्या विधायक कार्यास सहयोग द्यायला नेहमीच तत्पर असे. राष्ट्रीय चळवळीचे हे एक केंद्रच बनले होते.

५ नोव्हें. १९३९ मध्ये 'मराठा लीग' ने नासिक येथे भव्य 'मराठा कॉन्फरन्स' आयोजित केली. या 'मराठा लीग'ची स्थापना कोल्हापूरचे राजे छत्रपती राजाराम महाराज यांनी केली होती. आंग्लशाहीला खूष करणे व त्यांची साम्राज्यशाही वाढविण्यासाठी मराठ्यांची सैन्यभरती करणे, हा गुप्त सूर त्यामागे होता. या कॉन्फरन्सचे अध्यक्षपद भाऊसाहेब देखमुख यांचेकडे सोपविण्यात आले होते. पण ते पद त्यांनी नाकारले. आपल्या प्रत्युत्तरात भाऊसाहेबांनी म्हटले होते- "अध्यक्ष म्हणून मी बोलू लागलो, तर ते आपणांस खपायचे नाही; आणि कोणाला खूष करण्यासाठी स्वतःचे विचार वाकवायला मी तयार नाही. तेव्हा नकार हेच योग्य."

पण त्याचवेळी आयोजित केलेल्या सहकारी विमा कंपनीच्या कामाकरिता त्यांना नाशिकला जावे लागले. त्याची चाहूल लोकांना लागताच त्यांना स्टेजवर नेण्यात आले. तेव्हा देशभक्तीने ओतप्रोत व ओजस्वी अशा भाषणात ते म्हणाले होते - "आज युद्धाला पाठबळ मागणाऱ्या इंग्रजांनी यापूर्वी अत्याचार करताना तुम्हाला कधी तरी काही विचारलं होतं का? कवडीची तरी किंमत तुम्हाला दिली होती का? तरी आज त्यांना पाठिंबा देणारा ठराव घेण्यासाठी तुम्ही परिषद भरवावी! आपल्या तलवारी नि भाले आज नुसत्या शोभेच्या वस्तू झालेल्या आहेत... तुम्ही एकच ठराव घेतला पाहिजे की, या युद्धाशी आमच्या समाजाचा काडीमात्र संबंध नाही!... आपला इतिहास आठवून कालोचित कृती करण्यासाठी आम्ही आत्ताच सज्ज झालो पाहिजे. या अफाट मराठा समाजातून लाख-दोन लाख तरी लोक स्वातंत्र्याच्या लढ्यासाठी पुढे आले पाहिजेत. त्यातले निम्मे गारद झाले तरी त्यात खंत मानण्याचे कारण नाही. यावेळी देशासाठी बंड पुकारणे, हेच जातिवंत मराठ्यांचं खरं कर्तव्य ठरतं. म. गांधी थोर पुरुष आहेत. पं. नेहरू हे भारताचे लाल आहेत. पण यांपैकी असा एखादा जरी मराठा आईबापाच्या पोटी जन्माला आला असता तर आज हिंदुस्थान केव्हाच स्वतंत्र झाला असता!" आणि या उत्स्फूर्त व मराठ्यांना अंतर्मुख करणाऱ्या भाषणाने त्या मराठा कॉन्फरन्सला 'आमचा या साम्राज्यवाद्यांच्या युद्धाशी मुळीच संबंध नाही' असा ठराव घ्यावयास भाग पाडले.

१९४६ साली भारताची भावी राज्यघटना तयार करण्यासाठी जी समिती तयार करण्यात आली त्यात डॉ. बाबासाहेब आंबेडकर, डॉ. राजेंद्रप्रसाद, पंडित जवाहरलाल नेहरू, डॉ. पंजाबराव देशमुख, प्रो. रंगा इ. विद्वान सभासद होते. त्यात जातिवाचक उल्लेख सरकारी कागदपत्रातून काढून टाकण्यासंबंधीचे विधेयक, शेतकऱ्यांच्या हितसंबंधाचा विचार, विकास योजनेकरिता परदेशी कर्ज, संपत्ती करावरील विधेयक, राष्ट्रीय सैनिक दलासंबंधीचे विधेयक, बालविवाह प्रतिबंधक कायद्यात दुरुस्ती सुचविणारे विधेयक इ. संदर्भात अत्यंत मूलभूत दुरुस्त्या त्यांनी सुचविल्या. त्याचबरोबर राज्यघटनेवरील समारोपीय भाषणात, 'घटनेत राहिलेल्या काही जबरदस्त उणिवांमुळे त्या घटनेत परिस्थितीनुसार व आवश्यकतेनुसार नेहमी दुरुस्त्या जोडाव्या लागतील' – असे भाकितही त्यांनी केले.

पं. नेहरू प्रथमत: जेव्हा अमेरिकेत गेले तेव्हा इकडे घटना समितीच्या बैठकी सुरू होत्या. अमेरिकेत पंडित नेहरूंना पत्रकारांनी विचारले, ''तुमच्या मनात सध्या काय सुरु आहे?...'' नेहरू म्हणाले, ''भारतात गेल्यावर घटना समितीच्या बैठकीत डॉ. पंजाबराव आणि ह. वि. कामत मला कोणते आडवे प्रश्न विचारतील, याचा मी सध्या विचार करीत आहे.''

१९४२ च्या सुमारास भाऊसाहेब देवास संस्थानला गेले. देवासच्या मंत्रिमंडळात कसलेही खाते न स्वीकारता, आपल्या अनभुवसिद्ध कारभार-कौशल्याने मूलभूत सुधारणा घडवून आणण्याचे काम त्यांना करावयाचे होते. दुष्काळात त्यांनी शेतकऱ्यांना करात २५' प्रतिशत सूट दिली. या बाबीला इतरांचा विरोध असतानाही ती खासे साहेबांनी मान्य केली, असे त्यांचे डॉ. देशमुखांवर प्रेम. देवास दरबारात असताना, त्यांच्या कचेरीतील कारकून सांगतात की, एक महिना पुरेल इतके काम ते ६-७ दिवसांत उरकून टाकीत.

दिल्लीत लाल किल्ल्यावर आझाद हिंद सेनेविरुद्ध खटला सुरू असताना, त्या सेनेला कायद्याचे संरक्षण देण्यासाठी, भाऊसाहेबांनी देवास येथील मंत्रिपदाचा त्याग करून बॅरिस्टरीचा झगा पुन्हा अंगावर चढविला.'' आणि तीन महिने चाललेल्या या खटल्यातील सर्व आरोपी शेवटी दोषमुक्त झाले.

१९५१-५२ च्या निवडणुकीत निवडून आल्यावर मंत्रिपदाच्या चढाओढीसाठी तेथे न रेंगाळता ते आपल्या शिवाजी शिक्षण संस्थेची काळजी घेण्यासाठी अमरावतीस निघून आले. पण पं. नेहरूंच्या एका लखोट्याने मात्र त्यांना पुन्हा दिल्लीत बोलावले आणि १२ ऑगस्ट १९५२ ला गोकुळाष्टमीच्या शुभमुहूर्तावर डॉ. पंजाबराव देशमुख स्वतंत्र भारताचे पहिले कृषिमंत्री झाले. अशा रीतीने, 'भारताचा कृषिमंत्री हा कृषिपुत्रच असावा,' ही महात्मा गांधींची अपेक्षा पूर्ण झाली.

डॉ. पंजाबरावांनी बॅरिस्टर म्हणून, लोकनेते म्हणून आणि मध्यप्रदेश कारभाराचे नियंते म्हणून वैभव भोगले, पण मराठा खानदानीचा खोटा डौल आणि अहंकार त्यांच्यात कधीच दिसला नाही. त्यांची आठवण सांगताना द्वा. भ. कर्णिक लिहितात, 'मंत्री म्हणून ते पार्लमेंटात हजरजबाबी उत्तरे देत. आपल्या कामातही वाकबगार म्हणून ते ओळखले जात. पण इतर सभासदांबरोबर वा वार्ताहरांबरोबर मिसळताना त्यांनी कधी आपल्या अधिकाराचा डौल दाखवला नाही.''

कृषीमंत्री म्हणून निवडून आल्यावर तिवसा, मोझरी, नांदगाव येथील ग्रामस्थांनी त्यांचा भव्य सत्कार केला. अमरावतीला येताना आत्ताच्या शिवाजी शारीरिक महाविद्यालयाच्या विस्तीर्ण पटांगणावर, गाडगेबाबा – 'गोपाला ऽ ऽ गोपाला...' ही धुन गात झाडझूड करताना दिसले. भाऊसाहेबांना खूप आनंद झाला. ते पटकन् गाडगेबाबांच्या भेटीस उतरले. त्यांनी परस्परांना स्नेहालिंगन दिल्यावर लोकांनी दोघाही महात्म्यांच्या नावाचा प्रचंड जयघोष केला.

२० डिसें. १९६० ला जेव्हा गाडगेबाबांचे देहावसान झाले, तेव्हा कोणती तरी अद्भुत शक्ती त्यांना अमरावतीस येण्यास सांगत होती. ते जेव्हा २० तारखेला अमरावतीस आले, तेव्हा त्याना कळलं की, गाडगेबाबांचे अवतारकार्य संपले आहे.

दिल्ली येथे भरलेले जागतिक कृषी प्रदर्शन केवळ पंजाबराव देशमुखांच्या परिश्रमामुळे, तसेच वजनामुळे साकार झाले. सर्वाधिक प्रतिष्ठा मिळविणारे हे स्वतंत्र भारतातील पहिले भव्य कृषीप्रदर्शन होते. अमेरिका आणि रशिया या बड्या राष्ट्रांनी त्यात केवळ सहकार्यच केले नाही तर अहमहमिकेने एकमेकांशी स्पर्धाही केली. अमेरिकेचे तत्कालीन अध्यक्ष मा. आयझेनहॉवर हे उद्‌घाटनाला हजर होते. त्यामुळे तेथील उद्‌घाटन सोहळ्याला भव्यतेचे व उत्साहाचे उधाण आले होते. आयझेनहॉवर उद्‌घाटनाला आले म्हणून क्रुश्चेव्हही पुढे व्यक्तिशः प्रदर्शनाला भेट देऊन गेले. डॉ. पंजाबरावांनी या प्रदर्शनाच्या रूपाने कुठल्याही भारतीय नेत्याला साध्य होणार नाही, एवढे मोठे यश संपादन केले.

डॉ. पंजाबरावांचे सामाजिक व शैक्षणिक कार्य मुख्यत्वे विदर्भात झाले आणि त्यांच्या राजकीय जीवनाला उजाळा मिळाला तो पूर्वीच्या मध्यप्रदेशात. पण संयुक्त महाराष्ट्राच्या स्थापनेच्या बाबतीत पंजाबरावांची निष्ठा कधी कमी पडली नाही. त्यावेळी महाराष्ट्रातील पुढाऱ्यांच्या ज्या बैठकी होत त्याला डॉ. पंजाबराव न चुकता हजर राहात व खुल्या दिलाने आपले विचार प्रगट करीत. ''त्यांचे निवासस्थान मात्र विदर्भातील कार्यकर्त्यांप्रमाणेच महाराष्ट्रातील सर्व लोकांसाठीही खुले राहिले. तेथे उपचार नसे, खुलेपणा आणि मनमोकळेपणा असे – विदर्भातील आदरतिथ्याचाही तेथे लोकांना प्रत्यत येत असे.'' असा होता हा जनतेचा नेता! साधासुधा ग्रामसंस्कृतीचा –

जनसंस्कृतीचा प्रतिनिधी नि प्रवक्ता.

समोरचा सामान्य माणूस आपल्याशी बोलू लागला म्हणजे त्याच्यात मानसिक न्यूनता निर्माण होऊ नये, याची ते काळजी घेत आणि मग ते कोणत्याही सामान्य विषयावर दिलखुलास बोलत. एवढं साधंसुधं बोलणाऱ्या माणसाने इंग्लंडमध्ये वेदांवर डी. फिल्. केली आहे, हे सांगूनही खरे वाटत नसे!

त्यांची एक आठवण सांगताना मधुकर केचे लिहितात, 'त्यांना अनेक लोक आपल्या घरी जेवायला बोलावत... तेवढ्यासाठी पोरांची लग्ने, सोयरिकीचे पाव्हणे यांना ते खोळंबून ठेवत. भाऊसाहेब आपल्या घरी दोन घास खाऊन गेले, याची आठवण ते जन्मभर जपतात – आपल्या म्हाताऱ्या आईच्या फोटोसारखी!'

भाऊसाहेब आले म्हणजे, त्यांना भेटणाऱ्यांची फार गर्दी असायची. पण त्यांना न भेटणारे, त्यांच्याशी एक शब्दही न बोलणारे, पण ते मोटारीतून इकडे तिकडे जात असताना जरी दिसले, तरी त्यांचा नुसता चेहरा पाहून आनंदून जाणारे लोक रस्त्याच्या बाजूने रांगा लावीत असत.. "काय करा लागते भौ भेटूनच? अन् त्येईच्याशी बोलाचालाचे आपन थोडेच शिकलो सवरलो आहोत! नुसती नजरेले नजर पडली... अन् डोये भरून पाह्यलं तरी लय झालं..." असं त्या समाधानाचं पोत. दूरस्थ तरी आसक्त आणि निर्मळ!

राष्ट्रसंत वं. तुकडोजी महाराज लिहितात, – 'त्यांच्या वयाचे कितीतरी बॅरिस्टर खाटेवर पडून आपल्या जीवनातील दुःखद प्रसंग सांगताना मी पाहिले आहेत. पण या थोर पुरूषाचे सारेच वेगळे आहे. लकव्यासारख्या बिमारीनं अर्धांग अधू झाले असताना, मी त्यांना नागपुरात भेटायला गेलो, तेव्हा ते स्वतःविषयी काहीच न बोलता म्हणाले,

"महाराज, आपल्या गुरुदेव विद्यामंदिराचा विद्यार्थी मेरीट मध्ये आलेला वाचून मला अत्यंत आनंद झाला."

मी म्हणालो, "भाऊसाहेब, आपली प्रकृती आता कशी आहे?" ते म्हणाले "संतांचे आशीर्वाद आहेत. होईल बरी. मला काळजी नाही. चिंता वाटते ती बहुजन समाजाची, त्यांच्या प्रगतीसाठी निर्माण केलेल्या या संस्थांची."

असे होते डॉ. पंजाबराव देशमुख, आयुष्यभर जनकल्याणासाठी निःस्वार्थपणे झटणारे.. जनसंस्कृतीचे संरक्षण करणारे... त्यांच्या जनकल्याणी स्मृतीला जन्मशताब्दी वर्षानिमित्ते विनम्र श्रद्धांजली.



**संदर्भ ग्रंथ** –

डॉ. पंजाबराव देशमुख : जीवन व कार्य – सुदाम सावरकर इ. (खंड १)

डॉ. पंजाबराव देशमुख विविध दर्शन – ना. पां. नागपुरे इ.

# समकालीन नेतृत्व आणि भाऊसाहेब

प्रा. पुरुषोत्तम नागपुरे

---

## थोर विदर्भपुत्र

विदर्भ ही प्राचीन आर्यांची दक्षिणेकडील पहिली वसाहत. ऋग्वेदातील बऱ्याच ऋचा ज्याचे नावावर येतात तो गृत्समद ऋषी कळम (जि. यवतमाळ) येथे जन्मला आणि मानवजातीच्या कल्याणासाठी अनेक महत्त्वाचे शोध नोंदवून गेला. रुक्मिणी अन् दमयंती या विदर्भकन्यांची नोंद पुराणांनी करून ठेवलेली आहे. परंतु एवढा प्राचीन इतिहास नोंदविणाऱ्या विदर्भात स्मरणात राहावा इतपत थोर पुरुष मध्ययुगात झाल्याचे मात्र दिसून येत नाही. नाही म्हणायला नागार्जुन हा बौद्ध पंडित येथेच झाल्याचा ओझरता उल्लेख बौद्ध वाङ्मयात येतो. परंतु इतिहासकालात मात्र डॉ. पंजाबराव देशमुख हेच एक नाव घेण्यासारखे व्यक्तिमत्व उदयास आलेले दिसून येते. अशा या थोर विदर्भपुत्राच्या समकालीन नेतृत्वाचा विचार करावयाचा झाला तर वैदर्भीय नेत्यांची फारच थोडी नावे डोळ्यासमोर येतात.

## पापळचे दोन कीर्तिदीप

भारत देश स्वातंत्र्याचे लढ्यात गुंतलेला असताना भाऊसाहेबांचा जन्म पापळ या अमरावती जिल्ह्यातील आडवळणाचे गावात झाला. शामराव देशमुखांचे घरी हा कीर्तिदीप उजळला गेला. त्याच काळात पापळच्या देशपांड्यांचेही घरात 'यशवंत खुशाल देशपांडे' नावाच्या थोर संशोधकाचा जन्म झाला होता. एकाच गावात एकाच काळात दोन थोर अभ्यासक-संशोधक जन्माला यावेत हा नियतीचा योगायोगच म्हणावा लागेल. दोघेही संशोधन करून 'डॉ.' ही उपाधी मिरवीत समाजात दिगंतकीर्ती झालेत. एकाच गावाची देशमुख आणि देशपांडे ही वतने चालविण्याचे सोडून या दोघांनीही व्यापक परिक्षेत्रात आपल्या कार्याने नवीन वतनदारी निर्माण केली. डॉ. यशवंत खुशाल देशपांडे यवतमाळ आणि नागपुरातच आपले साहित्य संशोधनाचे

कार्यात खिळून राहिलेत. परंतु भाऊसाहेब मात्र विदर्भाच्या परिक्षेत्राच्या मर्यादा उल्लंघून देशव्यापी कार्यक्षेत्रात चमकून गेले.

### महाराष्ट्राच्या सांस्कृतिक राजधानीत

डॉ. भाऊसाहेबांना तिसरीपर्यंत गावातच शिकता आले. परंतु चवथीसाठी त्यांना नांदगाव खंडेश्वर आणि कारंजा लाड या गावात जावे लागले होते. तेथून ते उच्च शिक्षणासाठी पुण्याच्या सुप्रसिद्ध फर्ग्युसन कॉलेजात गेले. त्यामुळे त्यांचा वैचारिक पिंड पुण्याच्या हवा, पाणी आणि मातीवर पोसला गेला. असा योगायोगानेच त्यांच्या विचारांचा परिपोष महाराष्ट्राच्या सांस्कृतिक राजधानीत झाला.

त्या काळात लोकमान्य टिळकांचे जहाल आंदोलनाचे केंद्र पुणेच होते. त्यामुळे भारतीय राजकारणाचेही जणू तेच केंद्र झालेले होते. टिळकांचा केसरी पाहूनच गव्हर्नर जनरलच्या धोरणाची दिशा ठरत असे. त्यामुळे भाऊसाहेब १९१४ ते २० पर्यंत पुण्यास असताना-भारताच्या राजकीय भवितव्याच्या निर्णयांचे सुकाणू पुण्यात हलत राहाण्याचे काळात-भाऊसाहेबांचे सामाजिक-राजकीय विचारांचा परिपोष पुण्यातच होत होता. टिळकांच्या स्वदेशी चळवळीची पहिली होळी पुण्याचे लकडी पुलाजवळ पेटविली गेली तेव्हा भाऊसाहेब पुण्यासच होते. परक्या देशातील वस्तूंवर बहिष्कार घालण्याचे वारे पुण्यात वाहत होते. 'स्वराज्य हा माझा जन्मसिद्ध अधिकार आहे, आणि तो मी मिळविणारच' ही भारतीय स्वातंत्र्याचे इतिहासाला नवी दिशा देणारी घोषणा पुण्याचे गल्लीगल्लीत दुमदुमत होती त्यावेळी भाऊसाहेब तिथेच होते. त्याच काळात क्रांतिप्रज्ञ जोतिरावांच्या सत्यशोधक चळवळीचा वन्ही पुण्यात पेटलेला होता. समाजसुधारक आगरकरांच्या 'आधी समाज सुधारणा आणि मग राजकीय परिवर्तनाचे लढे-' या आग्रही विचारांची हाळीही आगरकरांनी याच काळात पुण्याच्या पुण्यभूमीत दिलेली होती. कर्वे, सेनापती बापट आणि स्वातंत्र्यवीर सावरकरांच्या विचारांचे दोहन पुण्याच्या गल्ली गल्लीत होत होते, त्या काळात भाऊसाहेबांसारखा संवेदनशील विद्यार्थी पुण्यात शिकत होता. वयाचे ऐन तारुण्याचे काळातील सळसळते रक्त या वातावरणात तापून निघाले नसते तरच नवल. भाऊसाहेबांचे विचारांचा पिंड असा वैचारिक वादळवाऱ्यात सापडला होता. लोकमान्यांचे स्वातंत्र्य संग्रामात उडी घ्यावी की गांजलेल्या पिचलेल्या अज्ञ बहुजनांच्या सेवेचे व्रत घ्यावे ? आगरकर-फुले यांचा मार्ग धरावा की टिळकांच्या स्वातंत्र्याच्या लढ्यात उडी घ्यावी ? कुणाचा पक्ष घ्यावा ? या वैचारिक द्वंद्वात असताना भाऊसाहेबांनी येथेच पक्का निर्णय केलेला दिसतो. त्यांना फुले-आगरकरांच्या विचारांनी प्रभावित केल्यामुळे, आधी समाजसुधारणा आणि नंतरच राजकीय सत्तासंपादन ! हीच त्यांनी मनाशी खूणगाठ बांधलेली दिसते. त्यामुळे भाऊसाहेबांचा पुढील जीवनप्रवाह सांगतो की त्यांनी टिळक आणि गांधी या दोघांच्याही

लढ्यात प्रत्यक्ष भाग घेण्यापासून स्वतःला दूर राखले. शेतकरी–कष्टकऱ्यांचे लढे उभे केले, अज्ञ ग्रामीण जनतेच्या घराघरात ज्ञानाचे दीप उजळले. त्यांनी आंबेडकरांचे अस्पृश्यता निवारणाचे क्रांतिकार्यात सक्रिय सहभाग दिला. त्यासाठी स्वजनांचा रोषही त्यांनी सहन केला. अमरावतीच्या अंबादेवीच्या मंदिरप्रवेशाचे आंबेडकरांचे सत्याग्रहात भाऊसाहेबांचे पुढारीपण ही त्यांचे या विचारांची साक्ष देणारी कार्ये आहेत.

पुढे वर्धेला गांधीजींच्या सेवाग्रामच्या झोपडीतून भारतीय राजकारणाची सूत्रे हलू लागली होती; परंतु अमरावतीपासून जवळ असूनही भाऊसाहेब वर्धेच्या रेल्वे स्टेशनवर कधी उतरलेले दिसत नाहीत. ही त्यांची स्वातंत्र्य चळवळीतील अलिप्तता लक्षणीय आहे!

## युद्धात बेचिराख झालेले पुन्हा उभे राहिले

भाऊसाहेब १९२० मध्ये लंडनला शिक्षणासाठी गेले. यावेळी नुकतेच पहिले जागतिक महायुद्ध संपलेले होते. त्या अभूतपूर्व महायुद्धापूर्वी आणि नंतरही जगभर राज्य करणाऱ्या लहानशा ब्रिटन नावाच्या बेटावर पाय टाकताच महायुद्धाने बेचिराख झालेल्या कारखान्यांच्या इमारती, उद्‌ध्वस्त झालेली शहरे, लाखो हौतात्म्य पत्करलेल्या सैनिकांच्या असहाय विधवा आणि पोरकी मुले भाऊसाहेबांना पाहायला मिळाली होती. त्या भयाण वास्तवाने तिथला नागरिक पार खचून जायला हवा होता. परंतु भाऊसाहेबांना तसे तिथे खचून गेलेल्या मानसिकतेचे शिकार नागरिक दिसले नाहीत, तर त्यांना अत्यंत हिंमतीने आणि दुर्दम्य इच्छाशक्तीने भारावलेले लोक नवा इंग्लंड उभा करण्याची शर्थ करताना दिसले. कठोर परिश्रम आणि राष्ट्रभक्तीने भारावलेले स्त्री–पुरुष रात्रीचा दिवस करून राष्ट्रउभारणी करीत होते. हे राष्ट्रप्रेम आणि त्यासाठी कष्ट करण्याची इंग्लिश लोकांची तयारी पाहून भाऊसाहेब आपल्या मातृभूमीच्या प्रेमाने भारावले गेले नसते तरच नवल. त्या प्रेमामुळेच त्यांना आपल्या देशबांधवांच्या मागासलेपणाची तीव्र जाणीव झाल्याचे, त्यांची त्या काळातील पत्रे सांगतात. आपल्या देशातील लोकांच्या अज्ञानाची त्यांना तीव्रतेने जाणीव झालेली दिसून येते. त्या जाणिवेतूनच त्यांना आपल्या देशवासीयांचे अज्ञान दूर करण्याचे प्रयत्न करण्याची तीव्रतर प्रेरणा मिळाल्याचे दिसते. 'विद्ये विना मती गेली'– या जोतिबांचे सामाजिक विश्लेषणाची महती भाऊसाहेबांना त्या वास्तव्यात प्रकर्षाने पटलेली दिसून येते याची साक्ष त्या काळातील त्यांची पत्रे स्पष्टपणे देतात.

## राखेतून पुन्हा उडालेले फिनिक्स

या वास्तव्यात भाऊसाहेबांचे नजरेत भरले होते, इंग्लिश लोकांचे कठोर परिश्रम

करण्याचे व्रत! हे व्रतस्थ लोक निष्ठेने आपल्या देशासाठी राबत होते. त्यातूनच त्यांनी आपला देश युद्धानंतर केवळ पाच-सहा वर्षांचे काळात पुन्हा तितकाच नव्हे, त्याहूनही काकणभर अधिक समृद्ध बनविला. तसाच जर्मनी, फ्रान्सचाही प्रयत्न सफल होऊन उत्पादनात भरभरून वाढ झाली होती. देशाचे नेतृत्व जनतेला सतत कठोर परिश्रमाची प्रेरणा देत होते.

### ग्राहकांत क्रयशक्ती उरलेली नव्हती

या युरोपियन देशांचे परिश्रमातून वाढलेले उत्पन्न विकायला ज्या पारंपरिक बाजारपेठा होत्या त्यांत भारत, चीन, मध्य आशिया आणि दक्षिण आफ्रिका हे देश होते. ते सर्व पहिल्या महायुद्धाच्या धगीमुळे होरपळून निघालेले होते. युद्धोत्तर काळात त्यांच्या आर्थिक प्रगतीचे कोणतेही प्रयत्न झालेले नव्हते. त्यामुळे त्या देशातील लोकांची आर्थिक परिस्थिती युद्धोत्तर काळात खालावलेली होती. परिणामस्वरूप तिथल्या लोकांची क्रयशक्ती कमी झालेली होती. त्याचा तडाखा युरोपातील पुन्हा उभ्या राहणाऱ्या व खूप उत्पन्न वाढविण्यात यशस्वी झालेल्या देशांना बसला. त्यांचे उत्पादनास बाजार मिळेनासा झाला. त्यामुळे १९२८ पासूनच जागतिक मंदीचा तडाखा या राष्ट्रांना बसू लागला होता. अभूतपूर्व मंदीची लाटच या काळात आलेली होती.

अशा वेळी मँचेस्टरच्या धोतरजोड्या खरेदी करून शौकात राहाणारा भारतीय - आणि विशेषत: वैदर्भीय सुखवस्तू शेतकरी आपली क्रयशक्ती हरवून बसला होता. त्यांचे या काळात फार हाल होऊ लागलेले होते. युद्धकाळातून इंग्लंडचे आणि युरोपीय लोक सावरले तसे भारतीय लोक सावरण्याचा प्रयत्न करू शकले नाहीत. त्यामुळे त्यांची क्रयशक्ती क्षीण झाली होती. ते मुळातच कर्जबाजारी राहात होते. या काळात त्यांचे कर्जाचे डोंगर अधिकच वाढत गेले. त्यामुळे भारतीय शेतकऱ्यांचे घरातील सोने १९२८ ते ३० या काळात खूप मोठ्या प्रमाणावर बाजारात आले. हे सोने जागतिक बाजारपेठेत मातीचे भावातच विकल्या जात होते. त्या काळात शेतकरी सोने विकून धोतरजोडी अन् लुगडी घेत होता, महागडे लग्नसोहळे करीत होता, तेरव्यांचे महागडे विधी उरकवीतच होता. खर्च तसाच सुरू होता. गाठीस पैसा मात्र उरला नव्हता. त्यांचे शेतीसाठी लागणारा, पतपुरवठा करणारा एकमेव घटक होता खाजगी सावकार! तो कार्तिक, वैशाख, दसरा, दिवाळी, शिमगा, चैत्र, वैशाख अशी महिन्यांची एका वर्षात चोवीस नावे घेऊन व्याजाची आकारणी करीत होता. शेतकऱ्यांचे अज्ञानाचा लाभ उठवून याच काळात सावकारांचे वाडे उभे झाले. त्यांच्या इस्टेटी वाढत राहिल्या आणि शेतकरी कर्जात पुरता बुडत राहिला. ही स्थिती भारतात इंग्लंडहून परतून आल्या आल्या भाऊसाहेबांचे नजरेसमोर उभी राहिली. ती अत्यंत वेदनादायी

होती. या वेदनांमुळे डॉ. देशमुख व्यथित झाले होते. त्या शेतकऱ्यांचे दुःखांना प्राथम्याने दूर करणे त्यांना अग्रक्रमाचे वाटत होते. त्यासाठी भाऊसाहेबांनी अमरावती जिल्ह्यात शेतकरी संघटनेची स्थापना करून शेतकऱ्यांचा लढा सुरू केला. त्यामुळेच ते गांधीयुगाच्या बहराचे काळीसुद्धा स्वातंत्र्य संग्रामात उडी घेताना दिसून आले नाहीत. त्या काळात भारतातील कोणताही देशभक्त तरूण गांधीजींच्या चुंबकीय परिघाचे बाहेर राहू शकलेला नव्हता; परंतु भाऊसाहेब मात्र त्याला अपवाद होते.

### लोकल्याणाच्या तळमळीतून नेतृत्वाची प्रेरणा

त्यांनी इंग्लंडहून आल्या आल्याच अमरावती जिल्हा कौंसिलचे अध्यक्षपद प्राप्त केले. तसेच शेतकऱ्यांचे दुःखांना वाचा फोडणाऱ्या शेतकरी चळवळीत काम करणे सुरू केले.

जिल्हा कौंसिलमध्ये असताना त्यांनी शेतकऱ्यांच्या आणि ग्रामीण जनतेच्या हिताची बरीच कामे हाती घेतली. वैदर्भीय ग्रामीण जनतेच्या मागासलेपणाचे मूळ कारण असलेली 'अविद्या' नाहीशी करणे ही तर त्यांच्या जीवनाची खरी सार्थकताच होती. तेच तर त्यांचे जीवनध्येय होते. त्यामुळे जिल्हा कौंसिलच्या कार्यकाळात त्यांनी महत्त्वपूर्ण ठराव करून 'शिक्षण सेस' १८ पै वरून २७ पै पर्यंत वाढविला. त्यांनी अमरावती जिल्ह्यातील ग्रामीण जनतेच्या शिक्षणासाठी पुरेसा पैसा उपलब्ध करून देण्याचा यशस्वी प्रयत्न केला. या फंडातून गावोगाव शाळा उघडण्यात आल्या. लहान गावातला कुणीही 'पंजाबराव' गावात शाळा नाही या सबबीसाठी शालेय शिक्षणापासून वंचित राहाणार नाही याची काळजी घेण्याचा त्यांचा तो प्रयत्न होता. प्राथमिक शिक्षणाचे सार्वत्रीकरण करण्याच्या आजच्या प्रयत्नांचा तो श्रीगणेशाच होता असे म्हणायला पाहिजे. या मूलभूत शैक्षणिक कार्यामुळेच पुढे हा जिल्हा शैक्षणिकदृष्ट्या देशात केरळनंतर प्रथम क्रमांकावर येण्याचा सन्मान मिळवू शकला व या जिल्ह्याला देशात सर्वात कमी निरक्षरता असल्याचे प्रमाणपत्रही मिळविता आले.

### समकालीन नेते हे राजकीय नेते होते; लोकनेते नव्हते

या त्यांचे कार्यकाळात अमरावती जिल्ह्यात जी नेतेमंडळी अमरावतीचे राजकारणात होती त्यात प्रामुख्याने श्री. दादासाहेब खापर्डे, वीर वामनरावदादा जोशी, सर मोरोपंत जोशी, बॅ. रामराव देशमुख-हे चारही नेते नागरी जीवनाशी निगडित होते. ग्रामीण जनतेच्या सुखदुःखाशी समरस होण्याइतपत ग्रामीण जनतेशी त्यांचा संपर्क नव्हता. डॉ. पंजाबराव देशमुख हे ग्रामीण जनतेच्या सतत संपर्कात येणारे पुढारी होते. ते खेड्यात जन्मलेले आणि ग्रामीण लोकांत मिसळणारे होते. त्यांची शेतकऱ्यांशी जवळीक होती, त्यामुळे ते शेतकऱ्यांचे दुःखाशी समरस होणारे पुढारी मानल्या जाऊ लागलेले

होते. गावागावातील लोकांत त्यांचे कर्तृत्वाबद्दल आदराची भावना निर्माण झालेली होती. ते लोकनेते झालेले होते.

### मंत्रिमंडळात समावेश आणि लवादाचा कायदा

त्यानंतर ते सर मॉंटेग्यू मंत्रिमंडळात 'लोककर्म खात्याचे मंत्री' झाले. त्या काळातच जागतिक मंदीची झळ भारतातल्या कापसासारख्या कच्च्या मालालाही लागलेली होती. त्यामुळे शेतकरी हवालदिल होऊन सावकारी चरकात पिळला जात होता. घरातले सोने पडत्या भावाने विकून आपला प्रपंच भागवीत होता. त्या हवालदिल झालेल्या शेतकऱ्याला सावकारी कर्जातून मुक्ती मिळावी म्हणून डॉ. पंजाबराव देशमुखांनी जगात कुठेही तोवर अस्तित्वात न आलेला 'लवादाचा'-कर्जमुक्तीचा कायदा असेंब्लीत पास करून घेतला व वऱ्हाडच्या चार जिल्ह्यांतील शेतकऱ्यांना सावकारी पाशातून मुक्त केले. वास्तविक त्यांचेकडे शेतकी खाते नव्हते किंवा कायदा खातेही नव्हते. परंतु आपल्या मुत्सद्दीपणाने आणि चिकाटीच्या प्रयत्नांनी त्यांनी हा अभूतपूर्वच नव्हे तर भविष्यातही आजवर अस्तित्वात न आलेला कायदा पास करून शेतकऱ्यांवर अनंत उपकार केले.

### देवस्थान बिल

याच वेळी डॉ. भाऊसाहेब पंजाबरावांनी अत्यंत मुत्सद्दीपणे 'देवस्थान बिल' असेंब्लीत मांडलेले होते. ते जर पास करून घेता आले असते तर पुढे वाढलेली हिंदु-मुस्लिँम तेढ वाढलीच नसती. त्यामुळे या तेढीतूनच पुढे झालेली भारताची दुर्दैवी फाळणीही टाळणे शक्य झाले असते. इतका मूलगामी विचार करून भाऊसाहेबांनी ते बिल सादर केलेले होते. परंतु काही लोकांनी धर्मभावना दुखविल्या जाण्याची सबब पुढे करून ते बिल नामंजूर करून घेतले आणि त्यामुळे पुढे राष्ट्राचे कधीही भरून न निघणारे नुकसान झाले. तरीही त्या बिलामागची भाऊसाहेबांची भूमिका आजच्या काळात प्रशंसनीय वाटणारी आहे.

### प्रस्थापितांचा विरोध

भाऊसाहेब पंजाबराव देशमुख विदर्भाच्या राजकीय क्षितिजावर चमकू लागल्यापासून त्यांना विरोध करणाऱ्या प्रस्थापित नेत्यांची धडपड उघडी पडत होती. त्या काळात सरकार दरबारी वजन असणारे रावबहादूर आणि रावसाहेब भरपूर होते. तसेच स्वातंत्र्य चळवळीशी संबंधित अमरावती शहरातील काही लोक राजकारणात क्रियाशील होते. सर मोरोपंत जोशी, गोखले, मुधोळकर, बापूजी अणे, दादासाहेब खापर्डे यांसारखे

लोकमानसात चांगली प्रतिमा असणारे नेते होते. या नेत्यांची कमजोरी ही होती की ते ग्रामीण, बहुजनांशी संबंधित नव्हते. तीच नेमकी भाऊसाहेबांची जमेची बाजू होती. ते मातब्बर पाटील देशमुखांसोबतच अमरावती जिल्ह्यात बहुसंख्य असणाऱ्या माळी समाजातील थुगावकरांसारख्या लोकनेत्यांशी जवळिकीचे संबंध ठेवून होते. अमरावतीचे वीर वामनराव दादा जोशी, अकोल्याचे ब्रिजलालजी बियाणी हे दोन नेते मात्र लोकांशी संपर्क ठेवून होते. त्यामुळे ते आपले स्वातंत्र्य लढ्यातील नेतृत्व लोकशक्तीच्या भरवशावर टिकवून होते. परंतु या दोनही नेत्यांचे लक्ष केवळ स्वातंत्र्य संग्रामातील काँग्रेसचे नेतृत्व करण्यापुरते मर्यादित होते. गटातटाचे पक्षांतर्गत राजकारण हेच केवळ त्यांच्या कार्याचे एकमेव उद्दिष्ट होते. परंतु अशा राजकारणापेक्षा लोकांच्या उत्थानाकडे भाऊसाहेबांनी आपले लक्ष केंद्रित केले होते. तसे असल्यामुळे त्यांच्या लोकप्रियतेचा पाया मजबूत होता. तो त्यांच्या पुढच्या राजकीय जीवनात भरपूर सहाय्यक ठरला. अन्यथा काँग्रेसच्या स्वातंत्र्यलढ्यात नाममात्रही सहभाग नसून भाऊसाहेब लक्षावधी मतांनी निवडून येऊन देशात मताधिक्याचा विक्रम नोंदवीत असत, ते कदापि घडले नसते.

## नागर पुढारी आणि भाऊसाहेब

'स्वातंत्र्य हा माझा जन्मसिद्ध अधिकार आहे'- असा घोष करणारे वैदर्भीय राजकीय पुढारी हे मुख्यत: नागरजनच होते. त्यामुळे खेड्यातला बहुसंख्य जनसमूह हा या आंदोलनात ओढला जाण्यासाठी ग्रामीण जनतेतील लोकनेते पुढे येणे आवश्यक होते. भाऊसाहेबांनी आपल्या सामाजिक कार्यात सामान्य जनांना सहभागी करून घेऊन लोकांचा सहभाग आपल्या समाज सुधारणेच्या कामास प्राप्त करून घेतला.

## महात्मा जोतिरावांचे कार्य

महाराष्ट्रात क्रांतिसूर्य जोतिराव फुल्यांचा सत्यशोधक समाज लोक जागृतीचे काम करीत होता. अंधश्रद्धा निर्मूलनाचे काम त्यांनी खेड्यापाड्यातून सुरू केलेले होते. त्या चळवळीकडे ग्रामीण बहुजन समाज ओढला गेलेला होता.

म. फुले यांचे पहिले चरित्रकार बुलडाण्याचे पंढरीनाथ पाटील यांनी जोतिरावांची सत्यशोधक चळवळ विदर्भात सुरू केलेली होती. त्यातच कोल्हापूरचे शाहूमहाराजांचे 'पुराणोक्त आणि वेदोक्त' या वादाचे फलस्वरूप महाराष्ट्रात सत्यशोधकांनी आपल्या चळवळीला 'ब्राह्मणेतर' चळवळीचे वळण देणे सुरू केलेले होते. त्यातून समाजाच्या दोन वर्गात बरीच कटुता वाढू लागलेली होती. हा जगाला ज्ञात नसलेला वर्गसंघर्ष महाराष्ट्रात नव्याच प्रकारच्या कटुतेची लाट पसरवून गेला होता. त्या चळवळीतून

विदर्भभर पंढरीनाथ पाटील आणि अमरावतीचे ॲड. अमृतकर, श्रीमान नायगावकर आदि मंडळींनी आपली चळवळ गावागावातून सुरू केलेली होती. या ब्राह्मणेतर चळवळीमुळे आम ग्रामीण जनता स्वातंत्र्य चळवळीपासून अलग राहू लागलेली होती; कारण स्वातंत्र्य चळवळीचे नेतृत्व हे ब्राह्मण मंडळीकडे होते.

ब्राह्मणेतरांच्या सत्यशोधक चळवळीला महाराष्ट्रातील वृत्तपत्रे प्रसिद्धी देत नव्हते अशी तक्रार होती. ती चळवळ नाहीशी व्हावी म्हणून प्रसिद्धी माध्यमांची मक्तेदारी असणाऱ्या लोकांचे प्रयत्न होते, असाही ब्राह्मणेतरांचा आक्षेप होता. त्या प्रयत्नांना शह देण्यासाठी पंढरनाथ पाटील, अमृतकर वकील, श्रीमंत नायगावकर आदि मंडळींनी सत्यशोधक जलसे उभे केले. नायगावकरांचा किंवा हरीचा जलसा हा यांतला प्रसिद्ध जलसा होता. हे जलसे गावागावात कार्यक्रम करून पौरोहित्यातून होणारी पिळवणूक आणि फसवणूक याबद्दल लोकजागृतीसाठी प्रभावी प्रचार करीत असत.

या चळवळीचे विदर्भात नेतृत्व करणारे पंढरीनाथ पाटील यांची डॉ. भाऊसाहेब देशमुखांशी मैत्री झाली. त्यातून अनेक शैक्षणिक संस्थांचे जाळे विणले गेले. बुलडाणा जिल्ह्यात शिवाजी शिक्षण संस्थेचे जाळे विणले जायला पंढरीनाथ पाटलांची भाऊसाहेबांशी झालेली ही मैत्रीच कारणीभूत होती.

## काँग्रेसचे नेतृत्व आणि भाऊसाहेब

१९३० ते ४५ पर्यंतच्या काळात विदर्भाच्या चार जिल्ह्यांचे नेतृत्व करणारे तीन प्रमुख नेते होते. अमरावतीचे वीर वामनराव जोशी, यवतमाळचे लो. बापूजी अणे आणि अकोल्याचे ब्रिजलालजी बियाणी. या तीन नेत्यांचे तीन प्रमुख कार्यकर्ते होते. वामनराव दादांचे पी. के. देशमुख, अण्यांचे बॅ. रामराव देशमुख तर बियाणीजींचे डॉ. आबासाहेब खेडकर (देशमुख). हे तीनही देशमुख अमरावती जिल्ह्यातीलच होते, हे येथे लक्षात घेण्यासारखे आहे. या तीनही नेत्यांच्या हातात न सापडलेले दोनच लोकनेते होते ते म्हणजे डॉ. भाऊसाहेब पंजाबराव देशमुख आणि पंढरीनाथ पाटील !

वीर वामनराव दादा आणि बापूजी अणे हे दोन ब्राह्मण नेते होते, तर बियाणीजी हे मारवाडी. त्यामुळे या राजकारणाला लोक विनोदाने 'शेठजीभटजींचे राजकारण' म्हणायचे. त्या राजकारणापासून दूर राहूनही भाऊसाहेब सत्तेच्या राजकारणात सतत यशस्वीपणे पुढे पुढेच जात राहिले.

## संस्थानात दिवाण

स्वातंत्र्यपूर्व काळात ते बराच काळ देवास संस्थानात दिवाण म्हणून राहिले. तेथे असताना त्यांनी इंग्रजांना देशातून घालविण्यासाठी अनेक संस्थानिकांच्या दिवाणांशी संपर्क साधलेला होता. संस्थानिकांनी सामूहिक उठाव करावा असाही त्यांचा मानस

होता. त्यासाठी पृष्ठभूमी तयार करण्याचा प्रयत्न त्यांनी चालविलेला होता, असे त्यांचे विचक्षण चरित्रकार श्री. सुदामदादा सावरकर यांनी नोंदविलेले आहे.

### ब्राह्मणेतरांत राहूनही ब्राह्मणद्वेष्टे नव्हते

डॉ. पंजाबराव देशमुख उपाख्य भाऊसाहेब देशमुख हे राजकारणापेक्षा समाजकारणाला अधिक महत्त्व देणारे लोकनेते होते. ते सत्यशोधक चळवळीशी संबंधित लोकनेत्यांशी मैत्री ठेवून होते, तरीही त्यांना 'ब्राह्मणेतर' चळवळीतला ब्राह्मणद्वेष कधीच शिवला नाही. ब्राह्मणेतर चळवळीतून महाराष्ट्रातील सामाजिक वातावरणात पसरलेली 'जातीयतेची' दुर्गंधी भाऊसाहेबांचे मनाला कधीही लागली नाही, ही गोष्ट त्यांचे जीवनातील अनेक प्रसंगांवरून स्पष्टपणे निदर्शनास येते. श्रीमती कुसुमावती देशपांडे यांना नागपूरच्या शासकीय महाविद्यालयात प्राध्यापिका म्हणून नोकरी मिळावी म्हणून भाऊसाहेबांनी आपल्या मंत्रीपदाचे वजन खर्च केले होते. अन्यथा 'स्त्री' प्राध्यापिका लावलीच गेली नसती. यामुळे पहिली स्त्री प्राध्यापिका लावण्याचे श्रेय तर भाऊसाहेबांना मिळालेच, शिवाय त्यामुळे त्यांचे मनात ब्राह्मणेतरांसारखी जातीय कटुता नव्हती, हेही स्पष्ट झाले. त्यांनी अनेक ब्राह्मण प्राध्यापक आणि शिक्षक आपल्या संस्थेत लावले होते. त्यात प्रा. ग. त्र्यं. देशपांडे, प्रा. रा. म. जोशी आणि प्राध्यापिका पाठक आदि नामवंत प्राध्यापकांनी श्री शिवाजी महाविद्यालयात नोकरी केलेली आहे. हे लक्षात घेता त्यांना सत्यशोधक म्हणावे हे योग्य, परंतु कडवे 'ब्राह्मणेतर' मात्र म्हणता यावयाचे नाही.

### गुणग्राहक भाऊसाहेब

परप्रांतांतूनही आलेल्या नामवंत गुणवंत प्राचार्य-प्राध्यापकांना त्यांनी सन्मानाने वागविले. त्यांत डॉ. ज्वाला प्रसादांसारखा आंतरराष्ट्रीय कीर्तीचा प्राचार्य त्यांनी मुद्दामच आणला होता. तसेच रामा राव आणि सुब्बा राव ही प्राध्यापकांची जोडी त्यांनी श्री शिवाजी महाविद्यालयाची गुणवत्ता वाढावी म्हणून नेमलेली होती. भाऊसाहेब हे असे गुणांचे पारखी होते. त्यांचे सत्यशोधकी दृष्टीला अतिरेकी जातीयतेच्या मर्यादा नव्हत्या. त्यांचे दिल्लीचे निवासस्थानी महाराष्ट्रातील सर्व जातींचा मेळाच भरायचा आणि सर्व प्रांतांतील शेतकऱ्यांची गर्दी असायची. ही त्यांची सर्वसमावेशकता त्यांचे व्यापक दृष्टीची द्योतक होती.

### अस्पृश्यता निवारण्यासाठी सत्याग्रह

अमरावतीच्या अंबादेवीचे मंदिरात अस्पृश्यांना मंदिरात प्रवेश करविण्याचा जो

सत्याग्रह करण्याचे ठरलेले होते, त्या कार्यक्रम समितीचे अध्यक्ष डॉ. भाऊसाहेब पंजाबराव देशमुख होते. तो सत्याग्रह चवदार तलावाच्या सत्याग्रहाहूनही क्रांतिकारक होता. नासिकच्या काळारामाच्या दर्शनाचा प्रयत्न झाला त्याहूनही हा प्रयत्न सरस होता. कारण या मंदिरात साऱ्या महाराष्ट्रातील भाविक अंबाभक्त येतात आणि अजूनही तेथे सोवळ्या-ओवळ्यातच पूजा होते. तुळजा भवानी किंवा माहूरची रेणुका ही 'आम' भक्तांची पंचमकारांची पूजा स्वीकारणारी दैवते आहेत; परंतु अंबादेवी मात्र कडक सोवळ्यांतली देवी होती व आहे. अशा सोवळ्यातल्या देवीचे दर्शनापासून (तथाकथित) अस्पृश्यांना वंचित ठेवणाऱ्या पुजाऱ्यांना दूर सारून मंदिरप्रवेश करविण्याचा हा प्रयत्न क्रांतिकारकच होता. स्वातंत्र्योत्तर काळात पंढरपूरच्या लोकदैवताचे दर्शन मुक्त करण्यासाठी साने गुरुजींना उपोषणे करावी लागली होती, ही गोष्ट लक्षात घेतली तर १९३२ मधील अंबादेवीचे मंदिरात आंबेडकरांसह अनेक अस्पृश्य बांधवांना प्रवेश द्यावा म्हणून भाऊसाहेबांनी आयोजित केलेला सत्याग्रह हा अत्यंत मोलाचा व क्रांतिकारकच ठरतो. परंतु हा प्रयत्न ऐनवेळी दादासाहेब खापर्डे या वजनदार पुढाऱ्याचे मध्यस्थीमुळे डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी तहकूब केला. त्यामुळे हा महत्त्वपूर्ण आणि क्रांतिकारक सत्याग्रह होऊ शकला नाही.

## खरा भौमर्षी

डॉ. भाऊसाहेब पंजाबराव देशमुख यांचे कार्याचे मूल्य त्यांचे कृषकहिताच्या कार्याने अधिकच वाढलेले दिसते. आज ज्या प्रकारचे कृषकांचे नेते समोर येत आहेत, त्यांचे तुलनेत भाऊसाहबांचे नेतृत्व डोळ्यात भरण्यासारखे आहे. त्यांनी १९३० पासूनच शेतकऱ्यांचा संघ स्थापन करून त्याचे द्वारा निवडणुकाही लढविलेल्या होत्या. ते जेव्हा भारताचे कृषिमंत्री झाले तेव्हा तर त्यांनी देशातील कृषकांचे हितासाठी बऱ्याच नव्या गोष्टी केल्या. पंतप्रधान नेहरूंचे नेतृत्व लाभलेल्या मंत्रिमंडळात भाऊसाहेबांकडे कृषी खात्याची जबाबदारी आली होती. त्या वेळी सी. डी. देशमुखांसारखा थोर अर्थतज्ञ भारताचा अर्थमंत्री होता. त्यामुळे भारतीय शेतकऱ्यांच्या हिताच्या गोष्टी करण्याची पूर्ण मुभाच भाऊसाहेबांना लाभलेली होती. त्यांनी भातशेतीमध्ये जपानी पद्धती सुरू करून विविध प्रकारच्या भाताच्या बीजांचे संशोधन करून घेतले होते. त्यामुळे भाताच्या उत्पादनात आपल्या देशात जी कमालीची वृद्धी झाली त्याचे श्रेय भाऊसाहेबांचे दूरदृष्टीलाच द्यावे लागेल.

जगातील विविध देशांतील प्रगत कृषी तंत्राची भारतीय शेतकऱ्यांना ओळख व्हावी म्हणून भाऊसाहेबांनी 'जागतिक कृषी प्रदर्शना' चे आयोजन केलेले होते. त्या प्रदर्शनास दोन बलाढ्य राष्ट्रांचे दोन बलाढ्य नेते उपस्थित राहिले होते. रशियाचे सर्वेसर्वा क्रुश्चेव

आणि अमेरिकेचे अध्यक्ष आयसेनहॉवर या प्रदर्शनाला उपस्थित राहिले, ही या प्रदर्शनाच्या भव्यतेची पावतीच आहे. या प्रदर्शनाचा बऱ्याच शेतकऱ्यांना लाभही झाला यात संशयच नाही.

## भारत कृषक समाज

स्वातंत्र्योत्तर काळात आपल्या या देशात नवनिर्माणाचे पावन पर्व सुरू करण्याचा पंडितजींचा हेतू होता. त्या दृष्टीने तरुणांना नवनिर्माण कार्यात सहभागी करून घेण्यासाठी ना. गुलझारीलाल नंदा यांचे अध्यक्षतेखाली भारत सेवक समाजाची स्थापना करण्यात आली होती. विदर्भातीलच थोर राष्ट्रसंत श्री तुकडोजी महाराजांनी 'भारत सेवक समाजा'सारखाच एक 'भारत साधु समाज' स्थापन केला होता. भारतीय शेतकऱ्यांचे दु:ख आणि आर्थिक हाल जन्मापासून पाहात आल्यामुळे शेतकऱ्यांना प्रगतीचा मार्ग दाखवून आपल्या उन्नतीसाठी प्रोत्साहित करण्यासाठी त्यांना भारतीय स्तरावर एकत्र करण्याची तीव्र गरज भाऊसाहेबांना जाणवत होती. त्यासाठी त्यांचे मनात 'भारत कृषक समाजा'ची स्थापना करण्याचा विचार येणे स्वाभाविकच होते. तसा तो विचार त्यांचे डोक्यात येताच त्यांनी भारतीय स्तरावरचा 'भारत कृषक समाज' स्थापन केला व त्याच्या शाखा संपूर्ण देशात स्थापन करण्याचा प्रयत्न केला. आज भारत कृषक समाजाचे जे कार्य काश्मिर ते कन्याकुमारीपर्यंत दिसते, ते कार्य भाऊसाहेबांच्या कल्पकतेचे फळ आहे. असा हा लोकनेता पापळपासून दिल्लीपर्यंत आपल्या लोककल्याणकारी कार्याने अमर होऊन राहिलेला आहे.

## ग्रामीण दारिद्र्याचे मूळ अज्ञान

भाऊसाहेब पंजाबराव देशमुख हे ग्रामीण जनतेचे कैवारी होते. त्यांचे कार्याचे कायमचे सूत्र ग्रामीण जनतेच्या हिताशी बांधले गेलेले होते. ग्रामीण हिताचा विचार करताना भाऊसाहेबांचे मनात खेड्यातील जनतेच्या अठराविश्वे दारिद्र्याचा विचार सतत सलत होता. म्हणून 'ग्रामीण जनतेचा विकास म्हणजे त्यांचे दारिद्र्याचा नाश' हे महत्त्वाचे सूत्र भाऊसाहेबांनी लक्षात घेतलेले होते. हे दारिद्र्य कायमचे हटवायचे असेल तर ह्या दारिद्र्याचे मूळ शोधून ते उपटून फेकणे हे त्यांना महत्त्वाचे वाटत होते. गरिबांच्या गरिबीचे मूळ त्यांचे अज्ञानात आहे' – हे जोतिबांसारखेच भाऊसाहेबांनाही पटलेले होते. त्यामुळे दारिद्र्य निर्मूलनासाठी गरिबांचे अज्ञान दूर करण्याची गरज त्यांना प्रकर्षाने जाणवू लागलेली होती. म्हणून त्यांनी १९३२ पासूनच अमरावती जिल्ह्यात गावोगाव शाळा सुरू करण्याचा सपाटा लावलेला होता. हे लोण पुढे अकोला, बुलडाणा, वर्धा, नागपूर आणि यवतमाळ या विदर्भाच्या सर्वच जिल्ह्यांत

पसरविण्यात आले. या प्रयत्नात त्यांना खरी साथ दिली ती बुलडाण्याच्या पंढरीनाथ पाटील यांनी. अमरावतीचे विदर्भ हायस्कूल अशाच एका पाटिलांनी त्यांचे स्वाधीन केले होते. धामणगावचे प्रताप विद्यालय हे त्यांना विरुळच्या रोंघे यांनी सोपविले होते. अकोला जिल्ह्यातील निंभा येथील हायस्कूल श्री. श्रीधरराव देशमुखांनी भाऊसाहेबांना दिले होते. वरुडचे महाविद्यालय माळी समाजाचे श्री. सीतारामजी चौधरी यांचे दानातून उभे राहिलेले होते. नागपूरचे महाविद्यालय उभे करण्यास श्रीमंत दादासाहेब धनवटे यांनी मदत केली होती. अशा अनेक दानशूरांच्या मदतीवरच भाऊसाहेबांनी 'तट्ट्याच्या शाळा' उभ्या केलेल्या होत्या. अनेक लोकांनी भाऊसाहेबांच्या या ज्ञानयज्ञात आपल्या समिधा आणून तो यज्ञ पेटता ठेवलेला होता. त्यातूनच पुढे बऱ्याच मोठ्या प्रमाणावर शाळांची उभारणी होऊ शकली. गावोगाव उभी राहू लागलेली ही विद्यालये त्या गावातील लोकांच्या प्रयत्नांतून उभी राहात होती. ती लोकशिक्षणाची केंद्रेच व्हावीत अशी भाऊसाहेबांची इच्छा होती. त्यांना या विद्यालयांच्या उभारणीतून एक लोकशिक्षणाची मोहीमच उघडावयाची होती. तो त्यांचा लोकविद्यापीठाचा पाया ठरणार होता.

### शिक्षणाची सजावट नको : विस्तार हवा होता

परंतु ही विद्यालये सजवून मोठमोठ्या इमारतींत भरविण्याचा मात्र त्यांचा आग्रह नव्हता. त्यांनी आपले पहिले शिवाजी मराठा विद्यालय तट्ट्याच्या खोल्यांतच भरविले होते. ते तसेच बराच काळ चालत राहिले. त्यांना शिक्षणाचा तातडीने विस्तार हवा होता. शोभेच्या शिक्षणाची त्यांना हौस नव्हती. ज्या गावात तिसरी पर्यंतचीही शाळा नव्हती तेथे हायस्कूलपर्यंतचे वर्ग तातडीने सुरू करणे हाच त्यांचा ध्यास होता. त्यांचे जन्मगावी मागच्या दशकापर्यंतही त्यांचेच एका कोठ्यात एक हायस्कूल भरत राहिलेले होते. या सर्व प्रयत्नांतून उभ्या राहिलेल्या शाळांना 'तट्टा हायस्कूल' या संबोधनाने काही लोक हिणवत असत. तेही भाऊसाहेबांना भूषणावहच वाटत होते.

### देणगीदार : राजापासून रंकापर्यंत

भाऊसाहेबांना पहिला मोठा देणगीदार मिळाला होता, तो स्वत:ला 'प्रिंस ऑफ बेरार' म्हणवून घेणारा हैद्राबादचा निझाम. त्याचे उदार देणगीतून पहिली वसतिगृहाची इमारत उभी राहिली होती. त्यातच पुढे श्री शिवाजी महाविद्यालय भरू लागले. त्यानंतरचा दुसरा भरीव देणगीदार होता श्रीमंत धनवटे! तितकाच मोठ्या मनाचा दिलदार देणगीदार म्हणून डोळ्यासमोर नाव येते ते 'पंढरीनाथ पाटील' यांचे ! त्यांनी सोसायटीला त्यांचे काळात एक लक्ष रुपयांची उदार देणगी दिलेली होती. याशिवाय

ा लहान-मोठे देणगीदार मिळाले. त्यांतले काही लहान होते, परंतु त्या लहान गीदारांनीच या संस्थेचा व्याप मोठा केला.

### चणीत बंगला गहाण ठेवून कर्ज घेत

विनाअनुदानाच्या शाळा आणि महाविद्यालये चालविताना भाऊसाहेबांना नेहमीच ची अडचण भासायची. त्यासाठी भाऊसाहेबांची एकमेव स्थायी संपत्ती असलेला ला ते गहाण टाकीत आणि आपली अडचण भागवीत असत. श्री. भैय्यासाहेब दे सांगतात की भाऊसाहेबांनी त्यांना अनेकदा शिक्षकांचे पगारासाठी उसनवार मागितले होते. असे अनेक भैय्यासाहेब-काकासाहेब असतील . असंख्य उसनवारी गारे मदतगार भाऊसाहेबांचे शैक्षणिक कार्यास मदत करायला धावून आलेले तील. त्यातूनच शिवाजी सोसायटीचा मोठा डोलारा उभा राहू शकला.

भाऊसाहेबांना जेवढ्या जमिनी देणगीदाखल मिळाल्या त्यावरच त्यांनी आपल्या थांच्या इमारती उभ्या केल्या. पैसे देऊन जमीन विकत घेण्याची संस्थेची ऐपत ती. श्री शिवाजी कॉलेजच्या लगतची त्रिकोणी जागा भाऊसाहेबांना विकत घेण्याचा ाव आला होता. परंतु दान देत असाल तरच घेतो, असा भाऊसाहेबांनी उलट प दिला आणि मग त्या जमिनीचा सौदा राठी छात्रालय समितीने केला. आज ाजी नगरात लाहोटी महाविद्यालयाच्या चिंचोळ्या लहानशा जागेला विद्यानगर ी पाटी लागलेली आहे. भाऊसाहेबांजवळ पैसे असते तर ती लागली नसती. शेती कत घेण्याला एकच अपवाद झाला होता. भाऊसाहेबांनी शासनाकडून राजेंद्रबाग ाची शेती विकत घेतली होती. इतर सर्व जमिनी सरकारकडून किंवा देणगीदारांकडून ठालेल्या आहेत.

### तंत्र्योत्तर काळात शासन फारसे अनुकूल नव्हते

भाऊसाहेबांना या कार्यास त्यावेळचे सरकार मदत करण्यास फारसे अनुकूल ते. मध्यप्रांत वऱ्हाडचे सरकारात शिक्षणमंत्री ना. पी. के. देशमुख हे अमरावतीचेच . ते वीर वामनराव जोशी यांचे परमशिष्य होते. राजकारणात भाऊसाहेबांना हे कारणातील प्रस्थापित अनुकूल नव्हतेच. वामनराव जोशी यांचा प्रतिस्पर्धी गट ाणीजींचा होता. तोही भाऊसाहेबांना प्रतिकूलच होता. तिसरे बॅ. रामराव देशमुख. ना लोकशिक्षणाचे माहात्म्य पटलेले नव्हते असे दिसते. त्यामुळे तेही भाऊसाहेबांचे ांना अनुकूल नव्हतेच. सामाजिक सुधारणांचा राजकारणाशी संबंध जोडायला हे क तयार नव्हते. भाऊसाहेबांनी आपले काम कर्मवीर भाऊराव पाटलांचे कार्याचे गेतून सुरू केलेले दिसते. परंतु भाऊरावांचे काम प्राथमिक शिक्षण आणि माध्यमिक

शिक्षणापुरतेच मर्यादित होते तर भाऊसाहेबांनी महाविद्यालयीन उच्च शि
वेगाने वाटचाल सुरू केलेली होती. या कार्यात भाऊसाहेबांना फारशी म
राज्य शासनाकडून मिळाली नाही; परंतु बरीच मदत केंद्र शासनाकडून म
गेली. 'रुरल इन्स्टीट्यूट' केंद्राच्या मदतीनेच आलेली होती. केंद्र शासनाक
स्कीम' म्हणून एक संस्था भाऊसाहेबांनी आणलेली होती. ती चार उद्योगांचे
देणारी आणि उत्पादन काढणारी संस्था होती.

ना. रविशंकरजी शुक्ला हे मध्य प्रदेशचे मुख्यमंत्री होते, ते वामनराव जो
पी. के. देशमुख यांचेशी राजकीय जवळीक असणारेच होते. त्यामुळे ते भाऊ
अनुकूल राहाणे शक्य नव्हतेच. तसेच दुसरे प्रभावी नेते- गृहमंत्री द्वारकाप्रस
हे पी. के. देशमुखांचे त्राते होते, त्यामुळे तेही भाऊसाहेबांना विशेष अनुकूल
असे दोन्हीकडून भाऊसाहेब एकाकी पडलेले नेते होते. या स्थितीचा ता
शैक्षणिक संस्थांना सहन करावा लागलेला होता. त्यांचे इतरही कार्यात हा र
विरोधकांचा ताप त्यांना भोगावा लागत होता.

## क्रांतिसिंह नाना पाटील यांचे स्वागत

स्वातंत्र्य प्राप्तीसाठी महाराष्ट्रात सशस्त्र क्रांतीचा संदेश देणारे महान क्रांतिवी
पाटील यांचे डॉ. पंजाबराव देशमुख यांनी अमरावतीला स्वागत घेतले होते. अ
जिल्हा कौन्सिलच्या समोरच्या बागेत नानांचा पुतळा उभारण्यात आला होत
वेळी बापुसाहेब देशमुख तळेगावकर हे अध्यक्ष होते. भाऊसाहेबांनी क्रांति
दौरा आखला होता. विदर्भात सर्वत्र फिरायचे असल्यामुळे पेट्रोलची मोठी
(लॉरी) हवी होती. त्यावेळी पेट्रोलचे कंट्रोल होते. या दौऱ्यासाठी किमान ८
लिटर पेट्रोलचे परमिट हवे होते. त्यासाठी भाऊसाहेब त्यावेळचे मुख्यमंत्री पं. रवि
शुक्ला यांचे बंगल्यावर गेले होते. तेथे गृहमंत्री पं. द्वारकाप्रसाद मिश्राही आलेले
भाऊसाहेबांनी क्रांतिवीर नाना पाटलांचे दौऱ्यासाठी ८०/८५ लिटर पेट्रोलचे प
देण्याची शुक्लाजींना विनंती केली. परंतु पं. द्वारकाप्रसाद मिश्रा यांनी मध्ये
सांगितले '' – नाना पाटीलका नाम पुलीसके रिपोर्टके अनुसार गुनहगारों की लि
होने के कारण ऐसा पेट्रोलका परमिट दिया नही जा सकता और ऐसे गुनहगा
स्वागत करने का दौरा निकालना भी गुनाह ही है। इसलिए यह मांग नाजायज
भाऊसाहेबांना या त्यांचे बोलण्याचा राग आला. तेही तितक्याच तिखट श
मिश्रांना बोलले: ''तुम्ही पेट्रोलचे परमिट दिले नाही तरीही हा दौरा होईलच.'

इशारा देऊन भाऊसाहेबांनी कार्यक्रम आखला. काही स्वागताच्या सभाही झा
नानांची भाषणे गाजू लागलीत. भाऊसाहेब सोबत होतेच. शेगावला प्रचाराची
आली. सभेची तयारी झालेली होती. परंतु मध्यप्रदेश सरकारचा हुकूम घे

'पुलीसवाले' आले. नानांचे भाषणाला व स्वागत समारंभाला बंदी घालणारा तो 'काळा हुकूम' होता. देशगौरव सुभाषचंद्र बोसांनाही गुन्हेगार मानणारे आपले स्वतंत्र भारताचेच सरकार अन्याय्य वागत होते, तसाच हाही एक मासलाच होता. बंदी हुकूम असल्यामुळे त्या सभेत नाना पाटील बोलले नाहीत. डॉ. भाऊसाहेब देशमुखांनी भाषण दिले. त्यांनी या तानाशाही सरकारचा स्पष्ट शब्दांत निषेध केला. नानांना गुन्हेगार म्हणण्याचा गुन्हा करणाऱ्या शासनाला शासन करण्याचे आव्हानही तापलेल्या मनाने डॉ. भाऊसाहेबांनी केले होते. भाऊसाहेबांचा या सभेतील आवेश पाहाणाराला भाऊसाहेबांचे हे रूप सर्वस्वी नवीन होते.

### तगड्या राजकीय पाट्या

स्वातंत्र्योत्तर काळात विदर्भात बियाणी आणि पी. के. देशमुख अशा दोन तगड्या राजकीय पाट्यां होत्या. त्यांनी आपआपली मोर्चेबांधणी पुरती अभेद्य करून ठेवलेली होती. बियाणींनी अमरावती जिल्ह्यात बाळकृष्ण भंडारी, सोलव, दादासाहेब तरार आणि बाबासाहेब सांगळूदकर या मंडळींकडे नेतेपदाची सूत्रे सोपविलेली होती. पी. के. देशमुख यांनी आपले पक्के समर्थक वीर पंजाबराव यावलीकर, उत्तमराव महल्ले यांचे मदतीने गावागावात लहान-थोर निष्ठावंत कार्यकर्त्यांची फळी उभी करून ठेवलेली होती. त्या दोन्ही गटांची भाऊसाहेबांचे या कार्यास मदत देण्याची भावना नव्हती. उलट होईल तेवढा विरोध करणे हेच त्यांचे कार्य होते. हे दोन्ही गट सत्तेच्या राजकारणात रमलेले राजकीय जुवारी होते. सत्तासंपादन हेच त्यांचे एकमेव ध्येय होते; तर भाऊसाहेबांना सत्ता ही आपल्या ध्येयपूर्तीचे साधन वाटत होती. सत्तासंपादन हे त्यांचे अंतिम ध्येय नव्हतेच.

डॉ. खेडकर यांचे नेतृत्वाला आधार देऊन वैदर्भीय देशमुखांची सहानुभूती मिळविण्याचे आणि त्याद्वारे लोकांत पाटील-देशमुख अशी फूट पाडून मते मिळविण्याचे राजकारण बियाणीजी खेळत होते. पाटलांची शक्ती क्षीण करता यावी म्हणून पाटील विरुद्ध असामी असाही एक कल्पक वाद राजकीय स्वार्थासाठी खेळण्यात येत होता. बुलडाणा जिल्ह्यात गोविंदशेठ भाटीया यांच्याही राजकारणाचा तोच प्रकार होता. जाती-पोटजातींचे झगडे लावून ग्रामीण बहुजन विभाजित करणाऱ्या या राजकारणापासून भाऊसाहेबांनी स्वत:ला वेगळे ठेवले होते. अकोल्यात कोरपे-सपकाळ आणि बुलडाण्यात पंढरीनाथ पाटील यांचे सहाय्याने दोन्ही जिल्ह्यांत शिवाजी शिक्षण संस्थेचे जाळे विणण्याचे काम भाऊसाहेबांनी यशस्वीपणे पार पाडले.

यवतमाळ जिल्ह्यात बियाणीजींचे गटात काकासाहेब सुराणा, बाबुराव डिग्रस्कर, अण्णासाहेब जवादे ही मंडळी होती. भाऊसाहेबांचे सहकारी आणि त्यांचे उत्तराधिकारी बाबासाहेब घारफळकर हे सुद्धा बियाणीजींचे सोबत असायचे, परंतु भाऊसाहेबांचे

शैक्षणिक कार्यात तळमळीने काम करायचे. असे बरेच लोक बियाणी वा अन्य विरुद्ध गटांत राहूनही भाऊसाहेबांसोबत काम करायचे.

भाऊसाहेबांचे विरोधात रा. सु. गवई या तरुण दलित नेत्याने लोकसभेच्या निवडणुकीत उभे राहून पाहिले. त्यावेळी आपल्या राजकारणाच्या सिद्धीसाठी बाबासाहेब सांगळूदकर गवईंचे काम करीत होते. ते तसे बियाणी गटाचे होते. परंतु शैक्षणिक कार्यात भाऊसाहेबांसोबतच राहात असत. तरीही आपल्या भावी राजकारणाच्या सोयीसाठी त्यांनी भाऊसाहेबांचे विरोधात काम केले. असे असले तरी सांगळूदकरांचे चाहत्यांनी भाऊसाहेबांनाच मदत केली. खुद्द गवईंच्या जातीतील बऱ्याच दलितांनीही भाऊसाहेबांनाच मते देऊ असे जाहीरपणे सांगितलेले होते. असे हे भाऊसाहेबांचे व्यक्तिमत्व राजकारणातील गटातटाच्या पलिकडचे होते, हीच त्यांच्या चारित्र्याची महती होती.

## निवडणुकीत विक्रमी मताधिक्य

कोणत्याही राजकीय गटाचे समर्थन नसतानाही भाऊसाहेब प्रचंड मतांनी निवडून येत असत. सतत १५ वर्षे ते लोकसभेच्या जागेवर निवडून गेले होते. मताधिक्याचा रेकॉर्ड तोडूनच हे विजय भाऊसाहेबांनी मिळविलेले होते. केंद्रात मंत्रीही झाले होते ते त्यांचे स्वत:चे गुणवत्तेनेच ! या कार्यकाळात त्यांनी ग्रामीण जनतेच्या हिताचे बरेच कार्य केलेले होते; तीच त्यांची पुंजी होती.

## लोकसभेतील महत्त्वपूर्ण कार्य

भाऊसाहेबांनी लोकसभेत असा ठराव मांडला होता की ग्रामीण तरुणांना जातपात न पाहाता सरसकट सरकारी नोकऱ्यांत आरक्षण असावे, हा ठराव पूर्णपणे मंजूर होऊ शकलेला नव्हता, परंतु यातून बहुजनातील बऱ्याच जातींना 'इतर मागासवर्गीय' या सदरात टाकून आरक्षण देण्याचे सरकारने मान्य केले होते. हा विजय सुद्धा कमी नव्हताच.

## घटना समितीचे चिकित्सक सदस्य

डॉ. पंजाबराव देशमुख हे भारताच्या घटना समितीचे सन्माननीय सदस्य होते. त्यावेळी भाऊसाहेबांनी अत्यंत चिकित्सकपणे घटनेच्या मूळ आराखड्यात सर्वाधिक म्हणजे ५०० दुरुस्त्या सुचविलेल्या होत्या. एवढ्या दुरुस्त्या म्हणजे घटनेचा मूळ मसुदाच बदलविण्याचा प्रकार होता. त्यामुळे घटना समितीचे अध्यक्ष डॉ. राजेंद्रप्रसाद यांनी प्रशंसोद्गार काढलेले होते. असा हा घटनेचा एक चिकित्सक शिल्पकार अमरावती परिसराच्या मातीत जन्मला हे या भूमीचे सद्भाग्यच म्हणावे लागेल.

## आध्यात्मिक पिंडाचा समाज सुधारक

भाऊसाहेब राजकारणात होते परंतु 'राजकारणी' नव्हते. 'राजकारणात प्रतिस्पर्ध्यांचे

पाय ओढणे' हा पुष्कळदा राजकारणी लोकांचा स्वभावच असल्याचे दिसून येते. आपल्या पुढे कुणीही जाऊ नये म्हणून आपण वेगाने धावण्याऐवजी इतरांचे पाय ओढून त्यांचा वेग कमी करणे, हेच जणू त्यांचे राजकारण असते, असे स्वातंत्र्योत्तर काळातील राजकारणाकडे पाहिले म्हणजे स्पष्ट दिसते. परंतु भाऊसाहेब याला अपवाद होते. त्यांना इतरांचे पाय धरण्यात, पाय ओढण्यात आणि पाय चाटण्यातही वेळ घालवायला सवडच नव्हती. कारण ते सतत लोकसेवेच्या कामात गुंतलेले असायचे. परंतु ते लोकांच्या सेवेत सदैव राहाणाऱ्या गाडगेबाबांना भेटायला मात्र सवड काढीत असत. गाडगेबाबांचे सहवासात ते बराच वेळ घालवीत असत. बाबाही त्यांचे सहवासात आनंद अनुभवत असत. गाडगेबाबांना गल्ल्या झाडून साफ करण्याचे कामात देवपूजेचा आनंद मिळत असे, तसाच लोकांच्या अडाणीपणाचा निरास व्हावा म्हणून कीर्तनातून लोकशिक्षणाचे काम करण्यातही त्यांना आनंद मिळत असे. गाडगेबाबा आपले कीर्तनात भाऊसाहेबांचा मोठ्या गौरवाने उल्लेख करीत असत. अमरावतीला आले की शिवाजी संस्थेच्या कार्यालयाचे समोर झाडण्याचे सफाईकाम देवपूजेच्या निष्ठेने ते करीत असत. भाऊसाहेब कार्यालयात येईपर्यंत बाबांचे हे काम चालत असे. भाऊसाहेब आल्यावर ते एकमेकांना अभिवादन करीत. गाडगेबाबा कुणालाही पायावर डोके ठेवू देत नसत. भाऊसाहेबांनाही ते तसे करू देत नसत. दोघेही बराच वेळ कार्यालयाचे बाहेरच उभ्या उभ्या बोलत असत. गाडगेबाबा कधी कुणाच्या घरात जात नसत, परंतु भाऊसाहेबांचे कार्यालयाचे व्हरांड्यात बसायचे. हा या दोन सत्पुरुषांचा सहवास भाऊसाहेबांचे थोर सामाजिक कार्याला थोर संतांनी दिलेली मान्यतेची पावतीच म्हणावी लागेल.

राष्ट्रसंत तुकडोजी महाराजही भाऊसाहेबांच्या कार्याचे प्रशंसक होते. भाऊसाहेबांचे शैक्षणिक कार्यावरून प्रेरणा घेऊनच महाराजांनी गुरुकुंजात एका विद्यालयाची स्थापना केल्याचे दिसून येते. भाऊसाहेबही तुकडोजी महाराजांचे गीतांनी प्रभावित झालेले होते. त्यांची गीते शाळा-शाळांतून म्हटली जावीत अशी भाऊसाहेबांची इच्छा होती. तसे त्यांनी तुकडोजी महाराजांनाही सांगितलेले होते.

भाऊसाहेब मंदिरात जाऊन दर्शन घेत असत. ते वैज्ञानिक दृष्टीचे चिकित्सक अभ्यासू असले तरी ते नास्तिक मात्र नव्हते, हेच त्यांचे संतसंपर्कावरून दिसून येते.

भाऊसाहेबांनी डॉक्टरेट मिळविण्यासाठी सादर केलेला प्रबंध हा वैदिक वाङ्मयाच्या त्यांच्या सखोल अध्ययनाची साक्ष देणारा आहे. त्या पांडित्यपूर्ण अभ्यासातून घडलेला त्यांचा पिंड हा 'आध्यात्मिक' होता, असे स्पष्ट दिसून येते.

अशा या थोर पुरुषोत्तमाच्या जीवनाच्या विविधांगी अभ्यासातून आपल्या असे लक्षात येते की हा महापुरुष या शतकातील थोर द्रष्टा शिक्षणमहर्षी होता; तसाच तो आध्यात्मिक पिंडाचा भौमर्षी - गृत्समदाच्या जातीचा थोर विदर्भपुत्र होता. त्याला विनम्र अभिवादन! लक्ष लक्ष प्रणाम!



# महात्मा फुले यांचे सच्चे वारसदार

डॉ. मा. गो. माळी

---

विद्या हेच सर्वांगीण विकासाचे प्रभावी साधन आहे हे म. फुले यांना प्रकर्षाने जाणवले आणि त्यांनी आपल्या सर्वंकष समाजक्रांतीची सुरुवात सन १८४८ मध्ये पुणे येथील बुधवार पेठेतील श्री. भिडे यांच्या वाड्यात मुलींची शाळा सुरू करून केली. शिक्षणाच्या अभावी सर्व गोरगरीब आणि दीन–दलित समाज प्रस्थापितांच्या गुलामगिरीत गटांगळ्या खात असल्याचे आणि तो निष्ठुरपणे शोषला जात असल्याचे एक विदारक चित्र फुले यांनी अनुभवले.आणि त्यांनी गोरगरीब, दीन–दलित तसेच स्त्रियांना विद्येची संजीवनी देऊन जागृत करण्याचा अहोरात्र प्रयत्न केला. हा बोलका इतिहास डॉ. पंजाबराव उर्फ भाऊसाहेब देशमुख यांचे बाबतीत प्रेरणा देणारा ठरला, असेच मानावे लागेल. महात्मा फुले यांच्या तत्त्वज्ञानाने प्रभावित होऊन राजर्षि शाहू महाराज, कर्मवीर भाऊराव पाटील आदींनी महाराष्ट्रात शैक्षणिक व सामाजिक क्षेत्रांत क्रांती घडविली. तद्वतच विदर्भात डॉ. पंजाबराव देशमुखांनी गोरगरीब व दीन–दलितांना अज्ञान–अंध:कारातून प्रकाशात आणण्याचा यशस्वी प्रयत्न केला. दीन–दलितांचे दु:ख निवारण्याचे महान् कार्य केले.

१९३२ साली अमरावती येथे श्री शिवाजी एज्युकेशन सोसायटीची स्थापना करून त्यांनी समाजाचे दु:ख–दारिद्र्य, निरक्षरता आणि अंधश्रद्धा नाहीशी करण्याचे कार्य चालू केले. त्यांनी अमरावती या शहरात ही शिक्षण संस्था स्थापन केली असली तरी त्या प्रारंभ काळातही त्यांचे मुख्य लक्ष्य ग्रामीण भाग हेच होते. खेड्यापाड्यांतील अज्ञान–अंध:कारात आणि दारिद्र्यात खितपत पडलेला समाज प्रामुख्याने त्यांच्या डोळ्यासमोर होता. यासाठी त्यांनी खेड्यापाड्यांत शिक्षणसंस्थांचे जाळे अल्पावधीत विणले. अनेक ग्रामीण तरुणांना आपल्या संस्थेत उच्च विद्याविभूषित केले. प्रसंगी शिष्यवृत्त्या देऊन बाहेर शिक्षणासाठी पाठविले. ''शिक्षणातून विकास व विकासातून शिक्षण'' – हे तत्त्व अंमलात आणण्याचा यशस्वी प्रयत्न त्यांनी केला.

डॉ. पंजाबराव देशमुख हे भारताचे काही वर्षे मंत्री होते. ते शेतीमंत्री असताना दिल्लीमध्ये अमरावतीतील त्यांच्या शिक्षण संस्थेतील माझ्या एका मित्रासमवेत त्यांचेशी भेटण्याचा योग आला. या भेटीत ते राजकारणापेक्षा आपल्या विविध प्रकारच्या संस्थांची बारकाईने माहिती घेताना दिसले. राजकारण विषयावर एक शब्दही त्यांनी उच्चारला नाही. बऱ्याच वेळा, शिक्षणसंस्था म्हणजे केवळ राजकारणाचे एक माध्यम असे मानणारे संस्थापक असतात. तथापि डॉ. देशमुख यांचे व्यक्तिमत्व याला अपवाद होते. त्यांनी कोणत्याही स्वार्थी हेतूने किंवा प्रसिद्धीच्या हव्यासाने आपल्या शिक्षण संस्थेचा कधीही वापर केला नाही. उलट आपल्या राजकीय स्थानाचा स्वत:पेक्षा आपल्या संस्थेच्या विकासासाठी उपयोग करून घेतला. संस्थेच्या विकासासाठी त्यांनी स्वत:ला वाहून घेतले, झोकून घेतले. 'श्री शिवाजी शिक्षण संस्था' हाच त्यांचा संसार. तिच्या विकासाचा त्यांनी हयातभर ध्यास घेतला आणि पोटच्या मुलीप्रमाणे संस्था वाढविली. खेड्यापाड्यांतील हजारो गोरगरिबांची मुले या संस्थेच्या छायेत शिकली. विद्येने सुसंस्कृत व समर्थ झालेले तरुण स्वत:च्या पायावर उभे राहिले. वर्षानुवर्षे अज्ञान-अंध:कारात खितपत पडलेल्या घराघरात ज्ञानज्योती प्रज्ज्वलित झाल्या. वाड्या, वस्त्या जागृत झाल्या. विदर्भातील शेतकरी जागा झाला. त्यांच्यात परिवर्तन घडून आले. डॉ. पंजाबराव देशमुखांनी समाजजागृतीचे विशिष्ट तत्त्वज्ञान डोळ्यासमोर धरून शैक्षणिक, सामाजिक व राजकीय क्षेत्रांत केलेले कार्य केवळ मौलिकच नव्हे तर ऐतिहासिक स्वरूपाचे आहे. ज्या काळात त्यांनी हे कार्य केले, त्या काळाचा विचार करता त्यांच्या कार्यास तोड नाही हे कबूल करावे लागेल. या दृष्टीने विचार करता द्रष्ट्या व्यक्ती मळलेल्या वाटेने जात नाहीत, असे जे म्हटले जाते ते डॉ. पंजाबरावांच्या बाबतीत बरोबर लागू होते. डॉ. पंजाबराव देशमुख म्हणजे नि:स्वार्थी, ध्येयवादी, दीन-दलित-कृषिवलांचे कैवारी-यादृष्टीने त्यांचे व्यक्तिमत्व वंदनीय असे होते आणि त्यांचे कार्य त्या भागात अतुलनीय असेच आहे.

त्यांच्या या जीवनकार्याचा विचार करता ते महात्मा फुले यांचे खरे वारसदार आहेत हे म्हणण्यास प्रत्यवाय नाही.



# भारतीय राज्यघटना-निर्मितीत योगदान

प्रा. सुभाष गवई

---

भारताच्या संविधान निर्मितीत अत्यंत हिरिरीने व मोलाचा सहभाग देण
व्यक्तींमध्ये डॉ. पंजाबराव ऊर्फ भाऊसाहेब देशमुख यांचा अग्रक्रमाने उल्लेख क
लागेल. हा उल्लेख अग्रक्रमाने यासाठी की, संविधान समितीतील ज्या काही व्यक्त
भारतातील मागासलेल्या, कष्टकरी, दलित, महिला या घटकांच्या विकासाची तळ
होती त्यांत भाऊसाहेब देशमुख हे एक बिनीचे समाजसुधारक होते. त्यामुळे दीनदुब
जातिव्यवस्थेवर आधारित या देशाला स्वातंत्र्यानंतर एक पुरोगामी विचारांची
देणाऱ्या राज्यघटनेची गरज होती. या देशात स्वातंत्र्य, समता व बंधुत्व या संकल
रुजाव्या याचा ध्यास घेणाऱ्यांत डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्यानंतर डॉ. पंजाब
देशमुख यांच्या नावाचा उल्लेख अपरिहार्यपणे करावा लागेल. स्वतंत्र भारता
राज्यघटना निर्मितीचा विचार सुरू झाल्यानंतर प्रत्येक प्रांतातून तज्ज्ञ, विचार
यांची विद्वत्ता, समाजविकासाची त्यांची तळमळ काँग्रेसपक्षातील ज्येष्ठ नेते जा
होते. त्यामुळे विदर्भ प्रांतातून संविधान सभेवर डॉ. पंजाबराव देशमुख यांना पाठविण्
निर्णय काँग्रेस पक्षाने घेतला.

१९४६ साली भारताचे भावी संविधान तयार करण्यासाठी जी समिती नेमली ग
त्या समितीवर पूर्व विदर्भातर्फे डॉ. पंजाबराव देशमुख यांची काँग्रेसने निवड के
१९४६ ते १९५० या कालखंडात भाऊसाहेबांनी संविधान समितीत कार्य के
भारताचे भावी संविधान निर्माण करण्याच्या या ऐतिहासिक कार्यात भाऊसाहेब
अत्यंत जिव्हाळ्याने व व्यापक जनहिताच्या दृष्टीने हिरिरीने भाग घेतला. अ
नाइलाजच झाला अशाच वेळी कदाचित ते संविधान सभेच्या बैठकींना अनुपस्
राहिले असतील. देशोदेशीच्या राज्यघटनांचा सूक्ष्म अभ्यास, विधिशास्त्राचे सख
ज्ञान, भारतातील बहुसंख्य जनतेच्या भवितव्याबद्दलच्या ठाम व तर्कशुद्ध कल्प
अभ्यासू वृत्ती व इंग्रजी भाषेवरील असामान्य प्रभुत्व यांमुळे घटना समितीतील त्य

भाषणे अत्यंत लक्षपूर्वक ऐकली जात असत. प्रत्येक वेळी कोणता तरी मूलगामी स्वरूपाचा विचार ते सभागृहासमोर ठेवीत असत. संविधान तयार करण्याकरिता विद्वान, विचारी व थोर अशा व्यक्ती एकत्रित झालेल्या असत. त्यांच्यासमोर तर्कशुद्ध मूलभूत विचार व विशुद्ध भावना यांनी परिप्लुत अशी भाषणेच प्रभावी ठरत असतात, याची सतत जाणीव भाऊसाहेबांनी ठेवली होती. कोणत्याही मुद्द्यावर आपले विचार प्रदर्शित करावयास ते जेव्हा उभे राहात असत तेव्हा एक प्रकारचा अदम्य असा आत्मविश्वास त्यांच्या चेहऱ्यावर झळकत असे. आपले प्रत्येक विधान नि:संदिग्ध व सप्रमाण राहील याची ते नित्य खबरदारी घेत असत. बिनतोड व सप्रमाण युक्तिवादाबद्दल त्यांनी घटना समितीत लौकिक मिळविला होता. वाऱ्याला लाथा झाडण्यासारखी संदिग्ध विधाने त्यांनी केली नाहीत, म्हणूनच त्यांच्या भाषणामुळे एक प्रकारचा दबदबा घटनासमितीत निर्माण झाला होता.

बहुजनसमाज, ग्रामीण जनता, शेतकरी, दलित व मागासवर्ग यांच्या हितरक्षणाची राज्यघटनेत तरतूद करण्यासाठी डॉ. पंजाबरावांना जणू अलिखित वकीलपत्रच मिळाले होते. इतरही महत्त्वाच्या व मूलभूत बाबींवर त्यांनी आपले विचार मांडले नाहीत असे नाही; पण शेतकरी व मागासवर्ग यांच्या हितसंबंधांची जपणूक करण्याची संधी त्यांना ज्या ज्या वेळी मिळाली त्या त्या वेळी त्यांच्या वक्तृत्वाला आगळे तेज चढत गेले. विचारांची निर्भीडता, भावनांची आर्तता व बहुजनांच्या हितासंबंधीचा जिव्हाळा यांनी त्यांची वक्तव्ये भारावली होती. अशा प्रसंगी समोर बसलेल्या व्यक्तींची, मग ती कितीही मोठी असो, त्यांनी गय केली नाही. तरीही त्यांनी सबंध सभागृहाचा आदर मात्र संपादन केला होता. याचे कारण त्यांच्या वक्तृत्वातील प्रभावीपणा, विचारांची तर्कशुद्धता, शिष्टाचार व निर्भीडपणा ! त्यांच्या क्रांतिकारी विचारांच्या प्रहारामुळे काही सभासद दुखावले गेले असतील; पण सभ्यता व शिष्टाचार, अंत:करणातील जिव्हाळा, त्यांचे दिलखुलास हास्य, इतरांना सहकार्य करण्याची तत्परता-यांमुळे ती मंडळी लवकरच कडवटपणा विसरून जात असत.

संविधान समितीत डॉ. बाबासाहेब आंबेडकर, डॉ. राजेंद्रप्रसाद, पंडित जवाहरलाल नेहरू, अनंत शयनम् अय्यंगार, ह. वि. कामथ, आर. के. सिध्वा, रंगराव दिवाकर, प्रो. रंगा, मिनु मसानी आदि विद्वान मंडळी होती. यांपैकी बहुतेकांनी भाऊसाहेबांच्या वक्तव्याची व जनहित दृष्टीची मुक्तकंठाने प्रशंसा केली होती. 'हरिजनादि, पददलित जातींव्यतिरिक्त भारतात आणखीही काही अत्यंत दुर्लक्षित, असहाय अशा जाती आहेत याची जाणीव घटना समितीतील बहुसंख्य सभासदांना डॉ. पंजाबराव देशमुख यांच्यामुळे झाली व म्हणून त्यांच्याही प्रगतीसाठी भारतीय संविधानात काही तरतुदी करता आल्या' – असे गौरवपूर्ण उद्‌गार भारतीय संविधानाचे प्रमुख शिल्पकार डॉ.

बाबासाहेब आंबेडकर यांनी संविधान निर्मितीनंतर केलेल्या समारोपीय भाषणात काढले.

विशेष उल्लेखनीय बाब अशी की गांधीवादी तत्त्वचिंतक आचार्य दादा धर्माधिकारी यांनी 'आपल्या गणराज्याची घडण' या आपल्या पुस्तकात डॉ. पंजाबराव देशमुख यांचा कौतुकाने उल्लेख केला तो असा- 'डॉ. आंबेडकरांच्या खालोखाल विचारांची स्पष्टता डॉ. पंजाबरावांच्या सुबोध, सोप्या आणि अनुभवसमृद्ध भाषाशैलीत जाणवते. एखाद्या कुशल वकीलाप्रमाणे ते आपले मुद्दे थोडक्यात, स्पष्टपणाने व सोप्या शुद्ध भाषेत मांडतात' - असा गौरवही दादांनी केला आहे. दादांनी केलेले डॉ. पंजाबरावांचे वर्णन आपली दाद आपल्या नकळत घेऊन जाते.

डॉ. पंजाबराव देशमुख यांचे संविधान समितीतील भाषणांचे एक स्वतंत्र पुस्तकच होऊ शकेल. त्यांनी संविधान निर्मिती-प्रक्रियेत ज्या विविध प्रश्नांना मांडून समाजातील तळागाळातील घटकांच्या विकासासाठी संविधानात तरतूदी करवून घेतल्या त्या पाठीमागे त्या प्रश्नासंबंधी त्यांचे असलेले चिंतन किंवा त्या घटकासंबंधी असलेली पोटतिडीक यामुळेच ते आक्रमक होत असल्याचे लक्षात येईल. भारतीय संविधान निर्मितीत संविधान समितीवर ज्या काही मोजक्या लोकांचा समितीवर प्रभाव पडला त्यांत एक महत्त्वपूर्ण नाव डॉ. पंजाबराव देशमुख यांचे घ्यावे लागते.

संविधान सभेत ज्या महत्त्वपूर्ण विधेयकांवर चर्चा झाली त्या सर्वच विधेयकांवर डॉ. पंजाबराव देशमुख यांनी अत्यंत हिरिरीने भाग घेऊन आपल्या पुरोगामी विचारांचा प्रभाव सभागृहावर पाडला. त्यांचे विचार किती समृद्ध, पुरोगामी तसेच दूरगामी होते हे पुढील काही विधेयकांवर त्यांनी केलेल्या भाषणांतून लक्षात येईल :

## शासकीय कागदपत्रांतून जातिवाचक उल्लेख गाळून टाकणारे विधेयक

संविधान समितीत ना. रंगराव दिवाकर यांनी 'सरकारी कागदपत्रांवरून जातिवाचक उल्लेख रद्द करण्यासंबंधीचे विधेयक' मांडले होते. जातिवादाच्या उच्छेदासंबंधीची विधेयकातील तत्त्वे चांगली असली तरी भारतातील असंख्य जातींतील अनेकविध व भयंकर विषमता लक्षात घेता या विधेयकाद्वारे उच्चवर्णीय जाती सोडून इतर जातींतील व्यक्तींचे नुकसान होण्याची दाट शक्यता आहे, याची जाणीव घटना समितीतील ज्या थोड्या लोकांना होती त्यांत डॉ. पंजाबराव देशमुख हे अग्रणी होते. डॉ. पंजाबराव देशमुखांनी या विधेयकास प्रखर विरोध केला. या विधेयकाच्या विरोधात त्यांनी दि. १७ फेब्रुवारी १९४८ व दि. ११ ऑगस्ट १९४८ या दोन दिवशी अत्यंत परिणामकारक भाषण देऊन सदर विधेयकातील संभावित धोके सभागृहासमोर अत्यंत परिणामकारक रीत्या मांडून सभागृहाला आपली बाजू पटवून दिली. त्यांच्या मते, ''ज्यांचे सरकारी

नोकरीत वर्चस्व आहे किंवा ज्यांना सरकारद्वारा नोकरीविषयक काही विशेष सवलती प्राप्त झाल्या आहेत अशांचा जातिवाचक उल्लेख झाला काय किंवा नाही झाला काय, सारखेच आहे. कारण त्यामुळे त्यांच्या जातिविषयक हितसंबंधांना कोणत्याही प्रकारे बाधा येणार नव्हती. पण एखाद्या कनवाळू अधिकाऱ्यास, इतर मागासलेल्या जातींतील होतकरू व्यक्तींस संधी द्यावीशी वाटली तर त्या व्यक्तीची जात माहीत नसल्यामुळे त्याला ते कार्य करता येणार नाही.'' हा संभाव्य धोका लक्षात घेऊन डॉ. पंजाबरावांनी या विधेयकास विरोध केला.

याच विधेयकावर बोलत असताना त्यांनी जातिभेद समूळ नष्ट करण्याचे काही विधायक मार्गही सांगितले. शिक्षणाचा प्रचार हेच जातीयता नष्ट करण्याचे एकमेव प्रभावी साधन असून उच्च शिक्षण घेतलेले युवक व युवतीच जातिवादाचा हा विषारी वृक्ष मुळासकट तोडून टाकणार आहेत असे त्यांचे म्हणणे होते. अत्यंत बुद्धिमान असूनही केवळ शैक्षणिक संधी उपलब्ध होऊ न शकल्यामुळे ग्रामीण भागातील होतकरू मुलांची कशी कुचंबणा होते हे त्यांनी स्वतःच्या जीवनातील एक उदाहरण देऊन सांगितले. अशा अगतिक ग्रामीण विद्यार्थ्यांना, शहरातील पांढरपेशा समाजातील महाविद्यालयीन शिक्षणापर्यंतच्या साऱ्या सोयी ज्यांच्या दाराशी आहेत अशा विद्यार्थ्यांशी समानतेच्या भूमिकेवरून स्पर्धा करावयास लावणे केवळ वेडगळपणाचेच नव्हे तर खोडसाळपणाचेही असल्याची टीका त्यांनी केली होती.

सदर विधेयकाच्या विरोधात डॉ. पंजाबराव देशमुख यांनी दोन्ही तारखांना दिलेल्या भाषणाने संपूर्ण संविधान सभा भारावून गेली होती. डॉ. पंजाबराव देशमुख म्हणाले होते, ''जातिवादाची कीड नष्ट करायची असेल तर ती सरकारी कागदपत्रांतून काढून होणार नाही तर त्यासाठी शिक्षणाच्या सोयी, सवलती सर्वांना लागू करणे आवश्यक आहे!'' डॉ. पंजाबराव देशमुख यांनी विरोधात घेतलेल्या ठाम भूमिकेमुळेच शासकीय कागदपत्रांतून जातिवाचक उल्लेख काढून टाकणारे विधेयक बारगळले.

## संपत्ती करावरील विधेयक

संपत्ती करावरील विधेयकावर डॉ. पंजाबराव देशमुख यांनी दि. ६ एप्रिल १९४९ रोजी केलेल्या भाषणात शेतकऱ्यांच्या मालाला कमी भाव देण्याचे समर्थन करणाऱ्यांवर सडकून टीका केली. ते आपल्या भाषणात म्हणाले, ''शेतकऱ्यांनी उत्पन्न केलेल्या वस्तूंचे जास्त भाव दिले तर त्यामुळे पैशाची किंमत कमी होते म्हणून शेतकऱ्यांच्या उत्पादनाच्या किंमती कमी करणे हाच चलनवाढ रोखण्याचा मार्ग आहे, असे बेजबाबदार विधान काही जबाबदार व्यक्ती करताना आढळतात. पण ते योग्य नाही. वास्तविक भारतीय शेतकरी पूर्वी कधीही नव्हता इतका आज दरिद्री झाला आहे. त्याच्या हाती

जो काही पैसा येतो तो सर्व अत्यावश्यक जीवनोपयोगी वस्तू खरेदी करण्यावर खर्च होऊन जातो. पुष्कळदा तर त्याला आपल्या कुटुंबाच्या सर्वसाधारण गरजादेखील भागवता येत नाही. उलट ज्यांची संख्या संपूर्ण देशात दोन हजारांपेक्षाही कमी आहे अशा नवकोट नारायणांच्या हातात देशातील शेकडा ७५ टक्क्यांपेक्षा अधिक संपत्ती आहे. खरे पाहाता त्यांच्याचमुळे देशात चलनवाढ निर्माण झाली आहे. ही अफाट संपत्ती या मूठभर लोकांच्या हातात जनतेची अधिक पिळवणूक करण्याकरिता राहू न देता जर देशाच्या औद्योगिक विकासार्थ उपयोगात आणली तर देशाची अधिक प्रगती साधून लोककल्याण होऊ शकेल.'' अत्यंत अभ्यासपूर्ण असे प्रतिपादन त्यांनी या विधेयकाबाबत मांडले. यातून शेतकऱ्यांच्या प्रश्नांवर व त्यांच्यावर झालेल्या अन्यायावर डॉ. पंजाबराव देशमुख हे सतत जागरूक असत व शेतकऱ्यांच्या विकासाचा ध्यास त्यांनी घेतला होता, ही बाब स्पष्ट होते.

## राष्ट्रीय सैनिक दलासंबंधी विधेयक

दि. ८ एप्रिल १९४८ रोजी राष्ट्रीय सैनिक दलासंबंधी चर्चेला आलेल्या विधेयकावर भाषण करताना डॉ. पंजाबरावांनी या विधेयकावर अत्यंत मौलिक सूचना मांडल्या होत्या. लष्करी शिक्षण हे केवळ शाळा-कॉलेजातील मुलांमुलींपुरते मर्यादित न ठेवता राष्ट्रातील सर्व तरुण तरुणींना त्याचा लाभ मिळावा हे स्वतंत्र भारतात अत्यंत आवश्यक आहे, असे डॉ. देशमुखांचे मत होते. याच विधेयकावर बोलताना ते म्हणाले होते, ''दीडशे वर्षांच्या ब्रिटिश राजवटीत आपण विचित्र व विलक्षण प्रकारची शांतता व सुरक्षितता अनुभवली. त्यामुळे आपण सुखासीन झालो आहोत. देशातील सर्वसामान्य जनतेला लष्करी शिक्षणाबाबतच्या या उणीवांची जाणीव झाली असून त्यासाठी त्वरित उपाययोजना केल्या पाहिजेत. लष्करी शिक्षण फक्त लढण्याकरिता नसून त्यामुळे युवकांमध्ये अनुशासन, संघटनकौशल्य आदि गुण उत्पन्न होऊन चारित्र्यसंवर्धन होते. त्यासाठी शासनाने तरतुदी कराव्या.'' याबाबतही भाऊसाहेबांनी आग्रही प्रतिपादन केले होते.

## शेतकऱ्यांच्या हितासंबंधी विचार

दि. ३ सप्टेंबर १९४९ रोजी घटनासमितीत बोलताना डॉ. पंजाबराव देशमुख यांनी शेतकऱ्यांच्या हितासंबधी आपले विचार मांडून शासनाने शेतकऱ्यांकडे केलेल्या दुर्लक्षासंबंधी खेद व्यक्त केला. ते म्हणाले, ''सरकारच शेतकऱ्यांची अक्षम्य उपेक्षा करीत आहे. केवळ संख्याबळामुळे नव्हे, तर श्रेष्ठतम कार्यामुळे या भारतवर्षात शेतकऱ्यांना पूर्वापर प्राधान्य मिळत आले आहे. त्यामुळेच भारत शेतकऱ्यांचा देश

म्हणून सर्वत्र प्रसिद्ध आहे व असा नित्य उद्‌घोषही केला जातो. हे शेतकरीच खऱ्या अर्थाने भारताचे स्वामी आहेत. पण तरीसुद्धा त्यांच्या कल्याणाची कुणालाच आस्था नाही.'' कामगार वर्ग व शेतकरी वर्ग यांच्या परिस्थितीचे तुलनात्मक दर्शन घडवून डॉ. पंजाबराव म्हणतात, ''ज्या प्रचंड मानव समूहाच्या-कृषकांच्या घामावर आपण जगतो, विकास साधतो त्यांच्याकरिता अजूनही एकही कल्याणकारी अधिकारी नाही हे सखेद आश्चर्य म्हणावे लागेल.''

''जेव्हापासून मजूरवर्गाला प्रतिनिधित्व मिळाले आहे, आपल्या शासनव्यवस्थेत मजूर मंत्रालय आहे, तेव्हापासून मजुरांचे कल्याण हा आमच्या शासनाचा जिव्हाळ्याचा विषय ठरला आहे. संख्येच्या मानाने कामगारांपेक्षा शेतकऱ्यांचा समाज कितीतरी मोठा असताना ज्या सोयी व सवलती स्वतंत्र मंत्रालय व कल्याण अधिकारी नियुक्त केल्यामुळे कामगार वर्गाला मिळाल्या त्यांपैकी एकही शेतकऱ्यांच्या वाट्याला आली नाही-'' याबाबत भाऊसाहेबांनी खेद व्यक्त करून शासनाने व संविधान सभागृहाने शेतकऱ्यांच्या हिताकडे कर्तव्यभावनेने लक्ष दिले पाहिजे, असे कळकळीचे आवाहन केले. शेतकऱ्यांच्या पोटी जन्माला आलेल्या डॉ. पंजाबरावांनी शेतकऱ्यांच्या समस्यांचे चटके लहानपणी अनुभवले होते. त्यामुळे शेतकऱ्यांच्या हितासाठी लढणे हा त्यांचा अत्यंत जिव्हाळ्याचा विषय असे. अहोरात्र दीन, दलित, शेतकऱ्यांच्या विकासाचा ध्यास घेतलेले भाऊसाहेब शेतकऱ्यांच्या प्रश्नांबाबत व हितरक्षणासाठी अशाप्रकारे नेहमी जागरूक असत.

डॉ. पंजाबराव देशमुख यांनी अशा प्रकारे संविधान निर्मितीच्या कार्यात तळागाळातील लोकांना न्याय मिळवून देण्यासाठी संघर्ष केला. पुरोगामी विचारांचे त्यांनी नेहमीच समर्थन केले; तर चुकीच्या व संकुचित विधेयकावर ते शत्रूवर तुटून पडणाऱ्या योद्ध्यासारखे तुटून पडले व संकुचित विधेयक मांडणारास ते मागे घेण्यास भाग पाडले. अत्यंत सुस्पष्ट विचार, विद्वत्तापूर्ण वक्तृत्व यामुळे सभागृहाला त्यांचे मत मान्य करण्यापलिकडे पर्याय उरत नसे. वर उल्लेखिलेल्या विधेयकांसोबतच डॉ. पंजाबराव देशमुख संपत्ती कर, घटनेचे हिंदीत भाषांतर, सनदी नोकर, साखरेच्या दुर्मिळतेचा प्रश्न, अधिक धान्य पिकवा आदि विषयांवर आपली मूलगामी व विचार प्रवर्तक मते निर्भीडपणे मांडून सभागृहाला प्रभावित करीत असत.

विधेयक मांडणाऱ्यांना आपण मांडलेल्या विधेयकासंबंधी डॉ. पंजाबराव व श्री. ह. वि. कामथ कोणत्या प्रकारचा दृष्टिकोन मांडतात याबद्दल धास्तीच असे. परंतु या दोघांनी विधेयकाला पाठिंबा देण्याचे सांगताच प्रवर्तकांना आनंद होत असे. इतकेच नव्हे, तर डॉ. पंजाबरावांसारखा समर्थक आपल्या विधेयकास मिळाल्यामुळे आपली बाजू अधिक बळकट झाली असे वाटून विधेयक मांडणाऱ्याला आनंद होत असे.

## संविधानावरील डॉ. पंजाबरावांचे समारोपीय भाषण

भारतीय संविधान निर्मिती प्रक्रिया पूर्ण झाल्यानंतर दि. २२ नोव्हें. १९४९ रोजी त्याच्या एकूण स्वरूपावर अनेक सभासदांनी आपली मते प्रदर्शित केली. त्याचप्रमाणे डॉ. पंजाबराव देशमुख यांनी देखील आपली प्रतिक्रिया प्रभावीपणे व निर्भीडपणे मांडली. ते आपल्या भाषणात म्हणाले, ''संविधान सभेने स्वतंत्र व सार्वभौम भारताला साजेशी राज्यघटना अतिशय परिश्रमपूर्वक तयार केली त्याबद्दल सर्व सभासदांचे अभिनंदन करतो.'' त्यानंतर त्यांनी आपल्या भाषणातून राज्यघटनेतील काही उणिवांवर अचूक बोट ठेवले. काही उणिवा घटनेत राहिल्यामुळे बदलत्या परिस्थितीनुसार व आवश्यकतेनुसार आपणास नेहमी या घटनेत दुरुस्त्या जोडाव्या लागणार असे भाकित त्यांनी केले.

ते पुढे म्हणाले, ''आपली राज्यघटना सांसदीय लोकशाही पद्धतीची असून ती अमेरिकन राज्यघटनेपेक्षा ब्रिटिश राज्यघटनेला अधिक जवळची आहे. ही राज्यघटना म्हणजे १९३५ च्या कायद्याची सुधारून वाढविलेली आवृत्ती होय. १९३५ च्या कायद्याचा संपूर्ण सांगाडा आपण जसाच्या तसा ठेवला आहे. फक्त गव्हर्नर जनरल ऐवजी अध्यक्ष आहे. बाकी प्रांतोप्रांती गव्हर्नर आहेतच. एकीकडे आपण संसदेला सार्वभौम मानले तर दुसरीकडे काही मूलभूत हक्क मान्य करून सांसदीय सार्वभौमत्व मर्यादित केले.''

या घटनेतील एका महत्त्वाच्या क्रांतिकारी तत्त्वाची डॉ. पंजाबराव देशमुख यांनी आपल्या भाषणातून प्रशंसा केली आणि ते तत्त्व म्हणजे प्रौढ मताधिकार. प्रौढ मताधिकारामुळे मात्र विधानमंडळात सर्वसाधारण माणसाला प्रतिनिधित्व मिळून त्याच्या हाती फार मोठे अधिकार येणार आहेत; त्यामुळे त्या अधिकारांचा तो सबंध राष्ट्राच्या कल्याणार्थ उपयोग करू शकेल - असा त्यांचा अभिप्राय होता.

त्यांनी आपल्या भाषणातून संविधानात राहून गेलेल्या काही दोषांवरही आपले विचार मांडले. त्यात 'सांसदीय लोकशाही पद्धती' हाच त्यांच्या दृष्टिकोनातून दोष वाटला. ते याबाबत म्हणाले, ''सद्यपरिस्थितीत आमूलाग्र व क्रांतिकारी बदल घडवून आणण्यासाठी काही या तत्त्वाची निर्मिती झाली नसून परिस्थिती 'जैसे थे' ठेवण्याकरिता त्याची निर्मिती करण्यात आली आहे. पूर्वीच्या अनेकविध राज्य प्रशासन संस्था आपण जशाच्या तशाच ठेवल्या आहेत. त्यामुळे मूठभर सत्ताधीशांच्या हातीच भारताची राज्यसूत्रे राहातील; तर प्रौढ मताधिकाराने काही महत्त्वाचा बदल घडून येऊन मूठभर सत्ताभिलाषी लोक अधिकारहीन झाले तरच ही घटना टिकू शकेल, नाहीपेक्षा ही राज्यघटना म. गांधी यांची राज्यविषयक कल्पना प्रत्यक्षात उतरवू शकण्यास केवळ असमर्थ ठरेल.'' असे अत्यंत परखड प्रतिपादन त्यांनी केले होते. प्रस्तुत राज्यघटनेत

मागासलेल्या जातींच्या हितसंबंधांचा म्हणावा तितका विचार झालेला नसल्याबद्दल त्यांनी खेद व्यक्त केला; मात्र पुष्कळ सभासदांच्या मनात मागासलेल्या जातीसंबंधी सहानुभूती असल्याबद्दल आनंदही व्यक्त केला होता. अनुसूचित जाती व अनुसूचित वन्य जमाती यांच्यासारखीच दयनीय परिस्थिती इतर मागासलेल्या जातींची असल्यामुळे त्या विशिष्ट जाती-जमातींना लाभलेली सहानुभूती इतर मागासलेल्या जातींच्याही वाट्यास येऊन ती भविष्यात निर्माण होणाऱ्या कायद्यात व स्वीकारल्या जाणाऱ्या धोरणात प्रतिबिंबित व्हावी अशी अपेक्षा त्यांनी व्यक्त केली होती.

डॉ. पंजाबराव देशमुख यांना आमूलाग्र समाजपरिवर्तन अपेक्षित होते. जातिविरहित समाजव्यवस्था, शिक्षित समाज व मागासलेल्या समाजाच्या विकासाचे स्वप्न उराशी बाळगून संपूर्ण आयुष्य बहुजन समाजाच्या विकासासाठी झिजविणाऱ्या डॉ. भाऊसाहेब ऊर्फ पंजाबराव देशमुख यांनी शिक्षण व कृषिक्षेत्रात तर अतुलनीय कार्य केलेच, परंतु भारतीय संविधानात तळागाळातील लोकांच्या विकासासाठीच्या उपाययोजना आणण्यासाठी व म. फुलेंचा पुरोगामी विचार रुजविण्यासाठी त्यांनी केलेले प्रयत्न म्हणजे मागासलेल्या समाजावर, शेतकरी बहुजन समाजावर केलेले अनंत उपकार होत. भारतीय संविधान निर्मितीच्या काळात अत्यंत महत्त्वाची भूमिका बजाविणाऱ्या डॉ. भाऊसाहेब ऊर्फ पंजाबराव देशमुख यांच्या जन्मशताब्दी वर्षानिमित्त त्यांना कोटी-कोटी प्रणाम !



# डॉ. पंजाबराव देशमुख : एक आकलन

प्राचार्य प. सि. काणे

---

शंभर वर्षांपूर्वीचा विदर्भ सामाजिक आणि शैक्षणिक दृष्टीने मागासलेला होता. सर्वसामान्य जनतेपर्यंत शिक्षणाचा प्रसार न झालेल्या त्या विदर्भात बहुसंख्य लोक आणि विशेषतः ग्रामीण भागातील लोक निरक्षर व शिक्षणापासून वंचित असे होते. समाजातील थोड्या उच्चवर्णीयांपुरतेच शिक्षण मर्यादित होते. ग्रामीण भागात शिक्षणाच्या अभावामुळे सर्वसामान्य जनता एक प्रकारे हलाखीचे जीवन जगत होती. निसर्गावर संपूर्ण शेतीचे भवितव्य अवलंबून असल्याने निसर्गाच्या लहरीनुसार शेतीचे उत्पन्न कमीअधिक प्राप्त होणारा शेतकरी प्रसंगी कर्ज काढून आपला संसार पुढे रेटीत असे. त्यात त्याच्या निरक्षरतेची आणि अज्ञानाची भर पडल्याने तो कर्ज देणाऱ्या सावकाराकडून होणाऱ्या पिळवणुकीमुळे आर्थिक दृष्टीने संपूर्ण पिचून गेलेला- अशी सर्वसाधारण ग्रामीण भागातील शेतकऱ्यांची अवस्था असल्याने प्रत्यक्ष शेतीतून उत्पादन करणारा शेतकरी हवालदिल; तर केवळ त्याला पैशाचा कर्जरूपाने पुरवठा करणारा पण प्रत्यक्ष शेती करण्याचे कष्ट न करणारा धनको श्रीमंत- असा मोठा चमत्कारिक विरोधाभास शंभर वर्षांपूर्वीच्या वैदर्भीय जीवनाचा स्थायीभाव बनला होता. त्यातही ब्रिटिश साम्राज्यशाही शासनाची- म्हणजे आपल्या दृष्टीने परकीयांचीच राजवट. अशा सर्व पार्श्वभूमीवर भाऊसाहेब पंजाबराव देशमुखांनी विदर्भातील कष्टकरी शेतकऱ्यांच्या सामाजिक, शैक्षणिक, राजकीय आणि सांस्कृतिक विकासाच्या दृष्टीने केलेले कार्य केवळ अलौकिक स्वरूपाचे ठरते. म्हणूनच डॉ. भाऊसाहेब पंजाबराव देशमुखांचे एक अत्यंत एकनिष्ठ अनुयायी आणि श्री शिवाजी शिक्षण संस्थेचे डॉ. पंजाबराव देशमुखांनंतर झालेले अध्यक्ष कै. बाबासाहेब घारफळकर डॉ. भाऊसाहेबांचा गौरव ' विदर्भात नवजीवनाची संजीवनी प्राप्त करून देणारा आधुनिक महर्षी ' या शब्दांनी करीत असत आणि ते डॉ. भाऊसाहेब पंजाबराव देशमुखांच्या बाबतीत शंभर टक्के खरे आहे.

समाजाचे नेतृत्व करणारा आणि आपल्या समाजाच्या उत्थानासाठी धोरण ठरविणारा यांत एक विशिष्ट प्रकारची 'व्हीजन' म्हणजे दृष्टी असावी लागते. एखाद्या विधायकासाठी म्हणजे कायदे करणाऱ्यासाठी ही 'व्हीजन' असणे अत्यावश्यक आहे, असे ॲरिस्टॉटलने एका ठिकाणी म्हटले आहे. एखादा मनुष्य खूप शिकलेला असेल; अनेक पदव्याही त्याने संपादन केल्या असतील, पण त्यामुळे त्याचेजवळ ॲरिस्टॉटल ज्याला 'व्हीजन' म्हणतो ती दृष्टी असेलच असे नाही. कमी शिकलेल्यातही ही दृष्टी असू शकते. हिलाच प्रज्ञा असेही म्हणता येईल. एखाद्या गोष्टीच्या सखोल चिंतनानंतर मनुष्याच्या अंगी आलेले शहाणपण म्हणजे प्रज्ञा. ही अशी प्रज्ञा वा विशिष्ट स्वरूपाची 'व्हीजन' ज्या व्यक्तीजवळ असते ती समाजातील उणिवा नेमक्या टिपून त्या पूर्ण करण्यासाठी काही उपाय सुचवीत असते. डॉ. भाऊसाहेब पंजाबराव देशमुखांजवळ ही 'दृष्टी' होती. त्यामुळेच समाजातील दोषांची ते चिकित्सा करू शकले व ते दोष दूर करण्यासाठी प्रभावी उपाय ते सुचवू शकले. यात खरे डॉ. भाऊसाहेब पंजाबराव देशमुखांचे मोठेपण आहे हे विसरता कामा नये. समाजाच्या उन्नतीसाठी म्हणून सर्वप्रथम शिक्षण प्रसार समाजात होणे आवश्यक आहे हे हेरून विदर्भात शिक्षणाचे जाळे सर्वदूर पसरविण्यासाठी त्यांनी आपली श्री शिवाजी शिक्षणसंस्था स्थापन केली आणि ज्ञानगंगा घरोघरी अगदी ग्रामीण पातळीवर नेऊन सोडली. सर्व समस्यांची गुरुकिल्ली शिक्षणच असल्याने ग्रामीण भागातील लोकांना साक्षर आणि शिक्षित करण्याचे काम त्यांनी हाती घेतले व त्यात त्यांना प्रचंड यश प्राप्त झाले.

डॉ. भाऊसाहेब पंजाबराव देशमुखांचा मूळ पिंड समाजकारण करणाऱ्याचा होता. पण समाजकारण हे राजकारणाच्या साधनाव्यतिरिक्त वांझोटे ठरते याची त्यांना झालेली जाणीव त्यांना राजकारणाच्या क्षेत्रात घेऊन गेली. शेवटी राजकारण ही आपल्यासमोर असलेल्या निरनिराळ्या समस्या सोडविण्यासाठी आपण करीत असलेली कृतीच असते (Politics is a problem solving activity) असे राजकारणाचे वर्णन यथार्थतेने केले जाते. संत रामदासांनी दासबोधात म्हटल्याप्रमाणे 'नाना वस्त्रे नाना भूषणे। येणे शरीर शृंगारणे। विवेके विचारे राजकारणे। अंतर शृंगारिजे।।' म्हणजे जसे अनेक वस्त्रालंकारांनी शरीर सुशोभित केले जाते तसे विचार, विवेक आणि राजकारणानी अंत:करण श्रृंगारावे. डॉ. भाऊसाहेबांच्या व्यक्तिमत्वात नेमके हेच साध्य झालेले होते. विचार, विवेक आणि राजकारणानी त्यांचे व्यक्तिमत्व समृद्ध झालेले होते हे त्यांच्या चरित्रावरून स्पष्ट होते. विवेकानुसार पक्क्या झालेल्या विचारांशी तडजोड किंवा प्रतारणा उभ्या आयुष्यात त्यांनी कधी केली नाही; तर तो विचार अंमलात आणण्यासाठी एक साधन म्हणून भाऊसाहेबांनी राजकारणाचा उपयोग केला व बहुजन समाजाला सन्मानित स्थान प्राप्त करून दिले.

डॉ. भाऊसाहेबांनी पोथीनिष्ठेतून कोणत्याही गोष्टीचा कधीच विचार केला नाही. त्यामुळेच वैदिक धर्माचा अत्यंत वस्तुनिष्ठ दृष्टीने विचार त्यांच्या डॉक्टरेटसाठी लिहिलेल्या प्रबंधातून ते करू शकले. हिंदू धर्मातील अनिष्ट गोष्टींवर जसे त्यांनी कोरडे ओढले तशा त्यातील चांगल्या व स्वीकारार्ह बाबींचे समर्थनही ते करीत असत. त्यातील सुंदर, उदात्त व महन्मंगल तत्त्वांबद्दल त्यांना सार्थ अभिमान वाटत होता व तसे ते बोलूनही दाखवीत असत. भारताच्या लोकसभेत गोसंवर्धनावर श्री. गोविंददास यांच्या भाष्यावर उत्तर देताना भाऊसाहेबांनी म्हटले होते की 'मला हिंदू धर्माविषयी कमी अभिमान नाही. मी वैदिक तत्त्वज्ञानावर डॉक्टरेट घेतली आहे!' हिंदू धर्माबद्दल अभिमान व आत्यंतिक श्रद्धायुक्त आदर त्यांच्या बोलण्यातून दिसून येत असे. पण हिंदुधर्मातील जातिव्यवस्थेबद्दल त्यांच्या मनात विलक्षण चीड असे. जातीपातीचा विचार सार्वजनिक जीवनात जसा त्यांनी केला नाही तसाच त्यांच्या व्यक्तिगत जीवनातही जातीपातीचे स्तोम त्यांनी माजू दिले नाही. त्यांनी स्वत: जातीपातीचे निर्बंध दूर सारून विमलाबाईंशी आंतरजातीय विवाह केला होता. त्यांच्या मुलाचाही आंतरजातीय विवाहच झाला होता. भाऊसाहेबांनी त्याला विरोध केला नाही. व्यक्तिगत जीवनात त्यांना जे योग्य वाटे ते करण्याचा त्यांचा स्वभाव होता; नव्हे- आपल्याला जे योग्य वाटते ते करायचे हाच त्यांचा बाणा होता. मग समाज काय म्हणेल ते म्हणो. त्याची तमा त्यांनी कधी बाळगली नाही. असे प्रत्येकाला जे योग्य वाटते, विचारांती जे पटते ते करायचे व्यक्तिस्वातंत्र्य असायलाच हवे अशी वैचारिक बैठक असल्याने पोथीनिष्ठा व पोथीवादाला त्यांच्या जीवनात स्थान नव्हते. रूढी, जर त्या अनिष्ट असतील, विवेकास न पटणाऱ्या असतील तर त्या बदलल्याच पाहिजेत. अनिष्ट रूढी व चालीरीती बंद केल्या पाहिजेत या मताचे ते होते. त्यामुळेच अमरावतीचे अंबादेवीचे देऊळ हरिजनांचे साठी मोकळे करण्यात यावे यासाठी त्यांनी पुढाकार घेतला होता. व्यक्तिस्वातंत्र्य, उदारमतवादाचे तत्त्वज्ञान त्यांच्या अंगी आणि हाडीमासी रुळले होते. खुल्या अंत:करणाने समाजाच्या हिताचे व फायद्याचे जे जे असेल ते ते करायचे, त्यासाठी उगीच एखादी बाब प्रतिष्ठेची बनवायची नाही वा एखाद्या क्षुल्लक गोष्टीचा बाऊ करून आपल्या समाजाचे वा संस्थांचे अहित करायचे नाही अशी वृत्ती असल्याने त्यांनी त्यांच्या छत्रपती श्री शिवाजी शिक्षण संस्थेला त्या संस्थेच्या महाविद्यालयासाठी हैद्राबाद संस्थानच्या निझामाने 'प्रिन्स ऑफ बेरार' च्या नावाने देऊ केलेली आर्थिक मदतही तितक्याच आनंदाने स्वीकारली होती. 'प्रिन्स ऑफ बेरार होस्टेल' म्हणून ती इमारत आजही मोठ्या डौलाने श्री शिवाजी शिक्षण संस्थेच्या परिसरात उभी आहे. राष्ट्रीय महत्त्वाच्या उत्सवाचे वेळी श्री शिवाजी शिक्षण संस्थेचा भगवा ध्वज तेथे फडकविला जातो.

१९२० मध्ये जी आर्थिक मंदीची लाट उसळली होती त्यामुळे भारतातील शेतकऱ्यांची अवस्था फार वाईट व दयनीय झाली होती. शेतकऱ्यांवर सावकारांचे प्रचंड असे कर्जाचे ओझे व त्याखाली शेतकरी पूर्णपणे दबून गेलेला- असे वऱ्हाडातील शेतकऱ्यांचे जीवन झालेले होते. निरक्षर शेतकऱ्यांना नानाप्रकारे सावकारांचे भक्ष्य व्हावे लागत होते. सावकारांची एक प्रकारे मनमानी शेतकऱ्यांच्या गांजणुकीला कारणीभूत झाली होती. अशा परिस्थितीत भाऊसाहेब १९२६ मध्ये इंग्लंडातून परत आल्यावर अशा गांजलेल्या शेतकऱ्यांचे दुःख निवारण्याचा विचार करू लागले. शेतकऱ्यांना कर्जमुक्त कसे करता येईल याचा उपाय शोधू लागले. त्याचाच परिणाम म्हणून १९३२ चे कर्ज लवादबिल सरकारपक्षाकडून मांडले जाण्यात झाला. त्यामागे भाऊसाहेबांची दृष्टी व श्रम कारणीभूत झाले. २६ जानेवारी १९३२ मध्ये संमत झालेल्या या कर्ज लवाद विधेयकामुळे वऱ्हाडातील जवळजवळ ९०% शेतकऱ्यांच्या जमिनी सावकाराच्या घशात जाण्यापासून वाचल्या. शेतकऱ्यांना दीर्घ मुदतीचे हप्ते कर्जफेडीसाठी बांधून देण्यात आले व शेतकऱ्यांच्या जमिनी त्यांच्यापाशी कायम राहिल्या. भाऊसाहेबांनी हे जर केले नसते तर उपजीविकेच्या साधनापासून वंचित शेतकरी वर्ग दारोदार मजुरी करायला लागला असता; अशा भूमिहीन शेतकऱ्यांच्या वर्गातून उत्पन्न झालेला बेकार मजुरांचा लोंढाचा लोंढा विदर्भभर आपणास दिसला असता व एका भयावह अवस्थेत विदर्भाची जनता ढकलली गेली असती. भाऊसाहेबांच्या दूरदृष्टीमुळेच ते संकट टळले हे त्याकाळच्या परिस्थितीचे अभ्यासक जाणतात व ही विदर्भाच्या शेतकऱ्यांच्या बाबतीत भाऊसाहेबांनी केलेली कामगिरी सर्वजण बहुमोल स्वरूपाची मानतात.

अशा या शेतकऱ्यांना शिक्षित करण्यासाठी १९३१-३२ साली त्यांनी श्री शिवाजी शिक्षण संस्थेची स्थापना केली. १९३७ मध्ये ते या संस्थेचे आजीव अध्यक्ष म्हणून निवडले गेले. अनेक महाविद्यालये व उच्च शिक्षण देणाऱ्या या संस्थांतून उत्तमोत्तम प्राध्यापक वर्गाची नियुक्ती त्यांनी केली. माध्यमिक, उच्च माध्यमिक शाळा विदर्भभर त्यांनी काढल्या. ग्रामीण भागांतून येणाऱ्या विद्यार्थ्यांसाठी वसतिगृहे काढली, मिरनिराळ्या प्रकारची सेवाकेंद्रे सुरू केली, व्यायामशाळा काढून विद्यार्थ्यांच्या शारीरिक विकासासाठी त्याद्वारे प्रयत्न केले. अमरावतीचे श्री शिवाजी कला -वाणिज्य महाविद्यालय व श्री शिवाजी विज्ञान महाविद्यालय, नागपूरचे धनवटे नॅशनल कॉलेज व तेथील शिवाजी शिक्षण संस्थेचे विज्ञान महाविद्यालय या सारख्या, भाऊसाहेबांनी सुरू केलेल्या महाविद्यालयांनी आज फार मोठा लौकिक प्राप्त केला आहे. त्याचे श्रेय भाऊसाहेबांच्या दूरदृष्टीला द्यावे लागेल.

भाऊसाहेब देशमुख अमरावती जिल्हा काँग्रेसचे अध्यक्ष असताना त्यांनी अमरावती

जिल्ह्यात प्राथमिक शिक्षण सर्व मुलांना सक्तीचे केले. शिक्षणावरील 'सेस' वाढवून सर्वांना शिक्षणाची सोय त्यांनी उपलब्ध करून दिली. संपूर्ण भारतातून पुढे अमरावती जिल्ह्याला साक्षरतेच्या बाबतीत केरळ खालोखालचे साक्षर जिल्ह्यांतील भारतातून जे दुसऱ्या क्रमांकाचे स्थान प्राप्त झाले त्याचा श्रीगणेशा सक्तीचे प्राथमिक शिक्षण करून, भाऊसाहेबांनीच केला होता. 'शहाणे करून सोडावे सकल जन' यासाठी त्यांनी शिक्षणाच्या माध्यमाचा उपयोग केला. पुढे शिक्षणमंत्री झाल्यावरही त्यांनी हेच धोरण राबविले. पूर्वी इकडच्या वऱ्हाडातील प्रदेशात नागपूरला व अमरावतीलाच महाविद्यालये होती. या नागपूर-अमरावतीच्या कॉलेजात गुणवत्तेनुसार विद्यार्थ्यांना प्रवेश दिला जाई. जागा देखील मर्यादित असत. ग्रामीण भागांतून आलेल्या बहुसंख्य विद्यार्थ्यांना त्यामुळे या महाविद्यालयांतून प्रवेश मिळणे कठीण जात असे. भाऊसाहेबांनी म्हणूनच या महाविद्यालयांत व त्यांच्याशी संलग्न वसतिगृहांत ग्रामीण भागातून येणाऱ्या विद्यार्थ्यांसाठी काही जागा राखीव ठेवण्याचे व ग्रामीण भागातील विद्यार्थ्यांना प्रवेशासाठी विशिष्ट सवलती देण्याचे धोरण अवलंबिले. नागपूरच्या सरकारी कृषि महाविद्यालयात व तेथील वसतिगृहातही पूर्वी जे सर्वांना नि:शुल्क शिक्षण व प्रवेश मिळे ती प्रथा बंद केली, कारण त्याचा लाभ फक्त काही सधन व उच्चवर्णीय वर्गाचेच लोक घेत असत; आणि प्रत्यक्ष खेड्यात राहाणारा व शेती करणारा विद्यार्थी नसला तरी त्याला गुणवत्तेनुसार ते नि:शुल्क शिक्षण घेणे सहज शक्य होत असे. म्हणून भाऊसाहेबांनी प्रत्यक्ष ग्रामीण भागातील शेती करणाऱ्या शेतकरी वर्गातील मुलांनी कृषि पदवीधर व्हावे म्हणून त्यांचेसाठी तेथे विशेष सवलती उपलब्ध करून दिल्या. कोणत्याही प्रकारचे शिक्षण घेणाऱ्या शेतकऱ्यांच्या मुलांसाठी शिक्षण शुल्कात एक तृतीयांश सूट उपलब्ध करून दिली. परिणामत: गरीब घरांतील अनेक विद्यार्थ्यांना शिक्षण घेणे सहज शक्य झाले.

डॉ. भाऊसाहेब पंजाबराव देशमुखांनी सर्व शेतकऱ्यांसाठी एकच धोरण ठेवले, मग तो शेतकरी कोणत्याही धर्माचा, संप्रदायाचा व जातीचा असो. धर्म वा जातीच्या आधारावर शेतकऱ्यांत भेदाभेद त्यांनी कधीच केला नाही. शेतकऱ्यांनी संघटित होऊन आपला दबाव शासनकर्त्यांवर टाकायला हवा. मार्क्स जसे जागतिक कामगारांचे ऐक्य उराशी बाळगून होता तीच गोष्ट शेतकऱ्यांच्या संदर्भात भाऊसाहेबांची होती. शेती असलेले, शेतात काबाडकष्ट करणारे, शेतीतून धान्योत्पादन करणारे सर्व शेतकरी व त्यांचे ऐक्य हा त्यांच्या जिव्हाळ्याचा विषय होता. सामाजिक क्रांतीचा, परिवर्तनाचा उगमच मुळी भारतासारख्या देशात कृषिक्रांतीपासून व्हायला हवा असे ते मानत होते. शेतकरी सुखी तर देश सुखी - असा साधासरळ विचार त्यांचा होता. आजचे शेतकऱ्यांचे आंदोलन, जे त्यांच्या दैन्यावस्थेमुळे आणि व्यापाऱ्यांकडून त्यांची होणारी पिळवणूक

लक्षात घेऊन शेतकऱ्यांनी छेडले आहे त्याचे पूर्ववर्ती एका अर्थाने भाऊसाहेबच वैचारिक दृष्टीने होते असे मानता येईल. शेतकऱ्यांच्या प्रश्नांना मुळात त्यांनीच हात घातला व आयुष्यभर शेतकऱ्यांच्या उन्नतीसाठी आणि उत्थानासाठी लढा दिला. मृतप्राय झालेल्या विदर्भाच्या शेतकरी वर्गात प्राण फुंकण्याचे काम सर्वप्रथम डॉ. भाऊसाहेब पंजाबराव देशमुखांनी केले.

भारताचे कृषिमंत्री असताना त्यांनी केलेला जपानी पद्धतीच्या भातशेतीचा प्रयोग, त्यासाठी त्यांनी केलेला देशव्यापी प्रसार आणि प्रचार या बाबी तर केवळ अभिनव स्वरूपाच्याच होत्या. भारताला अन्नधान्याच्या बाबतीत पुढे जो स्वयंपूर्णत्वाचाच नव्हे; तर अन्नधान्याची निर्यात करणारे राष्ट्र म्हणून दर्जा प्राप्त झाला त्याचे कारण भाऊसाहेबांच्या जवळ असलेली शेतीविषयक समस्या सोडविण्याची दृष्टी (Vision) हेच होते. जपानी पद्धतीच्या या भातशेतीच्या प्रयोगामुळे भारतात देशभर तांदुळाच्या उत्पादनाने एक प्रकारचा उच्चांक गाठला. साऱ्या जगाचे लक्ष त्यामुळे भारताकडे आकर्षित झाले व डॉ. भाऊसाहेब तांदूळ उत्पादनाच्या तंत्राचे एक तज्ज्ञ म्हणून साऱ्या जगात ओळखले जाऊ लागले. आंतरराष्ट्रीय तांदूळ संघटनेच्या १९५४ च्या टोकियो येथे झालेल्या परिषदेत भारतीय प्रतिनिधीमंडळाचे नेते म्हणून ते गेले. त्यांच्या भाषणाचा तेथे विलक्षण प्रभाव पडला. पुढे त्या संघटनेचे ते अध्यक्ष म्हणून निवडले गेले. भारताने तांदूळ उत्पादनात कशी क्रांती केली याचा वृत्तांत 'India's Rice Revolution' या ग्रंथातून दिलेला आहे. भारत सरकारने हा ग्रंथ प्रकाशित केला होता. दूरदृष्टी लाभलेले डॉ. भाऊसाहेब हे असे कर्ते कार्यकर्ते होते. भाऊसाहेबांनी शेतकऱ्यांच्या उद्धारासाठी अनेक योजना राबवल्या, अनेक संघटना स्थापन केल्या. 'राष्ट्रीय कृषी सहकारी खरेदी-विक्री संघ'; 'कृषक सहकारी भारतीय अधिकोष'; 'आफ्रो-आशिया ग्रामीण पुर्नरचना संघटना', 'कृषी सहाय्यक संघटना', 'अखिल भारतीय ताडगूळ महासंघ', 'कृषी उत्पादकांच्या आंतरराष्ट्रीय संघटनांचा महासंघ' अशा अनेक संघटनांच्या माध्यमातून त्यांनी कृषी व्यवसायाच्या उन्नतीसाठी केलेले कार्य अलौकिक स्वरूपाचे आणि त्यांच्या संघटनात्मक क्षमतेचे व कौशल्याचे द्योतक आहे.

डॉ. भाऊसाहेब पंजाबराव हे भारताच्या घटना परिषदेचे सदस्य होते. घटनेच्या कलमावर चर्चा सुरू असताना विशिष्ट जातीजमातींना शासकीय नोकऱ्यांत आरक्षण असावे हा विचार चर्चेला आला असताना, आरक्षणाचा निकष जातपात व संप्रदाय नसावा; तर आर्थिक दुर्बल घटकांना -मग ते कोणत्याही जातीचे, धर्माचे वा पंथाचे असोत आरक्षण उपलब्ध करून देण्यात यावे -हा विचार डॉ. भाऊसाहेबांनी व्यक्त केला होता. २२ नोव्हेंबर १९४९ ला घटना समितीत भाषण करताना जातीच्या आधारावर सवलती व संरक्षण देण्याची भूमिका आपल्याला मान्य नाही; तर सर्व

शोषित, गरीब व आर्थिक दृष्टीने दुर्बल लोकांना सवलतीचा लाभ उपलब्ध करून द्यावा ही भूमिका त्यांनी मांडली होती. आज त्यांचा हा विचार पुन्हा भारतीय राजकीय व्यवस्थेत काही विचारकांकडून प्रभावीपणे मांडला जात असलेला दिसतो. सर्व समाजाला एकरस आणि एकसंध करणारा हा विचार घटना परिषदेतील त्यांच्या भाषणातून त्यांनी पन्नास वर्षांपूर्वीच व्यक्त केला होता, हे विशेष आहे. घटना परिषदेत परिशिष्ट सात वर चर्चा होत असताना शेतकऱ्यांच्या कल्याणाच्या साठी सुचवलेली डॉ. भाऊसाहेबांची एक दुरुस्ती होती. त्यात सर्व प्रकारच्या शेतकऱ्यांचा (agriculturists of all sorts) उल्लेख जो भाऊसाहेबांनी केला त्यावरून घटनेच्या मसुदा समितीचे अध्यक्ष असलेले डॉ. बाबासाहेब आंबेडकर आणि डॉ. भाऊसाहेब देशमुख यांच्यात जी शाब्दिक चकमक झाली ती मोठी चिंतनीय आहे. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या मते 'agriculturists of all sorts' हे शब्द संदिग्ध (ambiguous) आहेत. त्यात जमीनदार, जहागीरदारही येऊ शकतात; जे पाच पाच लाखांचा शेतसारा देत असतील. आपण मग काय त्यांचेही कल्याण अपेक्षावे काय? - असे डॉ. बाबासाहेबांनी म्हटले. त्यावर ते शब्द गाळावेत असे आर. ए. सिधवा म्हणाले. डॉ. बाबासाहेब आंबेडकर म्हणाले की 'शेतकरी' या शब्दाचा नेमका अर्थ नाही. 'It may mean a rack-renter, It may mean a person who is actually a cultivator. It may mean a person who has got two acreas, or five lack acres.' त्यावर ती शब्दयोजना गाळायला मी तयार आहे असे डॉ. भाऊसाहेब पंजाबराव म्हणाले. त्यावर डॉ. बाबासाहेब आंबेडकर म्हणाले की वेगवेगळ्या एन्ट्रीजकडे व त्यातील अर्थाकडे डॉ. भाऊसाहेब द्यावे तेवढे लक्ष देताना दिसत नाहीत. त्यावर घटना परिषदेत उसळून डॉ. भाऊसाहेब एकदम ताडकन् म्हणाले 'what fallacious arguments are being advanced! For that matter, Labour welfare is a specific entry and yet you wanted separate provision for their vocational training? Do not advance fallacious arguments.' त्यातच पुढे या शाब्दिक चकमकीनंतर डॉ. आंबेडकर म्हणाले- 'Why can't you have some patience? I know my job. Do you mean to say I do not know my job? I certainly know my job' त्यावर डॉ. भाऊसाहेबांनी उत्तर दिले 'I know your attitude also. Do not try to fool everybody'. या उत्तरप्रत्युत्तरानंतर डॉ. भाऊसाहेब त्याच सत्रात म्हणाले 'is there no class of persons except agricultural labour in this country? Has Dr. Ambedkar heard of a class called 'farmers' and 'Peasants'? त्यावर डॉ. बाबासाहेब आंबेडकर म्हणाले की 'Their welfare will be attended to under entries 21 and 24 of the provincial list as I have already explained.'

हे एवढे विस्ताराने सांगायचे कारण म्हणजे दोघेही महापुरुष भारताची राज्यघटना शब्दश: निर्दोष, नि:संदिग्ध व सर्वकल्याणकारी कशी राहील याबद्दल व घटनेतील प्रत्येक शब्द बिनचूक व नेमका अर्थ स्पष्ट करणारा असण्याबद्दल किती दक्ष असत हे कळावे एवढेच आहे. दोन कायदेपंडितांची अशी शाब्दिक झुंज दोघांचेही त्या त्या क्षेत्रातील श्रेष्ठत्व व कसब किती होते यावर प्रकाश टाकतात. डॉ. भाऊसाहेबांनी घटना परिषदेच्या कामकाजात किती दक्षतेने आणि जागरुकतेने भाग घेतला, प्रसंगी पक्षाचे आदेश बाजूला सारूनही आपल्या विवेकाला व मनोदेवतेला पटेल ते निर्भीडपणे सांगून घटनापरिषदेच्या तशा एरव्ही रूक्ष अशा कामकाजात कसा जिवंतपणा कायम ठेवला हे डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनीच त्यांच्या २६ नोव्हेंबर १९४९ रोजी घटनेच्या संपूर्ण चर्चेनंतर उत्तरादाखल केलेल्या भाषणातून स्पष्ट केले. त्यात डॉ. आंबेडकरांनी म्हटले आहे की – 'घटना परिषदेचे सर्वच सभासद जर पक्षाच्या कडक शिस्तीने बांधले गेले असते तर परिषदेचे कामकाज अत्यंत रूक्ष व कंटाळवाणे झाले असते. पण सुदैवाने काही सभासदांनी पक्षाची शिस्त मोडून बंडखोरी केली, त्यामुळे चर्चेला रंग येत गेला. श्री. कामत, डॉ. पी. एस. देशमुख, श्री. सिध्वा, प्रो. सक्सेना आणि पं. ठाकूरदास भार्गव या बंडखोरांप्रमाणेच प्रो. के. टी. शहा व पं. हृदयनाथ कुंझरू यांच्यामुळे सभागृहात सदैव चैतन्य खेळत राहिले.... त्यांनी उपस्थित केलेले मुद्दे बहुतेक वैचारिक स्वरूपाचे होते... मला त्यांचे विशेष आभार मानले पाहिजेत. कारण त्यांनी जर आपले अस्तित्व प्रकट केले नसते तर घटनेसंबंधीची काही पायाभूत मूलतत्त्वे सभागृहाकडे मांडण्याची मला संधी मिळाली नसती. घटना यांत्रिक रीतीने पास करून घेण्यापेक्षा हे तत्त्वविवेचन माझ्या दृष्टीने अधिक मोलाचे होते.' बॅ. बाबासाहेब आंबेडकरांचे हे वक्तव्य म्हणजे एका घटनापंडिताने घटनातत्त्वांचे मूलगामी विवेचन घटनापरिषदेत करणाऱ्या डॉ. भाऊसाहेब पंजाबराव देशमुखादि प्रतिभाशाली कायदेपंडितांना केलेला गौरवपूर्ण सलाम आहे व त्यातच डॉ. भाऊसाहेब पंजाबराव देशमुखांचे अलौकिकत्व आहे ही गोष्ट स्पष्ट आहे.

प्रशासनाच्या कार्यातही भाऊसाहेब पंजाबराव देशमुखांनी मंत्री म्हणून काम करताना अनेकदा आपल्या प्रशासकीय क्षमतेचा परिचय करून दिला होता. मध्यप्रांत आणि वऱ्हाडच्या शासनात मंत्री म्हणून काम करताना (स्व.) विष्णू भिकाजी कोलते यांच्या प्राध्यापक पदावरील नियुक्तीचे वेळी निवड मंडळाकडून योग्य व्यक्तीची निवड करण्यात आलेली नाही, कोलत्यांना डावलण्यात आलेले आहे हे त्यांच्या लक्षात येताच त्याबद्दलची सारी कागदपत्रे प्रत्यक्ष तपासून घेऊन, 'निवडसमितीच जिचा कार्यकाळ संपलेला आहे अशी असल्याने व ती बाब मांडण्यापासून मुद्दाम दडवून ठेवल्याचे सिद्ध झाल्याने' त्यांनी ह्या निवडसमितीने केलेली सर्व कारवाई अवैध ठरवून सरकारला नवीन निवड समिती नेमण्यास भाग पाडले होते. नंतर

नेमलेल्या निवड समितीने शिफारस केलेले कोलत्यांचे नाव त्यांनी उचलून धरले. सोपीव खात्याच्या बाबतीतही जर हिंदी मंत्र्यांच्या निर्णयाला महत्त्व देण्यात येत नसेल तर मंत्री म्हणून काम करण्याची आपली अजिबात इच्छा नाही असे त्यांनी गव्हर्नरला निक्षून सांगितले. त्यांच्या या ठाम भूमिकेमुळेच कोलत्यांची निवड प्राध्यापकपदासाठी होऊ शकली. नोकरशाहीच्या तालाने चालणाऱ्या मंत्र्यांसारखा भाऊसाहेबांचा पिंड नव्हता ही गोष्ट त्या प्रकरणातून सहज सिद्ध झाली. मॉरिस कॉलेजात इंग्रजी विषयाच्या प्राध्यापकाच्या जागेसाठी देखील कुसुमावती देशपांडे यांना त्या केवळ स्त्री असल्याने महाविद्यालयाच्या पुरुष शाखेत प्रवेश वा नियुक्ती न देणे हे अन्यायमूलक व स्त्री जातीवर घोर अन्याय करणारे ठरेल व प्रसंगी सरकारी नियमांत बदल करून स्त्रियांना ती संधी उपलब्ध करून दिलीच पाहिजे – अशी स्त्री–पुरुष समतेच्या दृष्टीने महत्त्वाची भूमिका डॉ. भाऊसाहेबांनी घेतली होती हे सर्वविदित आहे. सांसदीय पद्धतीच्या मंत्र्यांच्यात इतरांकडून व विशेषतः आपल्या हाताखालील नोकरशाहीकडून कामे करवून घेण्याची जी पात्रता व प्रशासकीय क्षमता असावी लागते ती प्रशासकीय क्षमता डॉ. भाऊसाहेबांच्या ठिकाणी पुरेपूर होती हे वरील उदाहरणांवरून सिद्ध होते. चारित्र्य, सचोटी, प्रामाणिकपणा, स्वतः पुढाकार घेऊन काम करण्याची वृत्ती, आपण हाताळत असलेल्या विषयाचा सर्वांगीण अभ्यास करण्याची प्रवृत्ती व सततची उद्यमशीलता– हे प्रशासकाचे अंगी आवश्यक असणारे गुण भाऊसाहेबांचे ठिकाणी पुरेपूर होते म्हणून अनेक संस्थांच्या कार्याचा पसारा ते मोठ्या कुशलतेने सांभाळू शकले हे उघड आहे.

डॉ. भाऊसाहेब देशमुखांची प्रतिभा अशी चतुरस्त्र होती. समाजनिष्ठा हा त्यांच्या व्यक्तित्वाचा स्थायीभाव होता. आपण ज्या समाजात जन्मलो त्या समाजातील दीनदुबळ्या आणि अशिक्षित व हलाखीचे जीवन जगणाऱ्या लोकांच्यासाठी आपण आपले आयुष्य खर्ची घातले पाहिजे; जे ज्ञान व बुद्धिमत्ता आपल्याला मिळाली आहे, आपल्यामध्ये जे जे काही चांगले गुण आहेत, त्यांचा उपयोग स्वतःचे व्यक्तिगत जीवन सुखसमृद्धीचे करण्यापेक्षा सामाजिक जीवन उन्नत करण्यासाठी केला पाहिजे– हा विचार ते इंग्लंडात असतानाच त्यांनी पक्का केला होता. २८ सप्टेंबर १९२१ रोजी एडिनबरो येथून त्यांच्या वडिलांना लिहिलेल्या एका पत्रात ते लिहितात, ''मी आय्. सी. एस्. न झालो तरी आपली निराशा होऊ नये. कारण आय्. सी. एस्. होण्यापेक्षा जगात हजारो पटीने चांगल्या व लोकहिताच्या व त्याचबरोबर कीर्तीच्या असणाऱ्या कितीतरी गोष्टी आहेत. हिंदुस्थानची आजची खरी गरज निःस्वार्थ व स्वतंत्र बाण्याच्या माणसाची आहे व ही गरज मी काही अंशी जर भरून न काढली तर मी व्यर्थ जन्माला आलो असे समजेन.'' असा विचार मुळी विद्यार्थीदशेत मनात येणे, हेच असामान्यत्वाचे लक्षण आहे. सर्वसामान्यांहून त्यांची वेगळीक स्पष्ट होण्याच्या दृष्टीने हे पत्र पुरेसे

बोलके आहे.

डॉ. भाऊसाहेब पंजाबराव देशमुख यांच्या जीवनातील अग्रक्रमावर भाष्य करताना बाबासाहेब घारफळकर असे म्हणतात की, ''पंजाबराव सत्ता मिळवीत मिळवीत ध्येयाकडे गेले नाहीत! उलट ध्येय ठरवीत ते सत्ताप्राप्तीचे प्रयत्न करीत होते. थोरांच्या जीवनाप्रमाणे, कार्याप्रमाणे त्यांच्या जीवनातील अग्रक्रमही महत्त्वाचेच असतात याचे प्रत्यंतर आणि स्थित्यंतर त्यांच्या कार्यातून आणि ध्येयवादातून घडते. पंजाबराव ध्येयवादात नेहमीच अग्रणी राहिले. प्रयत्नात आणि त्यागात आघाडीवर दिसले, सत्ता संघर्षात कटाक्षाने फक्त प्रतिगाम्यांशीच झुंजले. या पक्क्या पथ्यातूनच त्यांचे सामाजिक व्यक्तिमत्त्व निकोप राहिले. पण त्यामुळेच ते वैयक्तिक सत्तासंघर्षात, पक्षीय राजकारणात आणि संघटनेत कच्चे बनले! पंजाबराव स्वत:साठी लढलेच नाहीत. म्हणूनच दुसरा पंजाबराव होणे नाही, असे जाणते मानतात! सर्वस्वाचा त्याग! भोगासाठी उदास! एवढा एककल्ली माणूस एवढेही यश मिळवितो हेही नवलच! पंजाबराव एक आश्चर्यच! नोकरीत शिरला नाही! काँग्रेसमध्ये विरला नाही! स्वार्थात रमला नाही! युद्धात हरला नाही! मरणात संपला नाही!'' त्यांच्या एकनिष्ठ अनुयायांनी त्यांच्या जीवनातील अग्रक्रमाबद्दलचे केलेले उपरोक्त वर्णन पंजाबरावांची थोरवी नेमकी कशात होती यावर प्रकाश टाकते.

केवळ विदर्भातीलच नव्हे तर अखिल भारतातील शेतकरी व ग्रामीण समाजाच्या उन्नतीचे स्वप्न पाहाणारे आणि त्यासाठी आयुष्यभर देह झिजविणारे हे व्यक्तिमत्व १० एप्रिल १९६५ रोजी दिल्ली मुक्कामी अनंतात विलीन झाले व ईश्वराने भल्या कामासाठी दिलेला देह आणि जीवन त्याच ईश्वराप्रत समर्पित करते झाले.

डॉ. भाऊसाहेबांनी केलेले कार्य तितक्याच जोमाने, उत्साहाने आणि नि:स्वार्थ समाजनिष्ठ भावनेने करण्याचे उत्तरदायित्व त्यांच्या असंख्य अनुयायांच्या खांद्यावर ते सोडून गेले. अनुयायांच्यांत त्यांच्या गुणांपैकी काही थोडे गुणही जरी अल्पांशाने असले तरी त्यांचे कार्य त्यांनी दाखविलेल्या मार्गाने जाऊन अनुयायी करू शकतील. पण त्यासाठी त्यांनी भाऊसाहेबांच्या गुणांचा वारसा आपल्याजवळ त्यांची ठेव म्हणून जोपासला पाहिजे. यात जर अनुयायांनी कुचराई केली तर भाऊसाहेबांनी आयुष्यभर उराशी बाळगलेले स्वप्न भंग पावण्यास वेळ लागणार नाही. जेजस् ख्राईस्टचे एक वचन आहे की, “Not knowing how to punish a Great man, God creates his disciples”. प्रत्येक थोर विचारवंताच्या विचारांची आणि कार्याची मृत्युघंटा त्याच्या शिष्यांचे कडूनच वाजविली जात असते. डॉ. भाऊसाहेबांचे अनुयायी व शिष्य त्याला अपवाद ठरतील एवढी किमान अपेक्षा आपण करायला हवी.



# स्वातंत्र्य चळवळीत भाऊसाहेबांचे योगदान

सुरेंद्र भुयार

---

आपला देश राम-कृष्णाचा-बुद्ध-नानकाचा देश म्हणून ओळखला जातो. असा भारतवर्ष हजारो वर्षे पारतंत्र्यात होता. येथील वैदिक संस्कृतीने 'कृषिमीत कृषस्व' असा संदेश दिला, शेतीच कर असे सांगितले. त्या ह्या पुराणप्रसिद्ध राष्ट्रातील शेतकरी नेहमीच उपाशी व वंचित राहिला. ज्या देशातील ऋषीमुनींनी 'वसुधैव कुटुम्बकम्'ची भूमिका घेतली व 'कृणतु न विश्वंआर्यम्' ची घोषणा केली त्या देशातील उच्चवर्णीय लोक व राजे महाराजे आपल्या देशातील लोकांना आपल्या कुटुंबात सामावून घेऊ शकले नाही व आपल्या घरातील स्त्रियांनासुद्धा आर्य म्हणजे सुसंस्कृत करू शकले नाही. आणि म्हणूनच परकीय मूठभर आक्रमकांना हा देश पादाक्रांत करता आला व येथील जनसामान्यांना लुबाडून नेता आले. अर्धा भारत हजारो वर्षे बहिष्कृततेचे, अस्पृश्यतेचे व गुलामीचे जीवन जगत असताना चातुर्वर्ण्याचे घाणेरडे तत्त्वज्ञान रवंथ करणारी मंडळी परकीय राजवटींना स्थिरता आणून केवळ मूठभर लोकांसाठी या देशातील साधनसंपत्तीचा दुरुपयोग करण्यात मशगुल होती. अशा ह्या अत्यंत भयानक अंध:काराचा प्रथम छेद छत्रपती शिवरायांनी गोरगरीबांसाठी हिन्दवी स्वराज्याची संस्थापना करून केला व स्वातंत्र्याच्या मंगल किरणांनी सर्वसामान्यांच्या झोपड्या उजळून टाकल्या. शिवशाहीनंतर पेशवाई, नंतर पेशव्यांकडून १९१८ साली इंग्लंडमधील ईस्ट इंडिया कंपनीने हा खंडप्राय देश एक एक प्रांत ताब्यात घेत पूर्णत: कब्जात घेतला.

परकीय राजवटीत हा देश असताना अधूनमधून स्वातंत्र्योत्सुक वीर नायकांकडून देश स्वतंत्र करण्याचे फुटकळ प्रयत्न देशाच्या विविध भागांत सुरू असायचे. राजकीयदृष्ट्या संपूर्ण पारतंत्र्यात असलेल्या ह्या देशात सामाजिक-शैक्षणिक व आर्थिकदृष्ट्या जवळपास ९० टक्के समाज हा वंचित होता. अशा ह्या भयंकर दुभंगलेल्या राष्ट्रावर राज्य करणे परकीय आक्रमकांना अत्यंत सहजसुलभ होते. या देशाला इंग्रजी

साम्राज्यवाद्यांनी प्रथमतः राजकीयदृष्ट्या राज्यकारभार करणे सोयीचे जावे म्हणून एक केले. त्यांचा राज्यकारभार योग्य व्हावा म्हणून या देशातीलच उच्चवर्णीय लोकांनी आपल्या सेवा त्यांच्या चरणी अर्पित केल्या. इंग्रजांनी या देशातील लोकांना इंग्रजी शिक्षणाचे दार मोकळे केल्यावर त्याचा सर्वप्रथम उपयोग येथील शिक्षणातील मक्तेदारांनी करून घेतला. युरोपात विज्ञानाचे नवीन नवीन शोध लावून एक नवीन औद्योगिक युगाची सुरुवात झाली व इंग्रजी राज्यकर्त्यांनी या देशातील गावगाडा नष्ट करून परंपरागत कारागीरांना बेकार करून भारताला 'कच्चा माल पुरविणारी बाजारपेठ' म्हणून शोषणाची एक नवी रीत शोधली व एका नव्या गुलामीत देशाला लोटले. अशा ह्या स्थितीत इंग्रजांनी या देशातील शेतकरी-कामगारांचे अपरिमित आर्थिक शोषण करून स्वतः जगातील प्रबळ भांडवलदारी व औद्योगिक राष्ट्र म्हणून आपली प्रगती करून घेतली. या पार्श्वभूमीवर भारतातील थोर स्वातंत्र्य सेनानींचे नेतृत्वाखाली या ठिकाणी स्वातंत्र्याकरिता लढे उभारण्यात आले. १८५७ च्या प्रथम स्वातंत्र्य लढ्यातील पराजयानंतर १८८५ साली काँग्रेसची स्थापना व नंतर टिळक-गांधी-सुभाष-भगतसिंग आदि देशभक्तांचे प्रयत्नाने १५ ऑगस्ट १९४७ ला हा देश स्वतंत्र झाला.

या देशाचा स्वातंत्र्य संग्राम सुरू असताना सामाजिक व शैक्षणिक क्षेत्रांत अनेक नेत्यांनी मोलाची कामगिरी केली. समाजातील सर्व घटकांना समान शिक्षण व समान न्याय मिळावा म्हणून चळवळी उभारल्या. देशातील कुप्रथा, वाईट परंपरा याचे विरोधात आंदोलनाची भूमिका घेऊन जनजागृती केली. म. जोतिबा फुले, स्वामी दयानंद सरस्वती, राजा राममोहन रॉय ह्या त्या महान व्यक्ती होत, ज्यांच्या त्यागामुळे स्वातंत्र्य संग्रामाकरिता राष्ट्राच्या सर्व थरांतून शिक्षित सत्याग्रही स्वातंत्र्य सैनिक राजकीय नेत्यांना मिळू शकले. महात्मा गांधींचा अहिंसक सत्याग्रह, नेताजींच्या आझाद हिन्द सेनेची चढाई व शहीद भगतसिंगासारख्या दहशतवादी क्रांतिकारकांचे बलिदान यांतून या देशाला स्वातंत्र्य मिळाले. या देशात शेतकऱ्यांचे व कामकऱ्यांचे राज्य यावे व शोषणविरहित समाजव्यवस्था यावी ही उपरोक्त तीन हुतात्म्यांची अंतीम इच्छा होती.

स्वातंत्र्याच्या सुवर्ण महोत्सवानंतर आपण आपल्या देशातील एका महान भारतरत्नाची जन्मशताब्दी साजरी केली. हा देश स्वतंत्र व्हावा, येथील खेड्यापाड्यातील गोरगरिबांच्या झोपडीपर्यन्त शिक्षणाची गंगा जावी व देशाचा पोशिंदा शेतकरी कर्ज-मुक्त जीवन जगून या राष्ट्रातील शेतीला व शेतकऱ्याला उर्जितावस्था यावी यासाठी ज्या महापुरुषाने भगीरथ प्रयत्न केले त्या डॉ. भाऊसाहेब पंजाबराव देशमुखांचे चरित्रात आपणास या देशाच्या समृद्धीचे बीज आढळेल.

समकालीन नेतृत्वामध्ये आपल्या आगळ्या वेगळ्या काम करण्याच्या पद्धतीमुळे डॉ. पंजाबराव स्वातंत्र्य संग्रामात नव्हते असा गैरसमज होण्याचा संभव आहे, म्हणून हा लेखनप्रपंच.

डॉ. भाऊसाहेब पंजाबराव देशमुख हे भारत कृषक समाजाचे संस्थापक व श्री शिवाजी शिक्षण संस्थेचे संस्थापक म्हणून जितके लोकप्रिय व परिचित आहेत तितकेच ते क्रांतिकारी देशभक्त होते या गोष्टीकडे जवळपास दुर्लक्ष झाले आहे.

अमरावती येथे विद्यालयीन शिक्षण व पुणे येथे महाविद्यालयीन शिक्षण सुरू असतानाच त्यांचे वडिलांनी आपली शंभर एकर जमीन मारवाडी सावकाराकडे गहाण ठेवून त्यांना उच्च शिक्षणाकरिता इंग्लंडला पाठविले. त्या ठिकाणी भाऊसाहेबांची आय्.सी.एस्. होण्याची इच्छा होती. त्या करिता एम्.ए. होणे आवश्यक असल्यामुळे त्यांनी संस्कृतात एम्.ए. केले तसेच बार-ॲट-लॉ केले. जन्मतारखेतील घोळामुळे ते आय्.सी.एस्. ला बसू शकले नाही; परंतु त्या संदर्भात आपले मावसभाऊ व वडिलांना लिहिलेल्या पत्रात त्यांनी स्पष्ट शब्दात लिहिले की मी आय्.सी.एस्. झालो तरी सरकारी नोकरी स्वीकारणार नाही. हिन्दुस्थानची आजची खरी गरज नि:स्वार्थी व स्वतंत्र बाण्याच्या माणसाची आहे व ही गरज मी काही अंशी जर भरून न काढली तर मी व्यर्थ जन्माला आलो असे समजेन. त्यांचे सोबत तेथे सुभाषचंद्र बोस सुद्धा शिकायला होते व त्यांनी आय्.सी.एस्. ची परीक्षा पास झाल्यावर तेथूनच सरकारी नोकरी न स्वीकारण्याबाबतचे पत्र आपल्या आईवडिलांना लिहिले होते. इंग्लंडला शिकत असतानाच भाऊसाहेब भारतात परत आल्यावर काय करायचे याचा तपशील ठरवीत होते. त्यांनी वेदांचा अभ्यास करून धर्मावर प्रबंध सादर केला व डी. फिल्. ही अत्युच्च पदवीसुद्धा मिळविली. इंग्लंडवरून परत येताच भाऊसाहेबांनी अमरावतीस राहून ग्रामीण शेतकऱ्यांची सेवा करण्याचा निर्णय घेतला व त्याप्रमाणे पावले टाकली. सर्वप्रथम त्यांनी समाजातील गरीब-होतकरू व हुशार विद्यार्थ्यांसाठी मराठी माध्यमातून शिक्षणाची, राहाण्याची व भोजनाची मोफत व्यवस्था केली. त्या करिता त्यांनी म. गांधींचे सहकारी, सुप्रसिद्ध स्वातंत्र्यसेनानी व आर्य समाजाचे नेते हुतात्मा स्वामी श्रद्धानंद यांचे स्मृतिप्रीत्यर्थ १९२६ साली वसतिगृह काढले. त्यावर्षी एका मुस्लिम माथेफिरूने त्यांचा खून केला होता. त्यामुळे वसतिगृहास स्वामी श्रद्धानंदांचे नाव देऊन त्यांच्या अंतरीची स्वातंत्र्याची प्रेरणा व भावना किती जागृत आहे हे दाखवून दिले. हे काम करीत असताना ते एखाद्या इंग्रज अधिकाऱ्याचे नावानेही वसतिगृह काढू शकले असते. पुढे चालून याच वसतिगृहातील अनेक विद्यार्थी व वसतिगृहाचे चालक फरकाडे यांनी म. गांधी यांचे नेतृत्वाखाली स्वातंत्र्य चळवळीत भाग घेऊन तुरुंगवास पत्करला. त्यांची नावे आपणास अमरावती जिल्ह्याच्या स्वातंत्र्यवीरांचे

यादीत पाहावयास मिळतील. भाऊसाहेबांनी आपले वसतिगृहातील विद्यार्थ्यांमध्येच नव्हे तर शेतकऱ्यांसाठी विदर्भात व देशात फिरत असताना स्वातंत्र्यासाठी लोकांना गांधींचे नेतृत्वाबाबत उत्कंठा निर्माण केली. ते महात्मा गांधींचा आदर करीत. इतकेच नव्हे तर अमरावतीचे किंग एडवर्ड कॉलेजचे विद्यार्थ्यांनी १९३० साली स्नेहसम्मेलनाकरिता जेव्हा तेव्हाचे देशातील तरुणांचे आवडते नेते ३३ वर्षीय देशगौरव सुभाषचंद्र बोस यांना अतिथी म्हणून बोलवायचे ठरविले तेव्हा भाऊसाहेबांनीच सुभाषबाबूंना पत्र देऊन विद्यार्थ्यांना साथ दिली. तेव्हा कॉलेजच्या इंग्रज प्राचार्याने कॉलेजचे दरवाजे बंद केल्यामुळे विद्यार्थ्यांना कॉलेजचे आवाराचे बाहेर सुभाषबाबूंचे उपस्थितीत स्नेहसम्मेलन पार पाडावे लागले. १९३०-३२ मध्ये अमरावती जिल्ह्यातील खेड्यापाड्यांत त्यांनी खादीचा प्रचार केला व म. गांधींचा ग्रामोद्योगाचा कार्यक्रम राबविला. हा देश स्वातंत्र्याकरिता सर्वतोपरी सज्ज व्हावा व येथील जाती-जमातींतील लोकांना आंदोलनात भाग घेता यावा म्हणून लाला लजपतराय यांचे अध्यक्षतेखाली झालेल्या हिंदु महासभेचे अधिवेशनात भाग घेऊन भाऊसाहेबांनी चातुर्वर्ण्याचा धिक्कार केला. तसेच अस्पृश्यता हा देशाला कलंक आहे या करिता दलितांना सर्व मंदिरांचे दरवाजे खुले व्हावे म्हणून डॉ. बाबासाहेब आंबेडकरांना बोलावून त्यांनी अंबादेवीचे मंदिरावर सत्याग्रह आयोजित केला. इंग्रजांचे गुलामीतून देश मुक्त होण्याचे अगोदर या देशातील बहिष्कृत भारत-दलित पीडित समाज आपल्याच उच्चवर्णीय बांधवांचे सामाजिक व आर्थिक गुलामगिरीतून मुक्त व्हावा म्हणून त्यांनी लढा दिला. शेतकरी संघाची स्थापना केली. कृषकांना कर्ज मुक्त करण्याकरिता मध्यप्रांत वऱ्हाडचे मंत्रिमंडळात मंत्री असताना कर्ज लवाद बिल आणले. तसेच डिस्ट्रिक्ट कौंसिलचे अध्यक्ष असताना बहुजन समाजाकरिता सक्तीचे शिक्षण करून शिक्षणाचे दार सर्वांसाठी मोकळे केले. भाऊसाहेबांच्या शिक्षणसंस्थेतून शिकलेलाच तरुण भारताच्या स्वातंत्र्य संग्रामातील तडफदार सैनिक म्हणून इंग्रजी साम्राज्यवाद्यांशी लढला. हजारोंच्या संख्येने शेतकरी कर्ज लवाद बिलामुळे कर्जमुक्त झाला व सावकाराचे घरात जाणारी त्याची शेती वाचली व त्यामुळे तो इंग्रजी साम्राज्यवाद्यांशी लढण्याकरिता म. गांधींचे नेतृत्वाखाली १९३०-१९४० व १९४२ चे स्वातंत्र्य संग्रामात भाग घेऊ शकला. शिक्षणामुळे बहुजन समाजाला राजकीय स्वातंत्र्याचे मोल कळले व हे मोल कळावे म्हणून सर्वप्रथम भाऊसाहेबांनी बहुजन समाजाला सामाजिक-शैक्षणिक, सांस्कृतिक व आर्थिक गुलामगिरीतून मुक्त करण्याचा वसा घेतला. सामाजिक सांस्कृतिक, शैक्षणिक व आर्थिकदृष्ट्या स्वतंत्र समाजच राजकीयदृष्ट्या स्वतंत्र होण्यास लायक असतो. तो राजकीय स्वातंत्र्य मिळवून ते टिकवून त्या स्वातंत्र्याचा जीवनाच्या सर्व क्षेत्रातील विकासाकरिता उपयोग करून घेऊ शकतो हे भाऊसाहेब समजून होते.

भाऊसाहेब सामाजिक व शैक्षणिक कामाची सुरुवात स्वत:पासून करायचे. सामाजिक क्षेत्रात काम करीत असताना समाजातील सर्व वर्गांतील लोकांना समानतेची वागणूक, उच्च-नीच हा भेद नष्ट करून जाती, पाती नष्ट करण्याचा चंग त्यांनी बांधला. त्याची सुरुवात स्वत:पासून केली. शेकडो एकर जमीन व लाखांचे वर हुंडा मिळत असताना सुद्धा जातीतील श्रीमंताचे मुलीशी विवाह न करता त्यांनी आंतरजातीय विवाह केला. आई-वडिलांचे तेरवी व श्राद्ध कार्यक्रमांत जुन्या परंपरागत वाईट प्रथांना फाटा देऊन दलित अस्पृश्य मुलांना जेवू घातले. इतकेच नव्हे तर त्यांनी अमरावतीच्या सिटी क्लबमध्ये स्वत:च्या विवाहाचे स्नहभोजन कार्यक्रमाची सर्व व्यवस्था भंगी समाजाचे मुलांच्या हाती दिली. इंटरपर्यंत शिक्षण झालेल्या सौ. विमलाबाईंना त्यांनी विवाहानंतरसुद्धा शिक्षण घेऊ दिले व त्यामुळेच विदर्भातील प्रथम कायदेपंडिता म्हणून त्या पुढे आल्या व भाऊसाहेबांसोबत सर्व सामाजिक व शैक्षणिक कार्यात अग्रेसर राहिल्या. देशाच्या लोकसभेत त्यांनी भाऊसाहेबांच्या जागी अमरावती विभागाचे प्रतिनिधित्व केले. तसेच पतिनिधनानंतर लाखो रुपये श्री शिवाजी शिक्षण संस्थेस अर्पण केले. ही सर्व भाऊसाहेबांची प्रेरणा व शिकवण.

इंग्लंडवरून शिक्षण पूर्ण करून आल्यानंतर त्यांनी आपल्या सामाजिक कार्याची सुरुवात एका स्वातंत्र्य सैनिकाचे म्हणजेच स्वामी श्रद्धानंदांचे नावाने वसतिगृह काढून केली. १९३०-३२ साली श्री शिवाजी महाराजांचे नाव देऊन शिक्षण संस्था स्थापन केली. आज शिवाजी शिक्षण संस्था ही देशातील तळागाळातील लोकांना शिक्षण देणारी अग्रगण्य संस्था आहे. वैद्यकीय, अभियांत्रिकी, विज्ञान, कृषी, विधी, कला, वाणिज्य, शारीरिक तसेच शिक्षणशास्त्र, पशुसंवर्धन, चित्रकला इत्यादी सर्व विद्याशाखांतील शिक्षण विदर्भाचे प्रमुख शहरांपासून तर खेड्यापाड्यापर्यन्त सर्व समाजाला देण्याचे काम ही संस्था अविरतपणे करीत आहे. त्या काळात शिवाजी महाराजांचे नावाऐवजी गव्हर्नर जनरल किंवा पंचम जॉर्जचे नावाने शिक्षण संस्था काढून भाऊसाहेबांना ब्रिटिश शासनातील मानाची जागा पटकाविता आली असती. भाऊसाहेबांनी इंग्रजी राजवटीत शेतकरी संघ स्थापन करून शेतकरी-कामकऱ्यांच्या भरवशावर डिस्ट्रिक्ट कौन्सिल व असेंब्लीचे निवडणुकीत विजय संपादन केला. केवळ १९३७ चे निवडणुकीत म. गांधींच्या लोकप्रियतेमुळे काँग्रेसचा उमेदवार त्यांना चार मतांनी पराभूत करू शकला व तो पराभव हा विदर्भातील बहुजन समाजाचा पराभव ठरला.

१९३७ चे पराभवानंतर देवास संस्थानचे आग्रहावरून त्यांनी मंत्रीपद स्वीकारले. संस्थानचे कारभारात क्रांतिकारी बदल केला. देशातील संस्थानिकांचे परिषदेत बोलताना इंग्रज सरकारची कुठलीही भीडमुर्वत न ठेवता देशाचे स्वातंत्र्यसंग्रामास संस्थानिकांनी

सहानुभूतिपूर्वक पाहिले पाहिजे व काळाची पाउले ओळखून एकसंध भारत निर्मितीस प्रोत्साहन दिले पाहिजे असे ठणकावून सांगितले. त्यामुळे सर्व संस्थानिक नाराज झाले. आता इंग्रज सरकार आपल्यावर कारवाई करील असे पाहून आपल्या संस्थानावर बला आणणारा हा माणूस हाकलून लावण्याचा निर्णय देवास सस्थानचे राजकन्येने व तिच्या सल्लागारांनी घेतला असताना आजारी असलेल्या देवासच्या खासे साहेबांनी भाऊसाहेबांची बाजू घेतली. 'मी माझा माणूस म्हणून डॉ. पंजाबरावांना पाठविले होते. ते जे काही बोलले ते माझ्या वतीने बोलले, त्यामुळे जी काही कारवाई करायची असेल ती ब्रिटिश सरकारने माझ्यावर करावी' असे सुनावले.

१९३९ साली झालेल्या मराठा शिक्षण परिषदेत व तत्सम निरनिराळ्या सामाजिक व शैक्षणिक परिषदेत अध्यक्ष अथवा उद्‌घाटक म्हणून बोलताना त्यांनी देशातील लोकांना स्वातंत्र्याची प्रेरणा दिली. इंग्रज सरकारने दुसऱ्या महायुद्धात मदत मागितली असता मराठा लीग परिषदेने उत्सुकता दाखविली, तेव्हा नाशिक येथे काकासाहेब वाघांनी भाऊसाहेबांना भाषणाकरिता पाचारण केले. त्या परिषदेत विदर्भातील एक नामवंत बॅरिस्टर व शेतकऱ्यांचे पुढारी डॉ. पंजाबराव देशमुख व्यासपीठावर केव्हा येतात याची जनता वाटच पाहात होती. त्या दिवशी भाऊसाहेबांचे जिभेवर अक्षरश: सरस्वती व रणचंडिका दोघीही आरूढ झाल्या होत्या. भाऊसाहेबांनी इंग्रज सरकारची भीडमुर्वत न ठेवता उपस्थित संस्थानिकांना, समाजातील मोठ्या प्रस्थापित धेंडांना सुनावले - "इंग्रजांनी यापूर्वी तुमच्यावर इतके अत्याचार केले त्याची काही आठवण ठेवा. आज त्यांची अडचण असल्यामुळे थोडा मान देताच हुरळून निघाले त्यांचे युद्धप्रयत्नांना मदत करायला. आपल्या वर्तनाने तुम्ही शिवरायाची व आम्हा झुंजार मराठ्यांची बेइज्जती करीत आहात. आमची मान शरमेने खाली जात आहे. गाई म्हशीच्या शेणाचीही किंमत आम्हाला उरली नाही. आमच्या तलवारी, भाले शोभेच्या वस्तू झाल्या आहेत. चला, म्हणा सारे जण की या युद्धाशी आमच्या समाजाचा व देशाचा काडीचाही संबंध नाही." पुढे ते म्हणाले- "झुंजार मराठ्यांनी इंग्रजांचे युद्धात मदत करून आपल्या गुलामगिरीची मुदत वाढविण्यापेक्षा व इंग्लंडचे स्वातंत्र्य -रक्षणाकरिता आपले प्राण खर्ची घालण्यापेक्षा आपल्या देशाच्या स्वातंत्र्यासाठी आपले प्राण का देऊ नयेत? या अफाट मराठा समाजातून लाख दोन लाख स्वातंत्र्यलढ्यासाठी का पुढे येऊ नयेत? होऊ द्या मग त्यातले अर्धे लोक गारद. काही चिंता नाही. ही मराठा वृत्ती सर्वत्र दिसायला हवी" भारावल्यासारखी स्तब्ध असलेली जनता उत्स्फूर्तपणे गरजू लागली. बोला "शिवाजी महाराज की जय! भारत माता की जय! भवानी माता की जय!" मग हा जयजयकार पुन्हा पुन्हा होऊ लागला आणि ह्या परिषदेत तेथेच व तेव्हाच ठराव पास झाला. अगदी एक ओळीचा

ठराव- 'आमचा या साम्राज्यवाद्यांच्या युद्धांशी काहीही संबंध नाही.'

१९४० ते १९४६ पर्यन्त भाऊसाहेबांनी संस्थानिकांचे प्रतिनिधी म्हणून, नागपूर विद्यापीठ कार्यकारिणी प्रतिनिधी म्हणून व अनेक समाजोपयोगी संस्थांचे व समितींचे सदस्य म्हणून काम केले. १९४६ मध्ये भाऊसाहेब काँग्रेसचे प्रतिनिधी म्हणून घटना समितीत निवडून गेले. मध्यंतरी काही काळ खाली ठेवलेला बॅरिस्टरीचा झगा चढवून भाऊसाहेबांनी दिल्लीचे लाल किल्ल्यात आझाद हिंद सेनेच्या बचावाकरिता पंडित नेहरू यांच्या नेतृत्वाखाली सुप्रसिद्ध कायदेपंडित भुलाभाई देसाई यांचेबरोबर काम केले. आझाद हिंद सेनेचे जगन्नाथराव भोसले यांची संपूर्ण केस भाऊसाहेबांनी लढविली. भाऊसाहेबांनी १९४६ मध्ये साताराचे प्रतिसरकार निर्माते क्रांतिसिंह नाना पाटील यांचे वऱ्हाड दौऱ्याचे आयोजन केले. १९४७ साली भाऊसाहेब अमरावती जिल्हा काँग्रेस कमिटीचे अध्यक्ष होते. स्वातंत्र्य संग्रामात प्रत्यक्ष तुरुंगात न जाताही भाऊसाहेबांनी स्वातंत्र्य प्राप्तीकरिता भरीव असे योगदान दिले.

या सर्व काळात श्री शिवाजी शिक्षण संस्था व देशातील शेतकरी यांचा भाऊसाहेबांना कधीही विसर पडला नाही. शिक्षण संस्थेकरिता छत्रपती शाहू महाराज व हैदराबादचे निजामाकडून सुद्धा त्यांनी निधी आणला. भाऊसाहेबांचे हयातीत वैद्यकीय व अभियांत्रिकी सोडून सर्व विद्या शाखांतील शिक्षक-शिवाजी शिक्षण संस्थेतून मिळत होते.

भाऊसाहेब १९५२, १९५७ व १९६२ असे तीन वेळा लोकसभेत निवडून गेले. १० वर्षे देशाचे कृषी व सहकार मंत्री म्हणून त्यांनी पंडित जवाहरलाल नेहरूंसोबत काम केले. १९५५ साली भारत कृषक समाजाची स्थापना केली आणि शेतकऱ्यांसाठी सहकारी बँकेचे जाळे विणले. नवीन अत्याधुनिक तंत्रज्ञान शेतकऱ्यांच्या शेतापर्यन्त नेणे व या सर्व वैज्ञानिक व आधुनिक युगाच्या प्रगत साधनांचा शेतकऱ्याला अनुभव यावा म्हणून भारतीय शेतकऱ्यांना अमेरिकेसारख्या प्रगत देशातील शेती प्रकल्पांना भेटी देण्याकरिता पाठविणे व आपल्या देशात जागतिक स्तरावरची कृषी प्रदर्शने भरविणे-यांद्वारे त्यांनी शेतकऱ्यांसाठी व त्यांचे उत्थानासाठी अविरत प्रयत्न केले. त्यांच्या १९६५ साली झालेल्या आकस्मिक निधनाने भारतीय शेतकरी पोरका झाला. अमेरिकेतील एका संस्थेने जागतिक शेतकऱ्याचा एकमेव प्रतिनिधी म्हणून त्यांचे नावाचा ताम्रपट जमिनीत गाडला.

घटना समितीत असताना त्यांनी भारताची घटना बनविण्यात डॉ. बाबासाहेबांना मदत केली. डॉ. पंजाबरावसारखे टीकाकार घटना समितीत नसते तर घटना समिती मुक्या-बहिऱ्यांचीच ठरली असती व तो एक कळसूत्री देखावा ठरला असता, असे डॉ. आंबेडकर घटना समितीत घटना सादर करताना म्हणाले. त्यांचे निधनानंतर

पंतप्रधान लाल बहादूर शास्त्री यांनी भाऊसाहेबांचा उल्लेख भारतीय शेतकऱ्यांचा अत्यंत जिव्हाळ्याचा समर्थक म्हणून केला. राष्ट्रपिता म. गांधी स्वातंत्र्यापूर्वी डॉ. पंजाबरावांचे सामाजिक कार्य व शेतकऱ्यांच्या विषयीचा त्यांचा कळवळा पाहून उद्‌गारले- 'शेतकऱ्यांची सेवा करणे सोपे आहे पण त्यासाठी सोपे कायदे, साधे शिष्टाचार व सरळ माणसे हवी आहेत. हे तीनही गुण अंगिकारलेला डॉ. पंजाबराव देशमुख हा कदाचित भारतात या युगातला एकमेव माणूस असावा- ज्याने पद, प्रतिष्ठा व पैसा यांना तुच्छ लेखून आपला जीवनयज्ञ चेतविला.'

भाऊसाहेब म्हणायचे, मानवी जीवनातील कृषी हीच आद्य व सर्वात श्रेष्ठ संस्कृती आहे (Our Culture is Agriculture) या कृषी संस्कृतीनेच मानवी जीवनाची वस्तुनिष्ठ मूलभूत मूल्ये निर्माण केली आहेत. कृषीशिवाय मानवी जीवनाच्या विकासाचे व सभ्यतेचे सिद्धांत फोल आहेत. पृथ्वीवरील मानवी संस्कृती व सभ्यतेचा विकास कृषीतूनच झाला.

साहित्यिकांना ते म्हणायचे, 'भौतिक संसारातील वास्तविक समस्यांवर भारतीय साहित्यिकांनी आपले लक्ष केंद्रित करावे. खरे काव्य मानवी संसार व व्यवहार यांत आहे. प्रत्यक्ष संसारातील वास्तविक सुखदुःखाची उकल समाजाला दाखवून द्या म्हणजे तुमच्या उद्धाराचा जिवंत प्रवाह तुमच्या वाङ्‌मयातून वाहू लागेल.'

'धन मिळविण्याची इच्छा सोडून इतर अनेक महत्त्वाकांक्षा- कृषकांच्या, बहुजन समाजाच्या उत्थानाचा विचार माझ्या मनात वावरत आहे' - असे भाऊसाहेब म्हणायचे व म्हणूनच त्यांच्या समकालीन नेतृत्वामध्येच नव्हे, तर आजसुद्धा भारतीय कृषकांचा पंचप्राण म्हणून भाऊसाहेबांचे नेतृत्व अधिक विलोभनीय वाटते.



# संयुक्त महाराष्ट्राची चळवळ आणि भाऊसाहेब

- प्रा. सतीश तराळ

---

डॉ. पंजाबराव देशमुख भारतातील एक महान व्यक्तिमत्व होते. सामाजिक, शैक्षणिक व राजकीय क्षेत्रांतील त्यांचे कार्य देदीप्यमान आहे. द्रष्टा तसेच हिंमतवान व परिपूर्ण व्यक्तिमत्वाचा माणूस म्हणून त्यांचा उल्लेख केला जातो. ते शेतकऱ्यांचे जिव्हाळ्याचे मित्र व महान नेते होते. कृषीमंत्री म्हणून त्यांनी देशाची दहा वर्षे नि:सीम सेवा केली. शेतकऱ्यांची शैक्षणिक व सर्वांगीण प्रगती व्हावी म्हणून त्यांनी आयुष्यभर अतोनात कष्ट उपसले. मागासवर्गीयांसाठी त्यांनी केलेले कार्य अविस्मरणीय व मूलगामी स्वरूपाचे आहे. मागासवर्गीयांच्या आर्थिक व सामाजिक प्रगतीसाठी ते सतत प्रयत्न करीत राहिले. सार्वजनिक धर्मशाळा, पाणवठे व मंदिरे अस्पृश्यांसाठी खुली करणारे ते कृतिशील समाजसेवक होते. तळागाळातील माणसाशी समरस होणारे मंत्री होते.

रचनात्मक कार्य करणारे आदर्श मंत्री म्हणून त्यांचा गौरव करण्यात येत असे. संसदेत काम करण्याची त्यांची पद्धत अत्यंत उत्कृष्ट व बिनतोड अशीच होती. लोकसभेतील त्यांची पोकळी भरून काढणे कठीण असल्याचा अभिप्राय त्यांच्या मृत्यूनंतर व्यक्त करण्यात आला. कृषकांची प्रभावी संघटना उभारणारे ते कृषकांचे महान कैवारी व प्रचंड ताकदीचे लोकनेते होते. ते विवेकशील संपूर्ण मानवी दृष्टिकोनाचे पुरस्कर्ते होते. लोकोत्तर बुद्धिमत्ता व विशाल अंत:करण यामुळे अफाट रचनात्मक व सृजनात्मक कार्य त्यांनी केले. स्वत:ची आर्थिक परिस्थिती हलाखीची असताना व विदेशातून उच्च पदव्या प्राप्त करूनही त्यांनी सरकारी नोकरी स्वीकारली नाही. प्रखर राष्ट्रवादी, प्रमुख राजनीतिज्ञ, उत्कट देशभक्त, लोकसभेतील बोलके व जाणते सदस्य म्हणून ते ख्यातकीर्त होते. त्यांनी ग्रामीण विदर्भात सुधारणा घडवून आणल्या. कर्जबाजारी भारतीय कृषक त्यांच्यामुळे ऋणमुक्त झाला. ते विनावेतन शिकविणारे उच्चविद्याविभूषित शिक्षक व उपेक्षितांची नि:शुल्क वकिली करणारे कसबी बॅरिस्टर होते. अन्नधान्य उत्पादनात त्यांच्यामुळे भारताने क्रांती केली. त्यांचे व्यक्तिमत्व बहुविध क्षेत्रांत प्रभाव

गाजविणारे विविधांगी व अजातशत्रू असे होते. ते उत्कृष्ट वक्ते, अत्यंत लोकप्रिय नेते व सांस्कृतिक क्रांतीचे समर्थक होते. अनेक राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय संघटनांचे ते प्रमुख होते. त्यांना आंतरराष्ट्रीय पातळीवरही सन्मान होता. सोवियत संघाचे सच्चे मित्र म्हणून त्यांचा उल्लेख केला जाई. भाऊसाहेबांचे संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळीतील योगदान महत्त्वाचे आहे. ते नसते तर विदर्भ संयुक्त महाराष्ट्रात सहभागी झाला नसता असे मानले जाते.

भारत अत्यंत विशाल देश आहे. भारतातील मध्यप्रदेश, बिहार यांसारखी राज्ये आजही युरोप खंडातील देशांहून मोठी आहेत. राज्यकारभाराच्या सुसूत्रतेसाठी विशाल अशा या देशाचे विभाग पाडणे तर आवश्यकच, पण ते पाडण्याचे निकष कोणते? सूत्र कोणते? त्याचे शास्त्र काय? 'भाषा' हा प्रांतरचनेचा एक महत्त्वाचा घटक मानला गेला. बहुसंख्य विचारवंतांना मान्य असलेला हा निकष आहे. भाषावार प्रांतरचना ही कायमस्वरूपी, मूलगामी व अत्यंत महत्त्वाची बाब आहे. जोपर्यंत संघराज्य टिकेल तोपर्यंत टिकणारी ही स्थिर रचना आहे. ज्या देशात विविध घटक असतात तेथे राज्यविभाजनाची सर्वमान्य तत्त्वे आधी तयार करून व त्यानुसार घटक राज्ये तयार करून सर्वांना न्याय देणे आवश्यक असते. भाषिक संस्कृती, त्याला होणारा विरोध, त्यातून निर्माण होणारा असंतोष व त्या असंतोषातून निर्माण झालेला संघर्ष यातून युरोपखंडात भाषिक राष्ट्रे निर्माण झाली.आज दीडशे वर्षांपेक्षा अधिक कालखंड लोटल्यानंतरही क्वेबेकसारखा प्रांत कॅनडाशी एकजीव होऊ शकत नाही याचे कारण एक भाषिक संस्कृतीचा अभाव हेच आहे. भाषावार प्रांतरचनेमुळे मनाचा संकुचितपणा वाढेल व देशात फुटीरता निर्माण होईल या विचारसरणीची जी मंडळी भारतात होती ती इंग्रजीचा पुरस्कार करणारी तामीळ-गुजराती भाषिक व भांडवलदारी वृत्तीची मंडळी होती. भाषिक राष्ट्रवादाच्या मागे अनेक शतकांची आंतरराष्ट्रीय परंपरा आहे. भारतात भाषावार प्रांतरचना झाली नसती तर एवढा मोठा असंतोषाचा आगडोंब उसळला असता की त्यात संघराज्याच्या अस्तित्वालाच धोका निर्माण झाला असता. लोकशाही राज्यव्यवस्था स्वीकारणाऱ्या विशाल संघराज्याला लोकांचा राज्यव्यवस्थेत सहभाग वाढविण्यासाठी लोकभाषेतून कारभार चालवावा लागतो व त्यासाठी भाषावार प्रांतरचना करणे अपरिहार्य असते.

एकोणिसाव्या शतकात इंग्रजी आक्रमणाखाली हिंदुस्थानचे जे प्रदेश आले त्याप्रमाणे प्रांतांची निर्मिती करण्यात आली. हे प्रांत निर्माण करताना विभाग, जमात, भाषा, संस्कृती, वंश असा भक्कम आधार नव्हता. प्रांत बनवताना कोणतेही तत्त्व किंवा वर्गीकरणाचे शास्त्र अवलंबिण्यात आले नव्हते. मुळात मुंबई, मद्रास व कलकत्ता असे त्यांचे तीनच प्रांत होते. ज्या प्रांताने जो भाग जिंकला तो त्या प्रांताला जोडला

जाई. पुढे तीन प्रांत मोठे वाटू लागल्याने बंगालच्या गव्हर्नरच्या ताब्यातील भागाचे तुकडे करून चौथा प्रांत तयार करण्यात आला. मात्र इंग्रजांच्या डोळ्यासमोर युरोपातील प्रांतरचनेचा इतिहास असल्यामुळे आसाम, ओरिसा, बिहार हे नवे प्रांत निर्माण करताना त्यांनी भाषेचाच आधार घेतला. सिंधप्रांत मुंबईपासून वेगळा करण्यात आला त्यालाही भाषेचाच निकष लावण्यात आला. इ.स. १८६१ ते १९१९ या कालखंडात क्रमाक्रमाने भाषावार प्रांतरचना होत होती. त्यामुळे स्वातंत्र्योत्तर कालखंडातही तसेच होणे क्रमप्राप्त व न्याय्य होते. भाषा हा संस्कृतीचा महत्त्वाचा घटक असतो. एकभाषिक लोकांमध्ये समान आचारविचार, समान श्रद्धा असतात. त्यांची ध्येये, आकांक्षा समान असतात. इ.स. १९२० च्या सुमारास डॉ. केतकर यांनी भाषावार प्रांतरचनेचा प्रभावी आणि आग्रही पुरस्कार केला. आंध्रप्रदेशातील टी. प्रकाशन् आणि लंकासुंदरम् यांचे सक्रिय व महत्त्वपूर्ण सहकार्य त्यांना लाभले. भाषावार प्रांतरचना राज्यकारभाराच्या सोयीची असते म्हणून महात्मा गांधी, सरदार वल्लभभाई पटेल, पंडित नेहरू हे तिचाच पुरस्कार करणारे होते. त्यांनी स्वातंत्र्यपूर्व काळातच काँग्रेस संघटनेची भाषावार रचना केली होती. काँग्रेसने १९२० साली घटनेच्या पहिल्या मसुद्यातच भाषावार प्रांतरचनेचा निर्णय समाविष्ट केला होता व स्वातंत्र्यप्राप्तीनंतर तो अंमलात आणण्याचाही निर्णय घेतला होता. पण देश स्वतंत्र झाल्यानंतर हितसंबंधितांचे राजकारण सुरू झाले. सत्ता टिकविण्यासाठी काँग्रेसमध्ये भांडवलशाहीचा प्रभाव वाढला. महाराष्ट्राच्या संदर्भातील पहिली चूक म्हणजे महाराष्ट्र, आंध्र, गुजरात, कर्नाटक अशा प्रदेश काँग्रेस कमिट्या असताना मुंबईची वेगळी काँग्रेस कमिटी विनाकारणच बनविण्यात आली. १९२० नंतर - म्हणजेच काँग्रेसचे नागपूर अधिवेशन संपल्यानंतर - काँग्रेसच्या घटनेतही भाषावार प्रांतरचना आली. नागपूर काँग्रेसच्या अधिवेशनात महात्मा गांधींनी मांडलेल्या भाषिक पुनर्रचनेच्या ठरावाप्रमाणे राज्यांचे शिक्षण व त्यांचा दैनंदिन कारभार मातृभाषेत होणे आवश्यक होते व त्यासाठी त्या त्या राज्यात अंतर्भूत होणारा प्रदेश एकभाषिक असणे आवश्यक होते. लोकमान्य टिळकांनी प्रस्थापिलेल्या लोकशाही स्वराज्य पक्षाच्या जाहीरनाम्यातही भाषावार प्रांतरचना करावी असेच स्पष्ट केले होते. पण स्वातंत्र्यानंतर जे त्रिभाषिक मुंबई राज्य निर्माण झाले त्यात मराठी, कानडी व गुजराती भाषा बोलणारा जनसमूह समाविष्ट करण्यात आला. या तीनही भाषांना मूठमाती देऊन राज्यकारभाराची भाषा म्हणून इंग्रजी भाषेचा अवलंब करावा लागला. या व्यतिरिक्त 'मध्यप्रांत-वऱ्हाड' या प्रांतात आठ मराठीभाषी जिल्ह्यांचा समावेश करण्यात आला. पण या प्रांतात हिन्दी भाषिकांचे वर्चस्व होते, त्यांचे बहुमत होते व म्हणून त्यांचाच प्रभाव होता. हैद्राबाद राज्यात मराठवाड्याचा बराच मोठा भाग समाविष्ट करण्यात आला होता व हैद्राबाद राज्यातही मराठी, कानडी व तेलगु भाषा

बोलणारे लोक समाविष्ट करण्यात आले होते. याशिवाय गोमंतक पोर्तुगीज अंमलाखाली असून त्यातही बराच मोठा मराठीभाषी समाज होता.

मराठीभाषी समाज असा वेगवेगळ्या प्रांतांत विभागल्या गेल्यामुळे शिवाजी महाराजांची समृद्ध परंपरा, संस्कृती व इतिहास असणाऱ्या मराठी माणसाला गुजराती, हिंदी, तेलगू भाषिक लोकांच्या वर्चस्वाखाली राहावे लागत होते. मराठी माणसाला अन्याय्य, अपमानास्पद, दुय्यम दर्जाची वागणूक मिळत होती. त्यातून सर्व मराठीभाषी लोकांचे एक राज्य असावे अशी भावना वाढीस लागली. तो मराठी माणसांचा हक्कच होता. हा न्याय्य हक्क स्वातंत्र्यप्राप्तीनंतर मराठी माणसांना मिळेल अशी रास्त अपेक्षा होती व महात्मा गांधी, पंडित नेहरूंसारख्या राष्ट्रनेत्यांनी तशी आश्वासनेही दिली होती. परंतु तसे घडले मात्र नाही.

१९०२ साली हैद्राबादच्या निजामाने बेरार (वऱ्हाड) हा मोठा भूप्रदेश ब्रिटिश सरकारला भाड्याने दिला. तो मध्यप्रदेशाला जवळचा म्हणून शासकीयदृष्ट्या मध्यप्रदेशात गेला व मराठी भाषिकांना हिन्दी भाषिकांच्या वर्चस्वाखाली खालच्या मानेने राहावे लागले. या असंतोषातून ब्रिटिशकालीन वऱ्हाड-मध्यप्रांताच्या विधानसभेने वऱ्हाड-मध्यप्रदेश हे द्विभाषिक राज्य मोडून मराठी भाषिकांचे 'विदर्भ' मराठी भाषिक राज्य स्थापन करावे असा ठराव संमत केला होता. मुंबई येथे स्वातंत्र्यवीर सावरकर यांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या साहित्य संमेलनात १५ ऑक्टोबर १९३८ रोजी विदर्भासह सर्व मराठी भाषिक प्रदेशाच्या एकछत्री सलग मराठी राज्याची मागणी करणारा ठराव मांडण्यात आला. त्यानंतर वर्षभर फारशी हालचाल झाली नाही. पुढच्या वर्षी नगर येथे झालेल्या साहित्य संमेलनात या मागणीचा पुनरुच्चार करण्यात आला व या प्रदेशाला 'संयुक्त महाराष्ट्र' असे नाव देण्याचे ठरविण्यात आले. संयुक्त महाराष्ट्राची मागणी अशी साहित्यक्षेत्रातून प्रथम होऊ लागली. हे प्रत्यक्ष घडवून आणण्यासाठी २८ जानेवारी १९४० रोजी मुंबई येथे दर्यापूर (अमरावती)चे बॅरि. रामराव देशमुख यांच्या अध्यक्षतेखाली संयुक्त महाराष्ट्र सभेची स्थापना करण्यात आली. २४ मे १९४० रोजी संयुक्त महाराष्ट्र सभेतर्फे पुणे येथे डॉ. तु. ज. केदार यांच्या अध्यक्षतेखाली 'महाराष्ट्र एकीकरण परिषद' भरविण्यात आली. या परिषदेच्या अध्यक्षस्थानी म. म. दत्तो वामन पोतदार होते. पुढे अनेक साहित्य संमेलनांच्या व पत्रकार संमेलनांच्या व्यासपीठांवरून या विषयीची मागणी होत राहिली. १९४० साली रत्नागिरी येथे भरलेल्या साहित्य संमेलनात तिचा पुनरुच्चार झाला. १९४१ साली सोलापूर येथे भरलेल्या साहित्य संमेलनाने या ठरावाला अशी पुस्ती जोडली की नवीन संयुक्त राज्यघटनेचा विचार होण्यापूर्वीच मराठी प्रदेशाचा निराळा प्रांत करण्यात यावा. नागपूरच्या दैनिकाचे संस्थापक-संपादक व प्रसिद्ध कादंबरीकार ग. त्र्यं. माडखोलकर यांनी महात्मा गांधींना

पत्र टाकून अशी विनंती केली की आपल्या विधायक कामाच्या कार्यक्रमात भाषावार प्रांतरचनेचा अंतर्भाव करावा. महात्मा गांधींनी त्यावेळी कळविले होते- 'महाराष्ट्राचे सर्व विभाग एकत्र यावेत याला माझी संमती आहे. पण यावेळी त्यासाठी आंदोलन करणे मला उचित वाटत नाही. जेव्हा हिंदुस्तान स्वतंत्र होईल तेव्हा हे प्रश्न आपोआप सुटतील!' १९४३ साली ३० व ३१ मे रोजी मुंबईला मराठी पत्रकार परिषद भरली. ज. स. करंदीकर अध्यक्ष होते. या परिषदेत संयुक्त महाराष्ट्राच्या ठरावावर खूप चर्चा झाली व संयुक्त महाराष्ट्र सभेने मांडलेल्या पंचखंड महाराष्ट्राच्या मागणीचा ठराव करण्यात आला. त्यावर वऱ्हाडच्या स्वतंत्र राज्याची उपसूचना मांडण्यात आली होती. मध्यप्रांत-वऱ्हाड या राज्याला मराठी मुख्यमंत्री चालत नाही हे डॉ. खरे यांच्या प्रकरणावरून निश्चित झाले होते. म्हणून खरे मंत्रीमंडळातील एक मंत्री बॅरि. रामराव देशमुख यांनी १ ऑक्टोबर १९३८ रोजी मध्यप्रांत-वऱ्हाड या प्रांतातील मराठी भाषी प्रदेशाचा 'विदर्भ' या नावाने स्वतंत्र प्रांत बनवण्यात यावा, अशी मागणी करणारा ठराव मांडला होता व तो संमतही झाला होता. पण बॅरि. रामराव मंत्रीपदाला अत्यंत लायक असूनही त्यांना पुन्हा मंत्रीपद मिळाले नाही. पुढे १८ ऑगस्ट १९४० रोजी वर्धा येथे बॅरि. रामराव देशमुख यांच्या अध्यक्षतेखाली 'महाविदर्भ परिषदे'ची स्थापना झाली. विदर्भ म्हणजे अमरावती, अकोला, यवतमाळ, बुलडाणा हे चार जिल्हे असा त्यावेळी अर्थ घेतला जात होता म्हणून नागपूर, वर्धा, चंद्रपूर (चांदा) व भंडारा या चार जिल्ह्यांचा समावेश स्पष्ट होण्यासाठी विदर्भ ऐवजी महाविदर्भ असा शब्दप्रयोग करण्यात आला. त्यावेळी चार चार जिल्ह्यांच्या दोन काँग्रेस कमिट्या होत्या, त्यांचे एकत्रीकरण 'महाविदर्भ' या शब्दात सुचवावयाचे होते. महाविदर्भ सभेच्या स्थापनेची जी उद्दिष्टे होती त्यांतील एक महत्वाचे उद्दिष्ट महाराष्ट्र एकीकरणाच्या चळवळीस वेळोवेळी सहाय्य करणे असे होते. महाविदर्भाच्या मागणीचे वर्णन करताना बॅरि. रामराव देशमुख यांनीही 'महाराष्ट्र राज्य एकीकरणाच्या चळवळीची पहिली पायरी' – असे तिचे वर्णन केले होते. या महाविदर्भ सभेचे दुसरे अधिवेशन दि. ३ ऑक्टोबर १९४३ ला अमरावती येथे भरले. बॅरि. जयकर या अधिवेशनाचे अध्यक्ष होते. त्यांनी जे अध्यक्षीय भाषण केले त्यात महाविदर्भ पुढे संपूर्ण मराठी भाषिक राज्यात सहभागी व्हावा असेच अभिप्रेत होते. पण ही कल्पना सर्वच महाविदर्भवाद्यांना मान्य होती असे नाही. बापूजी अणे, ब्रिजलाल बियाणी आदि मंडळींना ही भूमिका मान्य नव्हती. १९४२ चा 'चले जाव' चा लढा व निकरावर आलेले दुसरे महायुद्ध यांमुळे १९४३ ते १९४५ या कालखंडात संयुक्त महाराष्ट्राची चळवळ थंडावली होती.

१२ मे १९४६ च्या बेळगाव साहित्य संमेलनापासून पुन्हा संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळीला जोर चढला. संमेलनाचे अध्यक्ष ग. त्र्यं. माडखोलकर यांनी अध्यक्षीय

भाषणात संयुक्त महाराष्ट्राची आवश्यकता प्रभावीपणे प्रतिपादन केली व आचार्य अत्रे यांचे म्हणणे असे की त्यांनी या संमेलनात संयुक्त महाराष्ट्राचा ठराव मांडला. नंतर २८ जुलै १९४६ रोजी महाराष्ट्र एकीकरण परिषद भरली. २६ मे रोजी या परिषदेची स्थापना करण्यात आली होती. शंकरराव देव परिषदेचे अध्यक्ष होते. २८ सप्टेंबर १९४६ रोजी पुण्यात समितीची सभा झाली त्यात घटना तयार करण्यात आली. १५ डिसेंबर १९४६ ला निवडणुका घेऊन चौरेचाळीस प्रतिनिधींची निवड करण्यात आली. पुढे १३ व १४ एप्रिल १९४७ ला जळगाव येथे परिषदेचे अधिवेशन झाले व तेथे कार्यकारी मंडळाची निवड करण्यात आली.

५ ऑगस्ट १९४७ ला भारत स्वतंत्र झाला पण मराठीभाषींचे सलग एक राज्य अस्तित्वात आले नाही. मराठी जनता पंचखंडात विभागली गेली. त्यामुळे सर्वत्र असंतोष पसरला. म्हणून १७ जून १९४८ रोजी घटनासमिती अध्यक्ष डॉ. राजेंद्र प्रसादांनी आपल्या अधिकारात दार कमिशनची नियुक्ती केली. भाषावार प्रांतरचना करावी की करू नये ? व करावयाची झाल्यास कशी करावी ? याविषयीचा अहवाल सादर करण्यास या कमिशनला सांगण्यात आले होते. २८ ऑगस्ट रोजी मुंबई काँग्रेसचे नेते स. का. पाटील यांनी वृत्तपत्रात मुलाखत देऊन या कमिशनवर टीका केली. दार कमिशनने आंध्र, तामिळनाडू, केरळ, मुंबई, मध्यप्रांत-वऱ्हाड या भागात दौरा केला. सातशे साक्षीदारांच्यावर साक्षी घेतल्या. एक हजारावर लेखी निवेदने स्वीकारली. १३ डिसेंबर १९४८ रोजी दार कमिशनचा अहवाल प्रसिद्ध झाला. या कमिशनच्या अहवालानंतर महाराष्ट्रातच नव्हे तर इतर राज्यांतही असंतोष पसरला. हा अहवाल अत्यंत असमाधानकारक होता. अत्यंत विषारी अहवाल म्हणून त्याची संभावना केली जाऊ लागली. भाषावार प्रांतरचना करू नये असा सल्ला या कमिशनने दिला होता. महागुजरातची कल्पना 'पाटणी प्रभुता' नावाची कादंबरी लिहून गुजराती जनतेसमोर मांडणारे श्री. मुनशी हे मुंबईतून दार कमिशनचे सदस्य होते. ते साहित्यिक असून त्यांचा दार कमिशनवर प्रभाव होता. त्यांना कच्छच्या रणापासून वसई-रेवदंड्यापर्यंत मुंबईसह महागुजरात हवा होता.

३० जानेवारी १९४८ हा भारताच्या इतिहासातील काळाकुट्ट दिवस. या दिवशी महात्मा गांधींची हत्या करण्यात आली. फाळणीच्या जखमा सुकल्या नव्हत्या तोच ही घटना घडली. पुन्हा दंगली उसळल्या. संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळीत प्राण ओतण्यासाठी आचार्य अत्रे 'नवयुग' मध्ये वेगवेगळे लेख लिहून चळवळीला गती देण्याचा प्रयत्न करीत होते. १३ सप्टेंबर १९४८ ला हैद्राबादमध्ये सैन्य पाठवून निजामाला राजीनामा देण्यास भाग पाडण्यात आले होते. प्रशासकाचा कारभार तेथे सुरू झाला होता. या घटनेमुळे मराठवाड्याचा संयुक्त महाराष्ट्रात समावेश करण्याचा मार्ग तसे पाहिले तर

मोकळा झाला होता. पण दार कमिशनने त्याचा विचार न करता भाषावार प्रांतरचनाच नाकारली होती. यापूर्वी १६ व १७ ऑक्टोबर १९४८ ला संयुक्त महाराष्ट्र परिषदेचे अधिवेशन मुंबई येथे भरले होते. महाराष्ट्राचे सांस्कृतिक दर्शन घडावे अशा सांस्कृतिक कार्यक्रमांची आखणी करण्यात आली होती. शाहीर अण्णाभाऊ साठे यांनी या परिषदेसाठी 'मुंबई कुणाची' –हा तमाशा व काही गाणी लिहिली होती. शाहीर अमरशेख यांनी गाणी गाईली. या परिषदेपासून वातावरणनिर्मिती झाली. संयुक्त महाराष्ट्राचा लढा सर्वसामान्य जनतेचा लढा झाला. दलित, मुस्लिम त्यात सहभागी झाले. आचार्य अत्रे दार कमिशनवर तुटून पडले. 'महाराष्ट्राचे काळीज चराचरा कापले!', 'दार मंडळाच्या अहवालाने महाराष्ट्राचा घोर मानभंग!', 'दार कमिशनचा संतापजनक निर्णय', 'संयुक्त महाराष्ट्राचे पुढे काय?', 'दार कमिशनचे गौडबंगाल', 'संयुक्त महाराष्ट्राची क्रूर फसगत'– असे लेख त्यांनी स्वत:च्या नावे तर कधी निनावी लिहिले. सर्वत्र असंतोष पसरत होता. २९ डिसेंबर १९४८ ला जयपूर येथे काँग्रेसचे अधिवेशन झाले. त्यात दार कमिशन रद्द करून पुन्हा एक समिती नेमली गेली. यात जवाहरलाल नेहरू, वल्लभभाई पटेल व पट्टाभी सीतारामय्या यांचा समावेश होता त्यांच्या नावाच्या आद्याक्षरांवरून या समितीला 'जे व्ही पी' समिती असे नाव पडले. आमदार व्यंकटराव पवार यांनी २३ फेब्रुवारी १९४९ रोजी मुंबई कायदेमंडळाच्या बैठकीत संयुक्त महाराष्ट्राचा ठराव मांडला. 'मुंबईसह संयुक्त महाराष्ट्र व्हावा' या बाजूने प्रचंड कौल मिळाला. ५ एप्रिल १९४९ रोजी जेव्हीपी समितीचा अहवाल प्रसिद्ध झाला. हा अहवाल दार कमिशनपेक्षाही घातक होता. या अहवालात म्हटले होते, 'स्वतंत्र महाराष्ट्राचा विचार सध्या नको. पुढे बघू. पण स्वतंत्र महाराष्ट्र जरी झाला तरी त्यात मुंबईचा समावेश मात्र कदापिही होणार नाही.' समितीच्या या अहवालानंतर 'मुंबईसह संयुक्त महाराष्ट्र झालाच पाहिजे!' अशी घोषणा आचार्य अत्रे यांनी केली. स्वतंत्र भारतातील पहिले (बत्तीसावे) साहित्य संमेलन पुणे येथे झाले. आचार्य जावडेकर अध्यक्ष होते. अखंड महाराष्ट्र झालाच पाहिजे असे ठाम प्रतिपादन त्यांनी केले. जनसामान्यांची हीच भावना होती.

काँग्रेस वर्किंग कमेटीने सर्व प्रांतिक काँग्रेसकडून भाषावार प्रांतरचनेविषयी मते मागितली. अत्र्यांनी 'मुंबईबाबत सार्वमत मागा!' असा लेख लिहून महाराष्ट्रात व्यक्त झालेल्या काँग्रेस पुढाऱ्यांच्या मतांचा आढावा घेतला. सरदार वल्लभभाई पटेल मुंबई महाराष्ट्राला देण्याच्या विरुद्ध होते. मुंबईचे वैभव गुजराती व्यापाऱ्यांनी वाढविले आहे, त्यांना मुंबईपासून तोडू नये असे त्यांना वाटत होते. मोरारजीभाई मुंबई प्रांताचे मुख्यमंत्री होते व दिल्लीच्या पुढाऱ्यांशी त्यांचे चांगले संबंध होते. मुंबई गुजरातसह राहावी असा त्यांचा विचार होता. संयुक्त महाराष्ट्र परिषद सर्वपक्षीय होती. त्यामुळे विरोधाला धार

प्राप्त झाली होती. मुंबई स्वतंत्र ठेवावी असे सरदार वल्लभभाई पटेल यांनी सुचविले होते. विदर्भातही संयुक्त महाराष्ट्र सभा स्थापन झाली व कर्नाटक-महाराष्ट्राच्या सीमेवर महाराष्ट्र एकीकरण परिषद निर्माण झाली. तिकडे बेळगाव मराठी प्रदेश काँग्रेस कमेटी स्थापन करताना कर्नाटकसिंह गंगाधरराव देशपांडे यांच्या सोयीसाठी कर्नाटक काँग्रेसमध्ये अंतर्भूत केल्याने असंतोष निर्माण झाला व वाद वाढला.

विदर्भात भाऊसाहेब पंजाबराव देशमुख म्हणजे वैदर्भीय जनतेचा प्राण होता. जनसामान्याबद्दलची हार्दिक कळकळ, 'ज्ञानाची गंगा खेड्यापाड्यात पोहोचावी म्हणून त्यांनी केलेले भागीरथ प्रयत्न, भारताचे कृषिमंत्री म्हणून त्यांनी केलेले कार्य, त्यांचा विद्या-व्यासंग, शिवाजी शिक्षण संस्थेचा त्यांनी केलेला विचार, राजकारणात राहूनही त्यांनी जोपासलेली तत्त्वनिष्ठा व शत्रूवरही प्रेम करण्याची त्यांची वृत्ती-यांमुळे महान कर्मयोगी, शिक्षणशास्त्रज्ञ, द्रष्टे समाजसुधारक, कृषकक्रांतीचे कल्पतरू, शिवसंस्कृतीचे उपासक अशा विशेषणांनी त्यांचा गौरव केला जातो. भाऊसाहेब महाराष्ट्राचे भूषण होते. त्यांना मराठी भाषा व महाराष्ट्र यांच्याबद्दल अत्यंत अभिमान होता. मराठी भाषेवरील त्यांचे प्रेम अकृत्रिम होते. भाऊसाहेब पंजाबराव मूळचे महाविदर्भवादी. पण याबाबत त्यांची भूमिका बॅरि. रामराव देशमुख यांच्यासारखी होती. महाविदर्भाची निर्मिती ही संयुक्त महाराष्ट्र निर्मितीच्या चळवळीतील एक टप्पा आहे असे त्यांना वाटत होते, विदर्भ वेगळा झाला व तिकडे मुंबईसह महाराष्ट्र वेगळा झाला तर विदर्भाचा समावेश केव्हाही महाराष्ट्रात करता येईल. पण महाविदर्भाच्या संकल्पनेचा उपयोग मराठी प्रदेशाचे तुकडे पाडण्यासाठी काही स्वार्थी लोकांकडून आता केला जाऊ लागला आहे, ही गोष्ट त्यांच्या लक्षात आल्याबरोबर त्यांनी आपली महाविदर्भाची भूमिका सोडली व 'संयुक्त महाराष्ट्र विदर्भासह झाला पाहिजे' या भूमिकेचा आग्रह धरला. महाविदर्भाची कल्पना महाविदर्भाच्या प्रेमातून निर्माण होण्यापेक्षा राजकीय महत्त्वाकांक्षेतून, संयुक्त महाराष्ट्राच्या पोटात खंजीर खुपसण्याच्या भावनेतून निर्माण झाली. या भूमिकेत संयुक्त महाराष्ट्राच्या भूमिकेचा द्वेष, निषेध व विरोध आहे - ही बाब भाऊसाहेबांच्या लक्षात आली. त्यांच्या महाविदर्भाच्या भूमिकेत मराठी व महाराष्ट्राबद्दलचे प्रेम, इथला इतिहास, परंपरा व अस्मिता यांच्याबद्दलचा आदर होता. महाविदर्भाची मागणी मराठी मुलुखाच्या एकत्रीकरणाच्या मार्गात अडसर निर्माण करणार असे दिसताच त्यांनी संयुक्त महाराष्ट्राचा पुरस्कार केला.

मराठवाड्याचे पाच जिल्हे व विदर्भाचे आठ जिल्हे असे तेरा जिल्ह्यांचे स्वतंत्र महाविदर्भ राज्य करावे अशी ब्रिजलाल बियाणी यांची मागणी होती. त्यावेळी विदर्भ काँग्रेस ब्रिजलाल बियाणी यांचे वर्चस्वाखाली होती. नागपूर विभागीय काँग्रेस श्री. कन्नमवार यांचे नेतृत्वाखाली होती. या दोन्ही महत्त्वाच्या वैदर्भीय पुढाऱ्यांनी एकमत

करून महाविदर्भाची मागणी केली असताना डॉ. भाऊसाहेब पंजाबराव यांनी संयुक्त महाराष्ट्राच्या मागणीचा पुरस्कार केला याला ऐतिहासिक महत्त्व आहे. भाऊसाहेब अल्पसंख्यकांचे नव्हे, तर बहुसंख्यकांचे नेते होते. तळागाळातील जनतेचा, अठरापगड जातीच्या बहुजन समाजाचा व त्याचबरोबर बुद्धिवादी लोकांचा भक्कम आधार भाऊसाहेबांच्या नेतृत्वाला होता. १९४८ ते १९५० या दरम्यान 'संयुक्त महाराष्ट्र की महाविदर्भ ?' हा विदर्भात अत्यंत ज्वलंत चर्चाविषय होता. या वादाने विदर्भातील राजकारण ढवळून निघाले होते व त्याला तीव्र संघर्षाचे स्वरूप प्राप्त झाले होते. विदर्भाच्या जनतेचे व प्रामुख्याने अमरावती, अकोला, यवतमाळ, बुलडाणा या चार जिल्ह्यांतील लोकांचे मत संयुक्त महाराष्ट्राच्या बाजूने वळविण्याचे फार मोठे श्रेय भाऊसाहेबांना आहे. संयुक्त महाराष्ट्राच्या दृष्टीने आणखी एक महत्त्वाची बाब म्हणजे विदर्भातील एक महत्त्वाचे पुढारी श्री. आबासाहेब खेडकर १९५२ पर्यंत विदर्भवादी म्हणूनच ओळखले जात. याच वर्षी देशात पहिल्या मध्यावधी निवडणुका झाल्या. भाऊसाहेब पंजाबराव अमरावती मतदार संघातून तर श्री. खेडकर अकोला मतदार संघातून विजयी झाले. त्यानंतर तीन वर्षांत संपूर्ण विदर्भ कॉंग्रेस आबासाहेब खेडकर यांच्या अधिपत्याखाली आली आणि भाऊसाहेबांप्रमाणेच आबासाहेब संयुक्त महाराष्ट्राचा पुरस्कार प्रभावीपणे करू लागले.

जानेवारी १९५० मध्ये जळगावला समाजवादी युवक परिषदेचे अधिवेशन झाले. या परिषदेचे उद्घाटन आचार्य अत्रे यांनी केले. येथे एस्. एम्. जोशी यांचे त्यावेळी भाषण झाले. त्यांनी आपले भाषण, संयुक्त महाराष्ट्राच्या प्रश्नाचे गांभीर्य स्पष्ट करून संपविले. संयुक्त महाराष्ट्राच्या निर्मितीला दिल्लीतील कॉंग्रेस नेत्यांचा विरोध आहे हे स्पष्ट होताच महाराष्ट्रातील अनेक कॉंग्रेस नेते काढता पाय घेऊ लागले. त्यांच्या भूमिकेतील आग्रहीपणा व आक्रमकता कमी होऊ लागली. १५ जानेवारी १९५३ रोजी हैद्राबाद येथे कॉंग्रेसचे अधिवेशन झाले. या अधिवेशनापूर्वी महाराष्ट्रात काकासाहेब गाडगीळ, भाऊसाहेब हिरे यांच्यासारखे नेते 'काय वाट्टेल ते झाले तरी या अधिवेशनात भाषावार प्रांतरचनेचा सोक्षमोक्ष करणार' –अशी भाषा वापरू लागले. त्यामुळे जनतेच्या आशा पालवल्या. पण प्रत्यक्षात पंडित नेहरू यांच्यासमोर प्रभावीपणे संयुक्त महाराष्ट्राचा मुद्दा मांडण्यात ही मंडळी कमी पडली. 'काकांनी महाराष्ट्राचा द्रोह केला' – असा लेख अत्र्यांनी या घटनेनंतर लिहिला. ३० एप्रिल ते ६ मे पंडित नेहरूंनी महाराष्ट्राचा दौरा केला. महाराष्ट्रातील दुष्काळाच्या निमित्ताने हा दौरा होता. नेहरूजी भाषावार प्रांतरचनेवरच जास्त बोलले. २७ सप्टेंबर १९५३ रोजी मुंबई विधानसभेपुढे संयुक्त महाराष्ट्राचा ठराव आला.

विदर्भातील जनतेला संयुक्त महाराष्ट्रात सहभागी व्हायचे नाही असे भासवले जात

होते व सहभागी होऊ नये या विचारसरणीचा एक गट विदर्भात होताही. पण त्या विचारसरणीला भक्कम जनाधार नव्हता. यापूर्वीच वैदर्भीय जनतेच्या मनातील, संयुक्त महाराष्ट्रात सामील झाल्यास आपला विकास होणार नाही ही शंका काढून टाकण्यासाठी अकोला करार करण्यात आला होता. मुंबईसह संपूर्ण मराठी भाषिकांचा एक प्रांत करण्यास काँग्रेस श्रेष्ठी तयार नाहीत ही बाब त्रिसदस्यीय समितीच्या अहवालानंतर स्पष्ट झाल्यामुळे संपूर्ण मराठी भाषिकांची एकजूट आवश्यक होती. म्हणून वैदर्भीय जनतेच्या अटी मान्य करून त्यांना संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळीत समाविष्ट करून घेण्यात आले व त्यासाठीच नागपूर करार २८ सप्टें. १९५३ रोजी करण्यात आला. हा करार अकोला करारापेक्षा अधिक व्यापक व मूलगामी होता. हा एक ऐतिहासिक निर्णय होता. २१ ऑक्टोबर १९५३ रोजी संयुक्त महाराष्ट्र परिषदेची पुनर्घटना करण्यात आली व २२ डिसेंबर १९५३ रोजी भाषावार प्रांतरचनेचा पुनर्विचार करण्यासाठी फाजल अली कमिशन नेमण्यात आले. १० ऑक्टोबर १९५६ रोजी फाजल अली समितीचा अहवाल प्रसिद्ध झाला. सर्व महाराष्ट्रात तीव्र असंतोष पसरला. समाजाच्या सर्व थरांतून या अहवालाला विरोध होऊ लागला. महाराष्ट्रभर आगडोंब उसळला. संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळीच्या दृष्टीने मे १९४६ पर्यंतचा चळवळीचा कालखंड हा आंदोलनाचा पहिला टप्पा. १९४६ ते १९५५ हा दुसरा टप्पा व फाजलअली कमिशनने आपला अहवाल सादर केल्यानंतर आंदोलनाने उग्र रूप धारण केले–हा चळवळीचा तिसरा व महत्त्वाचा टप्पा होय.

फाजलअली कमिशन नेमण्यात आल्यानंतर या आयोगाने भारतभर दौरे केले. या आयोगाचे ज्यावेळी अमरावतीला आगमन झाले तेव्हा १९५४ साली डॉ. पंजाबराव देशमुख यांनी शिवाजी शिक्षण संस्थेच्या वतीने अँपी थिएटरमध्ये त्यांचा भव्य सत्कार आयोजित केला. विदर्भ संयुक्त महाराष्ट्रात असण्याचे महत्त्व त्यांनी विदर्भातील मराठी जनतेला पटवून दिले होते. विदर्भातील मराठी भाषेबद्दल अभिमान बाळगणारी बहुसंख्य जनता मराठी भाषिकांचे संयुक्त महाराष्ट्र राज्य व्हावे या मताची होती. ही बाब डॉ. पंजाबराव देशमुख यांनी फाजलअली कमिशनच्या लक्षात आणून दिली व विदर्भाचा समावेश संयुक्त महाराष्ट्रात व्हावा असे प्रतिपादन केले.

विदर्भातील अमराठी लोक ब्रिजलाल बियाणी यांच्या नेतृत्वाखाली एकत्र येऊन महाविदर्भ हे स्वतंत्र राज्य व्हावे या मतांचा आग्रही पुरस्कार करत होते. त्यांनी स्वतंत्र महाविदर्भाच्या निर्मितीसाठी दोन स्वतंत्र परिषदांचे आयोजन केले होते. पण अमरावतीच्या मराठी भाषाभिमानी लोकांनी त्या उधळून लावल्या. अकोल्याचे ब्रिजलाल बियाणी, यवतमाळचे माधव श्रीहरी अणे, चंद्रपूरचे मा. सां. कन्नमवार यांनी विदर्भवादी लोकांची आघाडी उघडली व जनजागरण सुरू केले. त्यांनीही आपल्या मागण्या

फाजल अली आयोगासमोर सादर केल्या. पुढे फाजल अली कमिशनने स्वतंत्र विदर्भाची मागणी मान्य केल्यामुळे या चळवळीला चांगलाच जोर चढला. तिकडे मुंबईचे सदोबा कान्होबा पाटील यांनी स्वतंत्र मुंबई राज्याची चळवळ सुरू केली. सदोबा पाटलांची भूमिका ब्रिजलालजींच्या विदर्भवादाच्या भूमिकेला प्रोत्साहन देणारी होती. ब्रिजलाल बियाणी यांचा हीरक महोत्सव अकोला येथे सदोबा पाटील यांचेच अध्यक्षतेखाली संपन्न झाला.

डॉ. पंजाबराव देशमुख यांनी संयुक्त महाराष्ट्राचा पुरस्कार करण्यासाठी 'मराठी प्रदेश' नावाचे वृत्तपत्र सुरू केले. भाऊसाहेब वाणी व लेखणी संयुक्त महाराष्ट्रासाठी झिजवू लागले. 'मराठी प्रदेश'ची जबाबदारी श्री. दौलतराव गोळे व डॉ. श्रीराम अत्तरदे यांच्यावर सोपविण्यात आली. नागपूरचे विदर्भवादी टी. जी. देशमुख नागपूरवरून एक वृत्तपत्र प्रकाशित करीत असत. या दोन वृत्तपत्रांमधून आरोप-प्रत्यारोप, उत्तर-प्रतिउत्तर असा प्रकार होत असे. नागपूरचे बाबूराव भोसले संयुक्त महाराष्ट्रवादी होते. त्यांनी डॉ. पंजाबराव यांचे अध्यक्षतेखाली संयुक्त महाराष्ट्र परिषद घेतली. नागपूरच्या विदर्भवाद्यांनी आणि हिंदी भाषींनी या परिषदेवर गोटमार करून ही परिषद उधळून लावली. भाषावार प्रांतरचनेला हिंसक वळण लागले. या परिषदेत पंजाबरावांनी संयुक्त महाराष्ट्रात विदर्भाचे असणे कसे आवश्यक आहे व विदर्भाच्या व मराठी माणसाच्या कसे हिताचे आहे ते समजावून सांगितले.

फाजलअली कमिशनने महाराष्ट्राचे तुकडे पाडले होते. मुंबई गुजरातला देण्याची शिफारस केली होती. विदर्भाचे स्वतंत्र राज्य सुचविले होते. कारवार-बेळगाव हा मराठी भाषिक प्रदेश संयुक्त महाराष्ट्रापासून वेगळा केला होता. मुंबईला सौराष्ट्र व कच्छ हे प्रदेश जोडले होते. विदर्भ वेगळा करून व मुंबई महाराष्ट्रापासून तोडून महाराष्ट्र दुबळा करण्याचे हे राजकारण फाजलअली कमिशनला पुढे करून खेळले गेले होते. त्यावेळी मोरारजीभाई महाराष्ट्राचे मुख्यमंत्री होते. पंडित नेहरू, स. का. पाटील हे संयुक्त महाराष्ट्राच्या विरुद्ध होते. आंध्रात पोट्टीरामलू यांनी तेलगू भाषेचे स्वतंत्र राज्य व्हावे यासाठी प्राणांतिक उपोषण सुरू केले व त्यातच त्यांचा अंत झाला. त्यातून प्रचंड दंगली उसळल्या व नेहरूंना त्यांची इच्छा नसताना तेलगू भाषिक प्रांताला अनुमती द्यावी लागली. रामलू यांच्या बलिदानाचे चीज झाले. अस्तित्वात नसलेला तेलगू भाषेचा प्रांत अशा प्रकारे निर्माण करण्यात आला. पण अस्तित्वात असलेला प्रांत मात्र फाजलअली कमिशनने दिला नाही. या देशातील सर्वभाषी लोकांना फाजलअली कमिशनने आपापले प्रांत दिले; पण मराठी व पंजाबी भाषी लोकांना दिले नाहीत. महाराष्ट्राचे तीन तेरा वाजवून महाराष्ट्र नेस्तनाबूत करण्याचा घाट या कमिशनने घातला. विदर्भ वेगळा करून मराठी भाषिकांना या राज्यात अल्पमतात

आणण्याचा डाव रचला गेला. कच्छ व सौराष्ट्र हा मुंबई राज्यात नसलेला भाग या राज्यात समाविष्ट करून द्विभाषिक राज्य सुचविले. महाराष्ट्राला विदर्भ वगळून उर्वरित महाराष्ट्र व गुजरात, सौराष्ट्र व कच्छ यांचे धेडगुजरी राज्य सुचविले. महाराष्ट्रावर घोर अन्याय करण्यात आला. प्रचंड असंतोष उफाळून आला. संयुक्त महाराष्ट्राचे युद्ध सुरू झाले. विदर्भासह विशाल मुंबई राज्याचा पर्याय सुचविण्यात आला, पण तो मान्य झाला नाही. काँग्रेसचे नेते शंकरराव देव नेहरूंना भेटून आले. त्यांनी विदर्भासह द्विभाषिक मुंबई राज्याचा पर्याय नेहरूंपुढे मांडला. नेहरूंनी त्रिराज्य योजना जाहीर केली. मुंबईचे केन्द्रशासित स्वतंत्र राज्य, गुजरातचे स्वतंत्र राज्य व महाराष्ट्र वेगळा जाहीर करण्यात आला. १५ नोव्हेंबर १९५५ रोजी शिवाजी पार्कवर 'उत्तर मुंबई संयुक्त महाराष्ट्र परिषद' भरली. एस्. एम्. जोशी अध्यक्ष होते तर आचार्य अत्रे स्वागताध्यक्ष होते. त्रिराज्य योजनेचा निषेध म्हणून संयुक्त महाराष्ट्र कृती समितीने १८ नोव्हेंबर १९५५ ला सचिवालयावर प्रचंड मोर्चा न्यावयाचे ठरले. सेनापती बापटही या मोर्च्यात सहभागी झाले. या मोर्चावर लाठीहल्ला झाला. २० नोव्हेंबर १९५५ ला चौपाटीवर स.का. पाटील, मोरारजी देसाई यांची सभा झाली. या सभेत पोलिसांनी हत्यार उपसले व हत्याकांडाला सुरुवात झाली.

१८ नोव्हेंबर १९५५ पासून सुरू झालेल्या अधिवेशनात मुंबई राज्याचे मुख्यमंत्री मोरारजी देसाई यांनी प्रांतरचनेच्या प्रस्तावाला मान्यता मिळवण्याचा प्रयत्न चालवला. अनेक दिवस चर्चा चालली पण मान्यता मिळाली नाही. संयुक्त महाराष्ट्राची चळवळ अधिक आक्रमक बनली. खरा वादाचा मुद्दा मुंबई वाचून संयुक्त महाराष्ट्र की मुंबईसह संयुक्त महाराष्ट्र हा होता. गुजरातला मुंबईपासून वेगळे असे शासन नको होते. कारण गुजरातचा व मुंबईचा व्यापारी संबंध एकमेकांत गुंतलेला होता. पण गुजरातमध्ये सुद्धा सलग गुजराती भाषिक प्रदेशाची मागणी वाढू लागली होती. महाराष्ट्रात चालू असलेले आंदोलन दडपण्याकरिता मोरारजी शासनाने कठोर उपाय योजले. या चळवळीत ३१,०९२ लोकांना अटक करण्यात आली, १९,४४५ लोकांवर खटले भरण्यात आले, १८,४१९ लोकांना कैदेची शिक्षा झाली, मुंबई शहरात व ग्रामीण भागांत दंगली उसळल्या त्यात ५३७ वेळा गोळीबार करण्यात आला. गोळीबारात १०५ माणसे बळी गेली.

केन्द्रीय अर्थमंत्री चिंतामणराव देशमुख यांनी मुंबई शहर महाराष्ट्रापासून विभक्त करण्याचा निर्णय सरकारने घेतला होता म्हणून व गोळीबाराची न्यायालयीन चौकशी करण्याचे सरकार टाळत आहे असा आरोप करून आपल्या मंत्रीपदाचा राजीनामा दिला. मुंबई महाराष्ट्रापासून वेगळी करणे महाराष्ट्रावर अन्याय करणारे आहेच पण ती एक गंभीर राजकीय व आर्थिक चूक आहे असे आपले मत त्यांनी मांडले. विदर्भात

डॉ. पंजाबराव देशमुख, बॅरि. रामराव देशमुख, के. आर. पाटील, ग. त्र्यं. माडखोलकर, वीर वामनराव जोशी, पी. के. देशमुख, बॅरि. शेषराव वानखेडे इत्यादि प्रमुख पुढारी संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळीत सक्रिय झाले होते. शंकरराव देव यांच्या अध्यक्षतेखाली संयुक्त महाराष्ट्राची चळवळ आपला लढा तीव्र करीत होती...

१९५५ साली पुणे कॉर्पोरेशनने डॉ. पंजाबराव देशमुख यांना मानपत्र देण्याचे ठरविले. पुणे कॉर्पोरेशन भारतातील अव्वल दर्जाच्या पुढाऱ्यांनाच मानपत्र देत असे. डॉ. पंजाबराव भारताचे कृषिमंत्री होते. कृषिमंत्री म्हणून त्यांनी केलेले कार्य अत्यंत महत्त्वाचे व भारताच्या कृषिविकासाला गती व नवी दिशा देणारे होते. त्यांच्या कार्याची दखल घेऊनच पुण्यात त्यांचा सत्कार आयोजित करण्यात आला होता. यावेळी वेदवाङ्मयावर पीएच्.डी. मिळविणाऱ्या डॉ. पंजाबरावांनी संयुक्त महाराष्ट्राची आवश्यकता प्रतिपादन करून संयुक्त महाराष्ट्राची घोषणा केली. त्याचे हे भाषण 'टाइम्स ऑफ इंडिया' या वृत्तपत्राने पहिल्याच पानावर छापले होते. भाऊसाहेबांमुळे संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळीला चांगलाच जोर चढला.

१९५५ साली फेब्रुवारी महिन्यात ना. ब्रिजलाल बियाणी, ना. मारोतराव कन्नमवार आणि खासदार तुमपल्लीवार यांच्या नेतृत्वात अमरावतीला जोग चौकात विदर्भवाद्यांची सभा भरली. ही भव्य सभा किंग एडवर्ड कॉलेज (विदर्भ महाविद्यालय) येथील तेव्हाचे विद्यार्थी जांबुवंतराव धोटे, सुरेश भट, रामदास पाटील इत्यादी तरुणांनी उधळून लावली. या सभेत जिल्हाधिकारी भावे यांना व्यासपीठावर बसवण्यात आले होते. त्यामुळे जनसमुदाय फारच खवळला होता. पोलिसांची मदत घेऊन मंत्रीमहोदयांना पलायन करावे लागले. ते अमरावती-नागपूर मार्गे निघाले. कपडे मळलेले, अंगावर धूळ, तहान लागलेली. अशा अवस्थेत ते तिवसा येथील विश्रामगृहावर पोहोचले. योगायोगाने विश्राम भवनावर त्यांची भेट डॉ. पंजाबराव देशमुख यांचेशी झाली. आपल्या लोकांनी आमची सभा उधळून लावली - अशी खंत ब्रिजलाल बियाणी यांनी भाऊसाहेबांजवळ व्यक्त केली. भाऊसाहेब ब्रिजलालजींना म्हणाले - विदर्भातील सर्वसामान्य लोकांना, अशिक्षित बहुजन समाजाला आपला निषेध व्यक्त करण्यासाठी आणखी कोणता मार्ग आहे ? त्यांच्याजवळ वृत्तपत्रे नाहीत. पैसा-अडका नाही. त्यामुळे त्यांनी आपला विरोध अशा पद्धतीने व्यक्त केला. बहुजन समाजाचे विरोधक तरी आपला निषेध व्यक्त करण्यासाठी यापेक्षा वेगळ्या मार्गाचा उपयोग करतात का ? त्यानंतर त्यांच्या गप्पा रंगल्या. हास्यविनोद झाला. पंजाबरावांचा विरोध विचारांना होता, व्यक्तींना नव्हता. पंजाबराव यांचे अध्यक्षतेखाली दुसऱ्या दिवशी अमरावती रेल्वे स्टेशनजवळ सुभाष क्लबचा बक्षीस वितरण समारंभ होता. त्यांची विचारसरणी लक्षात घेता विदर्भवाद्यांची सभा महाराष्ट्रवाद्यांनी उधळली ही गोष्ट त्यांना पसंत पडणार

नाही व ते आपली नाराजी व्यक्त करतील अशी भीती लोकांना वाटत होती. पण त्या दिवशी त्यांनी लोकांच्या कृतीचे समर्थन केले व विदर्भवादी मंत्र्यांवर टीका केली. ते म्हणाले, ''ज्या मंत्र्यांना न्यायपालिकेचे व मंत्र्यांचे अधिकार यांतील फरक कळत नाही त्यांना अमरावतीच्या तरुणांनी जे बक्षीस दिले त्यापेक्षा त्यांची दुसरी कोणती पात्रता होती ?'' भाऊसाहेब जनतेच्या योग्य भावनांची कदर बाळगणारे होते. भारतातील भांडवलदार व वरिष्ठवर्ग हाती सत्ता आली की सत्तेच्या जोरावर कष्टकरी बहुजन समाजाला दाबण्याचा प्रयत्न करतो. या अन्यायाला, दडपशाहीला बहुजन समाज वृत्तपत्रातून उत्तर देऊ शकत नाही. वृत्तपत्रे उच्चवर्गाच्या, भांडवलदारांच्या मालकीची असतात. अशा वेळी बहुजन समाजाचा क्रोध सभा उद्ध्वस्त करण्यापर्यंत गेला तर त्यांचे चुकले असे म्हणता येणार नाही. भाऊसाहेबांची सभासुद्धा नागपूरला विदर्भवाद्यांनी उद्ध्वस्त केली नव्हती काय? महाराष्ट्रातील मध्यमवर्गाने संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळीला पाठिंबा दिला खरा पण भांडवलदारांना तो मोडून काढणे सहज शक्य झाले असते. मात्र डॉ. पंजाबराव यांनी खेड्यापाड्यातील जनसामान्य या चळवळीच्या पाठीशी उभा केला. जनसामान्याच्या सत्त्वाने ही चळवळ उजळून निघाली. शेतकरी-शेतमजुरांच्या मजबूत हातांचा आधार तिला लाभला. त्यांनी आक्रमक निषेधाचा अवलंब केला. त्यामुळे भांडवलदारांना ही चळवळ दडपता आली नाही. पंजाबरावांनी या चळवळीला सर्वसामान्य जनतेच्या लढ्याचे तेज प्राप्त करून दिले. त्यांच्यावरील गाढ विश्वासाने जनता या लढ्यात सहभागी झाली, हे त्यांचे कार्य अलौकिक व अत्यंत महत्त्वाचे आहे. सर्वत्र खदखदत असलेल्या असंतोषामुळे व सतत होणाऱ्या विरोधामुळे १ नोव्हेंबर १९५६ ला महाद्विभाषिक मुंबई राज्य अस्तित्वात आले. यशवंतराव चव्हाण या राज्याचे मुख्यमंत्री झाले. गुजराती माणसाऐवजी मराठी माणूस आला. या द्विभाषिक राज्याने कोणाचेच समाधान झालेले नव्हते. महाराष्ट्र व गुजरात मध्येही असंतोष वाढत होता. यापूर्वी घडलेल्या काही घटना महत्त्वाच्या आहेत.

१९५५ च्या जानेवारी महिन्यात मुंबईत प्रचंड धामधूम होती. १६ जानेवारीला संयुक्त महाराष्ट्राच्या अनेक नेत्यांना अटक करण्यात आली. त्याच दिवशी नेहरूंनी आकाशवाणीवरून मुंबई केंद्रशासित करण्यात आल्याची घोषणा केली होती. संध्याकाळी कामगार मैदानावर पुढाऱ्यांच्या अटकेच्या निषेधार्थ सभा आयोजित करण्यात आली. आचार्य अत्रे यांनी नेहरू आणि मोरारजीभाई यांचेवर सडकून टीका केली. २६ जानेवारी १९५६ रोजी अत्र्यांना अटक करण्यात आली व पुढे त्यांची सुटकाही झाली. नेहरूंनी पाच वर्षे मुंबई केंद्रशासित करण्याचा जो निर्णय घेतला होता त्याच्या निषेधार्थ १० जून १९५६ रोजी मुंबईच्या शिवाजी पार्कवर युवक सभेने एक निषेध सभा भरवली. अकोल्याला संयुक्त महाराष्ट्र समितीची बैठक झाली. त्या बैठकीत दिल्लीला

जाऊन सत्याग्रह करण्याचे ठरवण्यात आले. महाराष्ट्राच्या कानाकोपऱ्यातून या आंदोलनाला भरपूर प्रतिसाद मिळाला. दिल्ली येथील मोर्चा प्रचंड होता. शाहीर अमरशेख यांनी दिल्ली गाजवली.

७ ऑगस्ट १९५६ रोजी लोकसभेने महाद्विभाषिक राज्याची योजना संमत केली. पुन्हा वणवा पेटला. तिकडे अहमदाबादही पेटले. त्यांनाही हा निर्णय पटला नाही. मोरारजींच्या सरकारने अहमदाबाद मध्ये हत्त्याकांड घडवून आणले. हत्त्याकांडाची पाहाणी करण्यासाठी मोरारजी गुजरातमध्ये गेले; पण लोकांनी त्यांच्याकडे पाठ फिरविली. द्विभाषिक राज्याविरुद्ध जनमत जागृत करण्यासाठी ३० सप्टेंबर व १ ऑक्टोबर या तारखांना शिवाजी पार्क मैदानावर भव्य 'महाद्विभाषिक परिषद' भरवण्यात आली. अनेक पुढाऱ्यांची भाषणे झाली. आगामी निवडणुकीत काँग्रेसचा पराभव करण्याचे ठरविण्यात आले. दुसऱ्या दिवशी निषेधाचा ठराव मांडला गेला. हा निषेधाचा ठराव भाई लालजी पेंडसे यांनी मांडला होता. संयुक्त आघाडी स्थापन करून लढा अधिक तीव्र करण्याचे ठरले. दुसऱ्या दिवशी याच मैदानावर भाई माधवराव बागल यांचे अध्यक्षतेखाली एक मेळावा भरला व त्यात बागल यांनी आचार्य अत्रे यांना संयुक्त महाराष्ट्रवादी वृत्तपत्र काढण्याची सूचना केली. त्यातून 'मराठा' दैनिकाचा जन्म झाला. १५ नोव्हेंबर १९५६ पासून मराठा नियमित सुरू झाला. संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळीत मराठाचे कार्य अत्यंत महत्त्वाचे आहे. मार्च १९५७ च्या दुसऱ्या आठवड्यात सार्वत्रिक निवडणुका होणार होत्या. डिसेंबर १९५६ पासूनच संयुक्त महाराष्ट्र समितीने प्रचाराचा झंझावती कार्यक्रम सुरू केला. महाराष्ट्रात अभूतपूर्व चमत्कार घडून आला. समितीला घवघवीत यश मिळाले. त्यानंतर मुंबई महानगर पालिकेच्या निवडणुका समितीने लढवल्या. तिथेही समितीला बहुमत मिळाले. मुंबई महानगर पालिकेवर समितीचा झेंडा फडकला. द्विभाषिक राज्य आल्यानंतर प्रत्यक्ष नेहरूंसमोर आपला रोष प्रगट करण्याची संधी मराठी जनतेला ३० नोव्हेंबर १९५७ ला प्राप्त झाली. प्रतापगडावर नेहरूंच्या हस्ते छत्रपती शिवाजी महाराजांचा पुतळा उभारला जाणार होता. मराठी माणसाला शांत करण्यासाठी म्हणून मुद्दाम हा कार्यक्रम घडवून आणला होता. कडक बंदोबस्त असतानाही नेहरूंना काळे झेंडे दाखवून विरोध प्रगट करण्यात आला. महाराष्ट्रात सारे लोक आता संयुक्त महाराष्ट्राच्याच भावनेने भारावलेले असल्याने त्या योजनेचा काही फायदा झाला नाही. पंडित नेहरूंना मात्र लोकप्रक्षोभाची जाणीव झाली. द्वैभाषिक उधळून लावण्याचे प्रयत्न सुरूच होते. सार्वत्रिक निवडणुकांमध्ये पश्चिम महाराष्ट्र व मराठवाडा यांत काँग्रेसची पिछेहाट झाली. काँग्रेसमध्ये चव्हाण गट व हिरे गट असे दोन गट पडले. हिरेंनी मोरारजीभाईंना मुख्यमंत्री होण्यास विरोध

केला व मोरारजींनी यशवंतराव चव्हाण यांना पुढे केले. यशवंतराव महाराष्ट्राचे मुख्यमंत्री झाले. परंतु संयुक्त महाराष्ट्राचा लढा थांबला नाही. तो अधिक प्रभावी होऊ लागला. यशवंतरावांनीही जाहीर केले. – ''मी संयुक्त महाराष्ट्राची चळवळ सत्तेच्या जोरावर दाबण्याचा प्रयत्न करणार नाही.'' यशवंतरावांनाही द्वैभाषिक फार काळ चालवता येणार नाही याची कल्पना होती. गुजरातमध्येही असंतोष पसरत होता. 'गुजरात जनता परिषद' आपला गुजराती राज्याचा लढा तीव्र करीत होती. गुजराती व मराठी जनतेत भावनिक दृष्ट्या जवळीक निर्माण होत नव्हती. दोन्ही भाषिकांना आपापली स्वतंत्र राज्ये निर्माण व्हावी असे वाटत होते. द्वैभाषिक राज्य संपुष्टात आणले पाहिजे असे आता महाराष्ट्र व गुजरातच्या नेत्यांना वाटू लागले. ऑगस्ट १९५६ मध्ये राज्य पातळीवरील नेत्यांनी आपला निर्णय कळविला. ६ सप्टेंबर १९५९ रोजी कॉंग्रेस वर्किंग कमिटीची बैठक भरली व त्यात द्वैभाषिक मुंबई राज्याच्या प्रश्नावर विचार करण्यात आला. समितीने तत्कालीन कॉंग्रेस अध्यक्षा श्रीमती इंदिरा गांधी यांना अधिकार दिला व त्यांनी याच वर्किंग कमिटीच्या सदस्यांशी सल्लामसलत करून २९ सप्टेंबर १९५९ रोजी भरणाऱ्या कॉंग्रेस कमिटीपुढे अहवाल मांडावा असे ठरले. यशवंतराव चव्हाण यांनी पुढाकार घेऊन–गेल्या तीन वर्षांत द्वैभाषिक राज्याचा प्रयोग भावनिक ऐक्य निर्माण करू शकला नाही, राज्यात सर्वत्र असंतोष आहे, वृत्तपत्रांचा पाठिंबा द्वैभाषिकाला नाही, मराठी भाषिकांचे मुंबईसह मराठी भाषिक राज्य स्थापन करणे आवश्यक आहे – अशा आशयाचे विचार प्रभावीपणे मांडले व आपले म्हणणे पटवून दिले. नेहरूंनाही महाराष्ट्रातील जनप्रक्षोभाची जाणीव झाली होतीच. द्वैभाषिक राज्यासंबंधी फेरविचार झालाच पाहिजे अशी इंदिराजींची खात्री झाली. इतर नेतेसुद्धा आता याच विचारावर आले होते. चंदीगढ येथील कॉंग्रेस अधिवेशनात नऊ सदस्यांची समिती या प्रश्नाची सोडवणूक करण्यासाठी नेमावी असे ठरले व पुढे या समितीने 'द्वैभाषिक राज्याचे विभाजन करून मुंबईसह संयुक्त महाराष्ट्र निर्माण करावा'–अशी शिफारस केली. एप्रिल १९६० मध्ये भारतीय संसदेने ही बाब मान्य केली व १ मे १९६० रोजी महाराष्ट्र राज्य अस्तित्वात आले.

संयुक्त महाराष्ट्राची चळवळ ही खऱ्या अर्थाने जन–चळवळ होती. यात विविध पक्षांच्या राजकीय पुढाऱ्यांचा सहभाग होता, सामाजिक कार्यकर्त्यांचा सहभाग होता, पण त्यापेक्षा जास्त सहभाग होता सर्वसामान्य माणसाचा; आणि सर्वसामान्य माणसाला या चळवळीत सहभागी करून घेण्याचे कार्य विदर्भात डॉ. पंजाबराव देशमुख यांनी मोठ्या प्रमाणावर केले.

पण आज संयुक्त महाराष्ट्राला एकोणचाळीस वर्षे पूर्ण झाली असताना जाणवते

की, भाऊसाहेबांच्या विश्वासाला तडा गेला आहे. संयुक्त महाराष्ट्रात विदर्भाचा विकास झाला नाही. नागपूर करार करताना बॅरि. रामराव देशमुखांना ज्या शंका होत्या व ज्या गोष्टींवर ते अडून बसले होते नेमक्या त्याच गोष्टी आज खऱ्या झाल्या आहेत. विदर्भ सर्वच बाबतीत मागासलेला आहे. संयुक्त महाराष्ट्र झाला, पण संपन्न महाराष्ट्र झाला नाही. विदर्भात आज पुन्हा वेगळ्या विदर्भाची मागणी जोर धरू लागली आहे.



**संदर्भ ग्रंथ :**


१. जागतिक कृषक क्रांतीचा विधाता-लोकनेता डॉ. पंजाबराव देशमुख (लेखक - स्वातंत्र्य संग्राम सेनानी-वीर उत्तमराव मोहिते)

२. डॉ. पंजाबराव: जीवन कार्य- सुदाम सावरकर व रा. ब. सूर्यकर

३. मराठी विश्वकोश खंड बारावा - प्रमुख संपादक - तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी

४. संयुक्त महाराष्ट्र: काल आणि आज - संपादक प्रा. भगवान काळे.

५. झालाच पाहिजे! - प्रल्हाद केशव अत्रे - डिंपल पब्लिकेशन, ठाणे

६. संयुक्त महाराष्ट्राचे मारेकरी - डॉ. गो. वि. देशमुख

७. रुतलेल्या पारंब्या - संपादक प्राचार्य गु. मा. सोमवंशी, प्रा. रू. वा. पाटील, प्रा. बजरंग सरोदे/ प्रस्तावना डॉ. वि. भि. कोलते.

# भाऊसाहेब - निजाम संबंध : वस्तुस्थिती

दौलतराव तुकाराम गोळे

---

'महाराष्ट्राच्या पुरोगामी परंपरेतील एक देदीप्यमान तारा' असे आताशा डॉ. पंजाबराव देशमुखांचे वर्णन केले जाते. याच परंपरेतील जे देदीप्यमान तारे होऊन गेले त्यांत अग्रपूजेचा मान म. जोतिराव फुले यांचेकडे जातो. महात्मा फुलेंना आधुनिक भारतातील मूलगामी समाजपरिवर्तनाचे 'आद्य प्रवर्तक' म्हणून सामाजिक इतिहासाने आताशा मान्य केले आहे.

आपल्या या महाराष्ट्राची जडणघडण करणाऱ्या नेत्यांमध्ये कोल्हापूरचे राजर्षि छत्रपती शाहू महाराज यांचे स्थान तेवढेच वैशिष्ट्यपूर्ण आहे. एकोणविसाव्या शतकात म. जोतिराव फुल्यांनी स्वाभिमानाचे व समतेचे बी पेरून जे झाड लावले त्याला खतपाणी घालून काळजीपूर्वक वाढविले ते शाहू छत्रपतींनी.

याच परंपरेतला एक महामानव म्हणून ज्या व्यक्तिमत्वाकडे आधुनिक महाराष्ट्राचा इतिहास डोळे भरून पाहातो ते व्यक्तिमत्व आहे डॉ. आंबेडकरांचे. डॉ. आंबेडकरांच्या जडणघडणीमध्ये या देशातील दोन मराठा नरेशांचा सिंहाचा वाटा आहे, हे देखील आताशा सर्वांनाच ज्ञात आहे.

त्यामानाने डॉ. पंजाबरावांचे व्यक्तिमत्व स्वयंभू आहे. तसे पाहिले तर डॉ. पंजाबराव देशमुख, महात्मा फुले, राजर्षि शाहू आणि डॉ. आंबेडकरांच्या खांद्यावर उभे राहिलेले विदर्भातील एक आगळेवेगळे व्यक्तिमत्व होय! या व्यक्तिमत्वाची खरी ओळख विदर्भाला व्हायला देखील बराच मोठा कालावधी जावा लागला. डॉ. पंजाबराव देशमुख या विदर्भाच्या भूमीवर उदयाला आलेला एक समृध्द असा विचार होय. त्यांनी आपल्या सार्वजनिक जीवनाला सुरुवातच मुळी श्री श्रद्धानंद वसतिगृहाचे स्थापनेपासून केली, त्यामध्ये त्यांचा हेतू स्पष्टपणे प्रतीत होतो. काय होता तो हेतू? 'सर्व जाती-पातीच्या मुलांनी एकत्र राहाणे, खाणे-पिणे म्हणजे महान समाजक्रांतीच होय!' म. फुलेंना हेच अभिप्रेत होते.

डॉ. बाबासाहेब आंबेडकर तर त्यांचे जिवाभावाचे मित्रच होते. १९२७ साली ते डॉ. पंजाबरावांच्याच निमंत्रणावरून अमरावतीला आले होते. अमरावतीत बुधवारा विभागातील इंद्रभुवन थिएटरमध्ये त्यांचेच अध्यक्षतेखाली एका परिषदेत ''अंबादेवीचे मंदिरात अस्पृश्यांना प्रवेश मिळावा'' - असा निर्णय झाला होता. डॉ. आंबेडकरांच्या 'शेड्यूल-कास्ट फेडरेशन'च्या विदर्भ विभागाचे अध्यक्ष डॉ. पंजाबराव देशमुख होते, हे देखील सिद्ध झालेले आहे.

डॉ. पंजाबरावांचा त्यावेळी गाजलेला तो आंतरजातीय विवाह ''जाती ठेवायच्या की तोडायच्या''- या त्यांचे त्यावेळच्या निर्धाराचा निदर्शक होता. डॉ. पंजाबरावांच्या समाजकार्याची व राजकारणाची ती गरूडभरारी पाहून, मोठमोठे विस्मयचकीत झाले होते! १९२६ साली परदेशातून परत आल्यावर १९२८ मध्येच ते त्यावेळच्या जिल्हा कौन्सिलचे लोकनिर्वाचित अध्यक्ष झाले होते, आणि १९३० मध्येच त्यांनी बॅ. रामराव देशमुखांसारख्या मातब्बर पुढाऱ्याचा त्यावेळच्या विधानसभेच्या निवडणुकीत ८०० मतांनी पराभव करून विधानसभेत प्रवेश मिळविला होता. आणि एवढेच नव्हे, तर त्यावेळच्या मध्यप्रदेशाचे मंत्रीमंडळातही ते विराजमान झाले होते. भारतातला सर्वात तरुण मंत्री असा त्यांचा लौकिक त्यावेळी सर्वत्र पसरला होता आणि त्यामुळेच की काय, त्यांच्या विषयी एक प्रकारची 'धडकी' त्यांचे राजकीय प्रतिस्पर्ध्यांत निर्माण झाली होती.

त्यांना एकदा जीवे मारण्याचा प्रयोग याच अमरावती शहरात झालेला त्यावेळच्या लोकांनी पाहिला होता. त्यानंतर डॉ. पंजाबरावांना बदनाम करून जीवनातून उठविण्याचाही एक प्रयत्न विरोधकांनी करून पाहिला, पण तो सफल मात्र झाला नाही.

या पार्श्वभूमीवर १९३२ साली त्यांनी स्थापन केलेली श्री शिवाजी शिक्षण संस्था, आणि त्या निमित्ताने डॉ. भाऊसाहेब पंजाबराव देशमुख व हैद्राबाद संस्थानचे 'अधिपती' आला हजरत निजाम शहा यांचा १९३९ ते १९४५ च्या दरम्यान आलेला तो संबंध व त्यातून त्याकाळात विदर्भात काही कट्टर हिंदुत्ववाद्यांनी माजवलेला तो अभूतपूर्व असा 'गदारोळ' समजून घेणे मोठे उद्बोधक होईल. त्याचाच हा धावता आढावा :-

सन १९३२ चा तो काळ. १९३२ च्या डिसेंबरात श्री शिवाजी शिक्षण संस्थेची स्थापना झाल्यावर छोट्या मोठ्या देणग्यांच्या भरवशावर आणि कधी कधी गावोगाव जाऊन संस्था चालविण्यासाठी झोळ्या फैलावून हा जगन्नाथाचा रथ कसातरी पुढे ढकलणे चालू होते. आर्थिक डबघाईला आलेल्या या संस्थेला कुणाच्या तरी मोठ्या आधाराची गरज होती.

त्या काळी निजाम सरकारला इंग्रजांकडून वऱ्हाडसाठी सालाना ३५ लाख रुपयांची

डणी दिली जात होती. १९३९ ला हैद्राबादला निजामाचा 'हीरक-महोत्सव' साजरा वयाचा होता. ही संधी साधून निजाम सरकारकडून वऱ्हाडातील उर्दू शिक्षणासाठी ही आर्थिक लाभ पदरात पाडून घ्यावा या संदर्भात विदर्भातील मुस्लिम नेते विचार ीत होते. या पार्श्वभूमीवर खामगावच्या अंजुमन उर्दू हायस्कूलच्या कार्यकारी मंडळाची ा झाली आणि तीत पांढरकवड्याचे वकील खानसाहेब अब्दुल रौफशहा यांचे ‍ शिष्टमंडळ हैद्राबादला पाठवावे असे ठरले. खानसाहेब हे एक प्रभावी व्यक्तिमत्व ा! ते उर्दू भाषेचे उत्तम साहित्यिक व वक्ते होते. खिलाफतची चळवळ, स्वदेशीची ळवळ, प्रांतिक मुस्लिम लीगचे अध्यक्ष या नात्याने त्यांच्या व्यक्तिमत्वाला एक गळीच झळाळी लाभली होती; आणि याहीशिवाय त्यांचे निजामदरबारी एक शिष्ट प्रकारचे वजन होते.

या पार्श्वभूमीवर काही मुस्लिम नेत्यांना घेऊन त्यांनी हैद्राबादच्या आला हजरत जामशहाची भेट घेऊन त्यांना आपला मनोदय कळविला. पण त्यांना जे उत्तर ळाले ते अनपेक्षित होते. त्यांना सांगण्यात आले की, "आपले शिष्टमंडळ नुसते स्लमांचे आहे. यात 'हिंदू' प्रतिनिधी आपण आणू शकत असाल तर आपल्या ाणीचा अवश्य विचार होईल."

हे उत्तर म्हणजे खानसाहेबांच्या दृष्टीने एक मोठाच पेच होता, कारण १९३७-३८ ूनच हिंदू-मुसलमानांत तेढ उत्पन्न होऊन त्यावेळी वातावरण बरेच तापलेले होते. जांनी 'डिव्हाइड ॲण्ड रूल'च्या नावे लावलेल्या विषवृक्षाला आलेलं हे एक ारी फळ होतं.

खानसाहेबांना हा जसा पेच होता तसाच हा पेच सुटला तर निजाम दरबारासाठी हा ‍ 'शुभशकुन' ठरणार होता. हिंदु-मुसलमान तेढीच्या पार्श्वभूमीवर त्यांचे 'संयुक्त ष्टमंडळ' ही तेढ कमी करण्याचे दृष्टीने चांगली घटना होती. सोबतच वऱ्हाड जांकडून परत कसा मिळविता येईल याचाही जागरूकतेने विचार करणाऱ्या जामशहाच्या दृष्टीने हा एक शुभयोग होता, एक दूरदर्शी पवित्रा होता!

खानसाहेब रौफशहा यांनी आपले एक जिव्हाळ्याचे मित्र यवतमाळचे श्री. ना. पाटील यांचा सल्ला घेतला. हिंदू-मुसलमान तेढीने भारलेल्या त्या प्रक्षुब्ध ावरणात हिंदूंचे सहकार्य लाभणे हे असंभव होऊन बसलेले; आणि अशा वेळी ूंना, "मुसलमान राजाकडे दान मागायला चला" - असे म्हणण्याचे दुःसाहस कोण करणार? पण श्री. ना. बा. पाटलांना यावेळी आठवल्या त्या विदर्भातील व्यक्ती! एक पंढरीनाथ पाटील आणि दुसरी डॉ. पंजाबराव देशमुख! जाती, पंथ, ा, परंपरा, धर्म यांच्यापुढे जाऊन मानवतेच्या व जनहिताच्या दृष्टीने ते सांप्रत ातीकडे पाहू शकत होते. रौफशहा व मुजफ्फर हुसेन डॉ. पंजाबराव देशमुख

मध्यप्रदेश मंत्रिमंडळात असताना कायदेमंडळाचे सदस्यही होतेच, त्यामुळे त्यांनाही आशेचा किरण दिसला आणि डॉ. पंजाबरावांची भेट ठरवून खानसाहेब रौफशहा श्री. ना. बा. पाटील व इतर आपल्या सहकाऱ्यांसमवेत डॉ. पंजाबराव देशमुखांना भेटले. भाऊसाहेबांनी कुठलीही अढी वा किंतू न ठेवता त्यांचे मनमोकळेपणाने स्वागत केले. भाऊसाहेब म्हणजे एक चालतीबोलती पारदर्शी मानवता जिथे जातपात, पंथभेद, पक्षधर्म या साऱ्याच अभेद्य वाटणाऱ्या भिंती गळून पडतात आणि एकप्रकारची मानवीय पारदर्शिता आपल्यासमोर उभी ठाकते, याचा पडताळा त्या शिष्टमंडळाला तेव्हाच येऊन चुकला होता. शिष्टमंडळाची सारी कैफियत ऐकून घेताना त्यांना एका डोळ्याने दिसला मागास आणि शिक्षणवंचित 'मुसलमान' समाज आणि दुसऱ्या डोळ्याला दिसला विदर्भातील खेड्यापाड्यांत शिक्षणावाचून खितपत पडलेला अशिक्षित असहाय 'ग्रामीण समाज'. आणि दोन्ही डोळ्यांतील चित्रांची सरमिसळ झाल्याने त्यांच्या लक्षात आले-हा तर कदाचित आपल्याच उद्दिष्टपूर्तीचा क्षण! आणि त्यामुळेच त्यांनी क्षणार्धात त्या शिष्टमंडळाला होकार भरला. अशक्यप्राय वाटणारी 'हिंदु-मुस्लिम' युती इतक्या सहजासहजी नजरेच्या टप्प्यात आलेली पाहून मुस्लिम शिष्टमंडळाला अतिशय आनंद झाला.

डॉ. भाऊसाहेबांनी स्वत: निजामदरबारी पत्रव्यवहार केला, मुस्लिम शिष्टमंडळाच्या कैफियतीतील सत्यासत्यता पडताळून घेतली आणि हैद्राबादला जायचा एक कार्यक्रम आखला. या योजनेनुसार श्री शिवाजी शिक्षण संस्थेचे अध्यक्ष डॉ. पंजाबराव देशमुख, यवतमाळचे श्री. ना.बा. पाटील, मध्यप्रांत वऱ्हाड सरकारचे मंत्री ना. विठ्ठल बंधूजी चौबळ, चिखलीचे श्री. पंढरीनाथ पाटील, पांढरकवड्याचे ॲड. अब्दुल रौफशहा, अकोल्याचे मोहिबूल हक, खामगावचे अब्दुल रहमान खान, पांढरकवड्याचे नरसिंगराव येलमे पाटील, सरफराज खान, जहागिरदार काद्री, मुझफ्फर हुसेन खतीब, सेठ महंमद हरून, मजीदखान- इत्यादींचे एक संमिश्र शिष्टमंडळ तयार झाले. संपूर्ण विदर्भातून एकेक प्रतिनिधी घेतल्याने हे शिष्टमंडळ जणू संपूर्ण विदर्भाचेच प्रतिनिधित्व करीत होते. हे संयुक्त शिष्टमंडळ हैद्राबादेस पोहोचताच अनेक सरकारी अधिकारी व लोकप्रतिनिधींनी त्यांचे रेल्वे स्टेशनवर हारतुरे व पुष्पगुच्छांनी स्वागत केले. चार शाही मोटारगाड्या दिमतीला देऊन त्यांना सुसज्जित निवासस्थानी पोहोचविण्यात आले. बादशाही बडदास्त व राजेशाही सोपस्कारात पाच दिवस त्यांचा आतिथ्य-सत्कार झाला.

वऱ्हाडच्या वतीने एक सुंदर मानपत्र आला हजरत निजामशहांना भेट देण्यात आले. त्यात वऱ्हाडातल्या मागासलेल्या गरीब लोकांची शिक्षणाची सोय करण्याची विनंती करण्यात आली. हे मानपत्र वाचून दाखविण्यापूर्वी ज्युबिली हॉलमधील त्या

शाही दरबारात डॉ. पंजाबराव देशमुख, श्री. पंढरीनाथ पाटील व अब्दुल रौफशहा यांची निजामशहाच्या गौरवपर भाषणे झालीत. आला हजरत निजामशहांनीही या संयुक्त शिष्टमंडळाच्या संयुक्त मानपत्राचा सानंद स्वीकार करून शिष्टमंडळातील सर्व सदस्यांचा गौरव केला व धन्यवाद दिले.

गेल्या शंभर वर्षांच्या निजामशाहीच्या इतिहासातील हा एक अविस्मरणीय प्रसंग होता. वऱ्हाडचे शिष्टमंडळ हैद्राबादेहून निघताना शिष्टमंडळाला निरोप देण्याच्या कार्यक्रमात 'प्रिन्स ऑफ बेरार' यांनी वऱ्हाडभेटीचे डॉ. पंजाबरावांनी दिलेले निमंत्रण स्वीकारले. आला हजरत निजामशहांनीही या निमंत्रणाला दुजोरा दिला आणि आपली स्वीकृती प्रदान केली. याच समारंभात श्री शिवाजी शिक्षण संस्थेला वीस हजार व अंजुमन हायस्कूलला वीस हजारांच्या देणगीचा पहिला हप्ता बहाल करण्यात आला. दुसरा हप्ता युवराजांच्या वऱ्हाडच्या आगमनानंतर देण्यात येईल असेही अभिवचन मिळाले.

या वीस हजारांच्या देणगीने शिवपरिवारात आशेची नवीन प्रभात उगवली. पण त्याचवेळी श्री शिवाजी शिक्षण संस्थेच्या कानाकोपऱ्यात या देणगीबद्दल सुंदोपसुंदी सुरू झाली. खुद्द श्री शिवाजी शिक्षण संस्थेच्या कार्यकारी मंडळातील काही सदस्य डॉ. पंजाबरावांच्या निजामभेटीची जबाबदारी घेण्यास तयार नव्हते. त्यामुळे श्री शिवाजी शिक्षण संस्थेच्या कार्यकारी मंडळात विघटन होण्याची चिन्हे दिसू लागली. हे सर्व पाहून डॉ. भाऊसाहेब स्तब्ध झाले. वीस हजारांची देणगी मिळवताना त्यांच्या पदरचे तीन हजार रुपये खर्च झाले होते, त्याची त्यांना पर्वा नव्हती. पण आपलेच लोक विरोधकांच्या प्रचाराला बळी पडून आपल्याविरुद्ध जातात हे पाहून त्यांचे मन विषण्ण झाले होते. ही परिस्थिती ओळखून एके दिवशी सायंकाळी काशीराव बापू देशमुख आणि शामराव गुंड भाऊसाहेबांच्या बंगल्यावर गेले. या दोन प्रतिष्ठित व्यक्तींच्या समोरच भाऊसाहेबांनी बेजबाबदारपणे वागणाऱ्या व बोलणाऱ्या 'त्या' दोन व्यक्तींची हजेरी घेतली. त्यांच्या बेजबाबदार कृत्याबद्दल बापूसाहेब देशमुखांनी खेद व्यक्त केला. श्री शिवाजी शिक्षण संस्थेची पहिली घटना संयुक्त जबाबदारीच्या तत्त्वावर आधारित नव्हती, म्हणून या नव्या परिस्थितीच्या प्रकाशात दुसरी घटना तयार करून डॉ. भाऊसाहेबांना 'तहहयात अध्यक्ष' करावे यावर सर्वांचे एकमत झाले.

दुसरी घटना तयार झाली. श्री शिवाजी शिक्षण संस्थेच्या आमसभेत काशीराव बापूंनी तशी सूचना आणताच तिला शामराव गुंड यांनी अनुमोदन दिले. ही नवीन घटना बिनविरोध पास झाली. या आमसभेच्या वेळी स्वतः भाऊसाहेब मात्र मुद्दाम अनुपस्थित राहिले.

नवीन घटनेप्रमाणे डॉ. भाऊसाहेब श्री शिवाजी शिक्षण संस्थेचे आजीव अध्यक्ष

बनले व कोषाध्यक्षाची माळ श्री. एस. व्ही. देशमुखांच्या गळ्यात पडली. निजामच्या दरबारातून आणलेली वीस हजाराची देणगी संस्थेच्या खजिन्यात जमा झाली. या वीस हजारांच्या निधीतून मोर्शी रोडवरील पटांगणात १६ खोल्या व दोन राऊंड हॉल असलेली एक आलिशान इमारत मूर्त रूप घेऊ शकली.

निजामाच्या युवराजांना 'प्रिन्स ऑफ बेरार' ही पदवी इंग्रज सरकारकडून लाभली होती. त्यांच्या देणगीच्या स्मरणार्थ सदर इमारतीचे नामकरण 'प्रिन्स ऑफ बेरार होस्टेल' असे करण्यात आले. त्याचा अनावरण समारंभ खास युवराजांच्या हस्ते भाऊसाहेबांनी आयोजित केला. निजामचे युवराज अमरावतीला भेट देणार-ही वार्ता वाऱ्यासारखी सर्वदूर पसरली. वीस हजार देणगीच्या रूपात रोख मिळाले तेव्हाच त्यातून भलतेसलते अर्थ काढून अफवांचे पेव फोडण्यात आले होते. 'मुसलमान-मराठे एक झाले, ते वऱ्हाडात मोगलाई आणणार' अशा हेतुपुरस्सर प्रचाराने भोळ्या जनतेची दिशाभूल करण्याचे प्रयत्न झाले होते. आता तर कल्पनाविलासाला जणू ऊत आला होता. विविध क्षेत्रांतील विरोधकांनी जणू एक संयुक्त आघाडीच त्यासाठी उघडली होती. अन्य शहरांमधून देखील या आगमनावर आगपाखड सुरू केली होती. नागपूरपासून पुण्यापर्यंतच्या सर्व वृत्तपत्रांनी, 'डॉ. पंजाबरावाने निजामाला वऱ्हाड गहाण टाकला!', 'स्वार्थासाठी निजामाला शरण जाऊन वऱ्हाड विकला!' अशा मथळ्यांखाली विषारी प्रचार केला आणि या प्रचारानं गोंधळलेले असंख्य भाबडे लोक भाऊसाहेब आणि त्यांच्या सहकाऱ्यांना शिव्यांची लाखोली वाहू लागले.

निजाम राजपुत्राच्या श्री शिवाजी शिक्षण संस्थेने आयोजित केलेल्या समारंभाला विरोध करण्यासाठी 'हिंदुत्ववादी' कार्यकर्त्यांची तयारी जोरात सुरू झाली. ब्रह्मविद्या मंदिरातील एका सभेत श्री. वि. ध. देशपांडेंनी डॉ. पंजाबराव देशमुखांवर कडाडून हल्ला केला आणि सत्कारविरोधी आंदोलन उभे करण्याची धमकी देऊन स्वयंसेवकांची एक संघटना उभारली. सर्व पक्षांतील जहाल, मवाळ, राष्ट्रीय-परराष्ट्रीय, देशी-विदेशी प्रवृत्ती विरोध करण्यात पुढे आल्या. डॉ. भाऊसाहेबांचे काही जवळचे लोकही या प्रचाराला बळी पडले आणि विरोधी सूर लावू लागले. अमरावतीतील प्रसिद्ध सहकार महर्षी लक्ष्मणराव भोकरेंनी ब्रह्मविद्यामंदिरात डॉ. पंजाबराव विरोधी सभा घेतली. आणि निजाम युवराजाच्या सत्कार समारंभावर त्यांनी प्रखर टीका करण्यास सुरुवात केली. मात्र त्या सभेत डॉ. पंजाबराव येऊन पोहोचताच त्यांनी तेथून पळ काढला.

दुसरी सभा सुप्रसिद्ध कम्युनिस्ट पुढारी भाई माधवराव देशपांडे यांच्या अध्यक्षतेखाली ब्रह्मविद्या मंदिरातच घेण्यात आली. या सभेत भाई शंकरराव दिघडेंनी आपल्या भाषणात डॉ. पंजाबराव देशमुख सरंजामी वृत्तीचे आहेत अशी टीका केली आणि या विधानाला डॉ. पंजाबराव देशमुख विरोधकांनी पाठिंबा दिला. या विधानावर वीर

उत्तमराव मोहित्यांनी आक्षेप घेतल्यावर भाई माधवराव देशपांडे यांनी वरील विधान हे शंकरराव दिघडेंचे वैयक्तिक विधान आहे आणि ही कम्युनिस्ट पक्षाची अधिकृत विधाने नव्हेत-अशी मल्लीनाथी केली; आणि लगेच दुसऱ्या दिवशी भाई दिघडेंनी स्वत:ची चूक कबूल करून आपली विधानं मागे घेतली.

हिंदुत्वनिष्ठांच्या भाऊसाहेब विरोधी आघाडीत वीर वामनराव जोशीही सामील झाले. निजाम राजपुत्र भेट विरोधी या आंदोलनात वीर वामनराव जोशींनी एका विराट सभेचे आयोजन केले. या सभेत 'डॉ. पंजाबराव देशमुख निमाजाचे पक्षपाती आहेत', 'त्यांनी वऱ्हाड निजामाला विकला' -अशी विधानं केली. त्यांच्या स्वतंत्र हिंदुस्थान या साप्ताहिकातही हीच विधाने छापून आली होती. या सभेत डॉ. पंजाबराव स्वत: जातीने हजर राहिले आणि या विधानांना त्यांनी सडेतोड उत्तरे दिली. त्यावेळच्या भाषणात भाऊसाहेब म्हणाले, "निजामाच्या ओट्यात वऱ्हाड टाकायला मी काही आज वऱ्हाडचा मालक नाही. मी वऱ्हाडला विकणारा कोण? मी कोणाच्या दृष्टीने चांगला असेन, कोणाच्या दृष्टीने वाईटही असेन. कोणाच्या दृष्टीने राष्ट्रीय तर कोणाच्या दृष्टीने परराष्ट्रीयही असेन. पण मी सतत जे जे करतो ते ते वऱ्हाडच्या जनतेच्या उद्धारासाठी करीत असतो. येथल्या जातीय प्रतिगामी धेंडांना वेळोवेळी वऱ्हाडच्या प्रेमाचा पान्हा फुटतो. पण याद राखा, वऱ्हाडवर आणि वऱ्हाडच्या जनतेवर डॉ. पंजाबराव देशमुखांपेक्षा जास्त प्रेम करणारा सपूत अजून जन्माला आला नाही."

त्याच महिन्यात रायपूर येथे डॉ. शामाप्रसाद मुखर्जी यांचे अध्यक्षतेखाली अ. भा. हिंदुसभेचे अधिवेशन झाले. त्यात अमरावती येथील 'प्रिन्स ऑफ बेरार'च्या आगमनाचा कार्यक्रम उधळून लावण्यासाठी हजारो रुपयांचा निधी व शेकडोंच्या स्वयंसेवक दलाची योजना आखणारा ठराव विशेष गाजला. हिंदुमहासभेचे जिल्हाध्यक्ष बापूसाहेब देशमुख हे भाऊसाहेबांचे निकटतम सहकारी आणि प्रांताध्यक्ष श्री. बाबासाहेब खापर्डे यांचे भाऊसाहेबांवर निर्व्याज प्रेम असल्याने त्यांना घटनेचे गांभीर्य चट्कन कळले व त्यांनी तो ठराव म्हणजे वऱ्हाडात असंतोष माजविण्यासारखे होईल, असे स्पष्टपणे सांगून त्या ठरावाला कडाडून विरोध केला. त्याप्रसंगी बाबासाहेब खापर्डे आपल्या छोटेखानी भाषणात म्हणाले, "विदर्भातील बहुजन समाजात 'हिंदुसभा' नुकतीच कुठे मूळ धरू लागली आहे. अशा स्थितीत या कार्यक्रमाचा निषेध हा आपलाच निषेध ठरेल. डॉ. पंजाबरावांच्या संस्थेला निजामाने देणगी दिली, तेव्हा त्यांच्या शिक्षणसंस्थेने जर त्यांचा सत्कार केला तर त्यात चूक कुठे आहे? शैक्षणिक बाबींशी राजकारण जोडणे अगदीच विसंगत! तुम्हाला निजामाचा इतका तिटकाराच असेल तर अमरावतीच्या जिल्हा कचेरीवर इंग्रजांच्या युनियन जॅकबरोबर निजामांचाही झेंडा डौलाने फडकत आहे, तो पाडण्याची हिंमत तुम्ही का करीत नाही?"

बापूसाहेब देशमुखांच्या सूचनेप्रमाणे अखेर डॉ. मुखर्जींच्या निर्णयानुसार ती योजना व तो ठराव फेटाळला गेला आणि 'कोणाला निषेध करावयाचा असेल तर तो आपल्या वैयक्तिक जबाबदारीवर करावा' - असा निर्णय घेण्यात आला.

तरीपण तापलेल्या वातावरणात विरोधाचे जहाल कट शिजू लागले. कित्येकांनी तर कुणीच काही न केल्यास शेवटी सभास्थानाला 'आग' लावून देण्याच्या भीष्मप्रतिज्ञा केल्या. येनकेन प्रकारेण शिवसंस्थेचा कार्यक्रम उधळून लावणे हा 'एक कलमी' कार्यक्रम विरोधकांचा ठरलेला. पण संकटात खांद्याशी खांदा लावणारे भाऊसाहेबांचे सारेच मित्र, सहकारी त्यांच्या पाठीशी उभे राहिले आणि विरोधाच्या या धारेवर 'काहीही झाले तरी कार्यक्रम होणारच, तो बंद पाडण्याची कुणाची छाती नाही!' या ईर्ष्येने कामाला लागले. कदम-होनाडे, भटकर-गावंडे आदींनी 'भारत सेवक दला'च्या स्वयंसेवकांची रांग उभी केली. जिल्हा कौन्सिलचे चेअरमन बापूसाहेब देशमुख यांचा सारा फौजफाटा कामाला लागला. मामासाहेब लोंढे व नानासाहेब देशमुख यांच्या नेतृत्वाखाली सारे आजीमाजी विद्यार्थी-कर्मचारी भव्य मंडप निर्मितीत तल्लीन होऊन परिसर शृंगारण्यात झटू लागले. दिव्यांची रोषणाई, तोरणं-पताका, आदींनी परिसराला नटविण्यात आले. स्वागतोत्सुक कमानी अंतराअंतरावर आपल्या माना उंचावू लागल्या.

उद्याच्या कामाची तयारी झाली म्हणतानाच आज निजामच्या सेक्रेटरीची तार आली, 'युवराजांचा दौरा स्थगित करण्यात आला आहे.' ही धक्कादायक बातमी म्हणजे शिवपरिवाराच्या प्रतिष्ठेला एक आव्हान होते. पण विचलित न होता भाऊसाहेबांनी निर्भयपणे सांगितले, "बिलकूल घाबरण्याचे कारण नाही. हा आपल्या परीक्षेचा प्रसंग आहे. मी येईपर्यंत वेळ काढा!" एस. व्ही. देशमुख, पंढरीनाथ पाटील व बापूराव देशमुख यांच्यावर अमरावतीची सारी जबाबदारी सोपवून त्यांनी आपली मोटार काढली आणि तडक हैद्राबाद गाठले.

"युवराज विदर्भ भेटीवर येतील तर जनक्षोभ उसळेल. त्यात त्यांच्या जिवालाही धोका होईल" - अशा आशयाच्या शेकडो तारा आल्याने दौरा स्थगित केल्याचे भाऊसाहेबांना निजामदरबारी कळले. भाऊसाहेबांनी युवराजांची भेट घेतली व त्यांना सांगितले, "कुठल्याही प्रक्षोभक परिस्थितीला तोंड देण्याची आमची तयारी आहे. आपल्या सुरक्षिततेची जबाबदारी माझी. ठरल्याप्रमाणे आपण आल्यास आपल्या केसालाही धक्का लागणार नाही याची मी हमी घेतो."

... आणि भाऊसाहेबांच्या या भक्कम आश्वासनाने भारून जाऊन युवराज यायला तयार झाले, निजामच्या शहांनीही याला सहमती दिली.

इकडे गावोगावच्या आलेल्या पाहुण्यांना थोपवून ठेवण्याचे काम बापूसाहेबांनी व पंढरीनाथ पाटलांनी केले. त्यांनी समयसूचकतेचे भान ठेवून तेथेच वेळेवर 'मराठा

शिक्षण परिषद' आयोजित केली. पंढरीनाथ पाटलांच्या आवशेपूर्ण व स्फोटक भाषणाने एक नवे चैतन्य सळसळू लागले, आणि अशात भाऊसाहेबांची 'युवराज येणार' म्हणून तार आली आणि नव्या चैतन्याने व उमेदीने कार्यकर्ते स्वागताच्या तयारीला लागले.

वऱ्हाडच्या कमिशनरने सरकारी रीत्या युवराजांच्या स्वागताची तयारी केली होती. २३ मार्च १९४५ ला स्टेशनपासून सर्किट हाऊसपर्यंत मालटेकडी रोडवर पोलिसांचा कडेकोट बंदोबस्त होता. इर्विनपासून स्टेशनपर्यंत काळी निशाणे उंचावणाऱ्या विरोधकांची तोबा गर्दी उसळली होती. पण कदम-होनाडे यांनी सायकल स्वारांची तुकडी पुढे करून आपल्या 'भारत सेवक दला'च्या पोलादी स्वयंसेवकांची फळी निर्भयपणे त्या गर्दीत घुसविली. स्टेशनजवळ त्या स्वयंसेवकांनी सर्वांना मागे रेटले. निजाम युवराजांची शाही ट्रेन धडधडत स्टेशनात आली आणि डॉ. भाऊसाहेबांनी पुष्पहारांनी त्यांचं स्वागत केलं. विरोधकांच्या निषेधाच्या आरोळ्या स्वयंसेवकांच्या प्रचंड जयजयकारात विरून गेल्या. त्यांची काळी निशाणं पुढे येऊच शकली नाहीत.

विरोधकांचा मुख्य उद्देश शिवसंस्थेचा मुख्य कार्यक्रम उधळून लावण्याचा होता. रात्रंदिवस राबून तयार केलेल्या या अभूतपूर्व सभास्थानाला वेळच आली तर पेटवून द्यायलाही विरोधक आणि त्यांचे सहकारी मागेपुढे पाहाणार नव्हते. ऐनवेळी मंडपात घुसता यावे म्हणून संस्थेच्या निमंत्रण पत्रिका पोस्टातून पळविण्याच्या घटनाही घडल्या होत्या. पण बापूसाहेबांची करडी नजर, स्वयंसेवकांची पूर्ण परिसर व्यापून टाकणारी उपस्थिती आणि स्वयंसेवक प्रमुखांची तत्परता-यांमुळे विरोधकांनी गडबड माजविण्यासाठी केलेले सर्वचे सर्व प्रयत्न थिटे पडले.

युवराजांचे स्वागत अगदी ठरल्याप्रमाणे यथायोग्य रीतीने करण्यात आले. प्रशांत वातावरणात प्रत्येक कार्यक्रम दरबारी शैलीने पार पडला. स्वागतगीत, मानपत्रसमर्पण सारे कार्यक्रम वैभवशाली झाले. आपल्या या अभूतपूर्व स्वागताने भारून गेलेल्या युवराजांनी 'प्रिन्स ऑफ बेरार होस्टेल'चे उद्‌घाटन करतानाच मोठ्या समाधानाने आणखी तीस हजारांची देणगी शिवसंस्थेला घोषित करून टाकली.

प्रचंड दडपणाखाली पार पडलेल्या या अभूतपूर्व स्वागत समारंभात युवराजांच्या केसालाही धक्का लावण्याची हिंमत खरोखरच कुणी केली नाही. भाऊसाहेबांच्या या पहाडी कर्तबगारीमुळे युवराजांना कृतकृत्य झाल्यासारखे वाटले. दुसऱ्या दिवशी सर्किट हाऊसवर मात्र वेगळेच दृश्य होते. कालचे विरोधक हजार-दोन हजारांच्या देणग्यांसाठी युवराजांच्या समोर कुर्निसात करीत होते.

अमरावतीच्या कार्यक्रमाने भारावलेल्या युवराजांना खामगावच्या अंजुमन हायस्कूलच्या स्वागतात फार मोठी तफावत जाणवली. इथे विरोधक गडबड माजविण्यात

सफल झाले होते. या पार्श्वभूमीवर युवराजांच्या व खुद्द निजामांच्या दृष्टीलाही पंजाबरावांच्या कर्तृत्वाची भव्यता अधिक उठावदार दिसली. त्यांनी हार्दिक आभाराचा खलिता पंजाबरावांना पाठविला आणि याच 'सुताने' बहुजनांच्या हितासाठी 'स्वर्ग' गाठण्याचा विचार पंजाबरावांच्या डोक्यात घर करून गेला. त्यासाठी ग्रामीण जनतेच्या शिक्षणाची लक्षावधी रुपयांची योजना त्यांनी तयार केली. भाऊसाहेबांनी ही योजना दाखवून निजामशहाच्या कार्यकारी मंडळाचे सदस्य श्री. गोपालस्वामी यांना अनुकूल करून घेतले. त्यावेळी प्रमुख प्रधान म्हणून कार्यरत होते 'सर मिर्झा इस्माईल'. त्यांच्या अनुकूलतेशिवाय ही योजना पुढे रेटता येणे शक्य नव्हते. भाऊसाहेबांनी सर मिर्झांना आपली योजना समजावून सांगितली, त्यांनीही मोठ्या आत्मीयतेने ती समजून घेतली आणि प्रयत्न करण्याचे आश्वासन देऊन डॉ. भाऊसाहेबांना आश्वस्त केले.

सर मिर्झा इस्माईल हे एक उदार विचारांचे स्वतंत्र पुरुष! त्यांचे कोणत्याही गोष्टीचे मूल्यमापन व विशदीकरण मार्मिक असायचे. १९४५ साली सरकारी कामानिमित्ताने त्यांचा विदर्भात दौरा होता, ही संधी साधून डॉ. भाऊसाहेबांनी 'अमरावतीच्या शिवसंस्थेला भेट द्यावी' - असे त्यांना निमंत्रण दिले. त्या निमंत्रणाचा सानंद स्वीकार करून त्यांनी अमरावतीला पदार्पण केले. त्यांच्या स्वागतसोहळ्याचा भव्य कार्यक्रम पार पडला. एका गरीब संस्थेने चालविलेले राष्ट्रनिर्मितीचे अमोल कार्य पाहून सर मिर्झा यांनी शिवसंस्थेवर स्तुतिसुमने उधळली आणि निजाम स्टेटच्या या प्रमुख प्रधानाने भाऊसाहेबांच्या शिक्षण कार्याचे एक लक्ष्य पूर्ण करण्यासाठी घवघवीत दोन लाख रुपयांची देणगी जाहीर केली. त्याकाळी भाऊसाहेबांचे पी. ए. म्हणून काम करणारे प्रा. गु. मा. सोमवंशी यांनी तो दोन लाखांचा चेक हैद्राबादहून स्वत: जाऊन आणला. या दोन लाख रुपयांत आपल्या संकल्पित कार्याचे शिखर उजळेल म्हणून भाऊसाहेब हर्षित झाले. त्यांचे सहकारी कृतज्ञ आनंदाने गहिवरून गेले! संपूर्ण शिवसंस्थेत आनंदाला जणू उधाण आले होते..

....काशीच्या हिंदू विश्वविद्यापीठाने जिथे निजामाच्या देणग्या घेतल्या, तिथे शिवसंस्थेविषयी विरोधकांनी केलेली केवढी ही हाकाटी होती! विरोधाला विरोध म्हणून किंवा एखाद्याचं वैभव बघणे होत नाही म्हणून केलेला हा क्षुद्रमतींचा प्रयत्न असावा. पण ज्याच्या हृदयात सतत जनसामान्यांच्या कल्याणाची ज्योत तेवत होती त्या भाऊसाहेबांची दूरदृष्टी या विरोधाला जुमानणे शक्य नव्हते.

... निजामाच्या मदतीशिवाय आजचे हे शिवसंस्थेचे वैभव शक्य तरी झाले असते का?



# भाऊसाहेबांच्या व्याख्यानांमधील लोकाभिमुखता

-प्रा. अनिल प्रांजळे

---

पुरुषार्थाचा मूर्तिमंत पुतळा असणाऱ्या भाऊसाहेबांचा संपूर्ण जीवनक्रम म्हणजे आश्चर्यकारक, अकल्पित व असाध्य अशा घटनांचा एक आलेख आहे. महात्मा जोतिबा फुले, संत गाडगे महाराज आणि राष्ट्रसंत तुकडोजी यांची विचारसरणी, शेतकरी-कष्टकरी वर्गाबाबतची सहृदय सहानुभूती आणि 'शिक्षणाशिवाय तरणोपाय नाही'- ह्या उक्तीची कृतिशील सार्थकता सिध्द करील अशी शिक्षणगंगा विदर्भातील दारादारात नेऊन पोहोचवण्याचे भगीरथ सामर्थ्य: अशा विविध गुणांचा एकाच व्यक्तिमत्वात समन्वय झालेला आपल्याला भाऊसाहेबांच्या रूपात दिसतो.

वरील विषयानुषंगाने प्रस्तुत लेखाच्या व्याप्तीचा विचार केल्यास एका प्रमुख गोष्टीचा विचार गृहीत धरावा लागतो. साधारणपणे केवळ व्याख्यानांचाच विचार केल्यास बरेचदा असे लक्षात येते की स्थलकालपदानुषंगाने मोठ्या व्यक्तींवर अनेक ठिकाणी बोलण्याचा प्रसंग येतो. अत्यंत उत्तम वक्तृत्व आणि विद्वत्व असणारे वक्तेही बरेचदा स्थळ, काळ व व्यासपीठाच्या अनुरोधाने बोलताना आढळून येतात. त्यामुळे, विशिष्ट उंचीवरून त्यांच्या संपूर्ण वक्तव्यांचा एकत्रित अभ्यास केल्यावर मात्र त्यात अनेक ठिकाणी विसंगती जाणवतात, तर अनेक ठिकाणी लोकानुनय करण्याच्या प्रचलित हव्यासापोटी विचार व व्यक्तिमत्व विभ्रमही उद्भवल्याचे जाणवते. त्यामुळेच, डॉ. पंजाबरावांवरील इतर सर्व पुस्तकांना बाजूला ठेवून केवळ त्यांच्या व्याख्यानांचा विभूतिभक्तिनिरपेक्ष नजरेने विचार प्रस्तुत लेखात करण्याचे योजिले आहे. डॉ. पंजाबरावांचे उत्तुंग व्यक्तिमत्त्व, त्यांचा स्वातंत्र्य लढ्यातील सहभाग, सामाजिक कार्य, भारताचे पहिले कृषिमंत्री म्हणून एक मोठी कारकीर्द, शिवाजी शिक्षण संस्थेचे तहहयात अध्वर्यू, मराठा महासंघाचे अध्यक्ष-अशा कितीतरी रूपांमध्ये भारतातील खेड्यांपासून लोकसभेपर्यंत आणि त्याहीपुढे परदेशात अनेक ठिकाणी त्यांना भाषणे करावी लागली. ह्या व्याख्यानांचा लोकाभिमुखतेच्या संदर्भात एकत्रित अभ्यास केल्यावर

लक्षात येते की, व्याख्यानांतील लोकाभिमुखता ही संस्कारातून येत असते; माणूस जसजसा घडतो, घडण सुरू असताना सामाजिक, सांस्कृतिक व भौगोलिक अशा विविधांगी व बऱ्यावाईट गोष्टींचा ज्या कमीजास्त प्रमाणात त्याच्या व्यक्तिमत्वावर प्रभाव पडतो आणि निसर्ग, मातापिता यांचेकडून जो परंपरागत, जैविक व नेणिवेतील वारसा प्राप्त होतो त्या सर्वांचे एकत्रित रसायन म्हणजे व्यक्तीचे व्यक्तिमत्व असते. ह्यामध्ये नेणिवेतील आधारभूत वैशिष्ट्ये ज्या प्रमाणात स्पष्ट व पारदर्शी असतील त्या प्रमाणात व्यक्तीचे जाणिवेतील विचार, वागणे, बोलणे, प्रतिक्रिया आणि पुरुषार्थ प्रभावी असतात. डॉ. पंजाबरावांचं संपूर्ण व्यक्तिमत्वच लोकाभिमुख आहे. त्यामुळे त्यांच्या सर्व व्याख्यानांमध्ये एकप्रकारची एकसूत्री सलग लोकाभिमुखता आढळते. विचारांमध्ये अविच्छिन्न प्रगल्भता व सामान्य जनतेविषयीची कळकळ आढळते. बहुधा त्यांच्या चरित्राच्या गाभ्यात ह्याचं रहस्य दडलेलं असावं. त्याबाबतची माहिती बहुधा ह्याच ग्रंथामध्ये इतरत्र उपलब्ध असण्याची शक्यता असल्याने विस्तारभयास्तव त्यांची पुनरुक्ती जाणीवपूर्वक टाळीत आहो.

व्याप्तीबरोबरच ह्या लेखाची मर्यादाही स्पष्ट करणे तेवढेच महत्त्वाचे ठरते. भाऊसाहेब अनेक ठिकाणी बोलले आहेत. वेगवेगळ्या ग्रंथांमध्ये त्यासंदर्भात उल्लेखही आले आहेत. त्यातील बहुतांश त्या त्या प्रसंगप्रमुख व्यक्तीचा अथवा काही ठिकाणी लेखकाच्या भाषेचा-प्रभाव दिग्दर्शित करणारे आहेत. ते सर्व टाळण्याच्या हेतूने केवळ श्री शिवाजी शिक्षण संस्थेच्या रौप्यमहोत्सव प्रसंगी डॉ. पंजाबराव देशमुख यांच्या व्याख्यानांचा जो संग्रह रौप्यमहोत्सव समितीद्वारे प्रकाशित केला गेला त्यातील भाषणांचाच इथे विचार करण्यात आला आहे. ह्या ग्रंथाच्या संपादकमंडळाच्या "These are nothing but a few drops from a big ocean" -ह्या मताशी प्रस्तुत लेखकही सहमत आहे. तरीही ह्या लेखाची मर्यादा मुद्दाम वरील ग्रंथातील प्रकाशित भाषणांचा अभ्यास-हीच ठेवण्यात आलेली आहे. दुसरी बाब म्हणजे व्याख्यानांच्या या पुस्तकातील मूळ इंग्रजी उतारे कंसात पृष्ठ क्रमांकासहित मुद्दामच दिलेले आहेत. ह्यामागे सुज्ञ वाचक-अभ्यासकांना भाऊसाहेबांचा अभ्यास संकलितपणे, निरपेक्षपणे करता यावा आणि हा अभ्यास करताना प्रस्तुत लेखकाच्या भाषा व मतांचा अडथळा येऊ नये हाच प्रामाणिक उद्देश आहे.

भाऊसाहेबांच्या सर्वच व्याख्यानांमधून त्यांच्या व्यक्तिमत्वातील काही गोष्टी ठळकपणे दिसून येतात - जसे स्वभावातील विनम्रता. व्याख्यान कुठेही असो, पण भाषेत इतकी विनम्रता आणि लीनता आहे की स्वत:चं मत स्पष्टपणे मांडतानाही माझंच मत बरोबर - हा आग्रह मात्र कुठेही नाही. त्याबरोबरच स्पष्टवक्तेपणा व परखड पारदर्शित्व हे आणखी दोन गुण त्यांच्या व्याख्यानांमधून दिसून येतात. भाषेवरील

त्यांचं प्रभुत्व आणि प्रभावी वक्तृत्व ह्या गोष्टीही त्यांच्या व्यक्तिमत्वाचा महत्त्वाचा भाग होता.

भाऊसाहेबांना हिंदुत्व व हिंदू धर्माबाबत अभिमान होता. घटना समितीला त्यांनी शिफारस केली होती की ह्या देशाला हिंदू राष्ट्र म्हणून जाहीर करावे, कारण जगात हिंदू धर्माशिवाय कुठलाही दुसरा धर्म व्यापक नाही हे त्यांचे स्पष्ट मत होते. २२ नोव्हें. १९४९ च्या भारतीय संविधानाच्या मसुद्यावर बोलताना ते म्हणाले.-

'I would not have minded if we had given some place to the noblest religion on earth-namely the Hindu religion, and even if we wanted that the constitution should remain secular, even if we had declared that this shall be a Hindu state, I have not the slightest doubt that the constitution would have remained as secular as we wanted it to be, because there is no religion on earth which is more secular in character than Hinduism.' (31)

संविधानामधील त्रुटी दाखविताना त्यांनी सांगितले की ह्या संविधानात सामान्य माणसाच्या महत्त्वाकांक्षांच्या, अपेक्षांचा काहीही विचार केलेला नाही. समाजातील वर्गव्यवस्थेवर ह्या संविधानाचा परिणाम होऊ शकणार नाही, त्यामुळे ही घटना फार काळ टिकणार नाही.

'This parliamentary democracy is essentially meant for maintaining the status quo.....we want to keep the various layers of society where they were....this constitution does not last long, because it does not answer the aspirations of the man in the street at the present time' (31)

प्रत्येक वयस्काला मतदानाचा अधिकार घटनेने दिला. परंतु भाऊसाहेबांचा ह्या देशातील जनतेच्या मानसिकतेचा अभ्यास त्यांना ह्या बाबतीतही साशंक बनवतो. ते म्हणतात, मतदानाच्या अधिकाराने काही बदल होऊ शकला आणि खरोखर ह्या देशातला सामान्य माणूस देशाचे नेतृत्व करू शकला तरच केवळ सामान्य जनतेला फायदा होण्याची शक्यता आहे.

'If the present constitution is worked in the right spirit, if the adult franchise makes a difference and we get the right people from the common and average men as their representatives, then alone will it be possible for the people to receive that benefit which they are aspiring for.' (32)

भाऊसाहेबांच्या ५० वर्षांपूर्वीच्या या विधानाचा आशय आज आपल्या लक्षात येऊ लागला आहे. प्रसार माध्यमांचा जाणीवपूर्वक रोकलेला प्रसार, त्यांच्यावरच

बंधने-ह्यामुळे आजपर्यंत असे वाटत होते की सर्वकाही घटनेप्रमाणे सुरळीत सुरू आहे. आत्ता कुठे निवडणूक प्रक्रिया व तिची विश्वासार्हता सर्वांच्या लक्षात येत आहे. आज स्वातंत्र्याच्या ५० वर्षांनंतर जेव्हा लक्षात येते की या देशातल्या बहुसंख्य जनतेला अजूनही त्यांच्या मतदानाच्या अधिकाराची जाणीव नाही किंवा सर्वेक्षणामध्ये लक्षणीय प्रमाणात जेव्हा जनता सांगते की आजपर्यंत एकदाही त्यांनी मतदान केले नाही तेव्हा ह्या देशावर राज्य करणाऱ्या अनेक लोकांच्या तथाकथित लोकप्रतिनिधित्वामागचे भीषण सत्य बाहेर येते. ह्या देशाचा इतिहास तर तसा राजे-रजवाड्यांचाच आहे. पण स्वातंत्र्यानंतरही इथल्या नेतृत्वामध्ये जनतेला अंधारात ठेवून स्वत:ला अघोषित राजा समजणे व मनमाने राज्य करणे हीच मानसिकता दिसते.त्याकाळचे लोहपुरुष सरदार वल्लभभाई पटेल ह्यांच्याविषयी ह्याच एकमेव कारणास्तव भाऊसाहेबांना नितांत आदर वाटतो की त्यांनी छोटी छोटी राज्ये विसर्जित करून भारताच्या एकात्मिकतेला भक्कम आधार दिला. भाऊसाहेबांच्या मते राष्ट्राची एकात्मता साधून आपण फार मोठी गोष्ट साध्य केली आहे. ते म्हणतात-

'It was he (Sardar Vallabhbhai Patel) who brought about homogeneity in the subcontinent of India by liquidation of all the states. Then the minorities and the various other impediments in the working of a proper democracy has also been removed largely by his wisdom, by his prudence and by his tactful handling than that of anybody else. So from that point of view we have achieved a great deal. In giving adult franchise, in abolishing all special interests and representations, in abolishing the states and in also liquidating many of the vested interests, we have certainly advanced a great deal..' (33)

स्वातंत्र्यानंतर समता व बंधुता ह्या दोन्ही तत्त्वांवर भाऊसाहेबांचे विचार स्पष्ट आहेत. आर्थिक निकषांवर सवलती देण्याच्या त्यांच्या विचारसरणीमागेही ह्या देशातील गरीब जनतेचाच विचार करताना ते दिसतात, जेव्हा ते म्हणतात-

....'There are only very insignificant proportions of our people who have got either the wealth or the education or the various good things in life. The generality of the people are destitute, are ill-fed, their health is very little cared for. Therefore, the handicaps and the suffering of the people like the scheduled castes, and Scheduled tribes are also, in a large measure, shared by vast communities which are in the Hindu fold itself. That being so, I would say that it would be very desirable that the sympathy which

we show towards the scheduled castes and scheduled tribes should also, in a measure be extended to these people who have yet to see any benefits accruing from the freedom that we have achieved and the more sympathy we show the better will it be for the homogeneity of the Indian Society .....' (35)

तेव्हा या देशातील गरीब जनता स्वातंत्र्यानंतरही सर्व लाभांपासून वंचित असल्याची खंतच त्यांना दर्शवायची असते. ह्या गरीब आणि अशिक्षित जनतेवरील त्यांचा विश्वास मात्र दांडगा आहे. ते केवळ अशिक्षित आहेत म्हणून मूर्ख आहेत असे त्यांना वाटत नाही. सामान्य माणसाला आपलं भलं बुरं कळते हीच त्यांची मान्यता आहे......

'However illiterate the Indian masses may be, they are in no sense unwise. The average Indian knows what he is doing; he has known what he has done and he will know what to do in the future if people in whom he declared his faith are found wanting....' (115)

त्यामुळेच प्रत्येक बिल हे जनतेसमोर गेले पाहिजे व जनतेमध्ये त्यावर चर्चा होऊन त्यावर मत घेतले गेले पाहिजे असा आग्रह ते धरतात-

'Bill should go before the people and they should be in a position to say whether this is a proper and adequate measure and give their opinion about the funds also....' (108)

तसेच त्यांनी निवडून दिलेल्या प्रतिनिधींनी खूप उच्चशिक्षितच असले पाहिजे हेही त्यांना अपेक्षित नाही. त्यांचा प्रत्येक विषयाचा गाढा अभ्यास नसला तरी चालेल; परंतु त्यांनी स्वत:च्या सदसद्विवेकबुद्धीने सर्वसामान्यांच्या विकासासाठी प्रयत्न केला पाहिजे.....

....'All that is expected of him is to protect and advance public interest by his sound common-sense and knowledge not only of practical agriculture but also the attitude, psychology, condition and capacity of the agriculturists....' (151)

ह्या लोकप्रतिनिधींनी संपूर्ण समाजव्यवस्था स्वच्छ करण्याचे काम अत्यंत जलद व वेळ पडल्यास कठोरपणाने करावयास पाहिजे, जेणेकरून ह्या देशाची पुढील उभारणी भुसभुशीत पायावर होणार नाही.

...'I would like your assistance in the field of clearing our own house as quickly and ruthlessly as possible, so that we do not continue to build on foundations of sand......' (185)

कारण आजही असे अनेक कायदे आहेत, अनेक नियम आहेत जे एकतर अपूर्ण

आहेत अथवा ज्यांना तोडणे वा दुर्लक्षित करणे हीच समाजाची रीत झालेली आहे, वा समाजातील दुर्गुणांना महत्त्वाचे स्थान मिळालेले आहे.

'.....We have got so many laws which are honoured more in their breath than in their observance. There are so many ordinances, Rules and Regulations and other things and because of the inefficiency of the present administration, so many evils are rampant which ordinarily , there should not be....' (74)

सभागृहामधील बहुमत सुध्दा ह्या गोष्टी वाढविण्याला कारणीभूत आहे. ह्या बहुमतामुळे बरेचदा लोक खरे बोलण्याचे धैर्य व प्रामाणिकपणा दाखवीत नाहीत. जबाबदार लोकांनी ह्याकडेही जरा लक्ष देण्याची गरज भाऊसाहेबांना वाटते.

But the dead weight of the majority that we so fortunately have, is itself a handicap for many people to speak the truth and to speak it boldly and honestly. And that is the reason why we have a terrible amount of discontent in the whole country, and I would be very glad if people in resposible positions pay a little more attention to this than before. (56)

ह्या देशातल्या प्रत्येक व्यक्तीला काम, संपत्ती आणि विश्रांती ह्यांच्या समान संधी मिळाल्याच पाहिजेत. संपूर्ण राजकीय व आर्थिक व्यवस्थेने केवळ सामान्य माणसासाठी, शेतकरी, कामकरी, लघुउद्योगी, स्त्रिया ह्यांच्यासाठी राबले पाहिजे, ज्यांच्या विकासाकडे आजपर्यंत कुणाचेही लक्ष गेले नाही...

.....'Everyone is to have equal access to work, wealth and leisure; the vast apparatus of political and economic machinery is to function through and in the interests of the common man, the tiller of the land, the small cottage worker, the factory operative, the humble men and women of the village whose interests till now had been uncared for.' (187)

देशाची नवीन उभारणी करण्यासाठी समता आणि विश्वासार्हतेच्या तत्त्वावर नवीन समाजाची निर्मिती करावी लागेल. त्यासाठी भांडवलशाही व्यवस्थेला नष्ट करावे लागेल......

'....The Indian Nation is determined to build up a new society on the basis of equality and fair play and there is going to be very little room for amassing an unrequired wealth in the hands of a few people.....' (288)

अशा नवीन राष्ट्राच्या उभारणीसाठी आपल्या लोकांना विज्ञान, सामाजिक शास्त्रे

आणि साहित्य ह्यांचा अभ्यास करावा लागेल. अडचणींना न घाबरणारे, ध्येयवादी, राष्ट्रवादी, संस्कृती आणि नैतिकता जोपासणारे आणि राष्ट्रहिताला सर्वोच्च प्राधान्य देणारे स्त्री व पुरुष निर्माण करावयाचे आहेत. श्री शिवाजी लोकविद्यापीठाच्या स्थापनेच्या वेळी भाऊसाहेब म्हणाले होते.

'.....We have to build a new Nation and in order to build such a nation our people must have knowledge of science, Art and Literature.... People must be taught and educated to be staunch optimistic men and women, who fear no obstacles, who understand self-interest as well as national interests. They must have lofty ideals with high cultural and moral standards, supreme devotion to the state and supreme loyalty to the interests of the people....

We want to help the education and opportunities of those children who have not been able to complete their education in the ordinary course.

.....We want to help all those who wish to study courses of practical utility including those particularly useful to the rural population.....' (266)

ह्या समाजनिर्मितीसाठी कालबाह्य झालेल्या रूढी सोडून दिल्या पाहिजेत हे सांगताना भाऊसाहेब स्त्रिया व अस्पृश्यांचा विचार करताना व त्यासाठी मनूला स्पष्टपणे धिक्कारताना दिसतात. ते म्हणतात-

.....but there are many others which are utterly out of date. For instance , the place Manu has given to the women of India as well as the untouchables ....' (297)

मराठी साहित्य संमेलनांद्वारे ठरावाच्या रूपाने जे प्रयत्न या दिशेने होतात त्यांबाबत भाऊसाहेब असमाधानी आहेत. त्यांच्या मते ह्यामध्ये केवळ काही सुशिक्षित लोकच असतात. सामान्य माणसाला अशा संमेलनाच्या समितीमध्ये काहीही स्थान नसते.....

'The Marathi sahitya sammelan of course passes certain resolutions now and again and probably makes certain representations. But according to its very name, this body consists of only the learned people and the ordinary individual has not much of a place there.'(295)

इतकेच काय तर विद्यापीठांवरही त्यांचा असाच आक्षेप आहे. शिवाजी लोकविद्यापीठाच्या स्थापनेचा उद्देश स्पष्ट करताना ते म्हणतात की, सर्व विद्यापीठांना सुपरमॅन निर्मितीमध्ये त्यांचा पैसा व शक्ती खर्च करू द्या. माझे विद्यापीठ मात्र

अज्ञान, अनुपलब्धता, गरिबी व अंधःकारातूनही राष्ट्रभक्त, उपयुक्त स्त्रिया व पुरुष तयार करील.......

'....Let other universities devote their moneys and energies to the production of only the superman. Let my university and Lok Vidyapitha strive to make useful, patriotic men and women out of ignorance, filth, poverty and misery in the heavy darkness of rural India....' (310)

हे अज्ञान, अंधःकार, गरिबी, अगतिकता भाऊसाहेबांना नवीन नाहीत. अधिकार हाती आल्यापासून त्यांनी सर्वच क्षेत्रांमध्ये संघटनात्मक बदल करण्याचे खूप प्रयत्न केले. परंतु ह्याची प्रेरणा मात्र त्यांनी लहानपणापासून आपल्या मनात जोपासलेली आहे. त्यांचे पुढील उद्गार ह्या देशातील जनतेबाबतच्या त्यांच्या मनातील कळवळ्याबरोबरच त्यांचा इथल्या समाजव्यवस्थेचा सखोल अभ्यासही दर्शवितात.

'....I have tried to change the organizational setup from one field to another, It was always directed towards the uplift of the rural population. Even from my school days I was fully consious of the handicaps and disadvantages of being born in a village. It is regretable that these handicaps have yet to be fully realized by a large number of people. I have often said that the villager lives in an altogether different world. His religious susceptibilities, his helplessness and precarious existence, his dependence on nature, his complete lack of any medical treatment of any sort, his belief in ghosts and super-natural powers, the uncertainty of his crop and therefore of his fortune- all make him live in an altogether different atmosphere....'(277)

ह्या अशा समाजव्यवस्थेचा जो कणा तो शेतकरी-कष्टकरी वर्ग होय. त्याच्याबाबत भाऊसाहेबांच्या मनात कमालीचा आदर आहे. ते म्हणतात-

'.....I make no secret of the fact that I have a high regard for the farmer and farming. I consider him the noblest producer of wealth. But he is perpetually at the mercy of others.'(157)

इतरांच्या मर्जीवर अवलंबून असणाऱ्या त्याच्या नशिबाबाबत सखोलपणे विचार केल्यावर त्यांना वाटते की सरकार प्रत्येक शेतकऱ्याच्या जवळ जाऊ शकत नाही. त्यासाठी शेतकऱ्यांनीच एकत्र येऊन स्वतःच्या प्रश्नांवर चर्चा करून त्यावरील तोडगा एखाद्या प्रकल्पाच्या स्वरूपात सरकारला सादर केला तर मात्र ते अधिक परिणामकारक होऊ शकेल.

'....We can easily realise how difficult it would be for the government to consult agriculturists in the country individually or in small groups in order to enlist their co-operation and to act in the best interests of the farmers. On the other hand if the farmers get together, discuss their problems and present their case to the government through their own organisation, governmental action and assistance in this as well as in other fields concerning agriculture would be more in tune with the circumstances and become easier to obtain....' (214)

आणि मग पुढे ते शेतकऱ्यांचा मंच स्थापन करण्याची घोषणा करतात. शेतकरी मंच कुठल्याही पद्धतीने राजकीय असणार नाही, तर तो शेतकऱ्यांचेच प्रतिनिधित्व करील-हे सांगताना त्यांना भारतीय शेतकऱ्यांची वर्षानुवर्षापासूनची अवहेलना, पिळवणूक नशिबाधीनता ह्या सर्वांचीच जाणीव आहे....

'....The farmer's forum will not in any way be attached to or work for political ideologies or dogmas but will represent the cultivators of this country and voice their views irrespective of their affiliations. The Indian farmer has long-suffered neglect and exploitation and therefore, he has resigned himself to fate. Some sort of mental inertia has not yet been completely lifted from his mind with the result that his approach to life itself is static and tinged with pessimism...' (220)

शेतकरी मंच कुणा मूठभर मोठ्या शेतकऱ्यांच्या हाती राहू नये, ती केवळ मोर्चे काढणारी संघटना होऊ नये, तसेच ती केवळ मागण्या करणारी व मतभेदांना महत्त्व देणारीही होऊ नये-तर ती स्वतःवर विश्वासणारी, शेतकऱ्यांना मदत देणारी एक सहकारी संघटना व्हावी....

'Everyone agreed that while catering for all types of farmers it should not be dominated by only the bigger farmers and yet it should not be permitted to be a mass movement for taking out marches etc.' (222)

First and foremost; this must be a self reliant organization based on self help and mutual and co-operative assistance. This should not be an organization for the sake of merely making demands and ventilating grievences' (225)

असे करताना भाऊसाहेबांना त्या संघटनांमध्ये येणारे राजकारण, प्रलोभन इ.

धोक्याची जाणीव असूनही त्यांचा शेतकऱ्यांच्या सुजाणतेवर अधिक विश्वास आहे.

'....But I am sure no thinking farmer will allow himself to be misguided by such critics.' (226)

तरीही ते ह्याबाबतीत इशारा देतातच की, ज्याक्षणी शेतकरी संघटना सक्रिय राजकारणात जाईल त्याक्षणी ती स्वत:चे अस्तित्व धोक्यात आणील. त्यामुळे राजकारण, हेवेदावे बाहेर ठेवून प्रत्येक सक्रिय आणि प्रामाणिक शेतकऱ्याला ह्यात प्रवेश खुला ठेवणे गरजेचे आहे.

'.... Whenever a farmers' organisation enters in to active politics, it not only ceases to serve the farmers but often endangers its own existence. The avoidance of politics and political creeds and controversies and keeping the door open to every individual farmer who agrees with us and accept our programmes has been a great asset in building up the organization....' (232)

आणि शेवटी भाऊसाहेब शेतकरी मंचावरून भुकेपासून मुक्तीची ऐतिहासिक घोषणा करतात. त्यासाठी त्यांना शेतकऱ्यांना शेतीविषयक तंत्रशुद्ध शिक्षण देणे व शेतीविषयक ज्ञान, तंत्रज्ञान विकसित करणे ह्याचीही गरज वाटते.

..'We therefore, propose to constitute a freedom from hunger. Trust fund of our own which would be devoted to fulfilling the first two aims of the campaign viz.imparting information and education to the farmers of India and helping agricultural research.' (244)

भाऊसाहेबांचे हे स्वप्न पूर्ण झाले असते तर आज आपल्या देशाचे स्वरूप निश्चितच वेगळे दिसले असते. शेती आणि शिक्षण ह्या दोन्ही गोष्टी राष्ट्राच्या प्रगतीचा कणा आहेत हे भाऊसाहेबांनी तेव्हाच ओळखले होते. त्यांची 'लोकविद्यापीठ' आणि 'भुकेपासून मुक्तिकोष' ह्या दोन्ही योजना सफल झाल्या असत्या तर भारताचा कायापालट झाला असता. भाऊसाहेबांच्या डोळ्यांपुढे फार पुढचा भारत होता. आपण मात्र त्यांना समजू शकलो नाही. मराठा महासंघाचे अध्यक्षपद स्वीकारले तेव्हा त्यांच्यावर जातीयवादाचा आरोप झाला. त्यावेळी त्यांनी 'बहुजन' हा शब्द देऊन मराठी बोलणाऱ्या सर्व लोकांचा मी प्रतिनिधी आहे हेच सांगितले. बहुजन ह्या शब्दात सर्व जाती-जमातीचे लोक येतात व त्यामुळेच ह्या संघटनांनी अधिक प्रामाणिकपणे व उत्साहाने काम केले पाहिजे असेही त्यांचे मत होते.

'(We are)... serving the Marathi speaking people at large, indeed from this point of view, I feel that for a long time to come, this

conference and similar other bodies would have to work with more zeal and enthusiasm if they wish that the members of these 'बहुजन' communities should figure somewhat more prominently on the all India as well as the state stage.'(293)

अशाप्रकारे एका बाजूला त्यांना ग्रामीण तरुण राष्ट्रीय तथा राज्यपातळीवरील निवडीसाठी योग्य ठरावे असे वाटते; तर दुसऱ्या बाजूला सरकारने लघुउद्योग व कुटीर उद्योगाला मदत व प्रोत्साहन दिले पाहिजे व देशाच्या गरजेच्या वस्तू 'ह्या' उद्योगांतूनच निर्माण झाल्या पाहिजेत, हेही त्यांनी सांगितले.

'....Govt. of India should give direct assistance and encouragement to cottage industry products, so that it would be possible in the course of a few years to purchase all the articles that the Government of India wants only from cottage industries.' (118)

'अनुसूचित जातींच्या ' प्रगतीच्या दृष्टीने घटनेच्या ३४० कलमान्वये अनुसूचित जातींबाबतचे कमिशन ताबडतोब बसवावे अशी स्पष्ट मागणी करून भाऊसाहेबांनी स्वत:ची भूमिका स्पष्ट केली.

'...The Backward classes commission provided for under article 340 of the constitution should be appointed at the earliest possible moment.' (118)

लोकसभेत काही बिलांना विरोध करताना भाऊसाहेब अत्यंत परखड बोलताना दिसतात. गोसंवर्धन बिलावरील चर्चेत गोसंवर्धनावर दरवर्षाला १० लाखाची तरतूद करण्याला विरोध करताना, ते त्याच पैशात ५००० मुलांना वर्षभर पोसण्याचे व त्यापासून दुग्धव्यवसायही करण्याचे एक महत्त्वाचे सृजनशील उत्तर देतात; एवढेच नव्हे तर त्याची संपूर्ण जबाबदारीही स्वीकारताना दिसतात.

'....I solemnly promise that with Rs. 10 lakhs I will feed 5000 children throughout a year and these 5000 children will be able to look after the cows and the milk they will get provide excellent nourishment to them.....' (106)

तसेच विश्वबँकेला कर्ज मागण्यासही त्यांचा तीव्र विरोध होता. 'कर्जाचं व्याज भरण्याइतका पैसा जर आपल्याजवळ होता तर कर्ज मागण्याची गरजच काय होती ?' ह्या भाऊसाहेबांच्या भूमिकेचा गंभीरपणे विचार झाला असता तर आज नक्कीच आपला देश गहाण पडण्याइतपत कर्जाच्या ओझ्याखाली दबला नसता.

'.....If this money was available for us, would it have been necessary for us to go to the international Bank for a loan under

these stringent conditions?' (39)

केवळ नियम तयार करून लहान मुलांवर संस्कार होणार नाहीत, त्यासाठी पालक सुज्ञ असावे लागतात. पालकांनी ठरवायचे की आपल्या मुलांसाठी काय चांगले काय वाईट. सेंसॉर बोर्डाबाबत एका बिलावर बोलताना लहान मुलांवरील संस्कारासंदर्भात पालकांची भूमिका किती महत्त्वाची आहे ह्याविषयी त्यांची संस्कारित व परखड मते आपल्याला दिसतात ती अशी-

'....It is far better to produce special films for children going to school and leave the responsibility on the guardians to see that they do not attend bad films. After all what are the guardians and parents there for, if they do not know what is good for their children and what is not!' (55)

महात्मा गांधींच्या विचाराचा व कार्याचा त्यांच्यावर प्रभाव आहे. ते म्हणतात की, पाश्चात्य देशातील लोकांना वाटते, पुन्हा एखादे महात्मा गांधी भारतात निर्माण होतील आणि ते जगाला योग्य मार्ग दाखवतील. भारतीय तत्त्वज्ञान, हिंदू तत्त्वज्ञानाप्रमाणे समाजाची पुनर्रचना- ह्याच गोष्टी जगाला शांती आणि समाधान देऊ शकतील, असे म्हणताना त्यांच्या संस्कारातील भारतीयत्व व गांधीजींविषयीची त्यांच्या मनातील श्रध्दा यांचे दर्शन होते.

'....they (Americans) think, some day another Mahatma Gandhi will rise in India who will show them the proper way and they will follow the Hindu tenets, the Hindu principles of philosophy and social re-construction which will probably give them solace and satisfaction...' (55)

भाऊसाहेब स्वप्नाळू आहेत, महत्त्वाकांक्षी आहेत, शिक्षण-संस्कार-आरोग्य आणि जनकल्याण ही त्यांची जिद्द तर आहेच; पण त्यांच्या आयुष्याची ती ध्येयेसुध्दा आहेत. त्यासाठी ते तहहयात लढले, झिजले. त्यांचे हे स्वप्न त्यांनी २९ जानेवारी १९५८ रोजी श्री शिवाजी शिक्षण संस्थेच्या रौप्य महोत्सव प्रसंगी तत्कालीन उपराष्ट्रपती डॉ. सर्वेपल्ली राधाकृष्णन ह्यांना सांगितले-

'.....realisation of our dreams and ambitions which can be summed up in a few words, namely better education, spread of light and understanding and improvement of the health and welfare of the masses...9.' (310)

मानवतेचा महामेरू शोभणाऱ्या त्या जनहितैषी शिक्षणमहर्षी भाऊसाहेबांना कोटी कोटी प्रणाम.



# भाऊसाहेबांची काव्यात्म वृत्ती आणि सौंदर्यदृष्टी

-प्रा. त्रिवेणी फरकाडे

---

डॉ. भाऊसाहेबांच्या विविधांगी जीवनकार्याचा आढावा घेता, एकंदरीत भाऊसाहेब हे समाजसुधारक, क्रांतिकारक असे लोकनेते ठरतात. मात्र त्यांच्या कार्याचा रोख पूर्णत: विधायकतेकडे आहे. भाऊसाहेबांचे व्यक्तिमत्व म्हणजे एक परिपूर्ण 'मूस' आहे. त्याचे विविध पदर मोठे देखणे, अर्थपूर्ण आणि जनजीवनाला सर्वांगसुंदर करणारे आहेत. भाऊसाहेबांचे व्यक्तिमत्व अष्टपैलू होते, परंतु प्रत्यक्षात त्यातले दोन-तीन पैलूच प्रत्येकवेळी गौरविले जातात. त्यांच्या व्यक्तिमत्वाचा साकल्याने विचार केल्यास बहुजनांचा लोकनेता, वऱ्हाडच्या कृषकांचा कनवाळू त्राता आणि ज्ञान-विज्ञानाचा उद्गाता या तीन पेडांत त्यांच्या व्यक्तिमत्वाचे सार सांगता येईल. जनसामान्यांच्या जीवनातील सत्त्व जोपासून त्यांचे माणूसपण समृद्ध करण्याच्या अखंड प्रयत्नात त्यांनी आयुष्य वेचले. राजसत्तेचे, समाजसत्तेचे, कौटुंबिक-संवाद-विवादांचे कडुगोड अनुभव झेलत (१) शिक्षण (२) कृषि व (३) आरोग्य या क्षेत्रांत त्यांनी देदीप्यमान कामगिरी करून दाखविली. परंतु सर्वात आश्चर्यकारक म्हणजे धर्माबद्दलची - विशेषत: भारतीय संस्कृतीशी निगडित अशा सनातन धर्मकल्पनांबद्दलची अभूतपूर्व अशी जाणही प्रबंधरूपात त्यांनी व्यक्त केली आहे. म्हणजे सामान्यत्वे बुद्ध, शंकराचार्य, फुले, आंबेडकर, म. गांधी अशा समाजक्रांतीच्या थोर प्रणेत्यांच्या व्यक्तिमत्वाप्रमाणेच, भाऊसाहेबांचेही व्यक्तित्व एकदेशीय नसून समृद्ध व संश्लिष्ट स्वरूपाचे आहे. निव्वळ व्यावहारिक सत्ता नव्हे, तर नैतिक सत्ता आणि धार्मिक सत्तेची प्रस्फुरणेही त्यांच्या व्यक्तिमत्वात आढळून येतात. पण सर्वात विलोभनीय असा त्यांच्या व्यक्तिमत्वाचा भाग म्हणजे त्यांची तटस्थ साक्षीभूत वृत्ती, तसेच समाजन्यायातून प्रकट होणारी समताधिष्ठित दृष्टी आणि आत्मीयतेतून झिरपणारी काव्यात्मवृत्ती. जीवनालाच एक खेळ, एक नाटक समजून अख्ख्या समाजाच्या वतीने आपली भूमिका खेळकरपणे निभावून नेण्याची सौंदर्यदृष्टी त्यांना लाभली असल्याचेही अनेक प्रसंगांतून दाखवून

देता येईल.

सन १९३६ सालच्या निवडणुकीच्या धामधुमीमधली डॉ. शिवाजीराव पटव यांनी सांगितलेली आठवण – ''भाऊसाहेबांच्या विरोधात काँग्रेसतर्फे आम्ही उमेद उभा केला होता. मतदानाच्या आदल्या दिवशी दोन्ही पक्षातील लोक प्रचारार्थ हिं होते. आम्ही प्रचाराकरिता एका गावात जात असता वाटेत आमची मोटर बिघडल त्यामुळे आम्ही निराशेत बसलो होतो. इतक्यात भाऊसाहेब मोटारीतून परत जात मी पाहिले. मी त्यांची मोटार थांबवली व त्यांना आमच्या प्रचाराकरिता मोटार देण्या विनंती केली. त्यांनी आपली मोटार आम्हाला दिली. त्यानंतर ते जवळच असलेल खेड्यात चालत जाऊन नंतर बसने अमरावतीला निघून गेले. त्यांच्या त्या मदतीमु आम्ही इलेक्शन जिंकले आणि त्यांचा पराभव झाला.''

या प्रसंगातून डॉ. भाऊसाहेबांच्या व्यवहारसत्तेला नैतिक सत्तेचे अधिष्ठान लाभले दिसून येते. त्याचाच परिणाम पुढे आत्मिक-बळ वाढविण्यात झालेला दिसून येत ही आत्मिक सत्ता एकप्रकारच्या काव्यात्मतेचेच रूप नव्हे काय?- अर्थात काव्यात्मतेची पातळी सर्वसामान्य नव्हे! भाऊसाहेब देशमुख जन्माने 'देशमुर असल्यामुळे ते ब्राह्मणांचे विरोधक आहेत, असा गैरसमज त्यांच्याशी संबंध न आलेल व्यक्तींनी करून घेतला होता. परंतु भाऊसाहेबांनी प्रा. वि. भि. कोलते यांचे नेमणुकी वेळी जशी कणखर भूमिका घेतली होती तशीच भूमिका सौ. कुसुमावती देशप यांच्या बाबतीतही घेतल्याचे नमूद आहे. तसेच वर्णेकर यांना राष्ट्रीय स्वयंसेव संघाचा एक कार्यकर्ता म्हणून म. गांधी हत्येबाबत पकड-वॉरंट होता. वस्तुतः त्यां त्या कृत्याशी काहीही संबंध नव्हता. कित्येक निरपराध संघकार्यकर्त्यांना त्यावेळ तुरुंगात डांबून ठेवण्यात आले होते. डॉ. वर्णेकरांची तुरुंगातून सुटका झाल्यावर त्यां अधिव्याख्यात्याचे पद भाऊसाहेबांच्या सदसद्विवेकपूर्ण निर्णयामुळेच त्यांना मिळ शक्य झाले होते. कारण भाऊसाहेबांजवळ आप-पर भाव नव्हता. कुणावर अन्या होत आहे का? कोणाचे नुकसान होत आहे का?-एवढेच ते पाहायचे. या संदर्भाती प्रसंगांचा अभ्यास केल्यास आप-पर भावाचा निरास झालेली समता, सहृदय विशाल आणि नीतिधर्म-मंडित अशी भाऊसाहेबांची समदृष्टी दिसून येते. अशा तदाकार वृत्तीत प्रायः जीवनविषयक काव्यात्म दृष्टिकोन जन्म घेतो.

चांगल्या कुटुंबव्यवस्थेतून, समाजव्यवस्थेतून आणि अर्थव्यवस्थेतून देशाचे चांग सरकार निर्माण होते. मात्र वरून लादलेले सरकार हे जनतेच्या अज्ञानाचाच फाय घेते, म्हणून समाजाचे अज्ञान आणि दारिद्र्य दूर करणे हाच डॉ. पंजाबरावांनी कालसुसंग असा वेदान्त मानला होता. समाजाच्या विचारशक्तीवर विश्वास ठेवूनच ते कृषि क्रांतीच्या कार्यात मग्न झाले. अज्ञानात आणि दारिद्र्यातच अपार हिंसा असते, अ

त्यांचे मत होते. भटशाही-भांडवलशाहीचे लोभ आणि मोह हे कृषिक्रांतीद्वारे त्यांना नाहीसे करावयाचे होते. ते या अर्थाने 'अहिंसावादी' होते असे म्हणता येईल.

भारतीय किसान-क्रांतीला पंजाबरावांनी प्राधान्य दिले. 'श्री शिवाजी शिक्षण संस्था' हे त्यांचे नवप्रवर्तन होते, तर 'भारत कृषकसमाज' हे त्यांचे संघटनात्मक असे अभिनव प्रवर्तन होते. "जागतिक कृषिप्रदर्शन आणि भारतीय कृषक वर्गाच्या दृष्टिकोनातून डॉ. पंजाबराव देशमुख 'मान्सून' एवढा महत्त्वाचा होता" - असे त्यांचे चरित्रकार सुदाम सावरकर म्हणतात, त्याला विशेष महत्त्व आहे. शेतकरी क्रांतीचे ध्येय ठेवून शेतकऱ्यांसाठी कार्य करणे ही त्यांच्या कामामागची मूलभूत धारणा होती. डॉ. पंजाबरावांनी हे दिव्य आयुष्यभर केले. ते भारताचे राजकारण, अर्थकारण, समाजकारण, धर्मकारण म्हणजे शेतकरीकार्यच समजत असत. कृषि विकासासाठी विज्ञानदृष्टी, जीवनसमृद्धीसाठी शिक्षण तसेच आरोग्यविषयक सवयी-अशा सर्व बाबींचे ज्ञान तळागाळातील लोकांपर्यंत पोहोचविण्याकरिता त्यांचे अखंड परिश्रम चालू असायचे. त्यांच्या त्या परिश्रमाला मर्यादा नाही, की उसंत नाही. तो एक अखंड यज्ञच होता. आपल्या जीवनातील सुखस्वास्थ्याच्या समिधा त्यांनी त्या यज्ञात समर्पित केलेल्या आहेत. भाऊसाहेबांचे समर्पित जीवन स्फूर्तिदायक होते. या जीवनाला शेतकऱ्यांच्या सर्वांगीण उन्नतीचा ध्यास लागला होता. या ध्यासातूनच, लोकशिक्षण घडवून आणावे म्हणून जनतेत प्रतिष्ठित न समजल्या जाणाऱ्या तमाशासारख्या लोकमाध्यमाला त्यांनी आधार दिला. या संदर्भात एक घटना बोलकी आहे :

"मोर्शीचा देवराव सदातपुरे हा तरुण कलावंत होता. जिजाबा पाटलांचे कीर्तन ऐकून त्यालाही कीर्तन करण्याची स्फूर्ती झाली. येरल्याचे काही कलावंत घेऊन डॉ. पंजाबराव उर्फ भाऊसाहेब आणि क्रांतीसिंह नाना पाटील या विषयांवर कीर्तन करण्यास त्याने प्रारंभ केला. अनेक ठिकाणी त्याचे कीर्तनाचे कार्यक्रम झाले. कीर्तन करता करता त्याला याच विषयावर 'राष्ट्रीय तमाशा' साकार करण्याची कल्पना सुचली. सदातपुरेच्या राष्ट्रीय तमाशाचे कौतुक करण्यासाठी भाऊसाहेब राजन्याला आले. त्याचा तो प्रयोग भाऊसाहेबांना फार आवडला. पुढे या राष्ट्रीय तमाशाचा उद्‌घाटन सोहळा जेव्हा मोठ्या प्रमाणावर आयोजित केला गेला तेव्हा त्या समारंभाला डॉ. भाऊसाहेबांना आमंत्रितही केले होते" - अर्थात त्यावेळी त्या सोहळ्यास भाऊसाहेब जाऊ न शकल्यामुळे सौ. विमलाबाई त्यांच्याऐवजी गेल्याची व त्यांचे बहारदार स्वागत झाल्याचीही नोंद आहे.

करमणुकीच्या माध्यमातूनच लोकशिक्षण व्हावे किंबहुना चालते-बोलते लोकविद्यापीठच समाज परिवर्तनाचे प्रमुख माध्यम बनावे अशी डॉ. भाऊसाहेबांची आंतरिक इच्छा होती. समाजाच्या गरजा, इच्छा व आकांक्षा या सामाजिक पातळीवर

असोत किंवा राजकीय पातळीवर असोत, त्याचे प्रगटीकरण होणे हे समाजस्वास्थ्यासाठी आवश्यकच असते. या माध्यमांतूनच लोकशाहीचे संरक्षण, संगोपन व संवर्धन होण्यास मदत होत असते - अशी भाऊसाहेबांची या संबंधातली धारणा होती. औषध कडू असले तरी ते जसे गुणकारी असते त्याचप्रमाणे राष्ट्रीय तमाशाद्वारे अज्ञान, अंधश्रद्धा व अलगतावादी वृत्ती यांचे निर्मूलन व्हावे असे भाऊसाहेबांना वाटत होते; आणि खरोखरच राष्ट्रीय तमाशांचा परिणाम त्यावेळी तळागाळातील लोकांपर्यंत आधुनिक विचार प्रसारित होण्यासाठी उपयुक्त ठरला. त्या काळात आजच्या प्रमाणे गल्लोगल्ली चित्रपटगृह किंवा घरोघरी टी. व्ही. सेट नव्हते. त्यामुळे जनप्रबोधनासाठी अशाच मार्गांची निवड सोयीची आणि उपयुक्त ठरत असे.

तसे पाहिले तर डॉ. भाऊसाहेबांचा लहानपणापासूनच कलारूपांकडे ओढा होता हे मान्य करणे अवघड असले तरीही ते सत्य आहे. या संबंधातील एक आठवण अशी - भाऊसाहेबांच्या आळीत लहुजी नावाचा एक झडपी कुणबी राहायचा. तो अगदी पट्टीचा ढोलक वाजविणारा होता. उंच, पल्लेदार सुरात ''धनवंत पिता, घरी सुखी कन्या लाडकी'' -अशा लावण्या देखील तो सुरेल व छान गायचा. अशावेळी येणाऱ्या-जाणाऱ्यांनी थबकून त्या लावण्यांचा रस लुटावा. त्याप्रसंगी बालगोपालांची झुंबड व्हायची. त्यात बाल पंजाबही भारल्याप्रमाणे तिकडे वळला. आणि लावणी ऐकण्यात तन्मय झाला, रंगून गेला. कुणीतरी ते वर्तमान पंजाबरावांच्या आई राधाबाईजवळ सांगितले. मुलांना भलतेच छंद लागू नयेत ही त्या माऊलीची सदिच्छा; म्हणून पंजाबरावांना त्या अशा बाबींपासून दूरच ठेवत. त्यामुळे मुळात कलासक्त असूनही भाऊसाहेबांचे 'वढाळ' मन प्रत्येक वेळी नियंत्रित होत गेले. नाहीतर डॉ. पंजाबरावांमध्ये उपजत असलेला कलासक्तीचा हा गुण अधिक विकसित होऊ शकला असता.

भाऊसाहेब कलेचे चाहते होते, नव्हे स्वत: ते एक कलाकारच होते. विद्यार्थी दशेत नाट्यकलेत त्यांनी भाग घेतला होता. भाऊसाहेबांना गायनाचीही आवड होती. ते हार्मोनियम वाजवायचे, तबला वाजवायचे. ते खरे रसिक होते. त्यांच्या रसिकत्वाच्या आठवणी अजूनही काही कलाकारांच्या मनात ताज्या आहेत. सौ. पुष्पा देव यांनी कथन केलेली आठवण याप्रमाणे -

''श्री शिवाजी कला महाविद्यालय अमरावती येथे एका स्नेहसंमेलनासाठी 'स्वप्न वासवदत्ता' हे संस्कृत नाटक भाऊसाहेबांच्या प्रेरणेने बसविण्यात आले. या नाटकात माझे वडील प्रा. मा. ल. व्यवहारे यांनी उदयन् राजाची भूमिका केली होती. नाटकाची तालीम पाहाण्यासाठी एक दिवस भाऊसाहेब आले. त्यावेळी -

*परमेशे निहिते मायागरे*
*मनु पश्यताम् ।। धृ ।।*

हे पद स्वरबद्ध करण्यात येत होते. पण का, न कळे. संगीत दिग्दर्शकाने या गाण्याला जी चाल दिली ती काही भाऊसाहेबांना विशेष आवडलेली दिसली नाही. क्षणभर ते काहीसे गंभीर व विचारमग्न झालेले दिसले – अन् दुसऱ्याच क्षणी उत्स्फूर्ततेसह संगीत दिग्दर्शकास प्रांजळपणे म्हणाले – ''या गाण्याला जर मानापमान नाटकातील 'धनराशी दिसता मूढापाशी सुखवी तुला – दुखवी मला' या गाण्याची चाल लावली तर...... !''

– आणि ही चाल लावताच भाऊसाहेब श्री. बाबूकाका चौबळ यांचा हात हातात घेऊन नाचू लागले.... त्यांच्यातला कलाकार जागा झाला होता....'' अनेकांचे कलाजीवन घडविण्यात भाऊसाहेबांचा फार मोठा वाटा आहे, हे कृतज्ञपणे अनेक कलावंत कबूल करतात.

भाऊसाहेब विद्यार्थी असताना टेनिस खेळत. कारंजाला असताना टेनिस खेळात त्यांनी बरीच प्रगती केली होती. पुढे ब्रीज खेळायचे. चेस खेळातही त्यांची गती होती. त्यांना देशी–विदेशी खेळांची आवड असल्यामुळे ते शाळा–महाविद्यालयांतून खेळाडूंना विशेष उत्तेजनही देत असत. ते कलाप्रेमी रसिकही होते. या सर्व बाबींतून त्यांची जीवनाकडे पाहाण्याची एक सौंदर्यात्मक दृष्टी व्यक्त होते.

डॉ. भाऊसाहेबांच्या व्यक्तिमत्वाचा अभ्यास करीत असता असे लक्षात येते की, ललित साहित्य क्षेत्रात भाऊसाहेबांचे फारसे काही योगदान नाही. समाजकार्यातील व्यस्ततेत त्यांना साहित्याचा प्रपंच करणे शक्यही झाले नाही. परंतु त्यांच्या व्यक्तिमत्वात कलात्मक अभिरुचीची समृद्ध जाण मात्र निश्‍चितच होती. या संदर्भात एखादा प्रसंग कथन करता येईल... ग्रामीण (वऱ्हाडी) साहित्यिक पा. श्रा. गोरे यांना भाऊसाहेब एकदा म्हणाले, ''गोरे, हे पहा गड्या, मी साहित्यिक नाही – पण माझ्या मते समानता, भावनात्मक एकता, आणि सोज्ज्वळ मानवता यांचा संदेश देणाऱ्या ध्येयवादी साहित्याची गरज आहे. तसेच जे मुलांच्या मनाची, मेंदूची आणि मनगटाची मजबूती करील तेच खरे साहित्य.....'' यावरून भाऊसाहेबांना असे साहित्य अपेक्षित होते 'जे व्यक्ती–व्यक्तींची मने समृद्ध करील आणि कसदार समाजाची निर्मिती करील.' मात्र भाऊसाहेबांची अभिरुची परंपरागत अभिजनमान्य पंडिती अभिरुचीहून वेगळी होती. पांढरपेशा माणसाच्या आणि भाऊसाहेबांच्या अभिरुचीतील फरक स्पष्टपणे जाणवतो, तो त्यांच्या डायरीतील हृदयस्पर्शी कवितांमधून. हळुवारपणे भावनेची पकड घेणारी त्यात काही वाक्ये आहेत. मासल्यादाखल–

''बा दु:खा! कधी–कधी तू मला अगदी ग्रासून टाकतोस हे मला कबूल करणे भाग आहे ....पण ते पहा तुझं काळंठिक्कर, केविलवाणं तोंड! तुझ्या सर्वच भांडवलाला आग लागलेली दिसते.'' .....

हा संपूर्ण उतारा तत्त्व-चिंतकालाही क्षणभर खिळवून टाकील. तशीच सन १९५४ साली अमरावती येथे ऑक्टोबर महिन्यात दाढी करीत असताना भाऊसाहेबांना संतश्रेष्ठ तुकारामाच्या अभंगवाणीवर स्फुरलेली ही कविता. (पाहा -परिशिष्ट २)

*महाकवि श्रेष्ठ। ह्या समान हाच।*
*तयासम जगी। अन्य नाही।।*
*हा हो लोककवि। ज्ञान पाजी जना।*
*अहंकारा तेथे। जागा नाही।।*
*दावा अन्य कोणी। पतितोद्धारक।*
*कुभंडा मारक। बाण ज्याचे।।*
*गर्विष्ठांचा गर्व। मूर्खांची मूर्खता।*
*सत्तेची अंधता। हरियेली।।*
*श्रद्धेची श्रेष्ठता। धर्माचे पावित्र्य।*
*सत्याचेहि मर्म। पटविले।।*
*संतांची उच्छिष्टे। बोलिलो उत्तरे।*
*दांभिका बडगा। शिरावरी।।*

या अभंगातून भाऊसाहेबांची प्रतिभा सत्याचा वेध घेणारी व परखडपणे सत्यपरिस्थितीचे सूक्ष्म चित्रण करताना मुखरित झालेली दिसून येते.

भाऊसाहेबांच्या काव्यात्मवृत्तीच्या संदर्भात त्यांच्या व्यक्तिमत्वाचा शोध घेतल्यास तळागाळातील लोकांच्या जाणीवा लेऊन त्यांचे व्यक्तिमत्व अभिमंत्रित झालेले दिसून येते. त्यांच्या या रचनेला साधेपणाचा साज आहे, तर प्रामाणिकपणामुळे ती अधिकच तरल आणि पारदर्शकही झाली आहे. त्यांच्या या छोट्याशा अभंग रचनेत देखील त्यांच्या दृढ संकल्पांची चुणूक दिसल्याशिवाय राहात नाही. ज्या काळात तमाशाला फारशी प्रतिष्ठा नव्हती त्याही काळात लोकनाट्याच्या माध्यमातून जनजागृती करता येते, याविषयी भाऊसाहेबांच्या मनात कोणताही किंतू नव्हता. भाऊसाहेबांच्या व्यक्तिमत्वावर तुकाराम महाराजांच्या परखड विचारांचा आणि जीवनशैलीचा ठसा उमटलेला दिसतो. समाजातील ढोंगी लोक ओळखून समाजातील पतितांचे जीवन उजळून टाकण्यास विविध शैक्षणिक संस्थांच्या, वसतिगृहांच्या, श्रद्धानंदसारख्या अनाथालयांच्या केलेल्या उभारणीमधून त्यांची जीवनविषयक दृष्टी जाणवते. सातत्याने समाजाचे देणे देत राहिले पाहिजे ही त्यांची ठाम भूमिका होती. या प्रेरणेतूनच त्यांनी तिसऱ्यांदा लोकसभेची निवडणूक लढविली. त्यात ते निवडूनही आले. मात्र त्यावेळी त्यांना मंत्रिपद देण्यात आले नाही. कृषकांचा हा नेता त्यामुळे थोडा नाराजही झाला. कारण काम करण्याला आता मर्यादा पडणार! तसेही त्यांनी उभारलेल्या विविध

समाजोपयोगी प्रकल्पांसाठी पैसा कसा उभा करायचा हे आव्हान त्यांच्या समोर सदैव उभेच असे. तरीपण लोकहिताची कोणतीच कामे त्यांनी पैशाअभावी सोडून दिली नाहीत. त्यासाठी युक्त्या-प्रयुक्त्या अवलंबिल्या. जसे - एका मित्राच्या कन्येच्या विवाहात सुलग्न लावण्याचे अक्षतांचे ताट भटजीऐवजी स्वतःच धरले आणि त्यातून आलेल्या आठ हजार रुपये रकमेतून संस्थेच्या गरजा भागविण्यास त्याचा उपयोग केला. अनेक प्रसंगी ते समाजातील श्रीमंत लोकांकडून धान्याच्या स्वरूपात देणगी स्वीकारत. त्याकरिता एखाद्याने 'देणगी देतो' असे म्हटले की ती मिळेपर्यंत ते सतत प्रयत्नशील राहात. कधी-कधी तर एक-एक दिवस ते त्याच कामात असत. विविध प्रसंगांत चिकाटीने, सातत्याने मागावर राहून, पाठपुरावा करूनही त्यांना उदासीनता कधी आली नाही. त्यांच्या प्रत्येक कामात एक नैसर्गिकता, एक उत्स्फूर्तता ओसंडत असलेली दिसून येई. शेतकऱ्यांना तळागाळातून वर उचलण्यासाठी व त्यांची भावी पिढी समृद्ध होण्यासाठीच ते सातत्याने एकेका संघर्षाला तोंड देत राहिले; आणि त्यातूनच परिस्थितीला आव्हान देण्याची ताकद त्यांच्या व्यक्तिमत्वात आली. व्यक्तिमत्वाचे असे सत्त्वशील सौंदर्य खरोखरी दुर्लभ असते.

भाऊसाहेबांना लहानपणापासूनच गरिबांविषयी, रंजल्या-गांजल्यांविषयी कळवळा होता. त्यांचा देव दगडाधोंड्यांचा नव्हता. त्यांचा देव दलित-पीडित दुःखी माणूस होता. मुलांवर त्यांचे विशेष प्रेम. कोणत्याही गावी गेले तरी तेथील मुलांची ते विचारपूस करीत. तेथे त्यांच्या संगोपनाची, शिक्षणाची सोय आहे की नाही याची चौकशी करीत. तशी नसेल तर त्याचा विचार करीत, नवीन योजना आखत आणि तिला मूर्तस्वरूप देईपर्यंत त्यांना चैन पडत नसे. वऱ्हाडातील शेकडो संस्था आणि हजारो विद्यार्थी आजही याची साक्ष देतात.

भाऊसाहेबांनी अमरावतीचे श्रद्धानंद वसतिगृहापासूनच या कार्याचा मुहूर्त केला. नागपुरातील श्रद्धानंद अनाथालय भाऊसाहेबांकडे १३ मार्च १९५५ ला आले. या संस्थेला डॉ. भाऊसाहेबांचा फार मोठा आधार होता. म. जोतिबा फुल्यांच्या पावलावर पाऊल टाकून ही संस्था मोठ्या परिश्रमाने त्यांनी पुढे आणली. या संस्थेतील मुलामुलींविषयी त्यांना अतिशय जिव्हाळा होता. १९४७ साली अखंड भारताचे विभाजन झाले. जातीयतेचा, धर्मांधतेचा, जीवहत्येचा डोंब उसळला. अशावेळी निष्पाप जिवांची हत्या केली गेली. निरपराध मुले उघड्यावर पडली. तशातच राजस्थान भागात भाऊसाहेब गेले असता त्यांना तीन अनाथ मुली आढळल्या. बन्नू, मीरा, रूपा ही त्यांची नावे. त्या अनाथ मुलींची तात्पुरती व्यवस्था राजस्थानचे त्यावेळचे मुख्यमंत्री डॉ. जीवराज मेहता यांनी शासकीय रुग्णालयात केली होती. परंतु पुढे त्यांना कुठे ठेवायचे हा त्यांच्यासमोर प्रश्नच होता. भाऊसाहेबांना हे कळताच डॉ. मेहतांना ते म्हणाले -"ह्या

मुली मला द्या - मी त्यांची व्यवस्था करतो.'' त्या मुलींना त्यांनी नागपूरच्या श्रद्धानंद अनाथालयात ठेवले. भाऊसाहेब नागपूरच्या श्रद्धानंद अनाथालयात पुढे जेव्हा-जेव्हा भेट देत तेव्हा या तीन मुलींची आवर्जून चौकशी करीत. इतकेच नव्हे तर प्रसंगी औषधपाण्याकरिता लागलेला अधिकचा पैसाही त्यांना ते पाठवीत.

विदर्भाच्या भूमीतील माणुसकीचा जिव्हाळा वाढीस लावण्यात भाऊसाहेबांचा फार मोठा हात आहे. भाऊसाहेब म्हणजे जिव्हाळ्याचे प्रतीकच. नामदेव चपराशाच्या मुलीचे लग्न स्वत:च्या खर्चाने दिल्लीच्या बंगल्याच्या आवारात त्यांनी लावून दिले. घरचा स्वयंपाकी, वाहन चालविणारा ड्रायव्हर, बागकाम करणारा माळी, ऑफीसचा बाबू.... अशा लहान-सहान माणसांची ते जातीने विचारपूस करीत. त्यांच्याजवळ कोणी लहान नाही, कोणी मोठा नाही, श्रीमंत नाही की गरीब नाही. त्यांच्याजवळ सर्वांसाठी एकच ठेवा आहे - 'निरपेक्ष मानवता, माणुसकीचा गहिवर.' ते सर्वांशी सहज भावाने वागत, उत्स्फूर्तपणे बोलत-चालत. माणसाला माणसासारखे वागविणे हाच त्यांचा धर्म. भाऊसाहेबांनी शेकडो संस्था उभारल्या, त्यांकरिता सायकलवरून दौरे काढले, तासन् तास त्या गोष्टींकरिता खर्ची घातले, त्यांत हजारो कर्मचारी, अधिकारी नेमले, परंतु कुठेही त्यांनी मालकीचा तोरा दाखविला नाही. फकिरी व कलंदरी वृत्तीचे भाऊसाहेब वैभवात असोत वा अभावात, ते सदैव सारखेच आढळून येत.

*वानोत निंदोत सुनीतिमंत*
*चळो असो वा कमलागृहात*
*हो मृत्यु आजीच, घडो युगान्ती*
*सन्मार्ग सोडूनि भले न जाती-*

हे कविवचन भाऊसाहेबांच्या बाबतीत तंतोतंत लागू पडते. ही समवृत्ती म्हणजेच त्यांची जीवनाकडे पाहाण्याची काव्यात्म वृत्ती होय.

अशा निरोगी मानसिकतेतून व अशा तन्मयतेतूनच काव्यात्मवृत्ती जन्म घेत असते आणि तटस्थ आनंदभावनेतून सौंदर्यदृष्टी जन्म घेत असते. अत्यंत अपवादभूत अशी सूक्ष्म संवेदनशीलता आणि विभोरतेच्या काठावरील भावनाशीलता लाभलेली व्यक्ती ही सृजनशील कलावंत बनते, साहित्यिक बनते; तर संवेदना, भावना आणि विचार यांचा त्रिवेणी-संगम व्यक्तिमत्वात झालेली व्यक्ती साक्षात्कारी संत बनते. भाऊसाहेबांची वृत्ती ही या दोहोंच्या मध्ये बसणारी वृत्ती आहे.

कारण एकीकडे राजकीय नेत्यांच्या निर्णयातला ठामपणा व दृढनिश्चय त्यांच्यात आहे, पण त्याचवेळी एखाद्या लोकसेवकाची विधायक कार्यप्रवणताही आहे. जग हा जणू एक विशाल रंगमंच आहे, जीवन हे एक नाटक आहे आणि आपण या रंगमंचावरचे एक पात्र असून जनसामान्यांच्या जीवनसत्त्वाची प्रातिनिधिक भूमिका तेवढी आपल्याला

समर्थपणे वठवायची आहे - अशा जाणिवेतूनच भाऊसाहेबांनी लोकोपयोगी कार्याचा हा सारा पसारा उभारला आहे, हे ध्यानात घेतले तरच त्यांच्या अखंड उद्यमाची, अम्लान चैतन्याची आणि लोकोत्तर कार्यकलापांची संगती लागू शकते.




**संदर्भ ग्रंथ**

(१) 'डॉ. पंजाबराव देशमुख - जीवन व कार्य' (१९६४)
लेखक - सुदाम सावरकर, रा. ब. सूर्यकर

(२) 'डॉ. भाऊसाहेब पंजाबराव देशमुख' -(१९८६),
लेखक - प्रा. रघुनाथ कडवे.

(३) 'पाने आठवणींची' - (१९९७) संपादक व संकलक
प्रा. वीणा मोहोड, डॉ. वंदन मोहोड

(४) 'डॉ. भाऊसाहेब देशमुख' - वीर उत्तमराव मोहिते.

(५) 'लोकनेता - डॉ. पंजाबराव देशमुख' लेखक - सुधाकर मोहोड

(६) 'पंजाबराव देशमुख - चरित्र व कार्य' (१९६७) लेखक - मधुकर केचे.

(७) 'डॉ. पंजाबराव देशमुख - विविध दर्शन' (१९६४)

(८) 'कृषि व शिक्षण महर्षि भाऊसाहेब डॉ. पंजाबराव देशमुख जीवन व कार्य - संक्षिप्त दर्शन' (१९९२) संकलन - श्री अच्युत महाराज

(९) तरुण भारत - डॉ. पंजाबराव देशमुख विशेषांक, (१९९२)

# समकालीन वैदर्भीय संत आणि भाऊसाहेब

- बाबा मोहोड

---

विदर्भाची माती आरंभापासूनच सांस्कृतिक दृष्ट्या सुपीक आणि आध्यात्मिक दृष्ट्या संपन्न आहे. वर्धा आणि पूर्णा या लोकमाता या प्रदेशातून वाहातात. या नद्यांचे किनारे अनेक संतांच्या वास्तव्याने पुनीत झाले असून त्यांच्या तपस्येला आणि आध्यात्मिक विकासाला त्यांनी जिव्हाळ्याने हातभार लावला आहे.

अलिकडच्या काळात असेच दोन महान् संत या वर्धा-पूर्णेने सिंचन केलेल्या विदर्भात अवतरून गेले. त्यांपैकी एक लोकसेवी निस्पृह संत गाडगेबाबा आणि दुसरे लोकानुवर्ती प्रतिभेचा वारसा लाभलेले राष्ट्रसंत तुकडोजी महाराज. या दोन्ही संतांचे अवतरण डॉ. भाऊसाहेब पंजाबराव देशमुख यांच्या आगेमागे झाले. संत गाडगेबाबा हे डॉ. पंजाबरावांपेक्षा सुमारे वीसेक वर्षांनी वडीलधारे तर राष्ट्रसंत तुकडोजी महाराज हे भाऊसाहेबांपेक्षा दहा-अकरा वर्षांनी धाकटे.

या उभय संतांचा विदर्भाच्या लोकजीवनावर व लोकमानसावर विलक्षण प्रभाव उमटून गेला. श्रीसंत गाडगेबाबा 'देवकी नंदन गोपाला'चे उद्घोष करीत कीर्तनाच्या माध्यमाने समाज जीवनात रुजलेल्या रूढी, परंपरा, अंधश्रद्धा, व्यसनाधीनता, बालविवाह, स्त्रीशिक्षण, अस्पृश्यता, पशुहत्या आदि सामाजिक समस्या डोळ्यांपुढे ठेवून पोटतिडिकेने संकीर्तन करीत; तर राष्ट्रसंत तुकडोजी महाराज खंजेरीचे सहाय्य घेऊन सामाजिक परिवर्तनाचे व राष्ट्रीय विचारांचे वारे आपल्या स्व-रचित मधुर भजनांच्या व भाषणांच्या माध्यमाने या परिसरात वाहवीत असत. या दोन्ही संतांनी विदर्भाचा कोपरान्कोपरा पिंजून काढला होता. आणि लोकमानस शिक्षित करणाऱ्या विचारांचा पाऊस त्यांनी सर्वत्र पाडला होता. या भूमीचा कणन् कण जणू गाडगेबाबा आणि संत तुकडोजी महाराज यांच्या अस्तित्वाने भिजून चिंबचिंब झाला होता. संत गाडगेबाबा स्वत:ची स्वयंभू प्रतिभाशक्ती वापरून महात्मा जोतिबा फुले यांचे विचार या भूमीत पेरीत होते, तर संत तुकडोजी महाराज महात्मा गांधींचे राजकीय व सामाजिक

प्रबोधन स्वत:मधल्या देवदत्त प्रतिभेची डूब देऊन येथे रुजवीत होते.

या दोन्ही संतांची जातकुळीच वेगळी. देवाने त्यांना कोणत्या मातीने घडविले होते माहीत नाही! परंतु त्यांची लोकविलक्षण वृत्ती सर्वांचे लक्ष वेधून घेणारी ठरली. गाडगेबाबा मुळातच अक्षरशत्रू आणि निरक्षरांचे प्रतिनिधित्व करणारे. गावकुसाबाहेरच्या परीट बलुतेदाराच्या कुळात त्यांचा जन्म झाला. घरात अठराविश्वे दारिद्र्य, व्यसने व अंधश्रद्धांचा धुमाकूळ, जन्म, मरण आणि विवाह हे सर्व सोहळे त्यांच्या जातीत बकरा बळी दिल्याशिवाय आणि दारू पिऊन धिंगाणा घातल्याशिवाय पार पडत नसत. मुला-मुलींची लग्नं बालपणी होत. शिक्षण सर्वांनाच वर्ज्य असे. स्त्रियांना कुत्र्यामांजरापेक्षाही वाईट वागणूक मिळत असे. अशा प्रतिकूल वातावरणात गाडगेबाबांचे अवतरण हा केवढा चमत्कार! या महात्म्याने आपला पाऊण शतकाचा जीवनकाल पूर्णपणे समाजाच्या सेवेत समर्पित केला. हजारोंच्या समूहांना व्यसनमुक्त केले. जातीजातीतील अंतराय मिटवून टाकले. गावकुसाच्या बाहेर शिक्षणाची गंगा वळविली. बालविवाह थांबविले. हुंड्याचा राक्षस ठेचून काढला. देवाधर्माच्या कर्मठ जोखडातून माणसाला बाहेर काढले. सारा समाज मानवतेच्या पातळीवर कसा येईल हाच एकमेव ध्यास त्यांनी घेतला आणि तो पूर्णत्वास नेला.

राष्ट्रसंत तुकडोजी महाराजांनीही याच प्रकारचे काम केले. आपली देवदत्त सुरेख पहाडी गायकी त्यांनी यासाठी वापरली. हजारो स्वरचित भजनांचा पाऊस पाडला. मंदिरातील देव आणि पोथीतला धर्म माणसाच्या पातळीवर आणून त्याला कर्तृत्वाची दीक्षा दिली. मंदिरात न दिसलेला सावळा मुरारी त्यांनी जनीसंगे दळताना आणि चाखोबासंगे ढोरे ओढताना अनुभवला. देश आणि देव यांच्यात ऐक्य साधले. प्रपंच आणि परमार्थ यांत अद्वैत शोधले आणि 'माणसाची मानवहितैषी कृती हीच त्याची पूजा' हा नवा धर्मविचार त्यांनी जनमनात रुजविला.

अशा या आतून-बाहेरून संतांच्या स्पर्शाने आणि तप:पूत प्रबोधनाने भिजलेल्या मातीत पापळ नामक लहानशा गावात २७ डिसेंबर १८९८ रोजी डॉ. भाऊसाहेब पंजाबरावांचा जन्म झाला. शामराव कदम नामक मध्यम शेतकऱ्याच्या चंद्रमौळी झोपडीत हे तेज प्रगटले. नियतीची कृपा झाली. मामांचा आधार मिळाला आणि मातेच्या ममतेने आडकाठी आणली नाही. त्यामुळे शेतकरी कुटुंबात जन्मलेला लहानगा पंजाब आपल्या दैवदत्त बुद्धीचे तेज प्रगट करू शकला. या मुलाजवळ अचाट बुद्धिमत्ता असल्याची चिन्हे प्राथमिक शाळेतच दिसून आली.

डॉ. पंजाबरावांचे पहिले तीन वर्षांपर्यंतचे शिक्षण पापळ या त्यांच्या जन्मगावीच झाले. पुढील शिक्षणाची तेथे सोय नव्हती. त्यामुळे आणखी एक वर्ष त्यांना तिसरीतच घालवावे लागले. त्यानंतरचे त्यांचे शिक्षण नांदगाव खंडेश्वर आणि कारंजा लाड येथे

झाले. महाविद्यालयीन शिक्षण त्यानी पुण्याच्या फर्ग्युसन महाविद्यालयातून घेतले. १९२० च्या ऑगस्टमध्ये उच्च शिक्षणासाठी ते इंगलंडला रवाना झाले. १९२८ पर्यंत त्यांचे वास्तव्य परदेशी होते. तेथे त्यांनी शिक्षण एके शिक्षण एवढाच ध्यास घेतला व इंग्लंडच्या एडिन्बर्ग विश्वविद्यालयात एक बुद्धिमान विद्यार्थी म्हणून त्यांनी लौकिक मिळविला. १९२३ साली ते संस्कृत घेऊन एम्. ए. ऑनर्स प्रथम श्रेणीत उत्तीर्ण झाले. वयाच्या केवळ सत्ताविसाव्या वर्षी वैदिक वाङ्मयाचे अध्ययन करून 'वैदिक वाङ्मयात धर्माचा उद्‌गम आणि विकास' हा प्रबंध लिहून ऑक्स्फर्ड विश्वविद्यालयाची डी. फिल्. (महापंडित) ही पदवी मिळविली. शेवटी बॅरिस्टरी पास करून ते मायदेशी परत आले.

त्या काळात पापळच्या देशमुखांचा मुलगा आणि तोही परदेशात जाऊन शिक्षणात नाव मिळविलेला-अशा मुलाच्या भोवती नोकरी, संपत्ती आणि प्रतिष्ठा साहजिकच रुंजी घालीत असतात. पण तरुण डॉ. भाऊसाहेबांनी या प्रलोभनाची कास धरली नाही. उलट स्वतः भरमसाट कर्जबाजारी असताही त्यांनी लोकसेवेचा निर्धार केला. कुणाही देशमुखाची देखणी मुलगी त्यांच्यावर हुंड्याची बरसात करून गेली असती. परंतु भाऊसाहेबांनी मुंबईच्या विमल वैद्य या शिक्षित मुलीशी मिश्रविवाह करून समाजाला धडा शिकविला. या विवाहाच्या निमित्ताने त्यांनी पहिले क्रांतिकारी पाऊल टाकले आणि कुठल्याही परिणामांची पर्वा न करता स्वतःला बहुजनांच्या सेवेत झोकून दिले.

डॉ. भाऊसाहेब पंजाबराव देशमुखांची विद्वता दांडगी, निर्णयशक्ती अचूक. त्यामुळे मानाची पदे त्यांचेकडे स्वतःहून चालून आली. अमरावती जिल्हा कौंसिलचे अध्यक्षपद (१९२८), सर मॉंटेग्यू मंत्रीमंडळात लोककर्म खात्याचे मंत्री (१९३०), घटनासमितीचे सन्मान्य सदस्य (१९४६), भारताचे कृषिमंत्री (१९५२ ते ६२), भारत कृषक समाजाचे अध्यक्ष- अशा कितीतरी जागा त्यांनी भूषविल्या व त्या त्या क्षेत्रात आपली छाप त्यांनी उमटविली.

शेतकरी हा डॉ. भाऊसाहेबांचा मानबिंदू होता. त्याच्या झोपडीपर्यंत शिक्षण जावे ही त्यांची आकांक्षा होती. त्याचप्रमाणे तो कर्जाच्या ओझ्यातून मुक्त व्हावा हीही त्यांची इच्छा होती. या इच्छेसाठी सरकारात असताना त्यांनी आपली शक्ती पणास लावून कर्जनिवारण कायदा पास करून घेतला आणि शेतकरी मुलांच्या शिक्षणासाठी श्रीशिवाजी शिक्षण संस्थेची स्थापना केली.

कामाचा प्रचंड पसारा आणि तो निपटण्याचा वेग प्रचंड असूनही भाऊसाहेबांच्या अंतरी समाधान नव्हते. विद्यापीठापेक्षा लोविद्यापीठाच्या संकल्पनेचे त्यांना अधिक आकर्षण होते. खेड्यापाड्यांतील लोकांपर्यंत आधुनिक विज्ञान आणि तंत्रज्ञान पोहोचावे

यासाठी उपयुक्त असे विविध प्रशिक्षण उपक्रम या लोकविद्यापीठामार्फत चालवावे आणि ग्रामीण कारागीरालाही आपला व्यवसाय उत्तम करता यावा अशी त्यांची कल्पना होती. या लोकविद्यापीठाचे उद्घाटन डॉ. भाऊसाहेबांनी पंतप्रधान नेहरूंच्या हस्ते १९५० पूर्वीच केलेले होते.

डॉ. भाऊसाहेब देशमुख हे म. फुल्यांचा वारसा पुढे चालविणारे एक निस्पृह कर्मवीर होते. शुद्ध बुद्धिवादाची त्यांची बैठक. परंतु त्यांच्या जीवनात पुढे गाडगेबाबा आणि राष्ट्रसंत तुकडोजी महाराज या दोन कर्मयोगी संतांचा प्रवेश झाला. या उभय महात्म्यांच्या वैचारिक सहवासाने आणि आध्यात्मिक जीवनप्रणालीने भाऊसाहेबांचे जीवन अधिकच समृद्ध झाले. डॉ. बाबासाहेब आंबेडकरांसोबतच त्यांनी अमरावतीचे अंबामंदिर अस्पृश्यांना खुले व्हावे म्हणून सत्याग्रह केला होता आणि मोर्शी येथील श्रद्धानंदांच्या सभेत अस्पृश्यांना प्रवेश नव्हता म्हणून त्यांची जाहीर कानउघडणी केली होती.

असे हे भाऊसाहेब पंजाबराव देशमुख संत गाडगेबाबा, तुकडोजी महाराज यांच्याच बरोबरीचे. विदर्भ प्रदेश स्वत:ला भाऊसाहेबांचा ऋणाईत मानतो. त्या दोन्ही संतांच्या कर्तृत्वाचा, विचारांचा ठसा उराशी जोपासून भाऊसाहेबांनी शिक्षणाची दारे बहुजनसमाज व गावकुसाबाहेरील जन यांना खुली करून दिली. भाऊसाहेबांच्या या कामाने गाडगेबाबा आणि राष्ट्रसंत अत्यंत प्रभावित होते. संत गाडगेबाबा तर दिसताक्षणीच 'तुम्ही आमचे देव आहात बाप्पा' - म्हणत भाऊसाहेबांच्या पायावर डोके ठेवीत असत आणि राष्ट्रसंत त्यांना संतत्व बहाल करून त्यांचा आदर व गौरव करीत असत. या त्रिमूर्तींनी विदर्भाचा सांस्कृतिक व आध्यात्मिक कायापालट केला. हे तीन महापुरुष विदर्भाच्या मातीत प्रगटले नसते तर येथल्या मागासलेपणाला अंत राहिला नसता. म्हणूनच म्हणावे लागते की संत गाडगेबाबांचा झाडू, डॉ. भाऊसाहेब पंजाबराव देशमुखांचा खडू आणि राष्ट्रसंत तुकडोजी महाराजांची खंजिरी- या तीन वस्तू विदर्भासाठी सांस्कृतिक, सामाजिक आणि आध्यात्मिक क्रांतीच्या प्रतिमा आहेत. या त्रिवेणी संगमावर अवघा विदर्भच अंतर्बाह्य शुचिर्भूत, साधनसंपन्न, ज्ञानसंपन्न आणि संस्कारसंपन्न झाला आहे; आणि या परिवर्तनाला निमित्त आहेत विदर्भाने प्रसवलेले दोन संत आणि डॉ. पंजाबराव देशमुख ऊर्फ भाऊसाहेब!



# वैदिक वाङ्मयातील धर्मः उद्गम व विकास

- प्रा. के. एल्. महाले

थोरांचे कर्तृत्व सर्वव्यापी असते असे म्हणतात. वैदिक वाङ्मयातील धर्म : उद्गम व विकास (The Origin and Development of Religion in Vedic Literature) हा पांडित्यपूर्ण ग्रंथ हाती पडताच स्व. भाऊसाहेबांच्या सर्वव्यापी-सर्वगामी व्यक्तिमत्त्वाचा आपणास साक्षात्कार घडतो. चिंतनशील, तत्त्वशोधक भाऊसाहेब आपल्यासमोर भरीव, रेखीव प्रमेयात उभे राहतात. भारतीय राजकीय क्षेत्रात केवळ वैयक्तिक योग्यतेमुळे त्यांना बहुमानाचे स्थान मिळाले आहे. सामाजिक क्षेत्रात त्यांच्या कृतिपर सुधारणेचे ठळक ठसे उमटलेले दिसतात. त्यांचा शैक्षणिक क्षेत्रातील व्याप जन्मांधाच्या पण डोळ्यात भरण्यासारखा, त्यांच्या सक्रिय ध्येयप्रवणतेतून उदयाला आलेल्या इमारती जनसाधारणाच्या पण डोळ्यात भरतात. हा प्रचंड व्याप पाहून त्यांचे डोळे दिपतात म्हणूनच की काय, नकळे: भाऊसाहेबांच्या भाविक भक्तांनी सुद्धा त्यांच्या या विद्वत्ताप्रचुर, शास्त्रशुद्ध ग्रंथाकडे डोळेझाक केलेली दिसते.

वैदिक वाङ्मय, वैदिक धर्म हे आमच्या संस्कृति-सृजनतेचे आधार मानले जातात. आमचा आत्मगौरव ही नावे ऐकताच बहरतो. वेद, ब्राह्मणे, आरण्यके, उपनिषदे-श्रुती व स्मृती आमच्या हृदयात भाविक भक्ती जागवितात. आमच्या पूर्वजांच्या ह्या पूर्वपुण्याईने आमची छाती ताठरते. पण ह्या पूर्वपूण्याईचे शास्त्रीय परिशीलन करण्याचा जर प्रश्न निर्माण झाला तर.... तर कदाचित आमचा आत्मगौरव दुखावला जाण्याचा संभव. भाविक भावनेच्या काळजाला हात घालून परिशीलनात्मक छाननी हा धाष्टर्याचा विषय ठरण्याचा दगा संभवतो. भाऊसाहेबांच्या या ग्रंथाबद्दल पसरलेली चौफेर शांतता सूचक तर नाही ?

सर्वसाधारण जनतेच्या नजरेत हा ग्रंथ भरला नाही, याला सबळ कारण आहे. भाऊसाहेब हे बहुजन समाजाचे पुढारी. त्यांचे जनमनाची पकड घेणारे कार्यक्षेत्र ग्रांथिक नाही. पण हा ग्रंथ जनसामान्यांच्या तर नव्हेच, नुसत्या सुशिक्षितांच्याही पचनी

पडण्यासारखा नाही. कोणतेही शास्त्रीय विचार सर्वसंमत होत नाहीत. हा ग्रंथ या नियमाला अपवाद आहे, असा माझा आग्रह नाही. कदाचित, ह्या ग्रंथातील विचार अधूनमधून कुणाला खुपतीलही. पण ज्या सुसंगत, शास्त्रीय मन:प्रवृत्तीतून हे विचार प्रकट झाले आहेत, तो विचारांचा तर्कशुध्द ओढा बुद्धिप्रामाण्याच्या कसोटीला उतरावा; – या ग्रंथाची तात्त्विक शास्त्रीय बैठक इतकी मजबूत, भक्कम आहे.

कोणत्याही ग्रंथाची महानता त्याच्या लांबी-रुंदीवर अवलंबून नसते. तरी पण या ग्रंथाचा एकंदर व्याप चार विभाग – चौदा प्रकरणांत सामावला आहे. विभागांची विभागणी व प्रकरणांचा कस हा कोणत्याही पीएच्.डी. उत्सुक अभ्यासकाने अभ्यासावा असा आहे.

ह्या ग्रंथाचा श्रीगणेशा 'धर्माची भाषा' या प्रकरणाने झाला आहे. धर्माची व्याख्या निश्चित करण्यापूर्वी पाश्चिमात्य पंडितांच्या धर्म-परिभाषाविषयक मतांचा वर्गवार, विस्तृत आढावा घेण्यात आला आहे. मॅक्स मुलर यांच्या 'धर्म म्हणजे अनंताविषयी तळमळ' (Longing after the infinite), 'अनंताची ओळख घडविणारी मन:प्रवृत्ती' (A mental faculty which enables man to apprehend the infinite) – असल्या श्रद्धाळू व्याख्येपासून 'हर्टलँड' यांच्या धर्म हा सामाजिक, नैतिक.. ह्यांसारख्या विचारांचा आढावा घेत घेत त्या आढाव्यासंबंधी असमाधान व्यक्त करून स्वत: धर्माची सुसंगत अर्थपूर्ण व्याख्या मांडीत असता, ग्रंथकाराने सर्वसंमत होऊ शकतील अशी धर्माची मूलप्रवृत्तिदर्शक तीन तत्त्वे पुढे आणलेली आहेत –

१) प्रत्येक धर्माचे स्वरूप सामाजिक असलेच पाहिजे.

२) प्रत्येक धर्माची काही तत्त्वे किंवा सूत्रे असतात व प्रत्येक धर्म काही श्रद्धास्थाने निर्माण करतो व ती तत्त्वे आणि श्रद्धास्थाने त्या धर्माला अंगभूत असतात.

३) प्रत्येक धर्म आचारशील असतो व आचाराचे नियम हे तत्त्वावर आधारलेले असतात- श्रध्देवर आधारलेले असतात. त्यांचा हेतू व्यक्तिसुखात भर घालणे हा असतो; मग ते सुख ऐहिक असो, पारलौकिक असो की दोन्ही प्रकारचे असो.

धर्मभावनेचे असे परिशीलन केल्यावर त्यांनी धर्माची व्याख्या दिली आहे. त्यांच्याच शब्दात:

"We may define religion as the belief in or recognition of a higher and uncoercible power or powers."

अनेक पाश्चिमात्य विद्वानांच्या मतांचे व त्यांच्या व्याख्यांचे घुसळण केल्यावर ग्रंथकाराच्या लेखणीतून हे नवनीत बाहेर आले. समतोल शास्त्रीय विचारांच्या कसोटीला हे नक्कीच उतरेल असे वाटते.

ग्रंथकाराने आपल्या ग्रंथाच्या पहिल्या दोन प्रकरणांत हाताळलेले विषय अत्यंत

गुंतागुंतीचे आहेत, असा आंग्ल पंडित कीथ ह्यांनी निर्वाळा दिला आहे. पण ग्रंथकारांची तर कठीण विषय सुलभ करून घेण्याची हातोटी त्यांच्या 'धर्माचा उद्‌गम' (The Origin of Religion) या प्रकरणात पहिल्या वाक्यातच सापडते. धर्म कसा निर्माण झाला–ह्या प्रश्नाची त्यांनी माणूस कसा निर्माण झाला – ह्या प्रश्नाशी सांगड घालून या प्रकरणाला सुरुवात केली.

"The Problem of the origin of Religion is inextricably linked up with the problem of the origin of man himself." आणि मग मनुष्य कसा निर्माण झाला ह्या प्रश्नाची चर्चा मतमतांतरांची चाळणी करून त्यांनी पुरोगामी विचारांनी केली. मनुष्य कुठल्यातरी गुप्त उच्च जगदात्म्याने निर्माण केला आहे हे पारंपरिक सूत्र बाजूला सारून मुनष्य हा सरळ उत्क्रांतिक्रमाचे फळ आहे हा सिद्धान्त त्यांनी निश्चित केला; व मग कीथ यांना कठिणतर वाटणारा गुंतागुंतीचा विषय सरळ प्रमेयांची मांडणी होत होत शेवटास नेला. ह्या ग्रंथाची मांडणी: विभागांची व प्रकरणांची ठेवण मला आदर्श वाटते ती ह्या अर्थाने. ग्रंथकाराने आपल्या ह्या ग्रंथात हाताळलेला विषय, त्या विषयासंबंधी असलेली अपुरी माहिती, लोटलेली युगे व लोकांच्या मनात या विषयासंबंधी वसत असलेली आंधळी भ्रामक श्रद्धा – या सर्व कारणांमुळे हे किती कठिणतर होते हे विचारवंतांच्या ध्यानात येईल. पण कठिणतर विषयाची शास्त्रशुद्ध मांडणी हे त्याहूनही कितीतरी कठिण आहे. ह्या असल्या, गुंतागुंतीच्या प्रश्नांची उकल पहिल्या फटक्यासरशी झालेली पाहाताच आपली मान आदराने खाली वाकलीच पाहिजे. आणि याच कारणांमुळे या तर्कशुद्ध ग्रंथाविषयी चौफेर सामसूम अधिक जाणवते.

मनुष्यनिर्मिती निश्चित झाल्यावर धर्मनिर्मितीचा प्रश्नही उत्क्रांतिसूत्राने सुलभ होतो. आदिमानव हा रानटी असून त्याच्या सभोवार निसर्गाचे नग्न, सात्त्विक तांडव चालू होते. त्या रानटी मनुष्याच्या संवेदनक्षम मनावर निसर्गाच्या लीला सारख्या परिणाम करीत होत्या. निसर्गाच्या क्रूर, भयाण शक्तीने त्याचे भावनाशील मन व्यथित झाले, भारावले – व स्वत:ची प्रतिकारशून्यता व निसर्गाची शक्ती यांत त्याला स्वत:ची असहाय स्थिती जाणवली. त्याचे भावनाप्रधान मन दिवसेंदिवस भयभीत होत गेले. ह्या प्रतिकारशून्यतेतून निसर्गाच्या ह्या घटनांमागे कुणीतरी गुप्त, अज्ञात शक्ती आहे असा त्याच्या मनाने कयास काढला; व त्या महान, अज्ञात शक्तीविषयी त्याला भीतियुक्त आदर वाटू लागला; व म्हणून माणसाव्यतिरिक्त ह्या सृष्टीची नियंत्रक सृष्टी निर्माण झाली व त्या गुप्त अज्ञात शक्तीला संतुष्ट ठेवण्याच्या, तिची कृपा संपादन करण्याच्या प्रयत्नातून धर्म निर्माण झाला.

सुरुवातीच्या गुंतागुंतीच्या प्रश्नाच्या बोरवनातून नागमोडी वळणे घेत घेत ग्रंथकाराची

विचारमालिका तिसऱ्या प्रकरणात रुळलेल्या मार्गावर आली. पण या दर्शनी रुळलेल्या मार्गावर आल्यानंतर ग्रंथकाराने ग्रंथाच्या तिसऱ्या प्रकरणात : 'जादूटोणा आणि हिंदी-युरोपीयन धर्म' (Magic and Indo-European Religion) या मथळ्याच्या निमित्ताने ग्रंथाच्या मुख्य विषयाच्या गाभ्याला होत लावला. प्रथम उत्पत्ती कशाची ?- मंत्राची की धर्माची ? (What First ? - Magic or Religion)- या प्रश्नाला त्यांनी दुसऱ्या प्रकरणाच्या शेवटीच सुरुवात केली होती.

धर्माच्या निर्मितीनंतर मंत्रोत्पत्ती झाली, की प्रथम मंत्र (जादूटोणा) निर्मिती होऊन मग धर्मप्राप्ती झाली: या विषयाची संगतवार मांडणी करताना शास्त्रीय दृष्टीने भारतीय आर्य व युरोपातील आर्य हे प्राचीन काळी कुठेतरी जगाच्या पाठीवर एकत्रित राहात होते - ही गोष्ट गृहीत धरून पुढील प्रमेयाची बैठक बसविण्यात आली आहे.

या प्रकरणात ऋग्वेदाचा आधार घेऊन ग्रंथकाराने तर्कशुद्ध रीतीने हे सिद्ध केले की, धर्माचा उदय प्रथम झाला व त्यानंतर मांत्रिक विद्येचा उदय झाला. रानटी अवस्थेतील लोकांच्या अवस्थेचा व प्राचीन जगातील मांत्रिक विचारांशी त्याच्या असलेल्या सादृश्यतेचा त्यांनी पुरावा पुढे केला आहे. वैदिक साहित्यातील मांत्रिक क्रियेत व प्रचलित रानटी अवस्थेत असलेल्या लोकांच्या मांत्रिक क्रियेत आढळणारे आश्चर्यजनक सादृश्य हे मनाच्या विचारपद्धतीच्या सादृश्यामुळे (identical Attitude of mind) आहे असा ग्रंथकाराने निष्कर्ष काढला आहे , व तो तर्कप्रधान आहे. धार्मिक युगापूर्वी पृथ्वीतलावर आधी मांत्रिकयुग सुरू झाले - या पाश्चात्य पंडितांच्या विचारातील फोलपणा ग्रंथकाराने ऋग्वेदाचा आधार घेऊन सिद्ध केला आहे. प्राचीन जगात विद्येला प्रथम सुरुवात न होता आधी धर्माला सुरुवात झाली; आधी धर्म वाढला व मग त्याच्या आधाराने जादुटोणा वाढला, मांत्रिक विद्या वाढली व कालांतराने आधारभूत असलेल्या धर्माला मांत्रिक विद्येने ग्रासून टाकले. म्हणून आधी पुरोहित निर्माण झाले व त्यांचे अधोगत रूप म्हणजे मांत्रिक होत. प्रार्थनेतून मंत्रांचा जन्म झाला. मंत्रातून प्रार्थना निर्माण होणे स्वाभाविक नाही, हे या प्रकरणात ग्रंथकाराने पटवून दिले.

आकाशातील निसर्गाच्या लीलांनी माणसाच्या संवेदनक्षम मनावर परिणाम झाला. तो निसर्गाशी एकरूप झाला नाही तर निसर्गाची कृपा पाहून त्याने ह्या गोष्टीकडे भक्तिभावाने पाहिले. निसर्गाची कृपा क्षणोक्षणी त्याला जाणीव देत होती की निसर्गशक्ती उपकारक आहे. निसर्गाबद्दल त्याच्या मनात भीतीयुक्त श्रद्धा निर्माण झाली व म्हणून तो निसर्गाची कृपा संपादन करण्याकरिता प्रार्थना गाऊ लागला. ऋग्वेदसंहिता हा आर्यांचा आदिवेद, आर्यांच्या मनात साठविलेल्या निसर्गभक्तीचा पुरावा आहे. निसर्गाची कृपा व्हावी म्हणून निसर्गाला अन्न, तूप देऊन संतुष्ट करण्याचा प्रघात सुरू झाला. माणसाला जे जे आवडते ते ते निसर्गालाही द्यावे म्हणून बलिदान सुरू झाले. ही

बलिदानाची प्रथा दिवसेंदिवस विधियुक्त होत गेली. भाविक भावनेची जागा विधी-यज्ञ-होम यांनी घेतली. बलिदानाचा विधी हा अधिक गुंतागुंतीचा झाला. विधियुक्ततेने मूळ प्रेरणेचा बळी घेतला व इच्छित फलप्राप्तीसाठी म्हणून मांत्रिक विद्या प्रधान बनू लागली. निसर्ग-प्रार्थनेचे सोज्ज्वळ, प्रांजळ स्वरूप लुप्त झाले. विधियुक्त रूढीप्रवणता शिरजोर बनली. मांत्रिकविधी दिवसेंदिवस सर्वसाधारण माणसांना न समजण्याइतका कठीण झाला. ही अधोगती वाढतच गेली. वैदिक भारतीयांच्या अधोगतीचा पहिला टप्पा तसा आपल्याला ऋग्वेदातच आढळतो. यजुर्वेद या अधोगतीची मधली अवस्था आहे आणि अथर्ववेद हा ब्राह्मण अधोगतीची परिसीमा. या विधियुक्त मांत्रिक विद्येत पुरोहितांचा व त्यांच्या कसबांचा (Priest-Craft) उदय व विकास आहे. स्वयंप्रेरित भक्तिभावनेची गळचेपी करून ही मांत्रिक विधियुक्तता दिवसेंदिवस वाढतच गेली.

हिंदी-युरोपीय आर्यांवर मांत्रिक विद्येचा परिणाम का होऊ शकला नाही याचे संयुक्तिक कारण ग्रंथकाराने दिले आहे. त्या अवस्थेतील आर्यांचा स्वभाव संशोधनात्मक व धाडसी होता. ते भटके होते. त्यांचे जीवन प्रवाही होते. प्रगतिप्रवण मनावर मांत्रिक विद्येची धूळ साचणे शक्य नव्हते. त्यांच्या नजरेसमोर क्षितिजरेषा नेहमी सरकत होती. दृष्टीची विशालता हा प्रगत जीवनाचा स्वाभाविक धर्म आहे. म्हणून सतत स्थलांतर, सतत निसर्ग-सान्निध्य यांतून निर्माण झालेली दृष्टिविशालता खुळ्या समजुतींना थारा देऊ शकत नाही. ऋग्वेद हा बहुतांशी आर्यांच्या भारत आगमनापूर्वी रचला गेला, म्हणून त्यातील संहितांचे स्वरूप पण विशाल व स्वयंप्रवाहित आहे. मांत्रिक विद्येसारखी खुळे निर्माण व्हायला सुस्थिर आयुष्यक्रमाची आवश्यकता असते. जीवनाची गती खुंटली की विचारांवर धूळ साचू लागते व मग यजुर्वेद, अथर्ववेद, ब्राह्मणे व आरण्यके निर्माण होतात. कदाचित भारतीय हवेचाच हा परिणाम असेल, पण ऋग्वेदाच्या शेवटच्या भागापासून तो ब्राह्मणांपर्यंत भारतीय वेदकालीन धार्मिक भावनेच्या व समाजरचनेच्या घसरगुंडीची कमान चढती आहे.

ग्रंथाच्या चौथ्या प्रकरणात आर्यांच्या मूळ वसतिस्थानाचा व त्यांच्या मूळ संस्कृतीचा विचार करून पाचव्या प्रकणात हिंदी-युरोपियन धर्म (The Indo-European Religion) या विषयाचा विस्तृत विचार करण्यात आला आहे.

आर्यांच्या त्या (भारताबाहेरील) मूळ अवस्थेत आर्यांच्या जीवनात सचैलता होती. त्यांच्या भावना स्वच्छंद, सात्त्विक होत्या. सतत वाहणाऱ्या शुभ्र पाण्याचे पाट, प्रकाश देणारा अग्नी, डोळ्यांना न दिसणारी पण कानांना व स्पर्शेन्द्रियांना भासमान होणारी हवा, जिच्या पोटातून सर्व काही उगवते व जे जे दडवले असेल ते ते सामावले जाते अशी पुष्टिवर्धक भूमी - ह्या सर्व गोष्टी आदिमानवांना पवित्र व आदरणीय वाटल्या. आदि आर्य अविश्रान्त खपत होता व त्याच्या श्रमाचा सारा भार निसर्गकृपेवर अवलंबून

होता. बालवत् साधे सरळ मन असलेल्या त्या मानवाने निसर्गावर श्रद्धांजली उधळली. ही पूजा, ही भक्ती साधी आहे, स्वतंत्र आहे. म्हणून ती अधिक शोभून दिसते. या भक्तीच्या पावित्र्याच्या तुलनेत चित्रातील देवासमोर व मूर्तीसमोर केलेला साष्टांग प्रणिपात किळसवाणा वाटतो. या मूळ आर्यांची ईश्वरविषयक कल्पना प्रकाशाशी एकरूप झाली आहे. आकाशातून प्रकाश येतो म्हणून आकाश त्यांना प्रकाशवान वाटले, आणि म्हणून त्यांचा ईश्वर वरुण; इंद्र, सूर्य, चंद्र, तारे हे झाले.

हिंदी-युरोपीयनांची ही निसर्गाला देव समजून त्याची प्रार्थना करण्याची प्रवृत्ती ग्रंथकाराने संस्कृत, लॅटिन, इराणी इ. भाषांतील शब्दसादृश्याद्वारे सिद्ध केली आहे. त्यावरून, मूळ आर्यांच्या धार्मिक कल्पनेचा पाया निसर्गाच्या सामर्थ्यावर आधारला होता, निसर्गालाच देव मानण्याची त्यांची प्रवृत्ती होती. त्यांनी निसर्गाला सजीव प्राण्याचे रूप देऊन त्याची पूजा केली नाही; निसर्गात त्यांना आत्मसाक्षात्कार झाला; देह आणि आत्मा यांतील भेद त्यांना दिसला. ज्या ज्या वस्तूने त्यांच्या अंत:करणाला प्रभावित केले, ज्या ज्या वस्तूंचा मनावर भीतियुक्त पण आदरणीय परिणाम झाला, ती ती वस्तू त्यांना कल्याणप्रद वा दु:खद वाटली; व तिची कृपा व्हावी म्हणून त्यांनी तिचा धावा सुरू केला.

ऋग्वेदात आपल्याला 'आगी'ची देवता दिसत नाही; अग्निदेवता दिसते. पावसाची देवता नाही, 'पर्जन्य' देवता दिसते. विजेची देवता नाही, वीजदेवता (इन्द्र) दिसते. हे निसर्गाला आत्मीभूत करणे आहे. निसर्गाला देवतास्वरूप समजून त्याची प्रार्थना करणे हा त्यांच्या श्रद्धेचा मूळ आधार आहे. निसर्गाला ते कल्याणप्रद समजत होते, त्यांना निसर्गाची भीतीही वाटत असे. पण त्यामुळे त्यांची भाविकता द्विगुणित होत होती.

ग्रंथाचा क्रम आता सरळमार्गाने धावू लागला आहे. सहाव्या प्रकरणात हिंदी-युरोपीय संप्रदाय व पुरोहित पेशा (Indo-European cult & Priesthood) या प्रश्नांचा साधकबाधक विचार करण्यात आला आहे.

सुरुवातीच्या अवस्थेत बलिदानाचा हेतू केवळ आशीर्वाद हाच होता. या अवस्थेत मंत्रविद्येचा धार्मिक भावनेशी संबंध नव्हता. कारण धर्मभावना व मंत्रविद्या ह्या मनाच्या दोन भिन्न प्रवृत्ती आहेत. ह्या दोन्हींचा विकास एकमेकापासून अलिप्त, स्वतंत्र प्रमाणात झाला असावा. तसेच पुरोहित व मांत्रिक पेशांची वाढ पण स्वतंत्रपणे एकमेकाशी काहीही संबंध नसताना झाली असावी. ऋग्वेदकाळात प्रार्थना व बलिदान ह्यांवर मांत्रिकतेचा काहीही परिणाम झालेला दिसत नाही. या काळात प्रार्थना व बलिदान यांचे स्वरूप पूर्णपणे सात्त्विक होते.

पण कालांतराने मांतरचालीने मांत्रिक विद्येने शक्ती प्राप्त केली आणि पूजेचा हेतू बदलला. यजुर्वेदापासून विधियुक्त मांत्रिकतेचा विकास झाला. भोळी निसर्गभक्ती

मागे पडली. अथर्ववेद व ब्राह्मणे यांचे युग सुरू झाले. बलिदानाचा तर हेतूच बदलला: ते ईश्वराच्या कृपाप्रसादाचे साधन न राहाता एका अर्थाने साध्य बनले. विधियुक्त बलिदान केल्यास पूजित्याच्या इच्छेप्रमाणे ईश्वराला इच्छित फळ देण्यास भाग पाडता येते हा समज बळावत गेला. त्याचा परिणाम मंत्रविद्येच्या परिणामावरचा विश्वास वाढविण्यात झाला. मंत्रविद्येच्या सामर्थ्यापुढे ईश्वर वाकलाच पाहिजे, हा विश्वास एकदा निर्माण झाल्यावर अथर्ववेदाच्या अवनतवृत्तिप्रधान संहिता तयार झाल्या.

पुरोहित पेशाला वरील कारणपरंपरेतून बळकटी आली. सुरुवातीला पुरोहिताला मंत्रविद्येचा गंध नसे. 'मंत्र' ह्या शब्दाचा वापर होत असला तरी त्याचा अर्थ निराळा होता. ब्राह्मण या शब्दाचा (नपुंसकलिंगात प्रयोग केल्यास) 'मंत्र' असा अर्थ होत असे. पुरोहित म्हणजेच वेदातील मंत्र 'अवरोहित करणारा' – म्हणजे 'छाती फुगवून गाणारा' असा अर्थ होत असे.

कालांतराने वेदमंत्राचा हा अवरोहित जप ठराविक लोकांचा अधिकारयुक्त धंदा बनला. बलिदानाची फलश्रुती ठराविक लोकांनीच जप केल्यास होऊ शकेल हा समज निर्माण झाला, किंवा करून देण्यात आला. ही पुरोहित कर्माच्या वंशावळीची सुरुवात आहे. जसा जसा काळ गेला, तसे तसे मांत्रिकविद्येचे व पुरोहितांचे महत्त्व वाढत गेले आणि पुरोहितकर्माला वंशपरंपरेचे स्वरूप आले. मांत्रिक विद्येला अग्रमान मिळाला व आमची धार्मिक व सामाजिक अवनती सुरू झाली. वैदिक धर्म म्हणजे मंत्रविद्या, पुरोहित व बलिदान.

सातव्या प्रकरणात हिंदी–इराणी देवतांचा (Indo-Iranian Gods) विचार करून आठव्या प्रकरणात ग्रंथकाराने वैदिक साहित्य व संस्कृती (Vedic Literature & Culture) या विषयाचा विचार केला.

भारताच्या इतिहासाच्या उंबरठ्यावर पाय ठेवताक्षणीच आपला विपुल साहित्याशी संबंध येतो. ह्या साहित्याला वैदिक साहित्य म्हणतात. ह्या साहित्याचा जन्मकाळ सात–आठशे वर्षांचा आहे आणि ह्या साहित्याचे स्वरूप पूर्णपणे धार्मिक आहे. हे सर्व साहित्य कालमानाप्रमाणे तीन कालखंडांत विभाजित होऊ शकते–

१) चार वेदांचा काळ

२) ब्राह्मणांचा काळ (यातच काही आरण्यके व उपनिषदेही येतात) व

३) सूत्रांचा काळ

या प्रकरणाच्या सुरुवातीच्या भागात ऋग्वेद, सामवेद, यजुर्वेद, अथर्ववेद यांचा व त्यानंतर ब्राह्मणे, आरण्यके, उपनिषदे व सूत्रे यांच्या स्वरूपाचा थोडक्यात वृत्तांत मिळतो. त्यानंतर या साहित्याच्या कालमानाची चर्चा करून ग्रंथकाराने वैदिक धर्माचे (१) वैदिक धर्म व (२) ब्राह्मण कर्मकाण्ड असे दोन भाग केले आहेत. ऋग्वेदातील

वैदिक धर्म हाच खरा वैदिकधर्म. सामवेद व यजुर्वेद यांची रचना स्थित्यंतराकडे प्रवृत्ती दाखवितात. ह्या स्थित्यंतराचा परिपाक म्हणजे ब्राह्मणे व आरण्यके : यांतील मांत्रिक जपजाप्य हे थोतांडयुक्त कर्मकाण्ड. ऋग्वेद हाच खरा वेद आहे असे मत ग्रंथकाराने येथे स्पष्टपणे व्यक्त केले आहे. त्यानंतर त्या वेदाचे विस्तृत वर्णन ह्या प्रकरणात दिले आहे. यानंतर ब्लुमफिल्डच्या मताचा आधार घेऊन अथर्ववेदाला ब्राह्मणे व आरण्यके या काळात ढकलण्यात आले आहे.

यानंतरची पाच प्रकरणे ग्रंथकाराने वैदिक देवांची अभ्यासपूर्ण माहिती देण्यात गुंतविली आहेत. वैदिक देवांचे तीन विभागांत वर्गीकरण करण्यात आले आहे - १) स्वर्गीय देव (The Celestial Gods) २) वातावरणातील देव (The Atmospheric Gods) व ३) भूतलावरील देव (The Terrestrial Gods).

स्वर्गीय देवांच्या यादीत त्यांनी वरुण, सूर्य-सविता, मित्र, विष्णू, उषा, अश्विनीकुमार यांचे विस्तृत वर्णन केले आहे, तर वातावरणातील देवांचा विचार करताना इंद्र, मारुत, वायू, रूद्र, पर्जन्य आदिंचा सविस्तर परिचय दिला आहे व नंतर भूतलावरील देवांत अग्नि, सोम, बृहस्पती, पृथ्वी आदिंचा सम्यक विचार केला आहे. त्याचबरोबर, ऋग्वेदातील तेहतीस देवांपासून तेहतीस कोटी देवांचा भव्य समुदाय जमायला कशी सुरुवात झाली हेही दाखविण्याचा प्रयत्न केला आहे.

अग्नी आणि सोमरस या भूतलावरील देवांनीच स्वर्गातील देवांना हिंदुधर्मात चिरंजीव बनविले हा विचार अकराव्या प्रकरणाच्या सुरुवातीच्या भागात सुंदर रीतीने वर्णिला आहे. तो विचारप्रेरक आहे. अग्नी व सोमरस यांनीच वैदिक धर्माचे विधियुक्त कर्मकाण्डात रूपान्तर केले हे ऐतिहासिक सत्य त्याचबरोबर त्यांनी यातच व्यक्त केले. ऋग्वेदाचा संकलन काळ हाच मुळी कर्मकांडाकडे पारडे झुकविण्याचा काळ आहे. ह्या काळापासून वेदाचे काव्यमय आणि उदार स्वरूप नष्ट झाले.

ह्या ग्रंथाच्या शेवटच्या विभागात शेवटच्याच प्रकरणात वैदिक सभ्यता व देव यांचे सर्वसाधारण समीक्षण करण्यात आले आहे. विधियुक्त कर्मकाण्डाची मार्मिक मीमांसा पण याच प्रकरणात करण्यात आली आहे. हा धर्म मुख्यत्वेकरून कर्मकाण्डयुक्त आहे व ऋग्वेदातील निसर्गधर्माहून पूर्णपणे भिन्न आहे हे परिणामकारक रीतीने दाखविण्यात आले आहे. ''ब्राह्मीनिझम म्हणजे ब्रह्माची पूजा; ज्यांची मुख्य देवता ब्रह्म, अशा लोकांचा धर्म - जो बुद्ध धर्मापासून भिन्न होता, तो धर्म-'' असा अर्थ ह्या शब्दाचा कुणी विद्वान करतात. तो अर्थ भ्रामक आहे हे प्रोफेसर जॉकोनी ह्यांच्या विधानाचा आश्रय घेऊन ग्रंथकाराने सिद्ध केले आहे. ब्रह्माची सार्वत्रिक पूजा वैदिक काळात होत नव्हती. त्याला मुख्य देवतेचा मान वेदकाळात मुळीच नव्हता. ब्राह्मीनिझमची खरी सुरुवात ऋग्वेदापासूनच झाली. यजुर्वेदकाळात त्याला निश्चित रूप आले; व जैन

आणि बुद्ध धर्माच्या उदयकालापर्यंत अकांड तत्त्व चालू होते. म्हणजे इ.स. पूर्वी ६०० वर्षांपर्यंतचा काळ हा वैदिक धर्माचा काळ नसून तो ब्राह्मीनिझमचा काळ आहे हे ग्रंथकाराने सुसंगतपणे पटवून दिले आहे.

ह्या ग्रंथाची मौलिकता ही त्यातील तर्कशुद्ध शास्त्रीय पद्धतीवर अवलंबून आहे, तशीच विचाराच्या सखोलतेवर पण ती आधारलेली आहे. ग्रंथाचे खरे महत्त्व ग्रंथाची पाने चाळल्याशिवाय कळणार नाही. तर सर्व विद्वानांनी हा ग्रंथ जरूर वाचावा ही विनंती. ग्रंथाचा परिचय एखाद्या प्रथितयश समीक्षकाकरवी झाला असता तर ग्रंथाचे स्वाभाविक तेज अधिक प्रकट झाले असते. पण –

*क्षीर सिंधुचिया तटा । पाणिया येती गजघटा ।*
*तेथे काय मरकुटा । वारिजितसे ।।*



(सौजन्य : श्री काकासाहेब उ. दौलतराव गोळे, प्रकाशक, जन्मशताब्दी प्रकाशन समिती, डिसेंबर १९९६)

# ज्ञानयोगी भाऊसाहेब

- प्रा. राम शेवाळकर

---

अन्य क्षेत्रांत प्रचंड कीर्ती मिळवलेल्या महापुरुषाच्या आयुष्यातील एखादा महत्त्वाचा पैलू झगमगाटामध्ये लोपून जातो. डॉ. पंजाबराव देशमुख हे राजकीय, शैक्षणिक व कृषी विषयक सुधारणेच्या क्षेत्रात उदंड पुरुषार्थ गाजवून गेले. त्यामुळे त्यांचे नाव काढले की, त्यांची हीच प्रसिद्ध कार्ये चट्कन डोळ्यासमोर येतात. त्यामुळे स्वत: सिद्ध मोलाचे स्वयंप्रकाशित कार्य विसरले जाते. शिक्षणाच्या व कृषीच्या क्षेत्रात भाऊसाहेबांना त्रिखंड ख्याती मिळाली होती. त्यापुढे जीवनाच्या प्रभात काळातच त्यांनी संपादन केलेली संशोधनपूत ज्ञानमत्ता अन्य राजकीय महत्त्वाच्या व्यापामुळे पुरेसा पाठपुरावा केला न गेल्याकारणाने जगाच्या डोळ्यासमोर आली नाही.

भाऊसाहेबांनी पदव्युत्तर शिक्षणासाठी १९२१ मध्ये एडिंबरो विद्यापीठात प्रवेश घेतला. तत्त्वज्ञान व इतिहास या विषयांबरोबरच संस्कृत हा त्यांचा प्रधान विषय होता. संस्कृत वाङ्मयाचा इतिहास लिहिणारे प्रोफेसर ए. बी. कीथ हे त्यांचे संस्कृतचे प्राध्यापक होते. भाऊसाहेबांची अभ्यासातील गती पाहून प्रा. कीथ यांनी 'व्हॅन्स डनलॉप' संस्कृत संशोधन शिष्यवृत्तीसाठी त्यांना प्रेरणा दिली. ही शिष्यवृत्ती त्यावेळी १०० पौंडांची होती. तिची परीक्षा अत्यंत कडक होती. जिद्द, चिकाटी, बुद्धिमत्ता, परिश्रमशीलता आणि आत्मविश्वास यांच्या बळावर भाऊसाहेब परीक्षेमध्ये सर्वोच्च गुणांनी उत्तीर्ण झाले आणि त्यांनी ऑक्स्फर्ड विद्यापीठातून आपल्या संशोधनाचा प्रकल्प हाती घेतला. प्रो. मॅक्डॉनल हे त्यांचे मार्गदर्शक होते. भाऊसाहेबांचे संस्कृतचे गुरु प्रा. कीथ हे मॅक्डॉनल साहेबांना गुरुस्थानी मानीत. 'वैदिक मायथॉलॉजी' हा त्यांचा ग्रंथ गाजलेला होता. त्यांच्या प्रगल्भ मार्गदर्शनाखाली त्यांनी संशोधनाकरिता 'धर्म आणि वेदवाङ्मय' हा विषय निवडला होता. धर्म कल्पनेचा उद्‌गम व विकास वैदिक वाङ्मयाच्या आधारे त्यांना शोधून काढायचा होता. धर्म कल्पना ही सर्व मानवीय जातीला मानसिक आधारासाठी अत्यावश्यक ठरलेली आहे. या कल्पनेचे

मानवी मनात बीजारोपण कधी झाले, ती अंकुरित कशी झाली, तिच्या विकास प्रक्रियेचा आलेख वेदवाङ्मयात सापडतो का – याचा शोध घेण्याचा त्यांनी प्रयत्न केला. त्यासाठी वेदवाङ्मयच निवडण्याचे कारण ते मानवी जातीचे आद्य साहित्य आहे. मानवाचा पहिला छंदोबद्ध उद्‌गार वेदरूपाने प्रगट झाला. त्यामुळेच इतिहास-मीमांसकांनी वेदवाङ्मयाला 'मानव जातीच्या बाल्यावस्थेतील गाणी' म्हणून संबोधले आहे.

धर्म कल्पनेची निकड माणसाला केव्हा जाणवली असेल ? का जाणवली असेल ? एकट्या माणसाला धर्माची आवश्यकता असेल काय ? माणूस दुसऱ्याबरोबर समूहात जगू लागला, त्यातून धर्मनिर्मिती झाली असेल काय ? धर्म कल्पना आत्मोद्धारासाठी असते, की परस्पर व्यवहारासाठी आवश्यक असणारे नीतिनियम ठरविण्यासाठी असते ? पुढे अभ्युदय व निःश्रेयस अशी धर्माची दोन उद्दिष्टे निश्चित झाली. पुरुषार्थांच्या द्वारे ऐहिक उन्नती साधून घ्यावी, व मोक्ष सिद्धीकरिता आत्मसाधना करावी. आत्मसाधनेसाठी ईश्वर कल्पना मानली तर चालते. ईश्वर प्राप्तीसाठी धर्म कल्पना मानावी लागते. मुक्ती व ऐहिक उत्कर्ष म्हणजे लौकिक व पारलौकिक कल्याण धर्माद्वारे साधले जाते. माणसाने पहिल्यांदा सृष्टिचक्र नियमितपणे चालविणाऱ्या निसर्गशक्तींची प्रचीती घेतली. त्या विराट शक्तींपुढे आपली हतबलता व नगण्यता अनुभवली. त्यामुळे त्यांच्यासमोर तो भयचकित होऊन नतमस्तक झाला. त्या शक्तींवरच त्याने देवत्वाचा आरोप केला व त्यांची पूजा आरंभिली. आपण ज्यांना पंचमहाभूते या नावाने संबोधतो, त्या शक्तींसमोर शरण्यता पत्करण्यामुळे आपले भय कमी होते, व मनाला दिलासा मिळतो. जीवनसंघर्षामध्ये अशी मनःशांती जीवाला आवश्यक असते. त्यातूनच धर्मसंकल्पनेचे स्फुरण झाले असेल काय ? वेदवाङ्मयात त्याचा कोणता सुगावा लागतो ? धर्म आणि वेदनिर्मिती यांचे पौर्वापर्य कसे ठरवायचे ? भाऊसाहेबांनी धर्मकल्पना वेदोत्तर मानली आहे. म्हणजे वाङ्मय अगोदर व धर्म नंतर. कोणत्याही विराट निमित्ताने स्वतःला अभिव्यक्त करण्याची ओढ माणसामध्ये पहिल्यांदा निर्माण झाली आणि त्यानंतर जीवनाच्या आधिभौतिक व आध्यात्मिक स्वास्थ्याची निकड जाणवली. त्यातून धर्मकल्पनेचा उदय झाला.

वेदवाङ्मयामध्ये ऋग्वेद हा ग्रंथ सर्वात महत्त्वाचा. त्या ऋग्वेदात प्रसिद्ध नासदीयसूक्त आहे. त्या सूक्तात सृष्ट्युत्पत्तिपूर्वीच्या अवस्थेचे वर्णन केले आहे. तर पुरुषसूक्तामध्ये समाजरचनेची प्रक्रिया दिलेली आहे. पण या सूक्तांचे मूळ असलेले ऋग्वेदाचे दहावे मंडल उत्तरकालीन असल्याचे अभ्यासकांचे मत आहे. त्यातील ऋचांची आणि सूक्तांची व्यवस्था लावून त्यांचे संहितीकरण व्यासांनी केले असल्याचा इतिहासाचा निर्वाळा आहे. (वेदान्विव्यास स व्यासः।) भाऊसाहेबांनी वेदव्यासांचा काळ कोणता गृहित

धरला असेल ?

ऋग्वेदाच्या मागून इतर वेदांची निर्मिती झाली. त्या तिन्ही वेदांत वेगवेगळ्या उद्देशाने केलेले ऋग्वेदावलंबनच आढळून येते. परंपरेने वेद हे अनादि मानलेले आहेत. आदिपुरुषाच्या निःश्वासातून ते बाहेर पडले (यस्य निःश्वसितं वेदाः ।) अशी लोकश्रद्धा आहे. ज्याप्रमाणे निसर्गाचे चलन-वलन अज्ञात नियमानुसारच चालू होते; कोणत्याही संशोधकाने ते नियम निर्माण केले नसून ते फक्त शोधून काढले आहेत, त्याप्रमाणे वेद हे अस्तित्वात होतेच, कदाचित लोकगीतांप्रमाणे मुखपरंपरेने ते प्रचारात असतील. ज्याप्रमाणे लोकसाहित्याचे निर्माते व त्यांचा स्थलकाल सांगता येत नाही, त्याप्रमाणे वेदांचेही असावे. ज्याला जे सूक्त सापडले त्याचा तो प्रवक्ता ठरला असावा. यानुसार वेदांची निर्मिती झाली असावी. त्यामुळे वेद ही मानवसमाजाची बाल्यावस्थेतील शिशुगीते असल्याचे मत पारंपरिकांना मान्य नाही. वेदांची सृष्टी, जीव आणि मानवाची सामाजिक प्रकृती याबद्दलची प्रगल्भ उमज पाहाता त्यांना एखाद्या कामचलाऊ विशेषणाने निकालात काढता यायचे नाही, हे भाऊसाहेबांनी ओळखल्यामुळेच मानवासाठी अत्यावश्यक असणाऱ्या अध्यात्माचे व सामाजिक नीतीचे मूलस्त्रोत शोधण्यासाठी त्यांनी ऋग्वेदाचा आश्रय घेतला.

वेदवाङ्मयातील धर्म कल्पनेचा उगम व विकास शोधण्याकरिता लिहिलेल्या प्रबंधात भाऊसाहेबांनी आपल्या विवेचनाचे चार भाग पाडले आहेत. पहिल्या भागामध्ये धर्माचे मूळ शोधण्याचा प्रयत्न असून धर्माच्या प्रचलित असलेल्या व्याख्या दिलेल्या आहेत. त्यावरून भाऊसाहेबांच्या चतुरस्त्र व अफाट व्यासंगाचा प्रत्यय येतो. दुसऱ्या भागात हिंद-युरोपीय व हिंद-इराणीय धर्माचा मागोवा घेतलेला आहे. या भागाची पाच प्रकरणे असून त्यात यातुविद्या व हिंद-युरोपीय धर्म, हिंद-युरोपीयांचे मूलस्थान व संस्कृती, हिंद-युरोपीय धर्म, हिंद युरोपीय प्रवृत्ती व पुरोहित वर्ग व हिंद इराणीय अशी पाच प्रकरणे आहेत. तिसऱ्या भागात वैदिक धर्माची मीमांसा असून त्यात वैदिक वाङ्मय व वैदिक संस्कृती, वैदिक देवता, स्वर्गीय, आकाशस्थ व इतर देवता, तत्त्वज्ञान अशी सहा प्रकरणे आहेत. चवथ्या ब्राह्मणीकरण या भागात संस्कृती व सर्वसामान्य देवतांचे विवेचन आहे. असा एकूण १४ प्रकरणांसहित चार भागांत भाऊसाहेबांनी आपला धर्मशोध मांडला आहे. पहिल्या प्रकरणात निरनिराळ्या पंडितांनी केलेल्या धर्माच्या व्याख्या त्यांनी संकलित केल्या आहेत. दुसऱ्या प्रकरणात धर्माच्या गंगोत्रीचा शोध घेतला आहे. धर्माची व्युत्पत्ती भयापासून झाली असेल काय ? मानवी आकलनाच्या आवाक्यापलिकडच्या निसर्गशक्तींच्या भयापासून आपले संरक्षण हवे, या हेतूने धर्मस्थापना झाली असेल काय ? 'पहिल्यांदा यातुविद्या अस्तित्वात होती. अनिष्ट देवतेच्या आराधनेतून मानवाचे कल्याण किंवा अकल्याण करणाऱ्या काही

अतींद्रिय व अगोचर शक्ती संपादन करण्यासाठी यातुविद्या आरंभी उपयोगी पडली असावी. त्यानंतर त्यातून धर्मकल्पना उत्क्रांत झाली असेल'- या पाश्चात्य पंडितांच्या उपपत्तीला भाऊसाहेबांचा विरोध होता. मानवाचा आद्यग्रंथ ठरलेल्या ऋग्वेदामध्ये निसर्गदेवतांची स्तोत्रे आळविली आहेत. यातुविद्येचे विवेचन हे त्यानंतर निर्माण झालेल्या अथर्ववेदात आलेले आहे. ही विद्या सफल होण्यासाठी मंत्रशक्तीचा उपयोग करण्यात आला. मंत्रातील अर्थशून्य वाटणाऱ्या मूल वर्णांमध्ये स्वयंसिद्ध शक्ती असते. ती नियमबद्ध उच्चारातून प्रगट होते. ही शक्ती कधी कधी निसर्गनियमांनासुद्धा आव्हान देते. वेदांच्या मते सर्व सृष्टिचक्र एका अज्ञात शक्तीच्या नियमानुसार चालते. हे नियम 'ऋत' या संज्ञेने ओळखले जातात. सूर्यचंद्र, दिवस-रात्र, ऊन-पाऊस व शीतोष्ण वायुमान यांचे गतिचक्र नियमबद्ध आहे. त्यात विशेष बदल होत नाही. त्यामुळे हजारो वर्षांपासून निसर्ग व्यवहाराची प्रक्रिया सुरळीतपणे सुरू आहे. या ऋताचे बंधन देवादिकांनाही चुकविता आले नाही. देव हे ऋतप व नियमाधीन आहेत. ऋतप म्हणजे या नियमांचे निमूटपणे पालन करणारे व ऋताधीन म्हणजे नियमाधीन. या ऋताचे पाश वरुणाजवळ असतात, म्हणून वरूण ही सृष्टीची नियामक देवता आहे. यातुविद्या मंत्रसामर्थ्यांचे बळावर सृष्टिनियमांचा शिस्तभंग करते, म्हणून ती अनृत विद्या आहे. ती पुष्कळदा विद्याधरावरच उलटते. धर्म-संरक्षणासाठी ऋताची आवश्यकता असते. मंत्रयुगानंतर धर्मयुग आले, असे मानणे म्हणजे धर्मपूर्व काळात अधर्माचे वर्चस्व असल्याचे मान्य करण्यासारखे आहे. अराजक बळावले, तर त्यातून आपोआप सुव्यवस्था निर्माण होते; तसे असत्य व अधर्म शिरजोर झाल्यावर आपोआप धर्मस्थापना होते, ही उपपत्ती बुद्धिग्राह्य नाही.

भाऊसाहेबांनी त्रिस्तरीय देवतामंडळ मानलेले आहे. पैकी पहिल्या, स्वर्गीय देवतांमध्ये सविता, उषा, मित्रा-वरुणादि देवतांचा समावेश आहे. दुसऱ्या, आकाशस्थ देवतांमध्ये इंद्र, मरूत व रुद्रादि देवतांचा अंतर्भाव आहे. तर अग्नि, सोम, ब्रह्मणस्पति या भूतलावरील देवता आहेत, पैकी निसर्गदेवतार्चन ही मानवाची स्वाभाविक प्रवृत्ती आहे. कारण या मूलभूत देवता आहेत. त्यांच्याशी नम्रभावाने शरण्यता हीच त्यांची पूजा आहे. माणसाच्या गरजांचे दैवतीकरण झाले, तेव्हा त्यांच्या पूजनाकरता बाह्य साधनांची आवश्यकता उत्पन्न झाली. त्यातून निरनिराळी पूजाद्रव्ये, हवनद्रव्ये व आहुतींचे कर्मकांड वाढीला लागले. त्यातून पुढे कर्मकांडाचेच अवडंबर माजून साधनांना साध्याचे रूप आले; व धर्मक्रिया यांत्रिक व निर्जीव होत गेल्या. धर्मपालनाच्या नावाखाली कर्मपालन अग्रक्रमाचे ठरवून त्याच्या शास्त्रशुद्ध सिद्धीसाठी पुरोहितवर्ग निर्माण झाला व धर्मनियमांचा अर्थ लावण्याचे अधिकार त्याने आपल्याकडे घेतले. त्यामुळे धर्मातील चैतन्य ऱ्हास पावले व कर्मकांडाच्या काथ्याकुटानेच धर्माचे सत्त्वहरण झाले. पूजनीय व पूजक यांच्यामधील

मध्यस्थाने आपले स्थान बद्धमूल करण्यासाठी आपल्या वर्गाचे हितसंबंध जोपासण्यावर भर दिला. परिणामी अर्थशून्य विधींचा व क्रियांचा बडिवार माजून धर्मक्षेत्र निःसत्त्व होत गेले.

त्यामधूनच विविध देवतार्चन फोफावत गेले. परिणामी विश्वाच्या अणुरेणूमध्ये व सर्व स्थावर जंगमाच्या अंतर्यामी वसलेल्या एकमेवाद्वितीय अशा ईश्वरीतत्त्वावर भ्रांतीचे आवरण चढले. ऋग्वेदामध्ये वेगवेगळ्या नावांनी ओळखले जाणारे मूलतत्त्व एकच असल्याचे प्रतिपादन केले आहे. (एकं सत् विप्रा बहुधा वदन्ति। अग्निं यमं मातरिश्वानमाहुः ।) याचा अर्थ देवता अनेक नसून अनेक नावांनी तीच देवता ओळखली जाते, असा आहे. पण तो लक्षात घेतला न गेल्यामुळे या अनेक देवतांची उपासना करणारे अनेक पंथही उदयाला येऊन त्यांच्या मतभिन्नतेच्या गदारोळाने सर्व श्रद्धाक्षेत्र गजबजून गेले. हळुहळू समाज घटनेच्या उद्देशाने कर्म विभागणीचे तत्त्व आकाराला येऊन समाजामध्ये वर्गव्यवस्था निर्माण झाली. बळकटी आणण्याकरिता तिला धर्माचे प्रामाण्य मिळवून देण्यात आले. परिणामी श्रेष्ठ – कनिष्ठ भाव उदयाला येऊन विषमतेचे बीजारोपण झाले. वर्गव्यवस्था ईश्वरनिर्मित असल्याचे प्रतिपादन झाल्याने वर्गव्यवस्था जन्मजात ठरली. धर्मनियमांच्या धाकाखाली समाजामध्ये विषमताच स्वाभाविक मानली जाऊ लागली. परिणामी नैसर्गिक ते अप्रतिष्ठ ठरवून कृत्रिमालाच सत्याची प्रतिष्ठा प्राप्त झाली. अस्वाभाविकांची शिरजोरी वाढल्याने अन्यायाचा प्रतिकार करण्याच्या शक्यताच बोथट होऊन गेल्या व समाजातील काही वर्गच प्रतिष्ठेच्या वरवंट्याखाली धर्मवंचित होऊन गेले. वैश्य-शूद्र व स्त्रियांना कर्मकांडप्रधान धर्मशास्त्राने वाळीत टाकले. "यथेमां वाचं कल्याणीमावदन्ति जनेभ्यः । ब्रह्मराजन्याभ्यां शूद्राय चार्याय च स्वाय चारणायच।" ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र, स्त्रिया आणि पतित अनार्यांसाठीही कल्याणप्रद असलेला हा वेदघोष दुर्लक्षिला गेला. वस्तुतः आर्य किंवा शूद्र या सर्वांच्याच कल्याणाची कामना "प्रिय सर्वस्य पश्यत् शूद्र उतार्ये।" – वैदिक ऋषींनी मनात बाळगली होती. श्रौत सूत्रे, गृह्यसूत्रे व सर्व धर्मसूत्रे, स्मृतिग्रंथ, निरुक्त, यजुर्वेदावरचे महीधरभाष्य, शतपथ ब्राह्मण, महाभारतावरची नीलकंठी टीका या सर्वांनी शूद्रांनाच नव्हे, तर निषादादि अतिशूद्रांना सुद्धा उपनयन, यज्ञ व वेदाध्ययनाचे अधिकार असल्याचे निःसंदिग्धपणे मान्य केले आहे. 'श्रावयेच्चतुरो वर्णान्।' चारही वर्णांना वेदोपदेश करण्याचा हा आदेश व्यासांनी आपल्या शिष्यांना दिला होता. जानश्रुति व जाबाली यांना वेदविद्या मिळाल्याचा उल्लेख उपनिषदात आहे. पैकी जानश्रुति हा शूद्र होता, तर जाबालीचे गोत्र संशयास्पद होते. परमेश्वराचे निःश्वास असणाऱ्या वेदातील काही सूक्ते गाणारे कवषऐलुष, कक्षिवान हे ऋषी शूद्र होते. कौशिक ऋषींनी धर्मव्याध नावाच्या चांडाळाकडून ज्ञान ग्रहण केल्याचा महाभारताच्या वनपर्वात उल्लेख आहे.

वेदांची व्यवस्था लावणारे व्यास कैवर्त असून पराशर श्वपाक होते. पण हे त्यांचे जन्मशूद्रत्व कधी धर्माधिकाराच्या वा धर्मोपदेशाच्या आड आले नाही, याचे कारण जन्मत: सर्व शूद्रच असतात; संस्काराने त्यांना द्विजत्व प्राप्त होते. (जन्मना जायते शूद्र: संस्कारात् द्विज उच्यत्ते।) कोणत्याही वर्णातला मनुष्य तपश्चर्येच्या संस्काराने ब्राह्मण बनू शकतो (तपसा ब्राह्मणो जात: संस्कारस्तेन कारणम्!) असा महाभारताचा निर्वाळा आहे. वर्णव्यवस्था जन्मजात मानली गेली असली, तरी धर्माचरणाच्या पुण्याईने कनिष्ठ वर्ण सुद्धा उच्चवर्णाप्रत जाऊ शकतो. (शूद्रो ब्राह्मणातामेति ब्राह्मणश्चैति शूद्रताम्।) व अधर्माचरणाने उच्चवर्णाची कनिष्ठ वर्णाप्रत अवनती होते, अशी मनुस्मृतीचीही ग्वाही आहे. जन्म नव्हे, तर आचरण हाच त्याच्या शुचित्वाचा निकष असल्याचे धर्मसूत्रांनीही सांगितले आहे. शुद्ध वर्तनाने चांडाळसुद्धा ब्राह्मणच ठरतो, अशी महाभारतातील भीष्मनीती साक्ष देते. "सत्यमहं गंभीर: काव्येन सत्यं जातेनास्मि जातवेदा। न मे दासो न मे आर्यो महित्वा व्रतं मीयाय यदहं धरीष्ये" (मी सत्य, गंभीर व ज्ञानप्रकाश देणारा आहे. मी आर्य अथवा अनार्य कोणाचाच पक्षपाती नाही. सत्य व्रत पाळील त्याचाच मी उद्धार करीन!) असे अथर्ववेदाचे आश्वासन असून, "रूचं विश्येषु शूद्रेषु मयि धेहि रूचा रूचम्।" या वचनाद्वारे वैश्य, शूद्रांबद्दलही आस्था बाळगण्याचे यजुर्वेदाचे आवाहन आहे.

ब्राह्मणवर्गाने हजारो वर्षांपासून वेदग्रंथांचे पाठपरंपरेनुसार अविकृतपणे जतन करून ठेवले, हे खरे आहे. पण कर्मकांडोपजीवी पुरोहित वर्गाने शुष्क पोपटपंचीवर व कवायतींवर भर देऊन सर्व ब्रह्मांडाला कवेत घेणारा वेदांचा दिव्य संदेश ओळखण्यात व त्याचा प्रसार करण्यात कुचराई केली, हेही खरे आहे. म्हणून भाऊसाहेबांच्या धर्मकल्पनेत वैदिक धर्मालाच अग्रस्थान आहे. कर्मकांडाच्या प्राधान्यामुळे नि:सत्त्व व निष्करुण झालेल्या अनुदार व्यवस्थेला त्यांनी आपले लेखन, वाणी व कृतीद्वारे विरोधच केला होता. ज्ञानाचा मागोवा त्यांनी मध्यस्थांमार्फत न घेता थेट प्राचीनतम ग्रंथांशी सलगी साधून घेतला व ऐन तारुण्यामध्ये आपली उज्ज्वल ज्ञानतपस्या सिद्ध केली. दुर्दैवाने त्यांना आपला प्रबंध पूर्ण करता आला नाही. तो अपूर्ण अवस्थेतच सादर करण्यात आला. पण त्यात प्रगट झालेल्या ज्ञानगर्भ चिंतनाला १९२६ मध्ये ऑक्स्फर्ड विद्यापीठाची मान्यता मिळाली. वैदिक पुराणकथांचे मीमांसक डॉ. मॅक्डॉनल यांचे मार्गदर्शनाखाली सिद्ध झालेल्या या प्रबंधाला त्यांचे गुरु व संस्कृत साहित्याचे इतिहासकार प्रो. कीथ यांचे आशीर्वाद लाभले; व खुद्द इंग्लंडच्या सम्राटांच्या विशेष उपस्थितीत झालेल्या पदवीदान समारंभात त्यांना या प्रबंधावर 'आचार्य' ही पदवी गौरवपूर्वक प्रदान करण्यात आली.

आयुष्याच्या ऐन उमेदीत आरंभलेला हा ज्ञानयोग स्वदेशी परत आल्यानंतर

भाऊसाहेबांनी अधिक व्यापक स्वरूपात कृतीमध्ये पर्यवसित करण्याचे ठरविले. त्यातून श्री शिवाजी शिक्षण संस्थेचा विकास होऊन भाऊसाहेबांचा आत्मसंस्थ ज्ञानयोग ग्रामीण भागातील घराघरामध्ये प्रकाशमान झाला, हे सर्वज्ञातच आहे.

धर्मकल्पनेच्या उद्‌भव व विकासाचा शोध घेण्यासाठी भाऊसाहेबांना चारही वेद, उपनिषदे, आरण्यके, ब्राह्मणग्रंथ, सूत्रग्रंथ, स्मृतिशास्त्रे यांचा मुळापासून अभ्यास करावा लागला. ऑक्स्‌फर्ड विद्यापीठातील ग्रंथालयाचा त्यांनी महत्तम उपयोग करून घेतला. त्यांच्या प्रबंधात आलेल्या विविध व विपुल संदर्भांचा व्याप पाहाता त्यांच्या जिज्ञासेचा व ज्ञानसाधनेचा पल्ला लक्ष्यात येतो. त्यांच्या राजकीय, शैक्षणिक व कृषिविषयक अवतारकार्याचा पाया किती सुदृढ होता, ते कळण्यासाठी त्यांचा ज्ञानयोग अभ्यासणे आवश्यक आहे.



# भाऊसाहेबांचा डॉक्टरेटचा प्रबंध -
## 'द ओरिजिन अ‍ॅण्ड डेव्हलपमेन्ट ऑफ रिलिजन इन वेदिक लिटरेचर'

- कॉ. शरद पाटील

---

लोकमहर्षी डॉ. भाऊसाहेब उपाख्य पंजाबराव देशमुख यांनी डॉक्टरेटसाठी ऑक्सफर्ड विद्यापीठाला जो प्रबंध सादर केला होता त्याचे परीक्षण कोणी केले असल्याचे माझ्या माहितीत नाही. भाऊसाहेबांच्या जन्मशताब्दी निमित्ताने अमरावती विद्यापीठाने प्रस्तुत प्रबंधाची फोटोकॉपी अभ्यासकांसाठी नुकतीच प्रकाशित केली आहे. अमरावतीच्याच डॉ. सुभाष सावरकर यांच्या विनंतीवरून मी भाऊसाहेबांच्या या प्रबंधावरील माझ्या प्रतिक्रिया प्रस्तुत लेखाद्वारे नोंदवीत आहे.

**व्यक्तिमत्व**

प्रबंधाचे प्रसिद्धी वर्ष १९३३ असले तरी त्याचे सादरीकरण १९२६ साली झाले. त्यांचे मार्गदर्शक प्रा. ए. ए. मॅक्डोनेल असले तरी, तोपर्यंत ते वारल्यामुळे 'पूर्वशब्द' त्यांचे एडिन्बर्ग विद्यापीठातील गुरू प्रा. ए. बी. कीथ यांनी लिहिला. मॅक्डोनेल व कीथ दोघेही जगद्विख्यात प्राच्यविद्या पंडित. या प्रबंधाबद्दल ऑक्सफर्ड सारख्या विद्यापीठाने पंजाबरावांना डॉक्टरेट दिली त्यावरून त्याची गुणवत्ता दिसते. त्या काळात प्राच्यविद्येत गुणवत्ता दाखविणाऱ्या दोनच ब्राह्मणेतरांची नावे डोळ्यासमोर येतात. एक, 'हिंदू पॉलिटी' (१९२४) चे लेखक काशीप्रसाद जयस्वाल व दुसरे द्विखंडी 'हिस्टरी ऑफ केरळ' (१९२४ - १९२८) चे लेखक के. पी. पद्मनाभ मेनन. कलाल-जातीय जयस्वालांचे वडील श्रीमंत असल्याने त्यांनी पदरी ठेवलेल्या 'हंडीबाबा' कडून जयस्वाल संस्कृत शिकले; तर नायरजातीय मेननांचे वडील नंबुद्री ब्राह्मण असल्यामुळे त्यांच्यापासून मेनन संस्कृत शिकले. हा प्रबंध लिहिण्यासाठी शाळा-कॉलेजातील संस्कृत पुरेसे नसते; आणि पंजाबराव बॅरिस्टर व आय्. सी. एस्. होण्यासाठी विलायतेला गेले होते. प्राच्यविद्येचा ब्राह्मणी बालेकिल्ला सर करण्यासाठी पूर्वतयारी त्यांनी तेथेच केली असावी. भाऊसाहेबांचे चरित्रकार वीर उत्तमराव मोहिते यांनी या महत्त्वाच्या प्रश्नावर प्रकाश टाकलेला नाही. गुरुवर्य मॅक्डोनेल गोरे असल्यामुळे ब्राह्मणांसाठी

ब्राह्मण, तर पंजाबरावांसाठी अब्राह्मण होते! जर्मन भाषेवरही त्यांनी प्रभुत्व मिळवले आणि ग्रीकशी परिचय. त्यावेळी ते तिशीच्या उत्तरार्धात होते. खरी विद्वत्ता माणसाला जातपातद्वेषावर उठवते. ४००० वर्षांची वेदवाङ्मयाची मौखिक परंपरा कानामात्रा उच्चारांचा काडीमात्र फरक होऊ न देता अबाधित ठेवण्यासाठी ब्राह्मणांनी काय काय अचाट वैज्ञानिक उपाय केले याचे पंजाबराव वर्णन करतात-

'सर्वात अगोदरचा उपाय होता पदपाठ वा 'शब्द-कित्ता' तयार करायचा. त्यात 'संहिता-कित्त्यातील सर्व शब्द वेगळे केलेले आहेत; संधिनियमांपासून मुक्त, मूळ रूपात व बहुतेक संधी सोडवून. त्याच्या पाठोपाठ आला क्रमपाठी वा 'सोपान-कित्ता' (शब्दशः अनुक्रम - कित्ता)- त्यात पदपाठाचा प्रत्येक शब्द दोनदा येतो, पूर्वशब्दाला जोडलेला व पश्चात्शब्दाला जोडलेला. जटापाठात वा विणलेल्या पाठात मग क्रमपाठासारखीच प्रक्रिया केलेली आहे. जटापाठावर अशीच प्रक्रिया करणाऱ्या अत्यंत गुंतागुंतीच्या घन-पाठात कित्त्यांचे शब्द वेगवेगळ्या संयोगीकरणांमध्ये देऊन त्यांना जतन करायच्या प्रक्रियेची परमावधी गाठली आहे. पण एवढ्यावरही ही खबरदारी संपत नाही. मग प्रतिशाख्ये येतात, जी अवलंबिलेल्या श्रुतिमाधुर्याचे व उपपादनाचे नियमही देऊन संहितेत पद-पाठाचे उपयोजन करायचे सर्व नियम दिग्दर्शित करतात. शेवटी अनुक्रमणी (वा 'सूची') नावाच्या विविध कृतींमध्ये सूक्ताने आवाहन केलेले दैवत, रचणारा/री ऋषी व ऋग्वेदीय सूक्तांचे छंदही संहिताक्रमात देऊन सबंध ऋग्वेदाची सूक्ते, ऋचा, शब्द, इतकेच काय, वर्ण यांच्या संख्येची मोजदाद करतात... *(१)

त्यांनी आपला हा जातिद्वेषातीततेचा बाणा भारतात परतल्यानंतर सत्ताधिष्ठिततेतही कायम ठेवला. १९३० मध्ये मध्यप्रांत-वऱ्हाडचे शिक्षणमंत्री झाल्यानंतर प्रा. कुसुमावती देशपांडेंना पुरुषाऐवजी प्राध्यापक नेमले, डॉ. एम्. एस्. मोडकांना शिक्षणाधिकारी व डॉ. लक्ष्मणराव कोकर्डेकरांना व्यायाम शिक्षकाची खास जागा निर्मून नियुक्त केले. पण, ब्राह्मणांनी आपला शूद्रद्वेष सोडला नाही. म्हणून उच्चजातीयांच्या जातीयवादाचे पितळ उघडे पाडण्यासाठी नागपूर विद्यापीठाच्या कुलगुरुपदासाठी ते उभे राहिले. त्यांनी प्रचारही केला नाही. ते पडले आणि पा. मु. देवांसारखा सामान्य उमेदवार निवडून आला. *(२)

प्रबंधावर पंजाबरावांचे काम बाकी असल्याचे कीथ सांगतात. त्यांनी ते पूर्ण केले असते तरी त्यावेळी 'इंडॉलॉजी' बाल्यावस्थेत असल्यामुळे अनेक वर्षे खर्चूनही ते फार काही साध्य करू शकले नसते आणि माझा आजचा अनुभव पाहाता त्यांना उच्चजातीयांनी तेही साध्य करू दिले नसते. जातिव्यवस्थेचे बळी असलेल्या शूद्रातिशूद्र व स्त्रियांसाठी ठोस काही करता यावे म्हणून राजकारणात पडणे त्यांनी श्रेयस्कर मानले. मंत्रीपदावरून त्यांनी शेतकऱ्यांसाठी व शेतीसाठी जे केले आणि वऱ्हाडात

शिक्षणसंस्थांचे जे जाळे विणले ते चरित्रकाराने तपशीलवार दिले आहे. त्यांनी आपली बॅरिस्टरी याच कामासाठी लावली. ब्राह्मणेतर पक्षाची जातिव्यवस्थान्त व स्वातंत्र्य-चळवळ यांबद्दलची भूमिका नकारात्मक असल्यामुळे त्यांनी तो पक्ष सोडून काँग्रेसमध्ये प्रवेश केला. काँग्रेसमध्ये त्यांनी आपली जातिव्यवस्थाविरोधाची आयडेन्टिटी कायम ठेवली. डाव्या पक्षांनी अजूनही जातिव्यवस्थान्तावर पाठ फिरवलेली आहे. ब्राह्मणेतर चळवळीच्या पुढाऱ्यांनी स्वातंत्र्यप्राप्तीनंतर शेतकरी-कामगार पक्ष काढला तोही केवळ वर्गवादी. मार्क्सवादी - लेनिनवादी तत्त्वज्ञान स्वीकारून. त्यामुळे पंजाबरावांपुढे जातिव्यवस्थान्ताचा संयुक्तिक पर्याय नव्हता, म्हणून ते काँग्रेसमध्येच राहिले. **विद्वत्ता आणि समर्पित राष्ट्रवादिता व जातिव्यवस्थाविरोधिता या दृष्टींनी त्यांचे व्यक्तिमत्व आधुनिक काळात अनन्य होते.**

### अन्वेषणपद्धत

पंजाबरावांच्या प्रबंधाची अन्वेषणपद्धत (methodology) त्यावेळच्या पाश्चात्य इंडॉलॉजिस्टांचीच राहिली. जयस्वालांचा 'हिंदू पॉलिटी' हा महाग्रंथ त्यांच्यापुढे आलेला दिसत नाही. जयस्वालांनी आपला ग्रंथ 'देव, मृत्यू, क्रौर्य व कास्ट यांपासून स्वातंत्र्य उद्घोषित करणाऱ्या वृष्णि, कठ, वैशाल व शाक्य या गणराज्यांना' अर्पण केलेला असला तरी हिंदू राष्ट्रवादापासून त्यांची नाळ तुटलेली नव्हती हे ग्रंथाच्या शीर्षकावरून स्पष्ट होते. 'द केम्ब्रिज हिस्टरी ऑफ इंडिया' मध्ये 'द इन्डस सिव्हिलिझेशन' हा मॉर्टिमर व्हीलरचा पुरवणी खंड १९५३ साली प्रसिद्ध झाला : उत्खनित सिंधू संस्कृतीची त्यामुळे पंजाबरावांना कल्पना येणे शक्य नसल्याने त्यांच्या ऐतिहासिक प्रतिपादनाचे सूत्र - आर्य भारतात बाहेरून आले आणि त्यांनी मागासलेल्या अनार्यांचा पराभव करून सिंधू व गंगेची खोरी व्यापली, हे असणे अपरिहार्य होते. त्यामुळे वैदिक धर्मावर अनार्यांचा परिणाम होणे शक्य नसल्याचे त्यांनी गृहीत धरले. फ्रेझरच्या 'गोल्डन बाऊ' या महाग्रंथाचा पंजाबरावांनी अभ्यास केलेला असला, तरी त्याच्या आदिम जादूच्या (Primitive magic) विराट विवेचनाची दखल केवळ धर्माच्या संदर्भातच घेतलेली आहे, 'राजपद हे अपहारातून (usurpation) जन्माला आलेले नसून कृषिमायेच्या गरजेतून निर्माण झालेले आहे' - या त्याच्या महान शोधाकडे त्यांनी लक्ष दिलेले नाही. ('ए डिक्शनरी ऑफ फिलॉसॉफी' या १९६७ च्या सोव्हिएत प्रकाशनाने आपल्या राजपदाच्या अपहाराच्या सिद्धांतासाठी फ्रेझरला साफ वगळून टाकले आहे!) प्राचीन युरोपच्या इतिहासाचा अभ्यास करून बॅकोफेन या स्विस पंडिताने लिहिलेल्या 'मुत्तरेक्ट' (१८६१) या ग्रंथात स्त्रीसत्तेची (gynocracy) प्रथम मांडणी केलेली असली तरी त्याने स्त्रीसत्ता ही अपवादात्मक असून मातृसत्ता (matriarchy)

ही नियमात्मक असल्याचे प्रतिपादले आहे. 'एन्शन्ट सोसायटी' (१८७७) या अमेरिकन आदिवासांचा प्रत्यक्ष अभ्यास करून लिहिलेल्या आपल्या पुस्तकात कायदेपंडित मॉर्गनने बॅकोफेनचा सिद्धान्त प्रमाणभूत मानून अमेरिकन आदिवासींच्या मातृसत्ताक समाजाला मानव समाजाचा आद्य व आदर्श समाज म्हणून रंगवले. मार्क्स व एंगल्स यांनी वास्तवात संक्रमणात्मक असलेल्या या समाजाच्या मॉर्गनप्रणीत 'शोधा'ला डार्विनच्या उत्क्रांतिवादाच्या शोधाइतकेच क्रांतिकारी ठरवले, आणि मग एंगल्सने लिहिलेल्या 'द ओरिजिन ऑफ द फॅमिली, प्रायव्हेट प्रॉपर्टी अँड द स्टेट' (१८८४) या पुस्तकात भावी साम्यवादी समाजवादी समाज या प्रिमिटिव्ह कम्यूनिझमची पुनरावृत्ती असेल असे मांडले. ब्रिफॉने 'द मदर्स' (१९२७) या आपल्या त्रिखंडी महाग्रंथात मातृसत्तावादाची री ओढली आहे. पद्मनाभ मेननने मात्र मातृसत्ताक समाज ही पुरुषसत्तेकडे संक्रमित होणाऱ्या स्त्रीसत्ताक समाजाची अवस्था असते असे केरळीय इतिहासावरून सप्रमाण दाखविले. कोसांबींनी हा ग्रंथ वाचलाच नव्हता. सर्व धर्मांचे मल्याळी अजूनही मातृवंशकता पाळत असूनही केरळचे कम्युनिस्ट पक्ष पद्मनाभ मेननना कालबाह्य मानतात! अँथ्रॉपॉलॉजीत झालेल्या या उलथापालथी प्रबंधोत्तर असल्यामुळे त्या पंजाबरावांच्या लक्षात येणे जरी शक्य नसले, तरी त्यांनी 'द सेक्रेड बुक्स ऑफ द ईस्ट' - वर न विसंबता धर्मशास्त्राचा मुळातून अभ्यास केला असता, तर त्यांना हारीत या प्राचीनतम धर्मसूत्रकाराने 'श्रुती एक नसून दोन आहेत, एक वैदिकी व दुसरी तांत्रिकी' - हे वचन आढळले असते. *(३) वैदिकी श्रुती ही पुरुषप्रधान आहे, तर तांत्रिकी स्त्रीप्रधान. म्हणजे बौद्ध धर्माच्या अपवादात्मक अनन्यतेवर न थांबता प्राग्वैदिक काळापासूनच भारतीय धर्म एकप्रवाही नसून द्विप्रवाही आहे - या वस्तुस्थितीपासून ते आपल्या विश्लेषणाचा प्रारंभ करू शकले असते. पण, तांत्रिक श्रुती ही सिंधू संस्कृतीचे अपत्य होते हा निष्कर्ष ते काढू शकले नसते आणि ती पुरुषप्रधान आर्यांतर्गतच होती या विसंगतीचा मेळ ते घालू शकले नसते. महायानाने बौद्ध धर्माचा तांत्रिक श्रुतीशी संयोग केला याकडे म्हणूनच पंजाबरावांचे लक्ष गेले नाही. या संयोगामुळे बौद्ध धर्माने जागतिक तत्त्वज्ञान व तर्कशास्त्र यांना जे क्रांतिकारी योगदान दिले, त्यावर प्रकाश टाकणारे स्त्चेर्बात्स्की याच काळात लेनिनग्राड विद्यापीठात कार्यरत होते. पण उपरोक्त सोव्हिएत डिक्शनरीने एकूण बौद्धवादाला पाऊण पानातच गुंडाळले आहे! *(४) पंजाबरावांचा बौद्ध धर्माचा अभ्यास हीनयानापुरताच मर्यादित राहिला. (डॉ. आंबेडकरांचा नवबौद्ध धर्मही हीनयानापलीकडे गेला नाही.) **पंजाबरावांचे व्यक्तिगत, राजकीय व सामाजिक जीवन नकळतपणे तांत्रिक श्रुतीच्या परंपरेत व्यतीत झालेले असले तरी कळतेपणी ते त्या समर्पित जीवनाचे अन्वेषणपद्धतीत रूपान्तर करू शकले नाहीत.**

धर्माच्या एकूण २,००० व्याख्या असल्याचे पंजाबराव सुरुवातीलाच सांगतात.*[५] धर्मोत्पत्तीचे पाच सिद्धान्त व त्यांच्या व्याख्या ते पुढीलप्रमाणे देतात –

**१. सी. द. ब्रॉसेचा फेटिशवाद :** प्रत्येक वस्तूत चांगली वा वाईट अतिमानुषी शक्ती असणे आणि तिने त्या वस्तुद्वारा आपले कार्य करणे याला फेटिशवाद म्हणतात.*[६] ऋग्वेदात सोम साधी भांग न राहाता 'आत्मा यज्ञस्य' बनतो,*[७] म्हणून फेटिशवादाला वस्त्वात्मवाद म्हणता येईल. या शक्तींना प्राचीन भारतीय साहित्य यक्ष, गंधर्व, राक्षस, पिशाच व भूत म्हणते. भगत जेव्हा झपाटलेल्याच्या अंगातले भूत काढतो, तेव्हा तो त्या भुताला "झाड सोड" – असा दम देतो. राक्षस हा शब्द रक्षस् म्हणजे रक्षण करणारा, यावरून बनलेला आहे. राक्षसादि लोक मातृवंशक अनार्यजन असल्यामुळे आर्यांनी त्यांना अनिष्ट अतिमानुषी शक्ती बनवले. लंकेच्या सभागृहावर ६०० पिशाचे पहारा देत असल्याचे रामायण सांगते.*[८] ऋग्वेदातील पिशाचीच्या एकमेव उल्लेखाकडे पंजाबराव लक्ष वेधतात.*[९] महाभारतात एका तळ्याचा रक्षक एक यक्ष असल्याचे दाखविले आहे.*[१०] प्राचीन पंजाबच्या मद्रांमध्ये पतंचल काप्य (कापी या स्त्रीचा मुलगा) नावाच्या श्रोत्रियाची पत्नी व मुलगी या 'गंधर्वगृहीता' (गंधर्व अंगात येणाऱ्या) असून त्या पृच्छकाच्या इतिहास व तत्त्वज्ञानावरील प्रश्नांची उत्तरे देत असल्याचे बृहदारण्यक उपनिषद् सांगते.*[११] साधे उपयुक्तता मूल्य असलेली वस्तू क्रयवस्तू म्हणून विनिमयमूल्य बनताच तिचे क्रयवस्तुविश्वाशी सममूल्याचे नाते प्रस्थापित होते, – या सामान्य माणसाला अतर्क्य असणाऱ्या कायाकल्पाला मार्क्स क्रयवस्तूचा फेटिशवाद म्हणतो. क्रयवस्तू मग तिच्या उत्पादकाच्या नियंत्रणात न राहाता उलट तोच तिच्या नियंत्रणात जातो.*[१२]

**२. ई. बी. टायलरचा ॲनिमिझम :** ॲनिमिझमला सर्वजीववाद (hylozoism) म्हणता येईल.*[१३] जैन धर्म सर्वजीववादी आहे.

**३. हर्बर्ट स्पेन्सरचा पितरपूजावाद :** पितरपूजेला पंजाबरावांनी भूत (ghost) पूजा असा पर्यायवाची शब्द दिला आहे.*[१४] हिंदू कुटुंबे एकत्र कुटुंबपद्धतीच्या काळापर्यंत चार पिढ्यांतील पितरांचे श्राद्ध करीत आली आहेत. (चार पिढ्यांनंतर सुतक तुटते. (मनु. ९.१८७). सर्वपित्री अमावास्या (भाद्रपद) हा सर्व पितरांच्या श्राद्धाचा सण आहे. इतर धर्मांत तो 'All Manes Day' - या नावाने साजरा होतो. ऑक्स्फर्ड डिक्श्नरीत Manes चा अर्थ दैवीकृत पूर्वज असा दिला आहे.

पतंचल काप्याची मुलगी व पत्नी यांच्या अंगात जे गंधर्व येत त्यांची नावे अनुक्रमे सुधन्वन् आंगिरस व कबंध आथर्वण अशी होती. अथर्ववेदाचे एक नाव अथर्व – अंगीरसी असेही आहे. ऋग्वेदाच्या पुरुषसूक्तात साध्य हे पितरच पहिले देव असल्याचे

म्हटले आहे – 'यत्र पूर्वे साध्या: सन्ति देवा:'।।१०.९०.१६।।

**४. एफ्. बी. जेव्हाँचा टोटेमवाद :** 'शास्त्रीय परिभाषा कोश'मध्ये टोटेमला पर्यायवाची शब्द कुलचिन्ह व गणचिन्ह असे दिले आहेत. अमेरिका व ऑस्ट्रेलियामधील आदिवासींमध्ये ही एक प्रकारची सामाजिक संरचना होती. हे चिन्ह पशू वा वनस्पती वा तुरळकपणे निसर्गातील सूर्य, पाऊस, इ. वरून घेतले जाई; आणि ते घेणारे कुल वा गण स्वत:ला त्या चिन्हाची संतान असल्याचे म्हणजे 'सालोहित' मानीत असल्यामुळे तो पशू वा वनस्पती खाणे निषिद्ध मानी.*(१५) बुद्धाचा शाक्य संघगण व त्याचा संबंधी कोळिय संघगण यांची नावे वनस्पतीवरून पडलेली होती. पण, कोलचा अर्थ बोर होत असला तरी कोळिय हे बोरे खात नव्हते असे नाही. निषिद्ध वस्तू विधिपूर्वकच खाल्ली जात असे. प्रतिष्ठान / प्रयागच्या स्त्रीराज्याची राणी उर्वशी हिने परगणीय राणीपुत्र पुरूरवा याला प्रथम अभिसिंचनातून 'वीर' वा गणबंधू करून घेतल्यावर त्याच्याशी देवविवाह (sacred marriage) केला आणि चौथ्या शरद्ऋतूत त्याचा पुरुषमेध करून त्याचे महामांस गणभोजनात खाल्ले – असे ऋग्वेदाचे उर्वशी-पुरूरवा सूक्त (१०.९६) सांगते. मातृदेवतेच्या स्तवनात तिला 'महामांसबलिप्रिया' – असे संबोधले जाते. पुराणांच्या वैदिक राजवंशावळीवरून पुरूरवा हा पहिला नियतकालिक राजर्षि होता असे दिसते. त्याचा पिता म्हणून राजवंशावळीने दिलेला सुद्युम्न प्रक्षिप्त आहे. त्याची माता व पिता दोन्ही इला होती असे महाभारत सांगते – 'सा वै तस्य अभवन् माता पिता च एव इति नः श्रुतम्'।। १.७५.१९। अनार्य नरमांसभक्षक होते असा ब्राह्मणी छावणीचा सर्रास आरोप आहे. मानवसमाजाच्या बाल्यावस्थेत माणसे सर्वत्रच नरमांसभक्षक होती. पण, वैदिक आर्य हे सुवर्णयुगात होते, त्यांना बाल्यावस्था नव्हतीच, असे मार्क्सवादी महापंडित देबीप्रसाद चट्टोपाध्यायही वरुणाला भारतीय प्रिमिटिव्ह कम्यूनिझमचा महत्तम देव मानून भासवायचा प्रयत्न करतात. हरिश्चंद्र हा वैदिक राजवंशावळीतला ३८ वा राजा. त्याची कथा ऐतरेय ब्राह्मणात आली आहे. तो निपुत्रिक असल्यामुळे त्याने नवस केला की, त्याला मुलगा झाला तर त्याला तो वरुणाला बळी देईल. मुलगा झाल्यानंतर त्याने त्याला बळी द्यायची टाळाटाळ केल्यामुळे वरुणाने त्याला जलोदराने ग्रासले. स्वत:चा जीव वाचविण्यासाठी तो पुत्र रोहिताला बळी द्यायला तयार झाल्यानंतर रोहित जंगलात पळून गेला. पण, वरुणाचा कोप होईल म्हणून त्याने आरण्यक दरिद्री ब्राह्मण आजीगर्त सौयवसि याचा मधला मुलगा शुन:शेप याला मेध्य पशू म्हणून १०० गाईंना विकत घेतला. परंतु यज्ञात त्याला यूपाला बांधायला कोणी तयार होईना, म्हणून सौयवसीने त्याला आणखी १०० गाईंच्या बदल्यात यूपाला बांधले. मग त्याचा मेध करायला कोणी तयार होईना, म्हणून आणखी १०० गाई घेऊन त्याने ते काम स्वीकारले. बाप सुरा पाजळत आपल्याकडे येताना

पाहून शुन:शेपाने दैवतांच्या धाव्याची जी १.२४ ते ३० व ९.३ ही सूक्ते गाईली ती ऋग्वेदात ग्रथित आहेत. वरुणासकट बाकी सर्व दैवतांचा धावा केल्यानंतर शुन:शेप मुक्त झाला नाही; त्याचे पाश निर्ऋतिपुत्री उषेचा धावा केल्यानंतरच का सुटले, याचा कोणत्याही प्राच्यविद्यापंडिताने विचार केलेला नाही. शुन:शेपाला मारल्यानंतर त्याचे महामांस कर्मकांडाच्या नियमानुसार त्याच्या बापासकट सर्वांनी खाल्ले असते – या वस्तुस्थितीकडेही कोणत्याही प्राच्यविद्या पंडिताने लक्ष दिलेले नाही. उलट, चट्टोपाध्यायांनी आजीगर्ताच्या या उलट्या काळजाचे खापर ऋतविरोधी निर्ऋतीवर फोडून ज्याच्या प्रीत्यर्थ हा नरमेध होणार होता त्या वरुणाच्या ऋतच्या 'सनातन वैभवा'चे त्यांच्या 'लोकायत'मध्ये गुणगान केले आहे! ऋग्वेदीय आर्यांबद्दल अशीच संकल्पना पंजाबरावांची असल्यामुळे 'प्राच्यभर्गादि यौधेयादिभ्य:'।।४.१.१७८।। यासारख्या पाणिनीय व्याकरण नियमांमध्ये यौधेय संघगणाचे नाव 'युधा' या स्त्रीवाचक नावावरून पडत होते, याकडे त्यांचे लक्ष गेले नाही. 'जनपदशब्दात् क्षत्रियाद् अञ्'।।४.१.१६८।। या सूत्रात पाणिनी उपदेश करतो की, जनपदाचे नाव क्षत्रियवर्णाच्या, म्हणजे स्त्रीवर्णाच्या नावावरून पडते. **गणाचे नाव कसे पडते याचे उत्तर केवळ व्याकरणावर न विसंबता त्या मानवसमूहाच्या समाजविकासक्रमातच सापडू शकते. संबंधित मानवसमूह पशुपालकतेतून शेतीकडे आला असेल तर त्याचा गण पुरुषसत्ताक असेल, आणि अन्नचयन, मृगया, इ. तून शेतीकडे आला असेल तर त्याचा गण स्त्रीसत्ताक असेल. मानवसमाजाची सुरुवात गणापासून होत नाही; तर तत्पूर्वीच्या समूहप्रकारांमधून होते, जे त्यांच्या उत्पादनप्रकारांवर अवलंबून असतात.**

क्षत्रिय हा शब्द मूळ नाही; तो क्षत्रपासून बनला आहे – 'क्षत्रस्य अपत्यं क्षत्रिय:।' क्षत्रची व्युत्पत्ती क्षेत्रपासून झाली आहे असे बुद्ध सांगतो – "खेत्तानं अधिपती ति खो खत्तियो।"*(२१) शेतीचा शोध जगभर स्त्रियांनी लावलेला असल्यामुळे क्षत्र चा अर्थ मुळात स्त्री ही होता. स्त्रीसत्ताक समाजात दोनच वर्ण होते, एक स्त्रियांचा क्षत्र वर्ण व दुसरा पुरुषांचा ब्रह्मन् वर्ण. त्यामुळे स्त्रीसत्ताक गणसमाजात जनपदाचे (व गणाचे) नाव क्षत्र वर्णावरून पडत असे. पण, स्त्रीसत्तेतून न गेलेल्या मानवसमूहांच्या गणांना हा नियम लागू नव्हता. टोटेमची उपरोक्त व्याख्या देऊन थॉमसन सांगतात की, ऑस्ट्रेलियन आदिवासी मुख्यांच्या मते विधीत टोटेम खाल्ल्यामुळे त्याची जादूशक्ती अंगात येते.*(२२) चट्टोपाध्याय 'लोकायत' मध्ये टोटेमिक कुलचिन्हांची भारतीय उदाहरणे देतात.*(२३)

**५. फ्रेझरचा जादूचा सिद्धान्त** – फ्रेझरच्या मते जादू ही धर्माअगोदरची असून, दोघांचे कालखंड वेगवेगळे आहेत. काही अँथ्रॉपॉलॉजिस्टांच्या मते दोन्ही आद्य आहेत; तर काहींच्या मते धर्म हा पाचपैकी कोणत्याही घटकातून निघालेला नसून त्यांच्यापूर्वीच्या कोणत्या तरीतून निघालेला आहे!*(२४) ही अनिश्चितता पंजाबरावही दाखवितात. फ्रेझरने

जादू व धर्म यांच्यामध्ये जी दरी उभी केली आहे तिचाही परिणाम पंजाबरावांवर झालेला दिसतो. थॉमसन जादूची व्याख्या खालीलप्रमाणे देतात -

'... वास्तवाचे नियंत्रण करता येते हा आभास निर्माण करून वास्तव खरोखर नियंत्रित होते - या तत्त्वावर जादू उभी आहे. ते आभासिक तंत्र आहे जे वास्तविक तंत्रातील उणीवा भरून काढू पाहाते...'*(२५)

**केमिस्ट्रीची सुरुवात जशी कीमयेत झाली, तशी वास्तविक तंत्राची** (technique) **सुरुवात जादूतंत्रात झाली हे महत्त्वाचे तत्त्व या व्याख्येत अनुस्यूत आहे. जादू ही पूर्णपणे आभासिक नव्हती हे येथे लक्षात ठेवले पाहिजे.**

जादू म्हणजे आज्ञा व धर्म म्हणजे प्रार्थना - अशा ढोबळ व अन्योन्यवर्जक व्याख्या केल्याने या दोघांतील अनुल्लंघनीय दरी कायम राहाते. पूर्वमीमांसा सूत्राने धर्माची व्याख्याच आज्ञा केली आहे - 'चोदना-लक्षणोऽर्थो धर्मः।' यातून श्रौत-स्मार्त धर्माचे अनन्य स्वरूप जरी दृग्गोचर होत असले, तरी जादू व धर्म यांची गल्लत होते. ही दोन टोके टाळली तरच जादू व धर्म यांचे अन्योन्यवर्जकत्व टाळणाऱ्या पृथक् व्याख्या होऊ शकतील.

जादूचा आदिबंध पाहिल्याशिवाय तिची सम्यक् व्याख्या होऊ शकत नाही. पंजाबरावांनी उल्लेखलेल्या अरणीमंथनाच्या ऋचेतून (प्रबंध, पृ. २७१) या आदिबंधाला हात घालता येईल -

*उत्तानायाम् अव भर चिकित्वान् त्सद्यः प्रवीता वृषणं जजान।*
*अरुपस्तूपो रुशत् अस्य पाजः इळाया इळायास् पुत्रो वयुनोऽजनिष्ट।। ३.२९.३ ।।*(२६)

सिद्धेश्वरशास्त्रींनी दिलेला अर्थ जास्त सुबोध व समर्पक आहे-

'३. हे ज्ञानवान अध्वर्यो, तू उताण्या अरणीवर दुसरी अरणी पालथी घाल; म्हणजे ती गर्भिणी होऊन आरक्तप्रकाशी अग्नीला जन्म देईल.' *(२७)

आदिम मानव सर्व निसर्गप्रक्रिया स्त्री-पुरुष समागमरूपात पाहात होता. द्यावा-पृथिवीच्या समागमातून पाऊस पडतो आणि सृष्टीचे पुनरुत्पादन होते हा त्याचा विश्वास. पुरुषसूक्त (१०.९०) हे मुळात स्त्रीसत्तेत विराट् राष्ट्रीदेवी व पुरुष ब्रह्मन् यांच्या 'देवविवाह'चे, तिने त्याचा स्वहस्ते बळी दिल्यानंतर त्याच्या शवाशी मायिक संभोग करून स्त्रीसत्ताक सृष्टीचे पुनरुत्पादन करायचे सूक्त होते. त्रैवर्ण्य (क्षत्रिय, ब्राह्मण व दास) राजकात ते या मातृवंशक समाजाचे पुनरुत्पादन करणारे सूक्त बनले. चातुर्वर्ण्य (ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र) राजकात मग ते या पितृवंशक समाजाचे पुनरुत्पादन करणारे सूक्त बनले. यावरून आता मायेची व्याख्या पुढीलप्रमाणे करता येईल-

**जी नैसर्गिक प्रक्रिया घडवून आणायची, तिचे मायिक स्त्रीपुरुषसंभोगासह नृत्यगीत वाद्यसाथीत अनुकरण केले म्हणजे ती प्रत्यक्षात घडून येते- यावर विश्वास**

**म्हणजे जादू/माया. यातून जादू ही धर्म, साहित्य, कला, तत्त्वज्ञान, विज्ञान, इ.ची जननी असल्याचे ध्वनित होते.**

पंजाबरावांनी धर्मोगमाच्या घटकांचे विवरण करण्याअगोदरच १ल्या प्रकरणात धर्माची खालील व्याख्या केली आहे– 'धर्म म्हणजे मानवी सुखवृद्धीचे उद्दिष्ट ठेवणारी विशिष्ट तत्त्वे, सिद्धांत, श्रद्धा व व्यवहार असलेली आचारसंहितेची सामाजिक संस्था.' जेव्हा कोणी व्यक्ती अशा अनुबंधात म्हणते की, ती विशिष्ट धर्माची आहे, तेव्हा ती त्या धर्माच्या श्रद्धा व आचारनियम यांचे पालन तिच्या व समाजाच्या सुखाकरता आहे असा विश्वास ठेवणाऱ्या समाजाची असते.' *[२८]

सर्व धर्मांना -बौद्ध धर्मालाही- लागू पडेल अशी व्याख्या करण्यात तिचे अतिसाधारणीकरण झाले आहे. समाजाची धारणा करतो तो धर्म, या धृ धातूपासून व्युत्पादलेल्या व्याख्येसारखीच ती आहे.

## धर्माची वास्तविक व्याख्या

धर्म हा शब्द ऋग्वेदात ऋत व व्रत प्रमाणे विश्वसर्जकचालक नियमशक्तींचा वाचक म्हणून येतो असे पंजाबराव स्वतः दाखवतात. त्यासाठी त्यांनी खालील ऋचेचा संदर्भ दिला आहे– (प्रबंध, पृ. १६८)

*'घृतवती भुवनानाम् अभिश्रिया उर्वी पृथ्वी मधुदुधे सुपेशसा।*
*द्यावा पृथिवी वरुणस्य धर्मणा **विस्कथिते** अजरे भूरिरेतसः'।।६.७०.१।।*

[घृताने परिपूर्ण, भुवनांना आधारभूत आणि अतिविस्तीर्ण अशा या द्यावापृथिवी मधुररसाचे दुग्ध देतात. त्यांचे स्वरूप प्रेक्षणीय असते, अशा या द्यावापृथिवी वरुणाच्या आज्ञेने आपापल्या निरनिराळ्या ठिकाणी सावरून धरलेले आहेत. ते कधी झिजत नाहीत (अजरे) आणि त्यांची उत्पादनक्षमता भरगच्च (भूरिरेतसः) असते. *[२९] ]

या नियमशक्ती अनेक असल्याने पुरुषसूक्तात धर्म हा शब्द बहुवचनात वापरला आहे –

*'यज्ञेन यज्ञम् अयजन्त देवास तानि धर्माणि प्रथमान्य् आसन्।*
*ते ह नाकं महिमानः सचन्त यत्र पूर्वे साध्वाः सन्ति देवाः'।।१०.९०.१६।।*

[अशाप्रकारे देवांनी यज्ञाने (पुरुषपशूला बळी देऊन) यज्ञ केला. आद्य धर्म हे असे होते. या मार्गानेच पितरांनी स्वर्ग मिळविला. कारण पूर्वी आमचे साध्य पितर हेच देव होते. *[३०]]

धर्माचा बहुवचनी वापर सांगतो की तो अजून संक्रमणावस्थेत होता, त्याचे एकवचनात स्फटिकीकरण झालेले नव्हते. हे सूक्त अलिकडच्या मंडलातले असले तरी, त्याची 'मिथ' प्राचीन असल्याचे पंजाबराव म्हणतात (प्रबंध, पृ. ३२९).

ऋग्वेदातील महत्तम देव वरुण असला, तरी त्याचा या सूक्तात उल्लेख नाही, त्याची जागा घेतलेल्या इंद्राचा आहे. (प्रबंध, पृ. २५२) यावरून पुरुषसूक्त हे मूळ सूक्ताचे संस्करण आहे हे स्पष्ट होते. पहिल्या चार ऋचांमध्ये पुरुषाची महती गाइलेली असली, तरी पाचव्या ऋचेत पुरुष व विराट् हे एकमेकांपासून जन्मलेले आहेत असे म्हटलेले आहे. यावरून दिसते की, ही अनैसर्गिक अनिश्चिती नंतरची आहे. विराज्/ट् च्या सूक्तांवरून पुरुष विराट्चे अपत्य असणेच संभवते. वि+राज् चा शब्दश: अर्थ स्त्रीराज्याची राणी असा होतो; आणि अथर्ववेदाच्या ८.१० या सूक्तावरून जगन्माता. उर्वशी-पुरूरवा संवाद-सूक्त (१०.९५) हे पुरूरव्याचा पुरुषमेध करायच्या तयारीचे आहे. अखेरच्या १८ व्या ऋचेत उर्वशी पुरूरव्याला समजावते-

*''इति त्वा देवा इमे आहुर् ऐल यथेम एतद् भवसि मृत्युबन्धु:।*
*प्रजा ते देवान् हविषा यजाति स्वर्ग उ त्वम्अपि मादयासे।।''*

[असे तुला देव हे सांगतात, इलेच्या पुत्रा, तू आता मृत्युवश होणार आहेस. तुझी प्रजा देवांना होमहवन करील. तू मात्र स्वर्गात आनंदप्रमोद करशील. *(३१)]

क्षत्रियांनी धार्मिक विधीत एक तर आपल्या पुरोहिताच्या प्रवराचा पाठ करावा किंवा 'मानव-ऐल-पोरूरवस इति' हा असे श्रौत सूत्र सांगते. *(३२) काणे कारण देतात की, क्षत्रिय आपले गोत्र विसरून गेले होते म्हणून हा प्रघात पडला. गोत्र म्हणजे गाईंचा वाडा. गोत्र हे पशुपालक पुरुषसत्ताक आर्यांनी आणले, तर कुल हे स्थानिक होते हे खरे कारण आहे. कुल चा अर्थच स्त्री असा होतो. हा अर्थ तंत्रात होतो असा आक्षेप घेतला जाईल. श्रुती ही एक नसून दोन आहेत हे हारीत या प्राचीनतम धर्मसूत्रकाराचे वचन वर दिले आहे. कित्ता असा - 'श्रुतिश् च द्विविधा, वैदिकी तांत्रिकी च।' *(३३) तांत्रिकी श्रुती ही आर्यांनी पुरुषप्रधान वैदिकी श्रुती बनवण्याअगोदरची होती. पौराणिक राजवंशावळीनुसार मनूच्या मानववंशातला सुद्युम्न हा पहिला राजा असला, तरी त्याचा पुत्र पुरूरवा हा दाखवला असल्याने *(३४) सुद्युम्न हा परिकल्पित आहे. कारण महाभारत सांगते की, इला ही पुरूरव्याची माता व पिता दोन्ही होती - 'सा वै तस्य अभवन् माता पिता च एव इति न: श्रुतम्'। १.७५.१९। रामायणाच्या उत्तरकांडात पुरूरवा हा बाह्लीकराज्ञी इलेचा पुत्र दाखवलेला आहे. इला म्हणजे भूमाता वा तिची पुरोहिता असलेली राणी. बाह्लीक हे जनपद सिंधू व सतलज यांच्यामध्ये होते. केरळीय स्त्रीराज्याच्या वारसाहक्काचा नियम के.पी. पद्मनाभ मेनन यांनी त्यांच्या द्विखंडी 'हिस्टरी ऑफ केरळ' (१९२४-१९२८) मध्ये सांगितला आहे, तर ईशान्येच्या खासींच्या स्त्रीराज्याचा पी.आर.टी. गुर्डॉनने 'द खासीज' (१९१४) मध्ये. राजपद राणीच्या मुलीलाच मिळत असे. रामायणात जनस्थानाची (महाराष्ट्र) राणी शूर्पणखाच झाली; तिचा वडील भाऊ रावण नाही. राजा होण्यासाठी त्याला

लंकेला जाऊन तिची राणी मंदोदरी इच्याशी लग्न करावे लागले. त्याचप्रमाणे पुरूरवा बाह्लीकचा राजा होऊ शकत नसल्याने तो प्रतिष्ठानला (प्रयाग) गेला आणि तिची राणी उर्वशी इच्याशी विवाह करून राजा झाला. उर्वशी उपरोक्त ऋचेत सांगते त्यावरून व पौराणिक राजवंशावळीवरून तिचा वारस तिला पुरूरव्यापासून झालेला 'आयु' झाला. आयुपासून पितृवंशक परंपरा सुरू होते. वैदिकी परंपरा आयुपुत्र नहुषाला ब्राह्मणवर्णाने आर्यांच्या मदतीने जनपदातून हद्दपार करून चातुर्वर्ण्य स्थापन केल्यानंतर सुरू होते. त्याला हद्दपार करायचे कारण तो वर्णसमतावादी होता हे वनपर्वातील आजगर उपपर्वावरून दिसते. उर्वशी घराण्यातील आयुमाता उर्वशी ही शेवटची राणी होती. नंतर ती तत्पूर्वीच्या अप्सरांप्रमाणे मातृदेवता न बनता देववेश्या बनली आणि तीही इंद्राच्या देवसभेमध्ये. उर्वशी घराण्यातल्या एका उर्वशीने कृषिमायेची देखरेख (ब्रह्मन्) आपला पुत्र वसिष्ठ (सर्वोत्कृष्ट) याच्याकडे सोपवल्याचे खालील ऋचेवरून दिसते–

*उत असि मैत्रावरुणो वसिष्ठ उर्वश्या ब्रह्मन् मनसोऽधिजात:।*
*द्रप्सं स्कन्नं ब्रह्मणा दैव्येन विश्वेदेवा: पुष्करे त्वा अददन्त ।।७.३३.११ ।।*

[हे वसिष्ठा, तू मित्र व वरुण यांचा पुत्र आहेस. हे ब्रह्मन्, तू उर्वशीच्या मनापासून जन्मलास. (उर्वशीच्या) देवपतीने तिच्या योनीत टाकलेल्या वीर्यातून (ती गर्भवती झाली). पुष्कराच्या काठी (उर्वशी प्रसूत झाल्यानंतर) देवपरिषदेने तुझा विधिपूर्वक स्वीकार केला.]

या भाषांतराचे वेगळेपण जाणकारांना जाणवेल. वैदिक मंत्रांची अशी अनेक वेगळी भाषांतरे 'दास-शूद्रांच्या गुलामगिरी'त करावी लागली आहेत. स्त्रीसत्ता व मातृवंशकता आणि एकूण भारतीय गणसमाजाचे अब्राह्मणी अन्वेषणपद्धतीने वेगळे व नवे आकलन यांनीच हे साध्य होऊ शकले, याकडे प्राच्यविद्यापंडितांचे अजून लक्ष गेलेले नाही; आणि ब्राह्मणेतरांचे लक्ष ब्राह्मणांनी वेधल्याशिवाय जात नाही! शेती हस्तश्रमाऐवजी मोठ्या जनावरांच्या औताने पुरुषांकडून सुरू होत असल्याने ती स्त्रियांऐवजी पुरुषांकडे गेली; आणि कृषिमायेवरील देखरेखीचे ब्रह्मन्पद उर्वशीने पुत्रप्रेमामुळे वसिष्ठाकडे सोपवले. कृषिमायेची देखरेख करणारा वसिष्ठ हा पहिला ब्रह्मन् पुरोहित होता. या ऋचेत ब्रह्मन् हा शब्द दोन अर्थांनी आलेला आहे. 'दैव्येन ब्रह्मणा' याचा अर्थ उर्वशीचा देवपती (Sacred Consort) असा पारंपरिक होतो. दुसऱ्या ब्रह्मन् चा अर्थ ब्रह्मन् पुरोहित. मायेने बुद्धाला शाक्यांचे पुष्कर असलेल्या देवदहाकाठच्या शालवनात जन्म दिला – ही प्रथा किमान उर्वशीइतकी प्राचीन आहे. कृषिमायेचे स्त्रियांकडून पुरुषांकडे हस्तांतरण वसिष्ठापासून सुरू होते आणि राजपदाचे पुरूरव्याकडे झालेले नियतकालिक हस्तांतरण आयुपासून कायमचे बनते. दैवी पातळीवर याचे प्रक्षेपण वरुण व मित्र यांनी संयुक्तपणे निर्ऋतिवंशाकडून पौरोहित्य घेतले या संदर्भात वसिष्ठाला मैत्रा–

वरुणी म्हटलेले आहे. वरुणाचा येथे राजा म्हणून उल्लेख येत नाही. राजा म्हणून वरुणाचा उल्लेख यानंतर एकटयाने येतो. या सर्व घडामोडी इंद्रोदयापूर्वी झालेल्या आहेत हे येथे लक्षात ठेवले पाहिजे.

आर्य सर्व संस्कृती घेऊन युरोपातून येथे आले असे पंजाबरावांनी गृहीत धरल्यामुळे त्यांनी आर्यांचे भा-युरोपीय व भा-इराणी असे दोन टप्पे केले आहेत; आणि वैदिक देवांचे मूळ प्राचीन युरोपमध्ये शोधायचा प्रयत्न केला आहे. फुलेंनी आर्यांच्या विरोधात अनार्यांना आपले पूर्वज मानले आणि त्यांच्या दैवतांना आपली दैवते, तर पंजाबराव अनार्यांना सैतान मानून त्यांची मजल मरीआईपलिकडे गेली नाही असे ठरवतात. (प्रबंध, पृ. १३७). फुलेंची एकमेवाद्वितीयता यातच आहे. 'इंडो-युरोपीयन रिलिजन' या ५ व्या प्रकरणात त्यांनी या संदर्भात युरोपीयन व भारतीय देवांचे विवरण केले आहे. त्यावेळच्या अन्वेषणपद्धतीपासून त्यांनी आपली सुटका करून न घेतल्याने वरुणासारख्या देवांचेही जनकत्व युरोपीयन देवांना देण्यासाठी त्यांनी व्युत्पत्तीची ओढाताण केलेली आहे. *(३५) तौलनिक भाषाशास्त्राद्वारे साम्य शोधणे वेगळे व जनकत्व शोधणे वेगळे. द्यो हे आकाशदैवत कालानुक्रमात आद्य असूनही ते अमूर्त राहाते आणि यज्ञदैवत बनत नाही, तर नंतरचा वरुण मूर्त व यज्ञदैवत बनतो आणि राजा व विश्वाचा नैतिक सम्राट हा फरक त्यांनी नोंदवलेला आहे. *(३६) विश्वसर्जक-चालक नियमशक्तींचा *-व्रत वा ऋत वा धर्म यांचा-अधिदेव म्हणून 'मायिन्' असे मुख्यतः त्याचेच वर्णन ऋग्वेदात येते असेही ते सांगतात. शांततेचा व नैतिकतेचा देव, म्हणून त्याला कोणत्याही शस्त्राची गरज नसल्याचे ते म्हणत असले, *(३७) तरी त्याने झपाटले जायची व यज्ञबली म्हणून त्याच्या पाशांनी जखडले जायची भीती वेदव्यापी आहे. यावरून त्याचा गणसमाज इंद्राच्या आर्य गणसमाजासारखा आक्रमक बनलेला नाही ही विशिष्ट समाजविकासावस्था येथे दिसून येते. इंद्राचा पशुपालकतेमुळे आक्रमक गणसमाज जरी कृषिप्रधान बनला, तरी तो स्वगणचौकटीमुळे वरुणाचा उपासक राहिला. नियमशक्तिवाचक 'ऋत' हा मूळ शब्द निर्ऋतिपासून निघालेला आहे हे मला 'दास-शूद्रांची गुलामगिरी' मध्ये दाखवावे लागले. *(३८) निर्ऋतीने 'धरले' जायची व तिच्या पाशांनी जखडले जायची भीती तैत्तिरीय संहितेच्या ४.२५ या मंत्रामध्ये विस्ताराने आली आहे-

*यत् ते देवी निर्ऋतिराबबन्ध दाम ग्रीवास्वविचर्त्यम्।*
*इद ते तद्वि ध्याम्यायुषो न मध्यादया जीवः पितुमध्दि प्रमुक्तः।।*
*यस्यास्ते अस्याः क्रूर आसञ्जुहोम्येषां बंधानामवसर्जनाय।*
*भूमिरिति त्वा जना विदुर्निर्ऋतिरिति त्वाऽहं परि वेद विश्वतः।।*

---

* तो समाज सर्वजीववादी असल्याने नियम-शक्ती हा शब्द वापरलेला आहे.

*असुन्वन्तमयजमानमिच्छ स्तेनस्येत्या तस्करस्यान्वेषि।*
*अन्यमस्मदिच्छ सा त इत्या नमो देवि तुभ्यमस्तु।।* *(३९)

[देवी निर्ऋते! तू ज्या पाशांनी न सोडण्यासाठी याचा गळा बांधलास, ते मी जणू काय आयुष्याच्या मध्यान्ही पासून मोकळे करीत आहे. मग बंधमुक्त होऊन जग व अन्नग्रहण कर. जिच्या क्रूर मुखात मी पाशविमोचनार्थ होम करतो, ज्या तुला भूमी म्हणून जन जाणतात, त्या तुला निर्ऋति म्हणून मी सर्वतोपरी ओळखतो.

ना हवन ना यज्ञ करणाऱ्याला तू झपाट; चोर व डाकूंच्या रस्त्याने तू जा. आम्हाला सोडून दुसऱ्यांना तू धर. देवी निर्ऋते, तुला प्रणाम असो! *(४०)]

निघण्टूच्या पृथिवीनामावलीतील तिच्या समावेशावरूनही (१.१.१६) ती भारताची आद्य पृथिवीदेवता होती असे दिसून येते.

माया हा शब्द 'मा' धातुपासुन बनलेला आहे. त्याचा 'मापणे' हा अर्थ पंजाबरावांनी दिलेला आहे एवढेच नाही तर वरुण पृथ्वीला सूर्यदंडाने (काठीने) मापायची माया करीत असल्याचे सांगणाऱ्या खालील ऋचेचा संदर्भही दिलेला आहे *(४१)

*इमाम् ऊं सु आसुरस्य श्रुतस्य महीं मायां वरुणस्य प्र वोचम्।* *
*मानेन इव तस्थिवान् अन्तरिक्षे वि यः ममे पृथिवीं सूर्येण।।५.८५.५।।* *(४२)

तिचा अर्थ ते खालीलप्रमाणे देतात–

'वरुण अंतरिक्षात उभा राहून सूर्याच्या मापक काठीने पृथ्वीची मोजणी करतो.' *(४३)

अशीच मोजणी इंद्र व विष्णू यांनी केल्याचे अनुक्रमे ६.४७.३–४ व १.१५४.१ या ऋचा सांगतात असे पंजाबराव पुढे म्हणतात. ६.४७.३–४ या ऋचांमध्ये इंद्राने नाही तर सोमाने पृथ्वीचे द्यावा–पृथिवी, अहो–रात्र, पाणी व वनस्पती असे सहा विभाग पाडल्याचे म्हटलेले असल्यामुळे त्या मोजणीच्या नाहीत. १.१५४.१ या ऋचेत विष्णूने तीन पावलांनी विश्व व्यापले असे म्हटलेले असल्याने तीही मोजणीची नाही. विष्णूची अशी जी १.१५५–१५६ सूक्ते आहेत, ती विष्णूने बलीला पाताळात गाडल्याचे सूचित करणारी सूक्ते आहेत. वरुण–ऋचेत वरुणाने पृथ्वीचे सूर्यकाठीने 'जणू मापन' केले या अर्थी जे 'मानेन इव' हे शब्द योजलेले आहेत, त्याकडे पंजाबरावांचे लक्ष गेलेले नाही. हे शब्द भौतिक वरुणाने राजा म्हणून गणशेतीच्या नियतकालिक मोजणीचे काम केले असे सुचवतात. 'दास–शूद्रांची गुलामगिरी' च्या 'फासे व शेती' या प्रकरण ३ मध्ये राजर्षीच्या या सर्वात महत्त्वाच्या कामाचे मी विवरण केले आहे. क्षत्र वा क्षत्रिय हे विशेषण विशेषेकरून वरुणालाच लावलेले असल्याचे पंजाबराव यथार्थपणे सांगतात. *(४४) क्षत्र हा मूळ शब्द क्षेत्र–शेताचा वाचक होता हे वर दाखवले आहे. भग व अंश

---

† या सूक्ताचा ऋषी अत्रि भौम, म्हणजे पृथ्वीपुत्र, असून त्याचे ८४ वे सूक्त पृथिवीस्तवक आहे हे लक्षणीय आहे.

हे वेगळे देव असून त्यांचे कार्य भाग वा वाटे पाडणे होते असे पंजाबराव सांगतात. *(४५) पण, ते या कार्याचा समाजाशी संबंध जोडत नाहीत. गणसमाजात गणभूमी व गणधन यांचे समान भाग करून वाटप करणे हेच ते काम असू शकत होते. वेदात 'भाग-दुध', म्हणजे भागवाटप करणारा, हे काम पूषा हा देव करीत असल्याचे दाखवले आहे. *(४६) भिक्षुसंघात हे भाग - दुधाचे वा भत्त - उद्देसकाचे काम पूर्वाश्रमीचा मल्ल-संघगणीय खत्तिय असलेला दब्ब महउपुत्त करीत असल्याचे विनयपिटक सांगते. *(४७) ही कामे (उपरोक्त वरुण-ऋचेवरून) मायाकर्मे होती आणि राजा वरुण या गणकर्मांची देखरेख करीत होता असे सूचित होते. पूषा हे भूमीचे एक नाव असल्याचे निघण्टु (१.१.१९) सांगतो. म्हणजे, हे गणधनवाटपाचे काम मुळात निर्ऋती करीत होती असे ध्वनित होते. राष्ट्रीदेवी नैर्ऋती (निर्ऋतिपुत्री) दुर्गा खालील ऋग्वेदीय ऋचा (अथर्ववेदीय सूक्त ४.३०) गाते-

*अहं राष्ट्री संगमनी वसूनां चिकितुषी प्रथमा यज्ञियानाम् ।३।*

*अहं जनाय समदं कृणोमि अहं द्यावापृथिवी अविवेश ।।१०.१२५.६।।* *(४८)

[मी राष्ट्री (स्त्रीराज्याची राणी) आहे, गणधनांचे निधान. मी यज्ञवेत्त्यांमध्ये आद्य आहे. मी गणजनांमध्ये गणभोजन संघटित करते. पृथ्वी व आकाशाला मी व्यापले आहे. *(४९)]

गणभूमिधनाच्या गणकर्मातून राजपदाची उत्पत्ती झाली हे मी 'दास-शूद्रांची गुलामगिरी' मध्ये दाखविले आहे.*(५०) हे कर्म निर्ऋतीच्या घराण्यातून✡ काढून स्वत:कडे घेण्यातून वरुण राजा झाला. ऐतरेय ब्राह्मणात जरी सुदास् (सुदा:) या वैदिक राजवंशावळीतल्या ३९व्या राजाच्या आद्य राजसूयाचे वर्णन केलेले असले, तरी या राजसूयाची उत्पत्ती वरुणसवातून झालेली होती. हा राजाभिषेक वसिष्ठाने केला; कारण तो वसिष्ठघराण्यालाच अवगत होता. त्याला ऐन्द्राभिषेक म्हटलेले आहे. ✝*(५१) या प्राचीनतम व ऋग्वेदीय ब्राह्मणातच पुरुषसूक्तानंतर प्रथम नवोदित चातुर्वर्ण्यातील वैश्य वर्णाची - 'अन्यस्य बलिकृद्, अन्यस्य अद्यो, यथाकाम ज्येय:' व शूद्रवर्णाची - 'अन्यस्य प्रेष्य:, कामोत्थाप्यो, यथाकाम वध्य:' -ही विदारक हालत नोंदवलेली आहे (७.२९). या ब्राह्मणाचा कर्ता महिदास ऐतरेय हा इतरेचा पुत्र होता असे शंकराचार्य छांदोग्य उपनिषदाच्या ३.१६.७ वरील भाष्यात सांगतात. त्याची मातृवंशकता तो अनार्य असल्याचे स्पष्ट करते. यावरून जेते उच्चवर्णीय आर्य व जित उच्चवर्णीय अनार्य यांची स्वगणीयांच्या डोक्यांवरून तडजोड होऊन चातुर्वर्ण्य आले

---

✡ घराणे म्हणजे आजचे वंशपारंपरिक घराणे नाही. स्त्रीसत्ताक गणाची राणी गणनियुक्तच असायची.

✝ एतेन हवा ऐन्द्रेण महाभिषेकेण वसिष्ठ: सुदासं पैजवनम् अभिषिषेच ८-२१

हे स्पष्ट होते. वरुणाचा मातृवंशक राजक समाज जेथे पराभूत झाला तेथे हा क्षत्रिय, ब्राह्मण व दास यांचा त्रैवर्ण्य समाज चातुर्वर्ण्यात विलीन झाला, तर जेथे तो अपराभूत राहिला तेथे तो त्रैवर्ण्यच राहिला. (इतरत्र स्त्रीसत्ताक गण विसाव्या शतकापर्यंत तग धरून राहिले). पण, वरुणाचा अनार्य समाज हा भारतातील आद्य शोषणपीडनाधिष्ठित वर्णसमाज होता हे विसरता कामा नये. वरुणाचे सर्वत्र संचार करून सर्व पाहाणारे हेर होते हे पंजाबरावांनी उल्लेखले आहे. यम-यमी संवादाच्या १०.१० या सूक्तातील २ च्या व ८ व्या ऋचांत त्यांचा नि:संदिग्ध उल्लेख येतो. हे सापेक्ष समताधिष्ठित स्त्रीसत्तेत संभवू शकत नव्हते. 'सर्व धर्म पुरोहितवर्गाने (Priesthood) तयार केले आहेत; बौद्ध धर्म सोडून'- हा निष्कर्ष पंजाबरावांनी काढलेला असला, *(५२) आणि वेदकाळात ब्राह्मण व क्षत्रिय असले, तरी तेव्हा चातुर्वर्ण्य नव्हते असे त्यांचे मत आहे- पुरुषसूक्तात चातुर्वर्ण्य असले, तरी ते मूळ वेदाचा भाग नाही असे ते एका बाजूला म्हणतात; तर या सूक्ताची मिथ प्राचीन होती असेही म्हणतात. *(५४) कोसांबीनी दाखवले आहे की, ब्राह्मणांच्या आद्य गोत्रकर्त्या ऋषींमध्ये केवळ विश्वामित्रच आर्य आहे, तर सप्तर्षी मातृवंशक असल्यामुळे अनार्य. *(५५) पण, वर्णचा अर्थ त्यांनी वर्ग (Moiety) वा गणार्ध असा न घेता रंग असा घेतल्यामुळे ते तेथेच थांबले, तर्कशुद्ध निष्कर्ष काढू शकले नाहीत. तर्कशुद्ध निष्कर्ष हा होता की, आद्य पुरोहितवर्ग आर्यपूर्व वरुण कालखंडातच तयार झालेला होता. स्त्रीसत्तेत माया क्षत्र-स्त्री-वर्णाच्या ताब्यात असली, तरी स्त्रीसत्ता शोषणपीडनाधिष्ठित नसल्यामुळे माया ही कर्मकांडी धर्म बनू शकली नव्हती. आता आपल्याला धर्माची व्याख्या करता येईल- **आद्य शोषणपीडनाधिष्ठित गणसमाजात पुरोहितवर्णाने मायेचे कर्मकांडात रूपांतर केल्यानंतर भारतीय धर्म जन्माला येतो.**

## वर्णाची आर्य-अनार्यता

पंजाबरावांनी वर्णाचा **मूळ** अर्थ रंग असा घेतल्याने त्यांनी वरुणासकट सर्व देव आर्य म्हणून गोरे मानले आहेत. *(५६) मरीआईसारखी रोगांची अनार्य अनिष्ट दैवते आर्यांच्या निसर्गदैवतांत नव्हती आणि आयुर्वेदाचा जनक असलेला अथर्ववेद पतित होता असे ते म्हणतात. निर्ऋती तर रोग व मृत्यूची देवता असल्याचे ते सांगतात. ऋग्वेदाच्या ज्या १०.१२५ या सूक्ताचा पाठ दुर्गाभक्त करतात असे सिद्धेश्वरशास्त्री सांगतात, *(५७) ती कृष्णा वा काळी असल्याचे युधिष्ठिर दुर्गास्तवनात गातो. *(५८) आद्य भूमाता निर्ऋती ही काळी असल्याचे तैत्तिरीय संहिता सांगते- 'निर्ऋत्यै रूपं कृष्णम्' ।५.२.४। निर्ऋती ही अमावास्याही असल्याने आणि ६.५५.५ ही ऋचा तिचा पुत्र भागदुध पूषा याला रात्रीपुत्र म्हणत असल्यामुळे तोही काळा असणे क्रमप्राप्त होते.

उषा सूर्योदयाआधीची देवता असल्यामुळे आणि वरील ऋचा पूषाला तिचा जार म्हणत असल्यामुळे ती काळी असणे अपरिहार्य होते. ८.४१.२ ही ऋचा भगाचा काळ उषःकालीन असल्याचे सांगते आणि निरुक्तानुसारही (१२-१३) त्याचा काळ पहाटेचा होता – 'तस्य कालः प्राग्-उत्सर्पणात्'। *(५९) अनुमति, राका, सिनीवाली व कुहू यांना निरुक्त 'देवपत्न्या' म्हणते. त्या अनुक्रमे शुक्ल चतुर्दशी, शुक्ल प्रथमा, कृष्ण चतुर्दशी व कृष्ण प्रथमा या रात्रींच्या देवता आहेत. निर्ऋती मात्र अमावास्या आहे आणि कोणाचीही पत्नी नाही. या सर्व संदर्भांवरून वरुणसुद्धा काळा असला पाहिजे हे उघड होते. कृष्णाच्या यादव अराजकाच्या वा संघगणाच्या उदयापर्यंत (इसवीपूर्व ९००) काळा रंग हा सौंदर्यादर्शाचा रंग राहिला. सोणदण्डसुत्तात ब्राह्मण सोणदण्ड हा बुद्धाला सौंदर्यादर्श लेखून तो 'ब्रह्मवण्णी' असल्याचे म्हणतो. *(६१) अशाप्रकारे सौंदर्यादर्शाचा रंग अब्राह्मणी परंपरेचा मेरुमणी असलेल्या बुद्धापासूनच ब्राह्मणी गोरा रंग झाला!

पंजाबराव देवची व्युत्पत्ती 'दिव्' वा 'द्यु' या तेजाळणे या अर्थीच्या धातूवरून झाल्याचे सांगतात. *(६२) ही पुन्हा आर्य व्युत्पत्ती आहे. 'दिव्' चा अर्थ आर्य परंपरेत द्यूत वा जुगार असा होऊ लागलेला असला, तरी वरुणकाळापर्यंत व इद्रोदयापूर्वी चौपट वा इरिण वा अधिदेवनावर फासे वा अक्ष वा छंद वा शलाकांनी गणभूमीधनाचे समान वाटप करणे – असा होत होता. प्राचीन ग्रीकांमध्ये अशीच 'लॉट' नावाची संस्था होती; आणि ते त्यांच्या त्रियुत मॉइराई देवीचे एक नाव होते. पण, चौपट व फासे यांचा शोध केवळ निर्ऋतीनेच लावला, म्हणून वैदिक काळात निर्ऋतीला हवन जमिनीवर स्वतः काढलेल्या चौपटावर केले जाई– 'स्वकृत इरिणे जुहोति' *(६३) तिच्या ऋत गणातील समतेची हमी तिने अशाप्रकारे निर्माण केली आणि तांत्रिक श्रुतीच्या सापेक्ष समतेच्या परंपरेत ती आधुनिक काळापर्यंत तेवत राहिली.

### 'ब्राह्मणवाद'

शेवटच्या ४ थ्या भागाला 'ब्राह्मणवाद' का म्हटले आहे याचा पंजाबराव प्रथम खुलासा करतात. ब्राह्मण साहित्य हे ऋग्वेदोत्तर साहित्याचा एक भाग आहे एवढ्याच कारणासाठी या कालखंडाला पंजाबराव ब्राह्मणवादी म्हणायला तयार नाहीत. ब्रह्मोपासना हे या कालखंडाचे मुख्य वैशिष्ट्य नसल्यामुळेही ते त्याला ब्राह्मणवादी म्हणू इच्छित नाहीत. ब्राह्मणप्रभुत्वाच्या धर्माचा हा कालखंड असल्याचे त्यांना मान्य असूनही त्याला ब्राह्मण धूर्तपणाने तसे म्हणायला तयार नाहीत म्हणूनही पंजाबराव तसे म्हणत नाहीत. मग ते व्याख्या करतात की, ऋग्वेदोत्तर – ते – जैन बौद्धोदयापर्यंतचा कालखंड हा कर्मकांडी धर्माचा असल्यामुळे त्याला ब्राह्मणवादी कालखंड म्हटले पाहिजे.

त्यांच्या आर्यप्रधान एकप्रवाही अन्वेषणपद्धतीनुसार ही व्याख्या संयुक्तिक वाटत असली, तरी आज ती तशी म्हणता येत नाही. हा काळ चातुर्वर्ण्यधर्माचा असला तरी ब्राह्मण व क्षत्रिय हे वर्णबदल करू शकत होते हे दाखविण्यासाठी ते विदेहराज जनकाने पुरोहित याज्ञवल्क्याला ब्रह्मोपदेश केल्याने तो ब्राह्मण म्हटला गेला, तर दासीपुत्र कवष ऐलूष हा ब्राह्मण बनला – ही उदाहरणे देतात. *(६५) उच्चवर्णीयांत वर्णबदल होणे हे समतेचे उदाहरण होऊ शकत नाही. दासवर्णीय कवष ऐलूष हा ब्राह्मण बनणे हे समतेचे उदाहरण होऊ शकते. पण, कवष मुळात दास नव्हता, तर उच्चवर्णीय होता असे 'वेदिक इंडेक्स' सांगते. *(६६) ऐतरेय ब्राह्मणातील कथेचा निरपवादपणे चुकीचा अर्थ घेतला गेलेला आहे. सरस्वतीकाठच्या यज्ञसत्राच्या सोमपानाच्या पंगतीत कवष बसलेला पाहून आर्य ऋषींनी त्याला 'कितव:, दास्या: पुत्र:, अब्राह्मण:' अशा शिव्या देऊन वाळवंटात तहानेने मरायला हाकलले. पण, त्याने 'जलपुत्र' हे १०.३० वे सूक्त गायला सुरुवात केल्याबरोबर सरस्वतीचा प्रवाह त्याच्याभोवती बागडू लागला. त्याची 'सिंधुवक्त्रमाया' पाहून स्तंभित झालेल्या ऋषींनी त्याला आपल्यात बोलावले. 'कितव' व 'अब्राह्मण' या शिव्यांचा अर्थच गाळपेर शेती ओलवण्याची कृषिमाया जाणणारा – असा होतो; आणि तो ऐलूषीपुत्र, म्हणजे मातृवंशक अनार्य, म्हणून त्याला 'दास्या: पुत्र:' ही शिवी दिली होती. *(६७) महाभारतकाळापर्यंत मातृसावर्ण्य प्रथा चालू असल्याने कुंतीसारख्या उच्चवर्णीय स्त्रिया विदुरासारख्या दासशूद्रवर्णीय पुरुषाशी नियोग करून युधिष्ठिरासारखे क्षत्रियपुत्र प्रसवू शकत होत्या. पण, नियोगातून विदुराचा वर्ण बदलला नाही, तो दासशूद्रच राहिला हे लक्षात घेणे महत्त्वाचे आहे.

सुरापान निषिद्ध होते असे पंजाबराव कोणताही पुरावा न देता म्हणतात. *(६८) ब्राह्मणी कर्मकाण्ड भांग वा सोमपानाशिवाय होऊ शकत नव्हते, मग अब्राह्मणी वा तांत्रिक मायाविधीत (कर्मकाण्ड नाही) दारू वा सुरापान निषिद्ध कसे असू शकेल? वनवासासाठी गंगा पार करताना तिला सीता नवस करते की, राम सुरक्षित परत अयोध्येला आला तर ती गंगेला मांसोदनाच्या पराती व सुरेचे घट अर्पण करील!

पंजाबरावांनी वैदिक कालखंडाचे दोन पक्ष मानले आहेत, एक देव, मनुष्य व पितरांचा; आणि दुसरा असुर, राक्षस व पिशाचांचा ! *(६९) यावर भाष्याची गरज नाही.

पाश्चात्य भांडवलदारी लोकशाही क्रांत्यांच्या प्रबोधनापर्यंत तत्त्वज्ञान धर्मापासून भिन्न नव्हते, असे पंजाबराव सांगतात. तरीही यूरोपीय तत्त्वज्ञानांचा उदय प्राचीन ग्रीक तत्त्वज्ञानांपासून झाला, तर भारतीय तत्त्वज्ञानांचा उदय उपनिषदीय तत्त्वज्ञानांपासून झाला, उदा. क्षत्रिय राजांचा ब्रह्मवाद वा अध्यात्मवाद, उद्दालक – आरुणीचा सर्वजीववाद

*(७१) व कपिलाचा सांख्यवाद. *(७२) उपनिषद् म्हणजे गुप्त ज्ञान नव्हते असे पंजाबराव जेव्हा म्हणतात, *(७३) तेव्हा त्यांची एकप्रवाही अन्वेषणपद्धत त्यांच्यावर पुन्हा मात करताना दिसते. गुप्त ज्ञान हा अर्थ केवळ व्युत्पत्तीत होता असे नाही. पंचाग्नीची अध्यात्मविद्या केवळ क्षत्रियांपुरती मर्यादित होती असे पंचाल राजा प्रवाहण जैवलि श्रोत्रिय उद्दालक आरुणीला बजावतो आणि उद्दालकाने प्रवाहणाचे विधिपूर्वक (तीर्थेण) शिष्यत्व पत्करल्यानंतरच तो ती त्याला शिकवतो, तर अश्वपति केकयांसारखे क्षत्रिय राजे आपले ब्रह्मवादी वा अध्यात्मवादी तत्त्वज्ञान पृच्छक ब्राह्मणांनी शिष्यत्व स्वीकारल्यानंतरच त्यांना सांगतात, खुद्द उद्दालक आपले सर्वजीववादी तत्त्वज्ञान श्वेतकेतू या आपल्या मुलाला शिष्य बनवल्यानंतरच सांगतो. यावरून ही ब्राह्मणी चातुर्वर्ण्यसमर्थक तत्त्वज्ञाने गुप्त तत्त्वज्ञाने होती हे सिद्ध होते. याउलट, अब्राह्मणी सांख्य व लोकायत तत्त्वज्ञाने चातुर्वर्ण्यविरोधी व स्त्रीस्वातंत्र्यवादी असल्यामुळे ती गुप्त ज्ञाने असू शकत नव्हती- हे मी 'दास-शूद्रांची गुलामगिरी, भाग २' च्या 'दास-शूद्रप्रथाक युगाची तत्त्वज्ञाने' या प्रकरणात दाखवले आहे. पंजाबरावांनी त्यांच्या प्रबंधात अपुरे ठेवलेले काम मी या खंडात व 'जातिव्यवस्थाक सामंती सेवकत्व' या दुसऱ्या खंडात पुरे केले आहे.



## संदर्भ ग्रंथ


(१) पी. एस. देशमुख, 'द ओरिजिन अँड डेव्हलपमेन्ट ऑफ रिलिजन इन वेदिक लिटरेचर (यापुढे केवळ 'प्रबंध'), पृ. २००-२०१.

(२) वि. भि. कोलते, 'अजुनि चालतोचि वाट,' १९९४, पृ. ५०६-५११.

(३) पां. वा. काणे, 'हिस्टरी ऑफ धर्मशास्त्र,' खं. १, १९३०, पृ. ७२.

(४) एम. रोझेन्यॉल व पी. युदिन (सं.), 'ए डिक्शनरी ऑफ फिलॉसॉफी,' पृ. ६०.

(५) प्रबंध, पृ. ३.

(६) उक्त, पृ.२४, २६-२७.

(७) उक्त, पृ. २८१.
(८) रामायण, ६.११-१६.
(९) प्रबंध, पृ. ३१६.
(१०) महाभारत, ३.३१२-३१४.
(११) बृहदारण्यक उपनिषद्, ३.३,७.
(१२) कार्ल मार्क्स, कॅपिटल, खं. १, पृ. ७१-८३.
(१३) प्रबंध, पृ. २४, २७-२९.
(१४) उक्त, पृ. २४, २९-३०.
(१५) उक्त, पृ. २४, ३०-३२.
(१६) श्रीकांत तलगेरी, 'आर्यन इन्व्हेजन थिअरी ॲण्ड इंडियन नॅशनॅलिझम,' १९९३, पृ. ३३८.
(१७) शरद पाटील, 'दासशूद्रांची गुलामगिरी,' भा. १,१९८२,पृ.४४२-४९.
(१८) श्रीकान्त तलगेरी, उक्त.
(१९) देबीप्रसाद चट्टोपाध्याय, 'लोकायत,' १९६९, पृ. ६३९.
(२०) शरद पाटील, उक्त, पृ. ५७.
(२१) भिक्खु जगदीसकस्सपो (सं.), सुत्तपिटके दीघनिकायपालि (३. पथिकवग्गो), पृ. ७३.
(२२) जॉर्ज थॉम्सन, 'स्टडीज इन एन्शन्ट ग्रीक सोसायटी,' खं. १, १९५४, पृ. ३६-३८.
(२३) देबीप्रसाद चट्टोपाध्याय, उक्त, पृ. ८७-९१.
(२४) प्रबंध, पृ. २४, ३२, इ.
(२५) जॉर्ज थॉम्सन, उक्त, पृ. ३८.
(२६) रा. वि. पटवर्धन, 'ऋग्वेदाचे सुरम्य मराठी भाषांतर,' प्रथम खण्ड, १९४२, पृ.४४८.
(२७) सिद्धेश्वरशास्त्री चित्राव, ऋग्वेदाचे मराठी भाषांतर , १९६९, पृ. २४३.+
(२८) प्रबंध, पृ. १८.
(२९) रा. वि. पटवर्धन, उक्त, द्वितीय खण्ड, पृ. ३४५ (बाकीची भाषांतरे समाधानकारक नाहीत.)
(३०) शरद पाटील, उक्त, पृ. २९४.
(३१) डी. डी. कोसांबी, 'मिथ अँड रिॲलिटी,' १९६२, पृ. ५२.
(३२) पां. वा. काणे, उक्त, खं. २, भा. १, १९४१, पृ. ४९३-४९४.
(३३) उक्त, खं. १, पृ. ७२.
(३४) श्रीकांत तलगेरी, उक्त.

(३५) प्रबंध, पृ. ९५.
(३६) उक्त, पृ. २१४.
(३७) उक्त, पृ. २१४-२१५.
(३८) शरद पाटील, उक्त, पृ. १०१-१०३.
(३९) श्री. दा. सातवळेकर (सं.), कृष्ण-यजुर्वेदीय संहिता, १९५७, पृ. १५६.
(४०) शरद पाटील, उक्त, पृ. १००-१०१.
(४१) प्रबंध, पृ. ३२५.
(४२) रा. वि. पटवर्धन, उक्त, पृ. २२४.
(४३) प्रबंध, पृ. ३२५.
(४४) उक्त, पृ. २१४.
(४५) उक्त, पृ. २३२.
(४६) शरद पाटील, उक्त, पृ. २३८, ३१५.
(४७) उक्त, पृ. ८१-८२.
(४८) रा. वि. पटवर्धन, उक्त, तृतीय खंड, १९४२, पृ. २४८-२४९.
(४९) शरद पाटील, उक्त, पृ. १७३.
(५०) उक्त, पृ. १३६.
(५१) उक्त, पृ. १०४, २०३.
(५२) प्रबंध, पृ. ३५०.
(५३) उक्त, पृ. २०७.
(५४) उक्त, पृ. ३२९.
(५५) डी. डी. कोसांबी, 'द कल्चर अँड सिव्हिलिझेशन ऑफ एन्शंट इंडिया इन हिस्टॉरिकल आऊटलाईन,' १९७२, पृ. ८२-८३.
(५६) प्रबंध, पृ. २०७.
(५७) सिद्धेश्वरशास्त्री चित्राव, उक्त, पृ. ७०६-७०७.
(५८) महाभारत, ४-६.९.
(५९) लक्ष्मण सरूप, 'द निघण्टु अँड द निरुक्त,' १९६७, पृ. २१०.
(६०) उक्त, पृ. २०१.
(६१) भिक्खू जगदीसकस्सपो (सं.), 'सुत्तपिटके दीघनिकायपालि,' (सीलवखन्धवग्गो), १९५८, पृ. १०४
(६२) प्रबंध, पृ. ४८-४९
(६३) तैत्तिरीय संहिता, ३.४.८
(६४) प्रबंध, पृ. ३४९-३५०

(६५) उक्त, पृ. ३५७
(६६) ए. ए. मॅक्डोनेल व ए. बी. कीथ, 'वेदिक इंडेक्स ऑफ नेम्स अँड सब्जेक्टस्,'- खं. १, पृ. १४३-१४४
(६७) शरद पाटील, उक्त, पृ. ३०२-३०५
(६८) प्रबंध, पृ. ३५५
(६९) उक्त, पृ. ३६४
(७०) उक्त, पृ. ९
(७१) शरद पाटील, उक्त, भा. २, पृ. २००,
(७२) उक्त, पृ. २३९, इ.
(७३) प्रबंध, पृ. १८९



# ज्ञान-कर्म-भक्ती यांचा त्रिवेणी संगम

-डॉ. रा. गो. चवरे

---

डॉ. पंजाबराव देशमुख यांचे व्यक्तिमत्व बहुआयामी होते. विद्यार्थी जीवनात त्यांनी अविरत ज्ञानसाधना केली. पुढे सामाजिक कार्यात स्वतःला झोकून दिले. तशातच त्यांना राजकारणात पडावे लागले. या दोन्ही क्षेत्रांतले त्यांचे कर्मप्रधान जीवन पाहाणाऱ्याला अंतर्मुख करून जाते. ज्ञान आणि कर्म या जीवनदायी गुणवैशिष्ट्यांच्या जोडीला अंगीकृत कार्याविषयी त्यांच्या मनात निर्विकल्प निष्ठा दिसून येते. या निष्ठेचंच दुसरं नाव भक्ती आहे. म्हणूनच 'ज्ञान-कर्म-भक्ती यांचा त्रिवेणी संगम' म्हणजे डॉ. पंजाबराव देशमुख.

डॉ. पंजाबराव हे ज्ञानमहर्षी होते. विद्यार्थी दशेपासूनच त्यांच्या ठिकाणी ज्ञानलालसा होती. म्हणूनच नियोजित क्रमबद्ध अभ्यासक्रम पूर्ण करताना ते विचारवंतांची ग्रंथसंपदासुद्धा वाचत असत. अभ्यासू विद्यार्थ्यांच्या सहवासात अधिक रमत. शिक्षणक्रम सुरू असतानाच त्यांच्या मिल्टन, स्पेन्सर, शेक्स्पिअर, शॉ-आदि श्रेष्ठ साहित्यिकांच्या मौल्यवान साहित्यकृती वाचून झाल्या होत्या. व्यास, वाल्मिकी, कालिदास, भवभूतीसारख्या भारतीय प्राचीन महाकवींच्या काव्याचा, मोरोपंतांच्या केकावली व टिळकांच्या गीतारहस्याचा त्यांचा गाढ व्यासंग होता. थोर साहित्यिकांच्या कलाकृतींविषयी आपले स्वतंत्र विचार ते व्यक्त करीत, त्यात मौलिकता असायची. संस्कृतविषयी त्यांना विशेष रुची होती. त्याचीच परिणती पुढे वैदिक साहित्याच्या संशोधनात झाली.

उच्च शिक्षणासाठी पुण्यात आल्यानंतर त्यांची ज्ञानलालसा विस्तारली. अखिल महाराष्ट्राचे तत्कालिन सांस्कृतिक केंद्र असलेल्या पुणे शहरात त्यांना साहित्यिक, संशोधक, विचारवंत, थोर नेते यांची व्यासंगपूर्ण व्याख्याने ऐकायला मिळाली. त्यांचे समुत्सुक अंतःकरण होईल तेवढे आत्मसात करायला नेहमीच उत्सुक असायचे. लो. टिळक व डॉ. ॲनी बेझंट यांचे चिंतनपर विचार त्यांच्या जिज्ञासू मनाला उत्कंठित करीत. याचवेळी त्यांनी शुद्ध, मार्मिक, अभ्यासपूर्ण भाषण-लेखनाकडे आपले लक्ष

केंद्रित केले. पुढे जर ते मंत्री झाले नसते तर प्रकांड पंडित म्हणून नावारूपाला आले असते. महाविद्यालयीन शिक्षण घेत असताना त्यांच्या जन्मजात तल्लख बुद्धिमत्तेमुळे प्रा. वा. ब. पटवर्धन, प्रा. केळकर, प्रा. खाडे या विद्वान प्राध्यापकांच्या मनात पंजाबरावांविषयी विशेष आपुलकीची भावना निर्माण झाली होती. कुशाग्र बुद्धिमत्तेच्या 'फर्ग्युसनची परंपरा' चालविणाऱ्या विद्यार्थ्यांत त्यांचा समावेश होत होता. ज्ञानार्जन कालखंडातील महत्त्वाची बाब म्हणजे चिकित्सक दृष्टी होय. ती त्यांच्या ठिकाणी प्रकर्षाने दिसून येते. त्यांची पुण्यातली दिनचर्या आदर्श विद्यार्थ्याची दिनचर्या होती: डॉ. केतकरांच्या विद्यार्थी जीवनाचे स्मरण करून देणारी. सतत लेखन, वाचन, मनन यांतच त्यांचा सारा वेळ व्यतीत व्हायचा.

परिस्थितीचा विचार करायलाही त्यांना उसंत नव्हती. त्यांच्या तत्कालीन जीवनाकडे पाहिल्यानंतर 'विद्यातुराणाम् न सुखम् न निद्रा' या उक्तीचे स्मरण व्हावे. मोठे शहर म्हटले की झगमगाट आलाच. मात्र त्यांची स्वतंत्र दृष्टी आणि निश्चित ध्येय असल्यामुळे इतरत्र लक्ष जावे असा त्यांना वेळच कुठे होता! त्या काळात त्यांनी आपल्या दैनंदिनीमध्ये लिहिलेले होते - ''इथले जीवन एक दिवस देखील मला प्रभावित करू शकत नाही. माझ्या अस्वस्थतेचे प्रमुख कारण आहे - मी कसं व्हायचं? हा एकमेव विचार!'' ज्ञानसत्त्वाचे सर्जन आणि संवर्धन याला विद्यार्थीदशा वाहिलेल्या पंजाबरावांच्या भावी कर्तृत्वसंपन्न जीवनाचीच जणू ती नांदी होती. ते केवळ पुस्तकी किड्यासारखे एककल्ली जीवन जगत नव्हते. नियमित व्यायामाकडेही त्यांनी लक्ष पुरविले. जणू 'शरीरमाद्यम् खलु धर्म साधनम्' हा विचार सदैव मनात बाळगून आपल्या प्रकृतीकडे ते लक्ष पुरवीत.

त्यांच्या व्यक्तिमत्वाला अनेक तेजस्वी पैलू असले तरी ज्ञानजिज्ञासेचा पैलू मात्र अधिक दीप्तिमान दिसतो. त्यांची वृत्तीच जिज्ञासू अभ्यासकाची होती. दुसऱ्या अभ्यासू व्यक्तीविषयी त्यांना तेवढाच आदर वाटायचा. इ.स. १९२४ ते १९२६ मध्ये ऑक्स्फर्ड विद्यापीठात डॉ. राधाकृष्णन् यांची 'तत्त्वज्ञान व धर्म : तौलनिक अभ्यास' -या विषयावर विद्वत्ताप्रचुर व्याख्याने होत. इंग्रजी भाषेवरील प्रभुत्व, विषयाचे सखोल ज्ञान, आशय प्रतिपादनाची उत्कृष्ट हातोटी यांमुळे ही व्याख्याने खूप गाजत. विद्यार्थी दशेतल्या पंजाबरावांची ती उत्कंठा जागवीत. एकाच वेळी दोन महत्त्वपूर्ण परीक्षांच्या अभ्यासाचा डोंगर डोक्यावर असतानासुद्धा ते वेळात वेळ काढून या व्याख्यानांना आवर्जून उपस्थित राहात. येथेच या दोघांचा परिचय झाला. पुढे इ. स. १९३२ मध्ये डॉ. राधाकृष्णन् नागपूर विद्यापीठाच्या दीक्षांत समारंभासाठी प्रमुख अतिथी म्हणून येणार असल्याबद्दलची स्वीकृती कळवितात, तेव्हा त्यात डॉ. पंजाबरावांना भेटण्याची आकांक्षा व्यक्त करतात. विद्वान् लोकांचा परिचय त्यांच्या दीर्घकाळ स्मरणात राहातो.

नव्हे, त्यातून जन्माचे ऋणानुबंध जोडले जातात. एरव्ही आजही समारंभांत कित्येकांचा एकमेकांशी परिचय होतो आणि समारंभ संपण्यापूर्वीच तो विस्मृतीच्या गर्तेत जमा होतो. पंजाबरावांची देशात आणि विदेशात कित्येक विद्वानांशी मैत्री होती आणि ती अखेरपर्यंत कायम राहिली. देश, विदेश असा भेद त्यांच्या मैत्रीच्या आड कधीच आला नाही. 'को विदेश स विद्यानाम् क: पर: प्रियवाणिनाम्' या उक्तीगत त्यांचे व्यक्तिमत्व होते.

त्यांचे भाषण संथ, सरळ आणि सहज असायचे. ऐकायला जे सहज वाटते ते बोलायला वाटते तेवढे सोपे नसते. त्यामागे वक्त्याची दीर्घ तपश्चर्या असते. चर्चिलची भाषणे सहज असली तरी ती अत्यंत परिश्रमपूर्वक तयार केलेली असायची. नित्याच्या व्यस्त जीवनात डॉ. पंजाबरावांना भाषण तयार करायला वेळच कोठे होता! कित्येकदा अनाहूत वक्त्यांमध्ये त्यांचा समावेश होई; आणि ऐन वेळेवर व्याख्यानासाठी उभे राहावे लागे. अशावेळी पूर्वतयारीविना ते समयस्फूर्त बोलत असत आणि ते त्यांचे बोलणेही तेवढेच प्रभावी वाटायचे. पुण्याच्या महाविद्यालयीन शिक्षणातच त्यांनी इंग्रजी, मराठी आणि संस्कृत या तिन्ही भाषांचा सूक्ष्म नि व्याकरणशुद्ध अभ्यास केला होता. इंग्लंडमध्ये गेल्यानंतर त्यांनी इंग्रजी व संस्कृतचा आणखी सखोल अभ्यास केला. चौफेर वाचनाने व विविध विषयांच्या विद्वानांच्या सहवासाने त्यांच्या व्यक्तिमत्वाला बहुश्रुतता आणि ज्ञानाला व्याप्ती लाभली. मात्र आपल्या व्याख्यानांतून त्यांनी तर्ककठोर पांडित्याचे प्रदर्शन कधी मांडले नाही. त्यांची व्याख्याने व्यासंगपूर्ण असूनही त्यांतील जिव्हाळा आणि सहजता पाहाण्यासारखी असायची. ते हिंदीही अस्खलित बोलत. ज्यांनी त्यांना इतक्या विविध भाषा सारख्याच सहजतेने बोलताना पाहिले त्यांना प्रश्न पडायचा की पंजबरावांची मातृभाषा कोणती? ते भाषाकोविद होते. आपल्या संबंधित विश्वाचे समृद्ध ज्ञान बाळगून होते. म्हणून पार्लमेंटमधील त्यांची अभ्यासपूर्ण भाषणे विशेष गाजली. ते उत्तम संसदपटू होते. त्यांच्या बोलण्यातील आशय आणि अभिव्यक्ती वेधक आणि उत्कट होती. त्यांच्या सत्त्वशील विचाराला प्रासादिक वाणीने हृदयस्पर्शी रूप लाभले. कित्येकदा भावनोत्तेजक, डौलदार वक्तृत्वाने ते श्रोत्यांना मंत्रमुग्ध करीत. संयुक्त महाराष्ट्र चळवळीत त्यांच्या वैचारिक परिपक्वतेचा सर्वांनाच प्रत्यय आला.

ज्ञानी व पंडित माणसाजवळ विनोदबुद्धी अपरूप असते. त्याला तेवढी उसंत नसते म्हणतात. डॉ. पंजाबराव याला अपवाद होते. त्यांचे ज्ञान विनोदाला पूरक होते. कधी कधी त्यांच्या साध्या बोलण्यातूनही विनोदी वृत्ती डोकावून जायची. एकदा संसदेत गोहत्याबंदी विधेयकावर गरमागरमीची चर्चा सुरू असताना – "हे विधेयक मंजूर न झाल्यास आपण आपल्या गृहमंत्रीपदाचा राजीनामा देऊ" – असे उद्‌गार गोविंद वल्लभ पंत यांनी काढले. सत्तारूढ पक्षाला मिळालेला हा घरचा अहेर होता. त्यामुळे

संसदेत तणाव निर्माण झाला. पंडित नेहरूंची विचित्र अवस्था झाली. तेव्हा प्रसंगावधान राखून डॉ. पंजाबराव लगेच बोलून गेलेत – ''फक्त गोहत्या बंदीच का? इतर पशूंचे काय? त्या मुक्या प्राण्यांची आपापसात भांडणे लावायची का?'' त्याबरोबर हास्याचा खळखळाट झाला. त्यांच्या जागृत विनोदबुद्धीचे दुसरे उदाहरण – सततच्या धावपळीने एकदा विमानातच त्यांना अर्धांगवायुचा झटका आला. तेव्हा ते शेजारी बसलेल्या सोबत्याला म्हणाले, ''अहो माझं अर्ध शरीर सेवानिवृत्त झालं.'' ही त्यांची विनोदवृत्ती प्रथमपासूनच त्यांच्या बोलण्यात दिसून येते. पुण्याला महाविद्यालयीन शिक्षण घेत असताना काही पुणेरी मित्रांनी मुद्दाम डिवचण्याच्या हेतूने त्यांना विचारणा केली, ''अहो, पंजाबराव! तुमच्या वऱ्हाडी स्त्रिया नेहमी बोलताना पुल्लिंगी क्रियापदे का वापरतात?'' हजरजबाबी पंजाबराव बोलून गेले, ''ते त्यांच्या मर्दानीपणाचे लक्षण आहे.'' विनोदातून ते प्रतिपक्षाला निरुत्तर करीत. त्यांचे पांडित्य त्यांच्या विनोदाची आडकाठी कधीच ठरले नाही. तसेच आपल्या पांडित्याचे त्यांनी जनमानसावर कधी दडपणही आणले नाही. सर्वसामान्यांतील एक होऊनच ते राहात. त्यांनी 'महापंडित' ही संशोधन क्षेत्रातील एक उच्च पदवी प्राप्त केल्यानंतर डॉ. आबासाहेब खेडकरांनी अमरावतीला जोशी हॉलमध्ये समारंभ आयोजित करून त्यात डॉ. पंजाबरावांचा भव्य सत्कार घेतला. त्या सत्काराला उत्तर देणाऱ्या त्यांच्या विनम्र व्यक्तिमत्वाचा सर्वांना पुन:प्रत्यय आला. त्यांच्या व्याख्यानातून बौद्धिक चमक असली तरी त्याहून अधिक सहजताच प्रतीत व्हायची.

पं. नेहरू विदेशात असताना त्यांना विचारमग्न पाहून कोणीतरी विचारले? –''आपण सध्या कशाच्या विचारात आहात?'' त्यावर ते उत्तरले, –''भारतात गेल्यावर डॉ. ह. वि. कामत आणि डॉ. पंजाबराव देशमुख मला कोणते प्रश्न विचारणार? आणि त्यांना कशी उत्तरे द्यायची, त्याच चिंतेत मी आहे.'' यावरून डॉ. पंजाबरावांच्या सखोल आणि व्यापक विद्वत्तेची जाणीव होते. राजकारण हा त्यांचा पिंड नव्हता. अंगच्या विद्वत्तेमुळेच त्यांना राजकारणात सन्मानपूर्वक प्रवेश मिळाला. आणि तेथे त्यांच्या प्रखर बुद्धिमत्तेने दिपून जाऊन कित्येक महाभागांनी त्यांना मागे लोटण्याचाही प्रयत्न केला.

डॉ. पंजाबरावांनी वादग्रस्त ठरलेल्या तत्कालीन ब्राह्मणेतर चळवळीत सहभागी होण्यास ठाम इन्कार केला. अवतीभोवतीच्या व्यवस्थेचे त्यांना सखोल ज्ञान होते. त्यांच्यावर टीकाही झाली. त्यांनी त्याची पर्वा केली नाही. उलट स्वत: स्वतंत्रपणे 'शेतकरी पक्ष' स्थापन केला आणि ग्रामीण परिसरातल्या, तळागाळातल्या लोकांपर्यंत आपला संदेश पोहोचावा म्हणून 'महाराष्ट्र केसरी' हे साप्ताहिक सुरू केले. यातील लेखांत त्यांच्या व्यापक दूरदृष्टीचा व समाजाच्या सर्व वर्गांची सांगोपांग माहिती

ळगणाऱ्या अभ्यासू वृत्तीचा प्रत्यय येतो. येथे या प्रकांड पंडिताच्या साध्या, सरळ व दयाला भिडणाऱ्या आणि अंतर्मुख करणाऱ्या शैलीचे आगळे सुवासिक रूप हाण्यासारखे आहे. 'शैली शीलानुवर्तिनी' असल्याने नकळत त्यांच्या व्यक्तित्वाचे र्शन ती देऊन जाते. 'आचारे शुचिता, गुणे रसिकता, शास्त्रेऽ ति विज्ञानता' अशा णांनी संपन्न असलेले पंजाबराव विद्वानांना आपलेसे करताना जनसामान्यांना प्रिय ावेत, यात आश्चर्य कसले! प्रथम श्रेणीची विद्वता असूनही बालकांशी वागताना ते ोडकर व खेळकर बनत. अशावेळी नकळत, ''प्रौढत्वी निज शैशवास जपणे बाणा वीचा असे''- ही केशवसुतांची काव्यपंक्ती आठवते. ते कविहृदयाचे होते. १९६० ली हीरकमहोत्सवदिनी 'म्हणोनी आदर्श तुका माझा' या शीर्षकांतर्गत त्यांची अभंगरचना ाली होती. याव्यतिरिक्त, आजारी असतानाही त्यांनी काही कविता केल्या होत्या. त्वज्ञानाची बुद्धी असलेल्या पंजाबरावांची गायन-वादनाची आवडही अशीच सुखवून ाते. आपल्या श्री शिवाजी शिक्षण संस्थेत संगीत, शिल्प, चित्र आदि ललितकलांना धान्य देण्यावर त्यांचा भर होता. त्यांच्या मनात कलेविषयी निःसीम भक्ती होती. मरावतीच्या श्री शिवाजी महाविद्यालयात स्नेहसंमेलन प्रसंगी बसविलेल्या वप्रवासवदत्ता' या नाटकातल्या एका गीताला त्यांनी 'मानापमान' नाटकातील गीताची क चाल सुचविली होती. विशेष म्हणजे प्रस्तुत नाटकाची तालीम सुरू असताना त्रांसोबत भाऊसाहेब साभिनय नृत्य करू लागले. उपरोक्त सर्व बाबींचा साकल्यात्मक चार केल्यास त्यांच्या मनात कलेविषयी असलेल्या भक्तीचीच साक्ष पटते. त्यांचा ंड कलावंताचा होता, असे म्हटल्यास अतिशयोक्ती ठरू नये. मात्र त्यांच्या जीवनाची शा पाहिल्यानंतर लक्षात येते की, त्यांना कलासाधना करायला पुरेसा अवकाश पलब्ध होणे शक्य नव्हते.

इंग्लंडमधील विद्यार्थी जीवनातील पंजाबरावांची ज्ञानसाधना स्तिमित करणारी आहे. टिश म्युझियमच्या समृद्ध ग्रंथालयात बसून ते अभ्यास करायचे. देशोदेशीचे बुद्धिवान द्यार्थी तेथेच बसून निवांत अभ्यास करीत. हे ग्रंथालय म्हणजे इंग्लंडची अस्मिता. ाचा अधिकाधिक लाभ उठविण्याची पंजाबरावांची मनीषा होती. एकसमयावच्छेदेकरून बॅरिस्टर व डॉक्टरेट अशा दोन उच्च पदव्यांचा अभ्यास करीत होते. संस्कृतच्या र्वोत्तम विद्यार्थ्याला मिळणारी दरमहा शंभर पौंडाची व्हॅन्स डनूलॉप संस्कृत रिसर्च कॉलरशिप त्यांना मिळत होती. ही त्यांच्या बुद्धिमत्तेचीच साक्ष होय जणू! या ाष्यवृत्तीमुळे इंग्लंडमधील राहाण्याचा त्यांचा खर्च कसाबसा भागत होता. 'वैदिक ाङ्मयातील धर्मांचा उद्गम, विकास व त्यांचा पारस्परिक संबंध' या विषयावर त्यांचे शोधन कार्य सुरू होते. मात्र आर्थिक विवंचनेमुळे कमीत कमी कालावधीत आपले शोधन कार्य पूर्ण होण्यासाठी प्रबंधाचा विषय त्यांनी कमी केला. काही तांत्रिक

अडचण येत नसल्यास आपणास 'वैदिक वाङ्मयातील धर्माचा उद्‌गम व विकास' एवढ्याच विषयावर संशोधनास परवानगी मिळावी असा ऑक्सफर्ड विद्यापीठाला त्यांनी विनंतीअर्ज सादर केला. तशी सिनॉप्सीसमध्ये दुरुस्तीही केली. विद्यापीठाने त्यांना मान्यता दिली. शिस्त, नियमित अखंड अभ्यास आणि अविरत परिश्रम यांमुळे त्यांचा सखोल व मौलिक असा प्रबंध तयार झाला आणि ऑक्स्फर्ड विद्यापीठाने त्यांना समारंभपूर्वक डॉक्टरेटच्या डी. फिल्. पदवीने सन्मानित केले. या प्रबंधात त्यांच्या तल्लख बुद्धिमत्तेचे नि तर्कशुद्ध निष्कर्षांचे दर्शन घडते. त्यांचा प्रस्तुत प्रबंध ऑक्स्फर्ड युनिव्हर्सिटी प्रेसने इ. स. १९३३ मध्ये मुद्रित स्वरूपात प्रकाशित केला. यातून भाऊसाहेबांच्या प्रकांड पांडित्याचे दर्शन घडते. त्यांचा तर्कशुद्ध बुद्धिप्रामाण्यवाद या विद्वत्ताप्रचुर विशाल प्रबंधातून अभ्यासकांना नवी दृष्टी देतो. येथे सामान्य वाचक चकित होतो. या ग्रंथातील चौदा प्रकरणे चार भागांत विभागली आहेत. भूतलावरील वैदिक देव, दैवतीकरण, असुरवाद, वैदिक साहित्य आणि संस्कृती, विधियुक्त कर्मकांड, धर्माचे स्वरूप, त्याची व्याप्ती व परिभाषा, आर्यांचे मूळ स्थान, हिंदी-युरोपीय धर्मसंप्रदाय-यांवर त्यांनी प्रकाश टाकलेला आहे. त्यांच्या संशोधनात मार्मिक व अचूक दृष्टी आहे. सुबोध आणि ओघवती इंग्रजी भाषेत त्यांनी केलेले हे संशोधन लेखन पीएच्. डी. करणाऱ्या जिज्ञासू विद्यार्थ्याला आदर्श ठरणारे आहे. भाऊसाहेबांच्या शास्त्रशुद्ध, पूर्वग्रहविरहित अभ्यासू मन:प्रवृत्तीचा हा सज्जड पुरावा ठरावा.

डॉ. पंजाबरावांचा पिंड कुशाग्र बुद्धिमत्तेच्या अभ्यासू विद्यार्थ्याचा होता. पुण्याच्या फर्ग्युसन कॉलेजमध्ये शिक्षण होत असतानाच त्यांच्या ध्येयाधिष्ठित विचाराची पायाभरणी झाली होती. इंग्लंडमध्ये ऑक्स्फर्ड विद्यापीठात प्रवेश घेतल्यानंतर त्यांच्या या विचारसरणीला भक्कम अधिष्ठान प्राप्त झाले. येथेच देशोदेशीच्या तल्लख बुद्धिमत्तेच्या होतकरू विद्यार्थ्यांचा त्यांना सहवास लाभला. शिकून नोकरी करावी ह्या परंपरागत विचाराला त्यांनी येथेच हद्दपार केले. त्यामुळे आय्. सी. एस्.च्या अभ्यासाचा प्रश्न केव्हाच निकालात निघाला होता. दि. २८-९-२१ रोजी इंग्लंडवरून पाठविलेल्या पत्रात ते लिहितात, '...आय्. सी. एस्. होण्यापेक्षा जगात हजारो पटींनी चांगल्या लोकहिताच्या व त्याचबरोबर कीर्तीच्या अशा कितीतरी गोष्टी आहेत. हिंदुस्थानला आज खरी गरज नि:स्वार्थी व स्वतंत्र बाण्याच्या माणसांची आहे. ही गरज काही अंशी जर भरून न काढली तर मी व्यर्थ जन्माला आलो असे समजेन. या माझ्या विचारांशी सरकारी नोकरीची बेडी पायात अडकवून घेणे अगदी विसंगत आहे, हे आपणास दिसून येईल...'' यातून ज्ञानलालसेबरोबरच त्यांच्या लोकोत्तर राष्ट्रीय मनोवृत्तीचेही दर्शन घडते.

डॉ. पंजाबरावांच्या बुद्धिवैभवाने व शिस्तशीरपणाने स्वातंत्र्यपूर्वकालीन इंग्रज

धिकारीही प्रभावित होत. मंत्रीपदावरून खाली आलेल्या पंजाबरावांना पूर्वीचे संबंधित धिकारी भेटायला येत ते त्यांच्या कार्याविषयी मनात खात्री व विश्वास बाळगून. आज मंत्र्यांना आपल्या संबंधित खात्याचे सखोल ज्ञान असतेच असे नाही. पंजाबरावांना त्र आपल्या स्वत:च्या खात्याचे तर सखोल व सूक्ष्म ज्ञान असायचेच, शिवाय त्या ात्याशी संबंधित इतरही खात्यांचे ते अद्ययावत् ज्ञान बाळगून असत. स्वातंत्र्यपूर्व ाळात इंग्रजी राज्यपद्धतीत शिक्षणमंत्री असताना ते कृषिखात्याविषयी सांगोपांग मयुक्त चर्चा करीत. वऱ्हाडच्या शेतकऱ्यांची दैन्यावस्था हा तर त्यांच्या नित्य चिंतेचा ाणि चिंतनाचा विषय होता.

सामान्यपणे जे ज्ञानी असतात, ते पढित पंडितासारखे वाचिवीर असतात. त्यांचा यक्ष कृतीशी क्वचितच संबंध येतो. याही बाबतीत पंजाबराव अपवाद होते. विचारापेक्षा र्मावर ते अधिक विश्वास ठेवणारे होते. ते खरोखरच कृतिपुरुष (Man of Action) ते– किंबहुना त्यांचे संपूर्ण जीवन म्हणजे कर्मयज्ञच होता. इंग्लंडमधून बार-ॲट- ॉ आणि डी. फिल्. या उच्च दर्जाच्या पदव्या प्राप्त करून भारतात आल्यावर त्यांनी विध सामाजिक कार्यांसाठी स्वत:ला वाहून घेतले. प्रथमत: अमरावतीला वकिली रीत असताना दुपारी पाच वाजेपर्यंत कामकाज आटोपल्यानंतर मराठा हायस्कूलमध्ये ऊन ते विद्यार्थ्यांना शिकविण्याचे काम करीत, तेही विनामूल्य; केवळ सेवाभावी तीने. त्यांचे विशेष संस्मरणीय कार्य म्हणजे श्री शिवाजी शिक्षण संस्थेची स्थापना. स. १९३२ मध्ये रुजलेला हा अंकुर आज प्रचंड वटवृक्षाप्रमाणे डौलात उभा आहे. टवृक्षाला असंख्य पारंब्या फुटाव्यात त्याप्रमाणे श्री शिवाजी शिक्षण संस्थेअंतर्गत विध शैक्षणिक उपसंस्था निघाल्या. त्यांचा व्याप आणि विस्तार आज वटवृक्षाप्रमाणे टतो. हे सारे डॉ. पंजाबरावांनी दूरदृष्टीने केलेल्या कर्माचे फळ होय. त्यांच्या ठिकाणी सलेल्या अढळ आत्मविश्वासाला अदम्य परिश्रमाची जोड होती. विशेषत: त्यांनी ा काळात हे कार्य केले त्या काळाच्या पार्श्वभूमीवर त्यांच्या या कार्याचे मूल्यमापन ले तर ते अधिकच डोळ्यात भरते. डॉ. पंजाबराव कर्म करीत राहायचे; यशापयशाची ांना पर्वा नव्हती. सोबतीला कोणी असले तर ठीकच. अन्यथा 'एकला चलो रे' – त्यांचा बाणा होता. प्रतिकूल परिस्थितीत कर्तव्याची चढण चढणारा हा माणूस णजे जणू काही 'किरणांचा उधळून पिसारा देवदूत कोणी, काळोखावर खोदित मला तेजाची लेणी'. थांबणे हे त्याला माहीतच नाही जणू. त्यामुळे विविध ठिकाणी ळा सुरू केल्यानंतर त्यांनी खेड्यापाड्यांत शेतकऱ्यांच्या 'कुडा'च्या घरापर्यंत जाऊन, ंच्यासोबत ओला कोरडा घास खाऊन त्यांना शिक्षणाचे महत्त्व पटवून देऊन मुलांना ळेत प्रवेश देण्याची विनंती केली.

खेड्यांतील दारिद्र्य, अज्ञान, शोषण, विषमता पाहून पंजाबरावांचे अंत:करण

पिळवटून निघे. कारण या मातीतून ते घडले होते. त्यामुळे त्यांची मातीची ओढ रक्तातच होती. अमरावती जिल्हा कौन्सिलचे अध्यक्ष झाल्यावर त्यांनी शिक्षण सक्तीचे केले. शिक्षणकर सुद्धा वाढविला. श्रद्धानंद छात्रालय सुरू करून समाजाच्या विविध स्तरांतल्या गरीब होतकरू विद्यार्थ्यांना अत्यल्प दरात राहाण्याची व जेवणाची व्यवस्था केली. सर्व जातीधर्मांच्या विद्यार्थ्यांना सामावून घेणारे हे छात्रालय म्हणजे सामाजिक समतेचे प्रतीक वाटावे. त्यांच्या या कार्याने गाडगेबाबा विशेष प्रभावित झाले. आपल्या कीर्तनातून ते डॉ. पंजाबराव व कर्मवीर भाऊराव यांच्या शैक्षणिक कार्याचा आवर्जून उल्लेख करीत. ''जीवनात ज्याला काहीच मिळाले नाही त्याला काहीतरी मिळावे - म्हणूनच मी शिक्षणसंस्था काढल्या'' -असे डॉ. पंजाबराव नेहमीच म्हणत. गुणवत्तेचा निकष वापरून प्रवेश देणाऱ्या संस्थांवर ते टीका करीत. ओबड धोबड दगडांतून शिल्पकार मूर्ती घडवितो: ती मूर्ती त्या दगडातच असते. तिच्यावरचा अनावश्यक भाग तो काढून टाकतो- हे त्यांचे तर्कशुद्ध विवेचन. त्यामुळेच विदर्भाच्या खेड्यापाड्यात शिक्षित तरुणांची पिढी निर्माण झाली.

त्यांचे शैक्षणिक कार्य अजोड आहे. आपल्या संस्थेतील लोकांविषयी त्यांना विशेष आत्मीयता असायची. कोणी दु:खात, संकटात सापडले की ते लगेच धावून जात. त्यांच्यावर मदतीचा, सहकार्याचा वर्षाव करीत व स्वत:च आनंदी होत. संस्थेतील माणसांविषयी त्यांना प्रेम असले तरी त्यांच्या कर्तव्यपालनातील बेशिस्तपणा ते खपवून घेत नसत.

डॉ. पंजाबराव चालता फिरता महत्त्वाची कामे करीत. बसता उठता महत्त्वाच्या सूचना देत. त्यातून त्यांची सावध दूरदृष्टी व कर्तव्यपरायणताच प्रतीत होते. कार्यालयात दहाबारा तास काम केल्यानंतर ते हसतमुखाने बाहेर पडत. जणू त्यांच्या मुखावर हास्याच्या रेषा कायम स्वरूपाच्या कोरलेल्या होत्या. कितीही कठीण आणि आव्हानात्मक काम पूर्ण केल्यानंतर कसला त्रागा नाही की कसली चिडचीड नाही. आज दिवसभर काम करणारी माणसे सायंकाळी कार्यालयातून बाहेर पडताना चिडखोर झालेली दिसतात. निदान आपण केलेल्या कार्याचा पाढा दुसऱ्यासमोर वाचून ती कृतार्थ होताना दिसतात. चीड, त्रागा हे शब्द पंजाबरावांच्या गावीही नव्हते. सतत काम आणि काम. इतरांनीही कामे करावीत, अशी त्यांची माफक अपेक्षा असे. कर्तव्यपरायण माणसाचे ते तोंडभर कौतुक करीत. त्याच्या पाठीवरून कौतुकाचा हात फिरवीत. असे हे कर्तव्यरत माणसाचे मनाचे उमदेपण. इतरांपासून काही घेण्यासारखे असले तर विनासंकोच तेही घेत.

एकदा कोऱ्या सकाळी गाडगेबाबा डॉ. पंजाबरावांच्या बंगल्यावर त्यांना भेटायला आले. पंजाबराव झोपले असल्याचे पाहून त्यांनी एक झाडू शोधला आणि बंगल्याच्या

समोरचे आवार झाडायला सुरुवात केली. काही वेळाने पंजाबराव उठून बाहेर आले आणि दोघांची भेट होऊन काही महत्त्वाचे बोलून गाडगेबाबा त्वरेने निघून गेले. लगेच पंजाबरावांनी हातात झाडू घेतला आणि गाडगेबाबांचे झाडायचे काम पूर्ववत् सुरू केले. तेवढ्यात त्यांना भेटायला प्राचार्य, प्राध्यापक, मुख्याध्यापक, शिक्षक असे एकामागोमाग एक येत गेले. पंजाबरावांना झाडण्यात व्यस्त असलेले पाहून प्रत्येकजण झाडू आणून परिसर, रस्ते झाडायला लागले. खूप वेळपर्यंत हे काम चालत राहिले. आजच्या गाडगेनगरपर्यंतचा रस्ता झाडून साफ झाला. नंतर सर्वजण एकत्र बसले. तेव्हा डॉ. पंजाबरावांनी आनंदाने सांगितले – "आज सकाळी गाडगेबाबांनी मला हा झाडायचा मंत्र दिला."

डॉ. पंजाबरावांच्या मनात गाडगेबाबांविषयी अशी आदर्श कर्मप्रधान भक्ती होती. गाडगेबाबा कोणाला आपल्या पाया पडू देत नसत. मात्र डॉ. पंजाबरावांच्या ते पाया पडत. 'दिव्यत्वाची जेथ प्रचीती, तेथे कर माझे जुळती' या काव्यपंक्तींची सार्थता त्यांच्या भक्तीत होती. मात्र ही भक्ती पारंपरिक कर्मशून्य भक्ती नव्हती. कर्माला ईश्वर मानून आजन्म त्यांच्या सेवेत व्यस्त राहाणारे हे दोन्ही मानवतावादी पुरुषोत्तम होत.

गाडगेबाबा आणि राष्ट्रसंत तुकडोजी या समकालीन वैदर्भीय संतांविषयी डॉ. पंजाबरावांच्या मनात अपार श्रद्धा होती. 'मंदिरी बैसोनि नाक दाबावे। त्यापेक्षा मार्गीचे काटे उचलावे' –असा कर्मप्रधान जीवनाचा संदेश देणारे राष्ट्रसंत आणि रंजल्या गांजल्यांची स्वहस्ते सेवा करणारे गाडगेबाबा म्हणजे कर्मप्रधान संस्कृतीची मूर्तिमंत प्रतीके होत. अविकारी श्रद्धेचेच दुसरे नाव भक्ती होय. मात्र त्यांची ही भक्ती एका ज्ञानी माणसाची भक्ती होती. तिला विद्वत्ता व बुद्धिप्रामाण्यवादाची जोड होती. त्यामुळे ती डोळस होती. परंपरेहून भिन्नत्व राखून होती. तिच्यात कर्माला प्राधान्य होते आणि हे कर्म ज्ञानोत्तर होते. त्यामुळे त्यात दूरदृष्टी, सदसद्विवेक, तर्काधिष्ठित विचारपरिप्लुतता निहित होती. समाजाच्या उन्नतीची आंतरिक तळमळ त्यात होती. परंपरागत अध्यात्ममार्गात भक्ती ही आत्म्याच्या विकासाची पायवाट असते. पंजाबरावांना तर समाजाचे पुनरुत्थान हवे होते. त्यांच्या कार्याचे वर्तुळही किती प्रचंड! संपूर्ण समाजाच्या मानसिकतेचा दूरगामी दृष्टिकोणातून विचार करून त्याच्या अभ्युदयाच्या नवनव्या वाटा कशा चोखाळता येतील, तात्पुरते कडू पण अंतिमदृष्ट्या समाजोपयोगी असे निर्णय कसे घेता येतील यांविषयी त्यांचे अहोरात्र चिंतन सुरू असायचे. कर्मालाच आराध्य दैवत मानून त्याच्या सफलतेत कृतार्थ होणारे पंजाबराव आधुनिक काळातील ज्ञान, कर्म आणि भक्ती यांचा त्रिवेणी संगम झालेले महर्षी वाटायला लागतात.

पंजाबराव जसे ज्ञानमहर्षी आहेत तसे ते कर्मयोगी आहेत. मात्र त्यांच्या कार्यात भक्ताची निष्ठा आहे. अध्यात्मात परमोच्च पातळीवर देव आणि भक्त यांचे अद्वैत

निर्माण होते म्हणतात. गाडगेबाबांना पूज्य मानणारे पंजाबराव आणि पंजाबरावांना आदर्श मानणारे गाडगेबाबा, दोघे आपापल्या ठिकाणी रूढ चाकोरी बाहेरचे जीवन जगताना दिसतात. दोघेही समान पातळीवर येतात. म्हणूनच पंजाबराव जेव्हा भारत सरकारच्या मंत्रिमंडळात कृषिमंत्री झाल्यानंतर प्रथम अमरावतीला आले तेव्हा त्यांच्या स्वागत समारंभस्थळी गाडगेबाबा खराटा घेऊन झाडलोट करीत होते. डॉ. पंजाबराव जेव्हा मोटारीतून खाली उतरले तेव्हा गाडगेबाबांनी चक्क त्यांच्या पायावर लोळण घेतली आणि पुटपुटले-

*''आजि फिटले माझे कोडे*
*जन्मोजन्मीचे साकडे*
*कोंदाटले पुढे*
*परब्रह्म सावळे''*

व लगेच पाहाता पाहाता गर्दीत नाहीसे झाले. असे हे दोघांचे जिवाभावाचे नाते. सामान्यांत राहून असामान्यत्वाचा वेध घेतलेले डॉ. पंजाबराव सामान्यांना आदर्श होते. ते संस्कृतचे गाढे पंडित होते. संशोधनासाठी वैदिक वाङ्मयातील धर्माची त्यांनी निवड केली होती. वेदांताविषयी त्यांना सादर उत्सुकता: मात्र ती बुद्धिप्रामाण्याधिष्ठित व चिकित्सक. निरपेक्ष कर्मावर त्यांचा अढळ विश्वास. त्यामुळे कर्मसाफल्यात फलप्राप्तीविनाही सुख अनुभवणारे. देशविदेशांच्या अनुभूति संपन्नतेने व्यक्तिमत्वात आलेली सर्वंकष दूरदृष्टी त्यांना कर्माकर्माची जाणीव करून देणारी. म्हणूनच वर्तमान युगसमस्या सोडविण्यासाठी ''राजैव युगमुच्यते'' हा राजसत्तेचा प्रभाव ओळखल्यामुळे सक्रिय राजकारणात त्यांनी सहभाग घेतला. पदे पादाक्रांत केली आणि त्यांचा विनियोग पुन्हा समाजपुरुषाच्या पुनरुत्थानासाठी केला. ढगांनी वाफेच्या रूपाने खाऱ्या समुद्राकडून पाणी घ्यावे आणि पावसाच्या रूपाने विपुल प्रमाणात त्याला परत करावे, तसे हे डॉ. पंजाबरावांचे महनीय कार्य. १९२७ साली त्यांनी राजकारणात उतरण्याचे ठरविले होते ते समाजकारणासाठीच. ज्ञान, कर्म आणि भक्तियुक्त उच्चविद्याविभूषित संपन्न व्यक्तिमत्त्वाचे ते राजकारण भावनेपेक्षा तत्त्वाला आणि विचारापेक्षा कृतीला महत्त्व देणारे होते. भारतीय राजकारणात अशी लोकोत्तर माणसे केवळ अपवादात्मक सापडतात. मात्र ती आपल्या कार्यप्रणालीने विद्युल्लतेप्रमाणे सर्व दिशांत चमकून जातात.

घटना समितीचे सन्माननीय सदस्य म्हणून झालेली त्यांची नियुक्ती म्हणजे त्यांच्या ज्ञानी व्यक्तिमत्वावर झालेले शिक्कामोर्तबच होय. या निमित्तानें व नंतर भारत सरकारचे कृषिमंत्री असताना देशोदेशीच्या विद्वानांशी त्यांचा झालेला परिचय नि त्याची मैत्रीत झालेली परिणती त्यांच्या व्यक्तिमत्वाचा पुन्हा नव्याने विचार करायला भाग पाडणारी आहे. इंग्लंड, अमेरिका, जपान, फ्रान्स, रशिया, इटली यांसारख्या देशातले त्यांचे

विचारवंत मित्र पाहिले म्हणजे त्यांच्या ज्ञानाची पातळी लक्षात यायला वेळ लागत नाही. दिल्लीला १९५९-६० साली आयोजित केलेली 'जागतिक कृषि प्रदर्शनी' म्हणजे त्यांच्या ठिकाणी असलेल्या ज्ञान आणि कर्म या दोन्ही गुणांचा मुक्ताविष्कार होय.

माणसामाणसातील सानथोरपण त्यांच्या मैत्रीच्या आड येत नव्हते. म्हणूनच इटलीच्या अन्नमंत्र्यापासून श्री शिवाजी शिक्षणसंस्थेतल्या चपराशापर्यंत सर्वांशीच ते सारख्या स्नेहाने वागायचे. ते पारंपरिक दृष्टीने अध्यात्मवादी नव्हते. मात्र 'सर्वांभूती समत्व' हा भाव त्यांच्या अंत:करणात रुजलेला होता. त्यामुळे राजकारण आणि समाजकारण ही दोन्ही क्षेत्रे त्यांनी आपलीशी केली तरी समाजकार्याला प्राथमिकता दिली. यावरूनही त्यांच्या विचारांची दिशा लक्षात येते.

बुद्धिवान माणसाचे चौफेर, व्यापक, सखोल वाचन असते. त्याचा अनुभूतीचा आवाका प्रचंड असतो. त्यामुळे कोणत्याही महत्त्वपूर्ण गोष्टींचा निर्णय घेताना तो विचारव्युहात गुरफटतो. 'To be or not to be' - अशी त्यांची अवस्था होते. शंकानिरसन, पुन्हा शंका-उद्भव अशा वर्तुळात घुटमळत राहिल्याने प्रत्यक्ष निर्णयाला निलंब लागतो. पंजाबरावांचे तसे नव्हते. न डगमगता नि कालापव्यय न करता ते निर्णय घेत व तो त्वरित अंमलात आणीत. तात्पर्य, विचारापेक्षा ते कृतीला अधिक महत्त्व द्यायचे. ते विचारवंत होते. मात्र विचारांच्या जंजाळात अडकून पडणारे पढिक पंडित नव्हते. तर्कशुद्ध विचार आणि विनाविलंब आचार असे 'कृतिशूर' (Man of action) होते. वि. भि. कोलते यांनी प्राध्यापकपदाचा इंटरव्ह्यू दिल्यानंतर झारीतल्या शुक्राचार्यांनी हेतुपुरस्सर त्यांच्या नियुक्तीचा घोळ निर्माण केला. पंजाबराव तेव्हा इंग्रज सरकारच्या मंत्रीमंडळातील शिक्षणमंत्री होते. त्यांनी सरळ त्या एकूण प्रकरणाची तलस्पर्शी सखोल चौकशी करून अनेक वैगुण्यांसह इंटरव्ह्यू कमिटीची अवैधताच उजेडात आणली. एवढेही करून वि. भि. कोलत्यांना नियुक्ती मिळत नसेल तर स्वत: मंत्रीपदाच्या राजीनाम्याची तयारी ठेवली. ही त्यांची गर्भित धमकी नव्हती. तत्त्वपालनार्थ निरपेक्ष बुद्धीने पदत्याग करण्याची खरी तयारी होती. शेवटी कोलत्यांना नियुक्ती मिळाली. इंग्रजी अमदानीतल्या या एकूण प्रसंगात इंग्रज अधिकाऱ्यांची नाचक्की झाली. त्यांनी आपली चूक सुधारली. या प्रसंगातून पंजाबरावांच्या सर्वांगीण बुद्धिमत्तेबरोबरच त्यांच्या धैर्यवान व्यक्तित्वाची प्रचीती येते.

पंजाबरावांनी अध्यात्मातल्या परंपरागत भक्तीच्या संकल्पनेला विशाल राष्ट्रभक्तीची जोड प्राप्त करून दिली. त्याचे ज्वलंत उदाहरण म्हणजे इ. स. १९४६ सालची घटना. तेव्हा क्रांतिसिंह नाना पाटील वऱ्हाडात येऊन भाषणाच्या माध्यमातून सातारा जिल्ह्यातल्या त्यांच्या कार्याची माहिती देणार होते. मात्र तत्कालीन मध्यप्रदेश शासनातील श्री.

रविशंकर शुक्ल आणि पं. द्वारकाप्रसाद मिश्र यांनी त्यांच्या भाषणावरच बंदी घातली. त्यामुळे संपूर्ण वऱ्हाडात संतापाची लाट उसळली. स्वातंत्र्य संग्रामातील एका क्रांतिकारकाच्या भाषणावर बंदी - हा देशवासीयांना आपला अपमान वाटला. या नेमक्या वेळी पंजाबराव पुढे आले आणि त्यांनी मध्य प्रदेश सरकारचे आव्हान स्वीकारून क्रांतिसिंहांना वऱ्हाडात आणून उत्साहाने गावोगाव नेले. सभा संपन्न केल्या. बदल एवढाच केला की, क्रांतिसिंह व्यासपीठावर उपस्थित राहात आणि पंजाबराव त्यांचे विचार बोलत. पंजाबरावांच्या बोलण्यातून एकीकडे जाज्वल्य देशभक्ती तर दुसरीकडे मध्यप्रदेश सरकारच्या रविशंकर शुक्ल आणि द्वारकाप्रसाद मिश्र यांचा खरपूस समाचार असायचा. तत्कालीन मराठी दैनिक 'राष्ट्रदूत'मध्ये ते प्रकरण खूप गाजले. भारतीय स्वातंत्र्यासाठी लढा देणारे म. गांधी असोत की नेताजी सुभाषचंद्र बोस असोत- दोघांविषयी त्यांच्या मनात नितांत आदर होता. या आदराच्या प्रेरणा त्यांच्या प्रखर राष्ट्रभक्तीत होत्या. परंपरागत भक्तिमार्गातल्या भक्ताच्या मनात आपल्या आराध्य देवतेविषयी पूज्यभाव असतो, म्हणून तो त्याच्या ठिकाणी आपली निष्ठा अर्पण करतो. डॉ. पंजाबरावांचा पिंडच परिवर्तनवादी; जीवनाच्या विविध प्रांतांत कालबाह्य झालेल्या विचारांना तिलांजली देऊन नव्या युगधर्माच्या तर्कशुद्ध जाणिवेने सन्मानित झालेल्या विचारांना शिरोधार्य मानणारा. म्हणून त्यांनी परंपरागत समाज पुरुषाच्या पुनरुत्थानात निरुपयोगी ठरणारी व्यक्तिगत भक्ती न स्वीकारता समाजांतर्गत शोषित, पीडित सामान्य जनांच्या पुनरुत्थानाची आस बाळगून त्यांना आपली निष्ठा अर्पण करताना त्यांच्यासाठी चार सुखाचे दिवस कसे येतील, यासाठीच स्वतःला अहर्निश राबविले. अशी ही परंपरा नाकारणारी वेडी भक्ती. जगाला शहाणपण अर्पण करू पाहाणारी.

जनसामान्यांच्या विकासाच्या नवनवीन वाटा शोधणारा सदाचार हाच त्यांचा देव. त्याच्या परिपूर्तीकरिता जीवन व्यतीत करणारे पंजाबराव आभाळाएवढे वाटायला लागतात. अमरावतीच्या एकवीरा देवीच्या चरणी लीन होणारा हा माणूस. मात्र या मंदिरात अस्पृश्यांना प्रवेश मिळत नाही हे पाहिल्याबरोबर एकवीरा देवी संस्थानच्या पदाधिकाऱ्यांच्या व आपल्या ज्ञातिबांधवांच्या रोषाची पर्वा न करता अस्पृश्यांना या मंदिरात प्रवेश मिळावा म्हणून त्यांच्या मोर्च्याचे नेतृत्व करणारा हाच माणूस, डोळस भक्तीचे मूर्तिमंत प्रतीक आहे.

*हर देशमें तू*
*हर भेष में तू*
*तेरे नाम अनेक तू एकही है*

असे म्हणणारे राष्ट्रसंत आणि जातिधर्मातीत माणसामाणसात ईश्वर पाहाणारे पंजाबराव यांच्या विचारसरणीत साम्य दिसते. मात्र उगीच कोणी अन्याय करीत असेल, पाशवी

त्याचाराला उद्युक्त होत असेल तर ते जशास तसे वागतात.

*विंचू देव्हाऱ्याशी आला। देवपूजा नावडे त्याला*
*तेथे पैजाराचे काम। अधमाशी तो व्हावे अधम*

तुकारामाच्या उक्तीला ते कृतीत आणतात. त्याशिवाय त्यांना आपल्या संधीचा वंड व्याप शिस्तीने सांभाळता आला नसता. एकीकडे रूढींचे जोखड झिडकारण्यात तार्थ होणारे पंजाबराव दुसरीकडे मूल्यानुवर्ती जीवनजाणीव उजळ करताना दिसतात. र्मप्रधान जीवन जगणाऱ्या ज्ञानी भक्ताला साजेशी सत्यनिष्ठा आणि निर्भय वृत्ती ही ांच्या व्यक्तिमत्वाची दोन कवचकुंडले होती.

पंजाबराव आणि गाडगेबाबा या वऱ्हाडच्या दोन सुपुत्रांनी समाजाला 'कर्मप्रधान क्तीची प्रेरणा दिली. 'गोपाला गोपाला देवकी नंदन गोपाला' ही धून गात स्वतः डगेबाबा हातात झाडू घेऊन रस्त्यावरची घाण नाहीशी करीत. दिवसभर गाव स्वच्छ ल्यानंतर रात्री कीर्तनात लोकांचा 'ब्रेन वॉश' करीत. पंजाबरावही ग्रामीण विदर्भाला पली कार्यशाळा मानीत; येथील श्रद्धाळू मनाला त्यांच्यासारखे बोलून, त्यांच्याशी करूप होऊन आपलेसे करीत; आणि शेवटी त्याच्या मुक्तीच्या वाटा प्रशस्त करीत. विध निमित्ते साधून या रांगड्या माणसांसमोर व्याख्याने देत. मध्यवर्ती भारत सरकारचे त्री झाल्यानंतरही त्यांच्या कृती-उक्तीत फरक पडला नाही. 'कुडाचा गिलावा' रणारा एखादा रांगडा माणूस दोन्ही हात जोडून त्यांना अभिवादन करायचा आणि कळ्या मनाने आपल्या जिवाभावाच्या मित्राला सांगाव्या तशा व्यथा बोलायचा. ात असंख्य कामाचे मोहोळ घोंघावत असतानाही त्या पापभीरू माणसाचे अंतरीचे ल ऐकून पंजाबराव व्याकूळ होत, त्याला दिलासा देत आणि पुढे जात.

सामान्य माणूस भक्तीच्या रुळलेल्या वाटेने चालणारा. त्याच्याशी जवळीक साधताना च्यासारखे वागणे अगत्याचे.

*मार्गाधारे वर्तावे। विश्व हे मोहरे लावावे*
*अलौकिका नोहावे। लोकाप्रती*

गाडगेबाबा, राष्ट्रसंत तुकडोजी आणि डॉ. पंजाबराव हे ज्ञानेश्वरांच्या प्रस्तुत ओवीचे त्यक्षिकच वाटतात.

डॉ. पंजाबरावांचे कार्य लोकहिताचेच राहिलेले आहे. अमरावती जिल्हा कौन्सिलचे ध्यक्ष असताना त्यांनी शिक्षण सक्तीचे करून शिक्षण कर वाढविला. आपल्यातलाच गेलेला हा माणूस आपल्यावर कर वाढवितो ही कल्पना सुरुवातीला बोचरी सली तरी अंतिमतः 'हे काम आपल्याच पोराबाळांच्या हितासाठी आहे' -हे उशिरा होईना - मात्र एकदा लक्षात आल्यावर हाच ग्रामीण माणूस त्यांना आराध्य दैवत नू लागला. भाबड्या जिवांची ही निरलस भक्ती होती.

जीवनामध्ये भक्ती हवी. मात्र ती डोळस हवी. ती गाडगेबाबा, तुकडोजी व डॉ. पंजाबराव यांनी येथे निर्माण केली. भक्ताच्या ठिकाणी सहनशीलता हवी. अनेक ठिकाणी त्याचा कस लागतो. 'भक्ती तो कठीण सुळावरची पोळी' असे तुकारामाने उगीच म्हटले नाही. श्री शिवाजी शिक्षण संस्थेच्या इतिहासात अनेक कठीण प्रसंग आले. त्यात त्यांचा कस लागला व त्यांचे व्यक्तिमत्व आणखी उजळून निघाले. 'मान अपमान गेले। अवघे गुंडोनी ठेवावे' या वृत्तीने केवळ संस्थेच्या कल्याणार्थ ते वागले. त्यांच्या ठिकाणी वीराची निर्भयता, तत्त्वज्ञाची स्थिरता, ज्ञानी पुरुषाची विद्वता आणि भक्ताची सहनशीलता होती.

'कुणी निंदा, कुणी वंदा। अमुचा स्वहिताचा धंदा' -या उक्तीने पंजाबराव जगले. त्यांच्या स्वहिताचे वर्तुळ मात्र खूप व्यापक आहे. ह्यात काबाडकष्ट करणारा समाज सामावलेला आहे. दूरवरच्या खेड्यात तट्ट्याच्या शाळेत शिकणारा गरीब होतकरू विद्यार्थी आहे. आंतरराष्ट्रीय अन्नपरिषदेच्या चर्चासत्रातील शेतकऱ्याच्या अधोगतीचे निरसन करणाऱ्या वक्त्यांची मौलिक भाषणे आहेत. अनाथालयातील दीन दुबळे जीव आहेत आणि शिक्षणसंस्थेचा गाडा व्यवस्थित चालावा म्हणून धनिकांकडे मदतीसाठी येरझारेही आहेत. कोणी बरे म्हटले काय किंवा कोणी वाईट म्हटले काय! त्याचा विचार करण्याइतकी उसंत त्यांना होतीच कुठे! त्यांचे चिरंजीव अनंत कुमार एकदा असे म्हणाले होते – "माझ्याशी बोलायला पप्पांना अजूनपर्यंत वेळच मिळाला नाही. माझी भगिनी श्री शिवाजी शिक्षण संस्था, हिला जोपासण्यातच त्यांचा सारा वेळ जातो." हे उद्गार खूप बोलके आहेत. या संतवृत्तीच्या माणसाचा संतांना लळा नसता तरच आश्चर्य ! डॉ. पंजाबराव एकदा आजारी असताना राष्ट्रसंत तुकडोजी त्यांना भेटावयास आले आणि प्रकृतीची आस्थापूर्वक चौकशी केली. त्यावर पंजाबराव उत्तरले,- "प्रकृतीची मला चिंता नाही. चिंता आहे ती बहुजन समाजाची; त्यांच्यासाठी निर्माण केलेल्या श्री शिवाजी संस्थेची." ज्ञानयज्ञाच्या पूर्ततेसाठी एका कर्मयोग्याची ही तगमग, भक्ताच्या आर्ततेने परिप्लुत नाही का?



# भाऊसाहेबांच्या क्रांतिकार्याचे मूल्यदर्शन

– प्रकाश श्री. आमले

---

महात्मा फुल्यांनंतर महाराष्ट्राच्या क्षितिजावर शिक्षणक्षेत्रात कार्य करणाऱ्या दोन देदीप्यमान ताऱ्यांचा उदय झाला. शैक्षणिक आणि सामाजिक क्षेत्रांत महत्त्वपूर्ण कार्य करणारे कर्मवीर भाऊराव पाटील यांनी आपले कार्य पश्चिम महाराष्ट्रात आरंभिले, तर तत्कालीन मध्यप्रदेशाचा भाग असलेल्या वऱ्हाड प्रांत या मराठी प्रदेशात डॉ. पंजाबराव देशमुख यांनी अमरावती येथून आपल्या कार्याला प्रारंभ केला. त्यांनी शैक्षणिक आणि सामाजिक क्षेत्रांसोबतच राजकीय क्षेत्रही हाताळले आणि पं. नेहरूंच्या मंत्रिमंडळात स्वतंत्र भारताचे प्रथम कृषिराज्यमंत्री म्हणून कामगिरीही बजावली.

विदर्भरत्न भाऊसाहेब डॉ. पंजाबराव देशमुख यांच्या कार्याचा आलेख पाहू जाता असे लक्षात येते की, 'आधी केले मग सांगितले' या उक्तीप्रमाणे ते जीवन जगले. अगदी लहानपणापासून जीवनात येणाऱ्या प्रत्येक अडचणींमधून मार्ग काढून व त्यांवर मात करून ते मार्गक्रमण करीत राहिले. महात्मा फुल्यांप्रमाणेच 'जे डोक्यात आले ते करून मोकळे व्हायचे'–असा त्यांचा पिंड होता. आजच्या सारख्या तथाकथित विद्वानांप्रमाणे 'अमुक असे व्हायला पाहिजे. तमुक तसे करायला पाहिजे' –असे ते सांगत राहिले नाहीत, तर त्यांच्या बुद्धीला जे पटले आणि ज्यात त्यांना समाजाचे हित दिसले ते त्यांनी स्वतः पुढाकार घेऊन केले. मग तो आंतरजातीय विवाहाचा प्रश्न असो, अंबादेवी मंदिरातील अस्पृश्यांच्या प्रवेशाचा प्रश्न असो, शैक्षणिक संस्था उघडण्याचा प्रश्न असो की साध्या एखाद्या कर्मचाऱ्याच्या मुलीच्या लग्नाचा प्रश्न असो. ते रोजच्या आपल्या जीवनप्रणालीचाच एक भाग समजून करून मोकळे व्हायचे. सर्व घडून गेल्यानंतर मग इतरांच्या लक्षात यायचं की भाऊसाहेबांनी किती मोठं कार्य करून टाकलं!

भाऊसाहेब मुळातच शेतकरी. शेतकऱ्यांचे प्रश्न त्यांनी अगदी जवळून पाहिलेले. त्यामुळे कृषिमंत्री पदापर्यंतच्या सोपानावर जाऊनही त्यांनी शेतकऱ्यांच्या हितासाठी

झटणारी भारत कृषक समाजासारखी मोठी यंत्रणा उभारली, जागतिक कृषि प्रदर्शन भरवून अमेरिकेच्या व रशियाच्या राष्ट्राध्यक्षांना एकाच वेळी आकर्षित करण्यात ते यशस्वी ठरले. राष्ट्रीय कृषि सहकारी खरेदी विक्री संघ, कृषक सहकारी अधिकोष आणि आफ्रो-आशियन ग्रामीण पुनर्रचना संघटना या संस्था उभारून भारतीय शेतकऱ्यांना आंतरराष्ट्रीय बाजारपेठेचा फायदा मिळवून देण्याचा ऐतिहासिक प्रयत्न केला.

भाऊसाहेबांनी जीवन जगत असताना केवळ शाब्दिक प्रबोधन न करता, आयुष्यातील प्रत्येक गोष्टच प्रबोधनात्मक केली. परिवर्तनवादी विचारांचा पुरस्कार करून पूर्ण आयुष्यच त्यांनी प्रबोधनात्मक असे जगून दाखविले. भाऊसाहेबांनी केलेल्या कार्याची नोंद त्यांच्या सोबतच्या काही सहकाऱ्यांनी तसेच विद्वान अभ्यासकांनी वेळोवेळी घेतलेली आहे. भाऊसाहेबांच्या काळात अमरावती जिल्ह्यात दोन थोर संत होऊन गेले - राष्ट्रसंत तुकडोजी महाराज आणि कर्मयोगी गाडगेबाबा. दोघांनीही त्यावेळी भाऊसाहेबांच्या कार्यास मन:पूर्वक प्रोत्साहन दिले व आपले आशीवार्दही दिले. राष्ट्रसंतांनी तर वेळोवेळी त्यांच्या कार्याची नोंद घेतलेली दिसते. त्यामुळे माझ्यासारख्या अभ्यासकाने त्यांच्या कार्यमूल्यमापनाबाबत आपली स्वत:ची मते मांडत बसण्यापेक्षा संत, कलावंत व विद्वान विचारकांच्या नजरेतून भाऊसाहेबांच्या कार्याचे रेखांकन केल्यास ते अधिक औचित्यपूर्ण ठरेल असे मनापासून वाटते. म्हणूनच प्रस्तुत लेखाद्वारे भाऊसाहेबांच्या 'परिवर्तनासाठी प्रबोधनात्मक' जीवनाचा आलेख विद्वानांच्या शब्दांत मांडण्याचा अल्पसा प्रयत्न करीत आहे-

भाऊसाहेबांच्या जीवनाचा अभ्यास केल्यानंतर असे लक्षात येते की, मुख्यत: शैक्षणिक, सामाजिक, राजकीय व कृषि या क्षेत्रांत भाऊसाहेबांनी महत्त्वपूर्ण योगदान दिलेले आहे. त्यामुळे एकेका क्षेत्रातील त्यांच्या योगदानाचे विद्वानांनी केलेले मूल्यमापन अवलोकिणे बोधप्रद ठरेल.

## भाऊसाहेबांचे शिक्षणविषयक कार्य

शिक्षण क्षेत्रातील भाऊसाहेबांच्या योगदानाबद्दल आपले विचार व्यक्त करताना वं. राष्ट्रसंत तुकडोजी महाराज म्हणाले होते, "श्री. डॉ. पंजाबराव देशमुख यांनी अनेक वर्षे बहुजन समाजाच्या उन्नतीसाठी जे चिंतन केले व अनेक हालअपेष्टा सहन करून गंगेच्या उगमाप्रमाणे, अनेक लहान लहान गवती चापांच्या झोपड्यांतून शिक्षणाच्या कामाला सुरुवात केली व कठीण परिस्थितीशी झगडून मानवतेच्या विशाल दृष्टिकोनातून जे विराट रूप श्री शिवाजी शिक्षण संस्थेच्या रूपाने धारण केले आहे ते कुणालाही नजरेआड करता येणार नाही. त्यांच्या मनात या कार्यासाठी व शेतकऱ्यांच्या प्रगतीसाठी जो जिव्हाळा मला अनेक वर्षांपासून दिसून येतो, तो मी त्यांच्या सहवासात अनेकदा

अनुभवला आहे. देशातील विद्यार्थी वर्गाला शिक्षणाचा लाभ द्यावा म्हणून त्यांनी फक्त वऱ्हाडातच कार्य केले नाही; तर देशभर या उपक्रमाला चालना दिली आहे. मोठमोठ्या धनिकांकडून प्रेमाच्या नात्याने तर कधीकधी कठोरपणाने त्यांनी दान मिळवले आहे आणि बहुजन समाजाची मुले उन्नत करण्यासाठी स्वत:च्या शारीरिक दुर्बलतेचीही पर्वा न करता त्यांनी अविरत प्रयत्न केले आहेत. आजपावेतो याच एका गोष्टीचे त्यांनी चिंतन व मनन करून शेतकऱ्यांची शेकडो मुले पुढे आणली आहेत.''

भाऊसाहेब डॉ. पंजाबराव देशमुखांच्या सहासष्ठाव्या वाढदिवसानिमित्ते प्रकाशित त्यांच्या विविध दर्शनावर आधारित गौरवग्रंथाच्या प्रस्तावनेत प्रसिद्ध साहित्यिक प्रा. अनंत काणेकर लिहितात – 'श्री. भाऊसाहेबांच्या शैक्षणिक कार्याचा हा वारसा जोतिबा फुले यांच्या परंपरेतील आहे. पश्चिम महाराष्ट्रात कर्मवीर भाऊराव पाटील यांनी जसे कार्य केले त्या तोडीचे कार्य श्री. भाऊसाहेबांनी विदर्भात केले. बहुजन समाजाला शिक्षणाभिमुख करून राष्ट्रकार्याच्या उभारणीत बिनीचे सैनिक बनविण्याचे कार्य भाऊसाहेबांचे. विदर्भ त्यांचा अक्षय्य ऋणी राहीलच; परंतु सबंध महाराष्ट्रालाच स्फूर्ती मिळवून देणारे हे अजोड कार्य आहे. श्री शिवाजी एज्युकेशन सोसायटीचा आजचा पसारा पाहिला की त्यांच्या कार्याची साक्ष कुणालाही सहज पटेल.'

तत्कालीन सेवानिवृत्त न्यायमूर्ती श्री. एस. एस. भोसले यांच्या खालील वक्तव्यावरून, भाऊसाहेबांच्या शैक्षणिक कार्याची ख्याती कशी सर्वदूर पसरली होती याचा अंदाज येतो – ''डॉ. देशमुखांची शैक्षणिक क्षेत्रातील कामगिरी व त्यांनी सुरू केलेले निरनिराळे प्रयोग यांची महती सर्वत्र गायिली जाते. भारताचे भाग्यविधाते कै. पंडितजींना त्यांच्या कार्याची पुरी कल्पना आली होती. प्रवासात असताना एकदा त्यांचे विमान नादुरुस्त झाले. तेव्हा बरोबर असलेल्या आपल्या सेक्रेटरींना ते म्हणाले, ''येथून जवळच माझे सहकारी डॉ. पंजाबराव यांनी चालवलेले एक केंद्र आहे. ते आपण पाहू.'' यावरून पंजाबरावांच्या कार्याविषयी पंडितजींच्या मनात किती आदर होता हे स्पष्ट होते. आज जो एक महावृक्ष दृष्टीला पडतो, त्याची शीतल छाया अनेकदा आल्हाददायक वाटते, त्या वृक्षाची जोपासना करताना पंजाबरावांना किती सायास पडले असावेत, हे जावे त्याच्या वंशा तेव्हाच कळेल.''

भाऊसाहेबांनी विविध क्षेत्रांत बजावलेली कामगिरी एकमेकांस पूरक अशीच होती. आणि म. फुल्यांप्रमाणेच लोकांना शिक्षित करण्यासाठी भाऊसाहेबांच्या जिवाची होणारी घालमेल, लोकशिक्षणासाठी भाऊसाहेबांनी घेतलेले कठोर राजकीय निर्णय यांचे महत्त्व प्रा. या. वा. वडस्करांच्या खालील अवतरणावरून लक्षात येते – 'शिक्षण सेस सत्तावीस पैश्यांपर्यंत वाढवूनही शिक्षणासाठी पुरेसा निधी उपलब्ध होऊ शकला नाही. वाढीव सेसमुळे जिल्हा कौन्सिलच्या खजिन्यात पंचावन्न हजारांची भरच पडली पण वऱ्हाडची

शिक्षण भूक अफाट होती. एवढ्या तुटपुंज्या रकमेने ती भागणे शक्य नव्हते. या अडचणीवर मात करण्याची संधी भाऊसाहेबांना १९३२ साली मिळाली. १४ डिसेंबर १९३० रोजी भाऊसाहेबांचा मध्यप्रांत वऱ्हाडच्या मंत्रीमंडळात गव्हर्नरांच्या मंत्रीपरिषदेत मंत्री म्हणून शपथविधी झाला होता. या संधीचा लाभ घेऊन भाऊसाहेबांनी १९३२ मध्ये मध्यप्रांत वऱ्हाडच्या कायदे कौन्सिलसमोर 'हिंदुस्थान देवस्थान संपत्ती बिल' आणले. मध्यप्रांत वऱ्हाडमधील सगळी देवस्थाने सरकारच्या नियंत्रणाखाली आणून देवस्थानांच्या प्रचंड संपत्तीचा उपयोग लोकांच्या शिक्षणासाठी करावा हे या बिलामागील भाऊसाहेबांचे प्रमुख उद्दिष्ट होते.'

भाऊसाहेबांचे कार्य जवळून पाहिलेले नागपूर विद्यापीठाचे माजी कुलगुरू आणि उच्च न्यायालयाचे निवृत्त न्यायाधीश श्री. के. टी. मंगलमूर्ती यांनी भाऊसाहेबांच्या सहासष्ठाव्या वाढदिवसानिमित्ते लिहिलेल्या, "The Greatest Educationist of Thought And Action." या लेखात भाऊसाहेबांच्या व्यक्तिमत्वाचे वर्णन करून त्यांना खालील शब्दात शुभेच्छा दिल्या होत्या- "He has been able to achieve all this because of his dynamic personality, wide Vision, sympathetic heart and modern outlook on education. This activity of his in an evergrowing activity and I pray God to spare him long in the interest of education in Vidarbha."

## भाऊसाहेबांचा कृषिविषयक दृष्टिकोन व कार्य

भाऊसाहेबांचे दुसरे महत्त्वाचे आणि अतिशय जिव्हाळ्याचे क्षेत्र म्हणजे कृषी. स्वातंत्र्य संग्राम सैनिक वीर उत्तमराव मोहिते यांनी लिहिलेल्या भाऊसाहेबांच्या चरित्राला दीर्घ प्रस्तावना देणारे प्रा. सुधाकर मोहोड यांच्या खालील उताऱ्यावरून भाऊसाहेबांचे कृषिविषयी काय चिंतन होते याची कल्पना येते - 'उत्पादन खर्चाएवढी किंमत भारतीय शेतकऱ्यांना का मिळत नाही? औद्योगिक उत्पादनांना उत्पादन खर्चाच्या अनेक पटीने कमी किंमत का मिळते? आर्थिक समृद्धीतून आर्थिक संपत्तीचे, नोकऱ्यांचे केंद्रीकरण आणि विकृतीकरण का घडून येते? शोषणप्रक्रिया कशी कार्य करते? कृषकांचे बहुमुखी शोषण शतकानुशतके का घडत आले? शोषणमुक्त पोषणव्यवस्था कशी निर्माण करता येते? अशा सर्व जटिल प्रश्नांची उत्तरे शेतकऱ्यांना शिक्षण घेऊनच प्राप्त करता येतील. शिक्षण देणे-घेणे यातूनच उपाय-योजनाही शोधता येईल. सर्वांना शिक्षण देणे अशी १०० टक्के साक्षरता म्हणजेच सर्वात मोठी शैक्षणिक गुणवत्ता आणि क्रांतिकारिता ठरते. कृषक घाटाची अशी स्वगते आहेत!'

प्रा. सुधाकर मोहोड यांनी भाऊसाहेबांच्या चिंतनातील मांडलेले प्रश्न आजही थक्क

करून सोडणारे आहेत. पण भाऊसाहेब नुसते चिंतन करून थांबले नाहीत तर आपल्या हयातीत त्यांनी शेतकऱ्यांसाठी नानाविध उपक्रम राबविले. प्राचार्य वा. सी. काळे यांच्या शब्दात सांगायचे झाल्यास – '२१ ऑगस्ट १९२० साली भाऊसाहेब इंग्लंडला गेले. तेथे एडिनबर्ग विश्वविद्यालयात पौर्वात्य भाषा व तत्त्वज्ञान यांचा त्यांनी अभ्यास केला. 'वेदवाङ्मयातील धर्माचा उद्‌गम आणि विकास' या विषयावर त्यांनी प्रबंध लिहिला व डॉक्टरेट मिळवून आणि बॅरिस्टर होऊन ते जुलै १९२६ मध्ये भारतात परत आले. ते येथे आल्याबरोबर त्यांनी 'मध्यप्रदेश–वऱ्हाड शेतकरी संघ' स्थापन करून त्याच्या कार्यास वाहून घेतले. तेव्हापासून भाऊसाहेबांची सर्व पावले कृषक विकासासाठीच पडलेली आहेत. त्यांच्या जीवनाचे हे सूत्र आपण कधीही नजरेआड होऊ देता कामा नये.'

पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठाचे माजी कुलगुरू प्राचार्य हि. ब. उलेमाले भाऊसाहेबांबद्दलच्या आपल्या भावना व्यक्त करताना लिहितात – 'भारत हा कृषकांचा देश, त्यांच्या घामावर शहरी माणसांचं जिणं आणि वैभव. परंतु त्या कृषकांच्या घामाचं मोल कुणी केलं नाही याची खंत विसाव्या शतकात एकाच थोर माणसाला होती आणि तो थोर माणूस म्हणजे आमचे भाऊसाहेब डॉ. पंजाबराव देशमुख. त्या माणसानं शिक्षणाची गंगा आणि कृषिक्रांतीची यमुना यांचा संगम करून शेतकऱ्यांच्या दारात आणण्याचे महान कार्य केले. ते आम्ही अतिशय जवळून पाहिले. त्यांच्या हृदयाची स्पंदनं ऐकली आणि त्यांच्या कार्याचे दर्शन घेतले. त्यांच्या कार्यात सहभागी होण्याचे थोडेसे भाग्य आम्हालाही लाभले. त्यांच्या स्वप्नाला साकार करण्यासाठी त्यांचेच आशीर्वाद मिळाले. त्यांच्याच प्रेरणेने चार पावलं चालायला आम्ही शिकलो.

भाऊसाहेबांचे जीवन म्हणजे संघर्षाचा धगधगता यज्ञकुंडच होता. भाऊसाहेब ध्येयवादी होते. तत्त्ववादी होते. तत्त्वासाठी त्यांनी कधी तडजोड केली नाही. शेतकरी त्यांचा केंद्रबिंदू होता. उद्याच्या नागरिकाला समर्थ करण्यासाठी त्यांनी आपले सर्वस्व अर्पण केले होते. वऱ्हाडच्या आणि विदर्भाच्या मातीचा कणन्‌कण याची साक्ष देतो!'

भाऊसाहेब कृषिमंत्री असताना त्यांनी जागतिक कृषि संमेलन भरविले व संपूर्ण जगाचे डोळे भारताकडे लावले. या संमेलनाबाबत महाराष्ट्र टाइम्सचे तत्कालीन संपादक श्री. द्वा. भ. कर्णिक आपल्या एका लेखात लिहितात, 'अमेरिका आणि रशिया या दोन्ही राष्ट्रांचे त्या प्रदर्शनाने नुसतेच सहकार्य मिळविले नाही, तर अहमहमिकेने त्या राष्ट्रांनी एकमेकांशी तेथे स्पर्धाही केली. अजस्त्र, भव्य असे ते प्रदर्शन होते आणि त्याच्या उद्‌घाटनाचा सोहळा! तो प्रत्यक्ष ज्यांनी पाहिला त्यांच्या हृदयात तो ठसला एवढेच मी म्हणू शकतो. का ठसणार नाही? अमेरिकेचे माननीय अध्यक्ष आयसेनहॉवर हे प्रत्यक्ष त्याच्या उद्‌घाटनाला हजर. मग तेथे भव्यतेला, उत्साहाला उधाण येणार

नाही तर काय ? त्या दिवशी आयसेनहॉवर यांनी राष्ट्रपतींच्या दरबारी गाडीतून समारंभाच्या स्थळी प्रवेश केला. सारेच काही अपूर्व, अनपेक्षित नजरेला पडावे, असाच जणू प्रदर्शनाचा योग असावा म्हणूनच आयझेनहॉवर उद्‌घाटनाला आले आणि रशियाचे अध्यक्ष कुश्चेव्ह पुढे व्यक्तिश: प्रदर्शनाला भेट देऊन गेले. पंजाबराव देशमुख यांनी या प्रदर्शनाच्या रूपाने कोठल्याही भारतीय नेत्याने, नव्हे प्रत्यक्ष सरकारनेही साध्य केले नसेल एवढे यश संपादन केले.'

## भाऊसाहेबांचे त्यागाचे राजकारण

भाऊसाहेबांचे राजकारण हे सदैव समाजकारणांसाठी असायचे. राजकारणातसुद्धा राजकीय विरोधकाला भाऊसाहेब वैयक्तिक जीवनात कधीही विरोधक मानत नव्हते. आपल्या विरोधकालाही मदत करण्याच्या भाऊसाहेबांच्या वृत्तीचा परिचय त्यांचे राजकीय विरोधक डॉ. शिवाजीराव पटवर्धन यांनीच शब्दबद्ध करून ठेवला आहे. या ग्रंथात तो इतरत्र उद्‌धृत करण्यात आलेला आहे.

आजच्या काळात असा राजकारणी मिळेल याची कल्पना सुद्धा करवत नाही पण भाऊसाहेबांनी ते करून दाखविले आणि आपल्या राजकीय विरोधकांची मने जिंकत त्यांनी आपली राजकीय वाटचाल यशस्वी केली. त्यांच्या दिल्लीतील राजकारणाविषयी महाराष्ट्र टाइम्सचे तत्कालीन प्रमुख उपसंपादक श्री. माधव गडकरी यांनी हे शब्दचित्र रेखाटले आहे. – 'विदर्भाचे वैभव आम्ही दिल्लीत पाहात होतो. परंतु या सर्वांवर मात करणारी एक व्यक्ती होती. कार्यबाहुल्यामुळे त्यांना रोज दिल्लीतील मराठी माणसांत अगर त्यांच्या संस्थांच्या कार्यात भाग घेणे शक्य नव्हते. परंतु विदर्भाचे खरे प्रतिनिधित्व ते करीत होते. '११ जनपथ' हे त्या व्यक्तीचे निवासस्थान. अनेक बाहेरून येणारी मंडळी तिथं जमत. भेटी-गाठी होत. ११ जनपथचा त्यांचा भव्य प्रासादतुल्य बंगला अजूनही माझ्या डोळ्यासमोर आहे. परंतु नवी दिल्लीत-भारताच्या या राजधानीत- एक दिवस असा उगवला की या व्यक्तीचे नाव सर्वतोमुखी झाले. केवळ मंत्री म्हणून त्यांचे नाव सर्वांना माहीत होतेच; परंतु अशी एक भव्य नगरी, स्वप्न नगरी त्यांनी या राजधानीत उभी केली होती की त्यामुळे कृषिप्रधान भारताचे सबंध जगाशी एकाच ठिकाणी नवे नाते जोडले गेले. कुशल संघटक, कार्यतत्पर मंत्री, हाडाचा समाजसेवक म्हणून त्यांचे नाव दिल्लीत गाजले. त्यामुळे विदर्भाचे नाव गाजले. अखंड महाराष्ट्राचे नाव गाजले. ज्या व्यक्तीने हे साधले त्या व्यक्तीचे नाव श्री. पंजाबराव उर्फ भाऊसाहेब देशमुख.'

भाऊसाहेबांचे वरिष्ठ सहकारी खासदार श्री. एम्. एस्. अणे 'The Distinguished son of Vidarbha' या आपल्या लेखामध्ये लिहितात – 'He is the

champion of the Lok Sabha of the cause of the farmers. And his powerful voice in protection of their interests is invariably heard there on every occasion. Being once in-charge of the Ministry of Food and Agriculture in the Union Government, he is heard with respect on those matters by members of all parties.'

यावरून भाऊसाहेबांच्या कार्यामुळे, त्यांच्या नि:स्वार्थ समाजसेवेच्या वृत्तीमुळे ते सर्वांच्या आदरास पात्र होते हे श्री. अणे यांच्या वरील वक्तव्यावरून सिद्ध होते.

## सामाजिक कार्य आणि समाज परिवर्तनाच्या दृष्टीने योगदान

अगोदरच नमूद केल्याप्रमाणे भाऊसाहेबांची सर्व कार्ये एकमेकास पूरक होती. भाऊसाहेबांनी समाजसेवेला प्रथम सुरुवात केली आणि नंतर राजकारणात उडी घेतली.

दि. २३ डिसें. १९२६ च्या एका रक्ताळलेल्या संध्याकाळी अब्दुल रशीद नामक एका धर्मवेड्या माथेफिरूने स्वामी श्रद्धानंदांची हत्या केली. 'विश्वचि माझे घर' या वृत्तीने पण अत्यंत तेजस्वीपणे कार्य करणाऱ्या त्या आदर्श संन्याशाची ती शोचनीय वधवार्ता भाऊसाहेबांच्या हृदयालाही छेदून गेली आणि भाऊसाहेबांनी स्वत: उघडलेल्या प्रथम वसतिगृहास नाव दिले 'श्रद्धानंद वसतिगृह'. तेव्हा वेगवेगळ्या जातींची वसतिगृहे अस्तित्वात होती व आपआपल्या जातीच्या विद्यार्थ्यांची व्यवस्था ही वसतिगृहे करीतच होती. पण 'श्रद्धानंद छात्रालयात' भाऊसाहेबांनी सर्व जाती-धर्माच्या मुलांची एकत्र राहायची व्यवस्था केली व नवीन प्रयोग करून समाजपरिवर्तनाच्या दृष्टीने पहिले पाऊल टाकले.

भाऊसाहेबांच्या या उपक्रमांबद्दल त्यांचे प्रथम चरित्रकार श्री. सुदाम सावरकर हे चरित्रग्रंथात लिहितात - वास्तविक श्रद्धानंद छात्रालय काढण्यात भाऊसाहेबांचेच औचित्यपूर्ण वैशिष्ट्य दिसून येते. हे छात्रालय म्हणजे एक तत्त्वनिष्ठ साहस होते. त्याकाळी प्रामुख्याने आपापल्या जातिविशिष्ट विद्यार्थ्यांसाठीच इतर छात्रालये झटत होती. अन्य जातींच्या विद्यार्थ्यांचा समावेश त्यात व्हायचा तो गौणत्वाने, अत्यल्प प्रमाणात आणि तो देखील विशिष्ट जातिमर्यादेतच अवरुद्ध असायचा. अशा स्थितीत मुळात या जातीयतेलाच मूठमाती देण्याचे धाडसी पाऊल म्हणजे हे 'श्रद्धानंद छात्रालय' होते! मांग-मुसलमान-मराठा-माळी सारे विद्यार्थी एकत्र आणून सामाजिक विषमतेची धारच बोथट करण्याचा आणि समानतेच्या तत्त्वावर नवसमाजाला चालना देण्याचा अत्यंत मोलाचा मौलिक प्रयत्न म्हणजे श्रद्धानंद छात्रालय! ते निर्माण करताना, अमृतसरच्या गाजलेल्या अधिवेशनातील स्वामी श्रद्धानंदांचे स्वागत भाषण भाऊसाहेबांना प्रेरणा देत असावे. मुख्यत: त्यातील ते जिव्हाळ्याचे बोल त्यांच्या हृदयाची तार छेडीत

असावे – आपल्या अस्पृश्य बांधवांच्या मुलांना तुमच्या मुलांबरोबर शिक्षण घेऊ द्या, त्यांच्या कुटुंबांना तुमच्या कुटुंबात वावरण्यास वाव द्या, असे वागण्याची या पवित्र मंडपात शपथ घ्या!..." भाऊसाहेबांनी स्वामी श्रद्धानंदांचे हे हृदगत आपल्या या विनम्र प्रयत्नाने जणू साकार केले होते. त्या महात्म्याच्या आत्म्याला शांती देणारे हेच त्यांचे खरेखुरे व जिवंत स्मारक होते!

भाऊसाहेबांच्या एकंदरीत समाजकार्याबद्दल प्रा. भाऊ भालेराव यांनी आपले मत पुढीलप्रमाणे व्यक्त केले आहे – 'सामाजिक समतेचा, वैचारिकतेचा, बुद्धिवादाचा, समाज–प्रगतीच्या मुळाशी कारणीभूत असलेल्या शिक्षण प्रसाराचा ध्वज मागच्या शतकातच महाराष्ट्रात उभारला गेला. जोतिबा, आगरकर, न्यायमूर्ती रानडे, लोकहितवादी आदींनी ज्या ध्वजाची उभारणी केली तो ध्वज या शतकात डौलाने फडकवीत ठेवण्याची महनीय कामगिरी महाराष्ट्रात ज्या कर्मवीरांनी केली त्यातले एक कर्मवीर भाऊसाहेबही आहेत. उद्याचा काळ भाऊसाहेबांचे मूल्यमापन याच दृष्टीने करील. महाराष्ट्राच्या इतिहासात, सुवर्णाक्षरांनी हीच वाक्ये महाराष्ट्राला लिहावी लागतील. त्याला आवर्जून सांगावं लागेल की, महाराष्ट्राची नवी तीर्थक्षेत्रे उजविण्याच्या भाऊसाहेबांच्या विधायक कर्तृत्वाला तोड नाही.' असे सांगत असतानाच भाऊसाहेबांच्या कर्मयज्ञास प्रा. भाऊ भालेराव यांनी खलिल जिब्रानच्या कथेतील समुद्र किनाऱ्यावर लाटांसमवेत येऊन पडलेल्या मृत माशांना आपल्या हातानी अत्यंत हळुवारपणे उचलून त्यांना पुन्हा जीवनदान देण्याच्या हेतूने समुद्रात नेऊन सोडणाऱ्या व्यक्तीच्या कर्मयज्ञाची उपमा दिलेली आहे; तर कविवर्य पांडुरंग श्रा. गोरे म्हणतात "भाऊसाहेबांनी राजकारणात राष्ट्रभक्तीने जशी उडी घेतली तशीच समाजकारणात देखील आघाडी उचलली. अमरावती येथील अंबेच्या देवळात अस्पृश्यांचा प्रवेश या गोष्टीचा प्रामुख्याने उल्लेख करावा लागेल. गडकऱ्यांनी म्हटल्याप्रमाणे विचारांचे नवकोट नारायण हे आचारांच्या बाबतीत सुदाम्यापेक्षाही कंगाल असतात. पण भाऊसाहेब या गोष्टीस अपवाद आहेत."

भाऊसाहेब हे कर्ते सुधारक होते. अंबादेवीच्या देवळातील अस्पृश्यांच्या प्रवेशासाठी त्यांनी स्वतः पुढाकार घेतलेला होता त्याचप्रमाणे मोर्शी येथील हिंदू महासभेच्या अधिवेशनात अस्पृश्यता व जातिभेदाचा निषेध करणारा ठराव आणून तो पारितही करून दाखविला. या संबंधात भाऊसाहेबांचे धाडस वाखाणण्याजोगे होते. ही घटना 'राष्टदूत' दैनिकाचे तत्कालीन संपादक श्री. वा. न. घोरपडे यांच्या शब्दात सांगायची झाल्यास – "या अफाट जनसमुदायात डॉ. भाऊसाहेबांच्या विचाराचे किती व खास हिंदुमहासभेच्या सनातनी मताचे किती याचा थांगपत्ता लागणे मोठे दुष्कर काम होते. पण शेवटी एक कसोटी लागलीच! भाऊसाहेबांच्या प्रेरणेवरून चातुर्वर्ण्य, तज्जन्य जातिभेद व पुन्हा तज्जन्य अस्पृश्यता यांचा निषेध करणारा ठराव तयार करण्यात

आला. सदर ठराव हिंदुमहासभा मोर्शी अधिवेशनाचे अध्यक्ष दे. भ. श्री. लाला लजपतराय यांनी पुढे मांडण्याला मंजुरी दिली व आश्चर्याची गोष्ट अशी की तो ठराव प्रचंड बहुमताने पास झाला. मोर्शी येथे घडलेल्या या चमत्काराने दे. भ. लाला लजपतराय यांना वऱ्हाडच्या हिंदुमहासभेचे स्थान व त्यावेळी वऱ्हाडात गाजत असलेल्या ब्राह्मणेतर चळवळीचा जोम या दोन्ही गोष्टींचा अंदाज करता आला.''

भाऊसाहेबांच्या या सामाजिक कार्याच्या यज्ञात अनेकांनी साथ केली; तर अनेकांनी साथ सोडली. भाऊसाहेबांचे काही सहकारी आयुष्याच्या शेवटापर्यंत भाऊसाहेबांचे व्रत पुढे नेत राहिले. भाऊसाहेबांच्या सामाजिक कार्याचा समाजाला खरोखरच काही फायदा झाला का? याचे उत्तर खालील दोन उदाहरणांवरून आपोआपच मिळते. डॉ. पां. वि. भुगुल आपला अनुभव लिहून ठेवतात. '१९४८ साली एम्. बी. बी. एस्.च्या फर्स्ट इअरला असताना मी एक सांजेला जेवायचा. सायंकाळी पाण्यात भिजवलेले चणे खायचा. हे मी कोणालाच सांगितले नाही. माझे मित्र कै. डॉ. आर. डी. ठाकरे हे त्यावेळेला सेकंड इअर एम्. बी. बी. एस्.ला होते. त्यांनी भाऊसाहेबांना केव्हा आणि कसे कळविले, मला माहीत नाही. भाऊसाहेब त्यावेळी भारताच्या 'घटना समिती'चे मेंबर होते व डॉ. बाबासाहेब यांचे बरोबर ते ओ. बी. सी., इ. बी. सी. च्या सत्यशोधन समितीचे मेंबर होते . भाऊसाहेबांनी त्यावेळी मला एम्. एल्. ए. विश्रामगृहावर बोलाविले, मी भेटीला गेलो. भेटीचा लाभ झाल्याबरोबर पहिले वाक्य उद्गारले - ''काय रे तू एकवेळ जेवतो असं समजलं.'' मी उद्गारलो -''भाऊसाहेब माझी तब्येत तर 'टन्न' आहे.'' त्यावर भाऊसाहेब म्हणाले -''बरं तू असं कर, ओ. बी. सी. किंवा इ. बी. सी. चा फॉर्म भरून माझ्या किंवा डॉ. आंबेडकरांच्या पत्त्यावर पाठव.'' मी फॉर्म भरण्याच्या उद्योगाला लागलो. केवळ आठ दिवसांत मला भारत सरकारची १२० रु. दरमहा स्कॉलरशिप मंजूर झाली व पुढील पाच वर्षे निश्चिंत आनंदात गेली.'

अशाच प्रकारचा अनुभव श्रीमती नलिनीताई लढके यांचा आहे - 'डॉ. बाबासाहेब आंबेडकर जयंतीच्या कार्यक्रमात अध्यक्षपदावरून मी 'हिंदू कोड बिला'च्या समर्थनार्थ भाषण केले हा माझा गुन्हा. नोटीस मिळाली. चर्चाही खूप झाली. तितक्यात भाऊसाहेब अमरावतीला आले होते. भाऊसाहेब मला उद्देशून म्हणाले, ''सामाजिक कार्याबद्दल असा अन्याय झाला तर त्यासाठी संघर्ष करू. आपली वकील मंडळी तुमच्या पाठीशी उभी राहील.'' भाऊसाहेबांना सर्वसामान्यांवर होणाऱ्या अन्यायाच्या निवारणाचे कार्यसुद्धा जागतिक स्तरावरील कार्याइतकेच महत्त्वाचे वाटत असे हे त्या अनुभवानंतर मला जाणवले.'

### भाऊसाहेबांच्या जीवनाचे इतर विविध पैलू

कर्मवीर भाऊसाहेब डॉ. पंजाबराव देशमुख हे शब्दांत मावण्याइतकं लहान व्यक्तिमत्व

नाही. समाजकारण, राजकारण, शिक्षण आणि कृषिविचार यांच्याही पुढे जाऊन त्यांचा एकमेकांसाठी करून घेतलेला योग्य पूरक उपयोग, त्यांचे स्वत:चे व्यक्तिमत्व आणि त्यांचे पवित्र चारित्र्य–यांमुळे त्यांच्या जीवनाचे विविध पैलू आपल्याला दिसतात. नागपूर विद्यापीठाचे माजी कुलगुरु आणि प्रसिद्ध संशोधक–समीक्षक डॉ. वि. भि. कोलते यांच्या नजरेतून पाहू जाता भाऊसाहेब असे दिसतात –''डॉ. पंजाबराव देशमुख हे स्वत: हाडाचे शेतकरी आहेत. भारतीय शेतकऱ्यांच्या जीवनातील दु:ख, दारिद्र्य त्यांनी भोगलेले आहे. सभोवतालच्या शेतकऱ्यांचे दैन्य, अज्ञान, उपासमार, कष्ट, अवहेलना व पिळवणूक त्यांनी पाहिली आहे. त्यामुळे त्यांचे हृदय पिळवटून निघाले आहे. त्यातून त्यांच्या आयुष्याचे ध्येय आकाराला आले आहे. या ध्येयसिद्धीसाठीच त्यांचे परिश्रम अखंड चालू असतात. परिश्रमांना मर्यादा नाही, उसंत नाही, तमा नाही. तो एक अखंड यज्ञ आहे, या यज्ञात त्यांनी आपल्या जीवनातील सुख–स्वास्थ्याच्या समिधा समर्पित केल्या आहेत. डॉ. पंजाबरावांचे जीवन हे समर्पित जीवन आहे. आणि म्हणूनच ते आदर्श जीवन आहे, स्फूर्तिदायक जीवन आहे. या जीवनाला ध्यास शेतकऱ्यांच्या सर्वांगीण उन्नतीचा आहे आणि त्याच दृष्टीने त्यांचा जीवन प्रवाह आतापर्यंत वाहात आला आहे आणि पुढेही वाहात राहील. त्यांनी अधिकारपदे राबविली आहेत तीही याच ध्येयासाठी. जेथे शक्य नसेल तेथे त्या अधिकारपदांचा लोभ सोडून ते पुन्हा येऊन मिसळले आहेत ते शेतकऱ्यांतच!''

भाऊसाहेबांचे समकालीन श्री. ना. पां. नागपुरे यांच्या नजरेतून – 'शिक्षणमहर्षी डॉ. पंजाबराव म्हणजे उपेक्षितांना ज्ञानगंगेचा लाभ करून देणारा आधुनिक भगीरथ होय. त्यांनी स्थापन केलेल्या विविध संस्थांनीच अनेक लोकनेते, नामवंत कलावंत, सुप्रसिद्ध शिक्षणतज्ज्ञ आणि ख्यातनाम साहित्यिक व वक्ते तयार करून मातीतील मोती हुडकून काढले. मातीने मातीचे अंतरंग ओळखले. त्यांना जागतिक कीर्ती प्राप्त करून दिली. डॉ. पंजाबरावांचे कार्य आठवताना त्यांच्या जीवन मंदिरातील चिरंतन स्मृतिगंधाचा वैशिष्ट्यपूर्ण जीवनपट झरझर डोळ्यासमोरून जात असल्याचा भास होतो व हृदय उचंबळून येते. सर्वांना अन्नवस्त्र पुरविणाऱ्या कष्टमूर्ती शेतकऱ्याने कृषकवर्गाचे पांग फेडल्याबद्दल या प्रभाकराला सूर्योदयी नियमाने आठवावे आणि भारतातील शिक्षणतज्ञांनी विद्येची दिंडी विदर्भ भूमीत फिरविणाऱ्या या ज्ञानपंढरीच्या वारकऱ्याचा 'शिक्षण महर्षी' म्हणून गौरव करावा एवढ्या तोलामोलाचे ते होते. एकाच दिवशी सात महाविद्यालये स्थापन करणाऱ्या त्यांच्या कार्याचा भारताच्या भावी वारसदारांनी परिचय करून घेणे आवश्यक आहे.'

डॉ. मधुकर आष्टीकर भाऊसाहेबांना एक ऋषी संबोधून भाऊसाहेबांनी समाजाला काय काय दिलं याची चर्चा करतात – 'विदर्भासाठी – त्यातल्या एकेका खेड्यासाठी

– शाळा मागा – पैसा मागा – माणसं मागा – दिलीच त्यांनी! गावासाठी – कॉलेज मागा – पुस्तकं मागा – इंजिनिअर्सची शिकविण्याची सोय मागा, शेतकी ज्ञान भंडार पाहिजे म्हणून म्हणा, उघडलंच हे सारं जादूनं यांनी! ग्रामसेवक हवेत, शारीरिक शिक्षण तंत्रशः देणारे हवेत, प्रशिक्षित शिक्षक हवेत, वैज्ञानिक तरुण शिल्पज्ञ हवेत – काय काय हवे ते त्यांनी सारे पुरवले – त्या साऱ्यांना शिकविणारी मंदिरे त्यांनी उभारली. आज अमरावती एक प्रचंड तीर्थक्षेत्र झालीय्. ज्ञानगंगा दुथडी वाहतेय ह्या नगरीतून! कधी काही कमी जातच नाही ह्या क्षेत्री – तो ऋषी बसलाय् ना एक ध्यानस्थ – पंजाबराव!'

भाऊसाहेब असे बहुआयामी समाजजीवन जगले. येणाऱ्या प्रसंगावर मात करीत पुढे गेले आणि एक दिवस ते दुःखालाच प्रश्न विचारते झाले. याचे सुंदर दिग्दर्शन भाऊसाहेबांचे एक चरित्रकार प्रा. रघुनाथ कडवे यांनी पुढील उदाहरणातून केले आहे. – ".... बा दुःखा! कधी कधी तू मला अगदी ग्रासून टाकतोस हे मला कबूल करणे भाग आहे. परंतु आज मात्र तुझी स्थिती करुणास्पद झाली आहे. हे पहा, तुझं काळं ठिक्कर केविलवाणं तोंड ! तुझ्या सर्वच भांडवलाला आग लागलेली दिसते..." – भाऊसाहेब डॉ. पंजाबरावांच्या रोजनिशीतील हे दुःखाला आव्हान देणारे उद्‌गार वाचले म्हणजे त्यांच्या संघर्षात्मक जीवनाची कल्पना येते.

संघर्षाने दुःखावर मात करणारे कर्मवीर भाऊसाहेब दुःखाचीच अवस्था केविलवाणी करून टाकतात. केवढा हा आत्मविश्वास! पण आदि-अंत कुणासही सुटलेला नाही. प्रसिद्ध ललितलेखक श्री. मधुकर केचे लिहितात – 'त्यांना दुरून पुष्कळदा पाहिले होते. पुरेसे दिसले नाहीत. मग सतत आठवडाभर सहा जिल्हे फिरून त्यांच्या संस्था पाहिल्या, तेव्हा ते थोडेसे दिसले. नंतर त्यांचा सहवास लाभला, पुन्हा काहीसे दिसले – आणि एक दिवस त्यांच्या निर्वाणाची बातमी ऐकली तेव्हा जाणवले की आपले बरेचसे पाहाणे राहूनच गेले.'

भाऊसाहेबांच्या सान्निध्यात राहिलेल्या काही लोकांच्या अनुभवावरून व विद्वानांनी केलेल्या निरीक्षण-परीक्षणांवरून त्यांच्या कामाची व्याप्ती बघितल्यास एका आयुष्यात भाऊसाहेब किती आयुष्ये जगले याचे प्रत्यंतर येऊन बुद्धी स्तिमित होते. पापळसारख्या २५० लोकवस्तीच्या गावात दि. २७ डिसें. १८९८ रोजी जन्मलेल्या एका कास्तकाराच्या मुलाने आपले शिक्षण जिद्दीने पूर्ण करून वयाच्या बाविसाव्या वर्षी अत्यंत विपरीत परिस्थितीवर मात करून उच्च शिक्षणासाठी इंग्लंड गाठावे, पैशाच्या कमतरतेमुळे वेळ वाचविण्यासाठी एम. ए. (ऑनर्स) सारखा अभ्यासक्रम कमी वेळात पूर्ण करून, वेद वाङ्मयावर आधारित विषयावर डॉक्टरेटचा प्रबंध सादर करून व सोबतच बार-ॲट-लॉ करून मायदेशी परतावे, हे परीकथेतील कल्पनेप्रमाणे वाटते. पण भाऊसाहेबांनी

अशा कित्येक कल्पनारम्य वाटणाऱ्या गोष्टी सत्यात उतरवून दाखविल्या होत्या.

कु. विमलाबाई वैद्य यांच्याशी मिश्रविवाह, श्रद्धानंद वसतिगृहाची स्थापना, वयाच्या अठ्ठाविसाव्या वर्षी अमरावती जिल्हा कौन्सिलचे अध्यक्षपद, वयाच्या ३२ व्या वर्षी सर मॉंटेग्यु बटलर मंत्रीमंडळात शिक्षण-कृषि-सहकार व लोकधर्म खात्यांचे मंत्रीपद, खादी विक्री व पदयात्रा, वयाच्या ३४ व्या वर्षी श्री शिवाजी एज्युकेशन सोसायटी या सांप्रतच्या भारतातील अग्रगण्य संस्थेची स्थापना व नोंदणी-अशी कामांची यादी पाहिली म्हणजे आणि एकेका दिवशी दोन-दोन, तीन-तीन नवीन संस्था उघडणे तसेच एकाच दिवशी सात कॉलेजेस उघडणे यांसारखे धाडसी निर्णय पाहिले म्हणजे आपला स्वत:वरही विश्वास बसत नाही. पण हे सर्व भाऊसाहेबांनी प्रत्यक्षात करून दाखविलेले आहे.

भाऊसाहेबांनी इ. स. १९४४ साली आझाद हिंद सेनेचा खटला जाज्वल्य राष्ट्रप्रेमापोटी चालविला, १९५२ मध्ये स्वतंत्र भारताचे कृषिमंत्री झाल्यावर भातशेतीच्या अभिनव जपानी पद्धतीचा अवलंब केला, कित्येक शेतकी संघटना/संस्था स्थापन केल्या. कित्येक संघटनांचे स्वत: अध्यक्ष/प्रमुख राहिले. भारतातच नव्हे, तर लंडन येथेही इ. स. १९६४ मध्ये शिवाजी वसतिगृहाची स्थापना केली. असे एखाद्या झंझावाताप्रमाणे भाऊसाहेब आयुष्य जगले आणि दि. १० एप्रिल १९६५ च्या रात्री जेव्हा भाऊसाहेब नावाच्या या झंझावाताला आपली यात्रा संपल्याचे जाणवले तेव्हाही 'आपण सर्वजण मिठाई खाऊ'- म्हणून नोकरास मिठाईसाठी पाठविले व विलिंग्टन हॉस्पिटल, दिल्ली येथे त्यांची प्राणज्योत मालवली.

शेवटच्या क्षणीही लोकांना मिठाई खाऊ घालण्याची इच्छा सोडून जाणाऱ्या व देहात प्राण असेपर्यंत सतत समाजात गोडवा पेरणाऱ्या वं. भाऊसाहेब डॉ. पंजाबराव देशमुख यांच्या स्मृतीस माझे कोटी कोटी प्रणाम.



# आमचे भाऊसाहेब : सार्वजनिक जीवनात

-गिरीश रा. खारकर

---

भाऊसाहेबांच्या कर्तृत्वाची क्षितिजे निरनिराळ्या चरित्रकारांनी तसेच सार्वजनिक जीवनातील त्यांच्या सहकाऱ्यांनी आणि कुटुंबातील आप्तस्वकीयांनी या ना त्या निमित्ताने गौरविली आहेत. पण महापुरुषांच्या महानतेचा अंदाज व त्यांच्या व्यक्तिमत्वातील वैशिष्ट्यांचा अदमास खरोखरी आपल्याला घेता येतो तो त्यांच्या जीवनातील छोट्या छोट्या प्रसंगांमधून.

कुठलाही मुखवटा न लावता, कुठलीही झूल न पांघरता, काही बेसावध क्षणी मनुष्य जसे बोलतो-वागतो, त्यावरून त्याच्या व्यक्तित्वाचे सूक्ष्म पदर न्याहाळता येऊ शकतात. अशाच काही निवडक प्रसंगांमधून सार्वजनिक जीवनातल्या भाऊसाहेबांच्या व्यक्तिमत्वाच्या घटकांचा वेध घेण्याचा प्रस्तुतचा एक नम्र प्रयत्न आहे.

सार्वजनिक जीवनात वावरताना क्रियाशील व्यक्तीच्या अंगी असलेल्या गुणसमुच्चयाला सामान्य जनता आत्मीयतेने न्याहाळत असते. समाज जीवनात ती व्यती कशी वागते, त्यांची इतरांशी वर्तणूक कशी आहे यावर त्या व्यक्तीची प्रतिमा ठरत असते. जनसामान्यांच्या आठवणींद्वारे अशा व्यक्तींचे व्यक्तिमत्त्व उभारण्यास मदत होते. म्हणूनच डॉ. भाऊसाहेबांचे व्यक्तिमत्त्व समजून घेण्यासंबंधात त्यांच्या समकालीन व्यक्तींच्या आठवणी अधिक उपयुक्त व बोलक्या ठरतात. प्रतिकूल परिस्थितीत जन्माला येऊन सुद्धा प्रगतीच्या शिखरावर आरूढ झालेल्या निवडक व्यक्तींपैकी एक- अशा भाऊसाहेबांचे सामाजिक, शैक्षणिक, राजकीय व कृषिविषयक कार्य असामान्य आहे. त्यांच्या सामाजिक क्षेत्रातील कर्तृत्वाचा कालखंड साधारणपणे सन् १९२६ ते १९६५ दरम्यानच्या ३९ वर्षांचा आहे. या तीन तपांमध्ये त्यांनी विदर्भातील पीडित शेतकऱ्यांसाठी केलेले शिक्षणविषयक व कृषिविषयक कार्य नजरेत भरण्याजोगे आहे. १९३२ मध्ये त्यांनी स्थापन केलेल्या श्री शिवाजी शिक्षण संस्थेचा विकास पुढे इतक्या झपाट्याने झाला की, एकाच दिवशी सात महाविद्यालये सुरू करण्याचा

विक्रम या संस्थेने केला. १९६१ मध्ये एका वेळी १४ माध्यमिक शाळा उघडून शाळा निर्मितीचा उच्चांकही या संस्थेने गाठला.

भाऊसाहेबांनी आपल्या संस्थेवर, सहकाऱ्यांवर, शिक्षकांवर, विद्यार्थ्यांवर तसेच कर्मचाऱ्यांवर निरतिशय प्रेम केले. त्यांच्या हृदयात हे सहकारी आणि कर्मचारी यांच्याविषयी सदैव सौहार्द व सहानुभूतीची भावना असायची. एकदा पैशांअभावी शिक्षकांचे वेतन अनेक दिवसांपासून होऊ शकलेले नाही हे जेव्हा भाऊसाहेबांना कळले तेव्हा त्यांचे डोळे पाणावले. दुसरे दिवशी त्यांनी कोणालाही न कळवता आपला बंगला गहाण ठेवून सावकाराचे कर्ज काढले व शिक्षकांच्या वेतनाची व्यवस्था केली. त्यांनी संस्थेतील कर्मचाऱ्यांना व विद्यार्थ्यांना सदैव कुटुंबातील सदस्यांप्रमाणे वागविले आणि म्हणूनच विदर्भातील बहुजन समाज त्यांच्या उपकाराच्या, प्रेमाच्या, आपुलकीच्या व जिव्हाळ्याच्या स्पर्शाने भारावून गेलेला आहे. अशा भाऊसाहेबांचा सहवास लाभलेले श्री शंकरराव इंगोले आपल्या आठवणीत सांगतात –

१९२६ मध्ये विलायतेतून परत आल्यावर भाऊसाहेबांनी श्रद्धानंद फ्री बोर्डिंगची स्थापना केली. या बोर्डिंगमध्ये सर्व जातींचे सभासद होते. एक जाती निर्मूलन संघ काढून अस्पृश्यता निवारण कार्याची मुहूर्तमेढ भाऊसाहेबांनी अंबादेवीच्या मंदिरात प्रवेश मिळावा म्हणून सत्याग्रहानेच केली. त्यासाठी डॉ. बाबासाहेब आंबेडकरांना त्यांनी अमरावतीला बोलाविले व अस्पृश्य परिषद बोलावून मंदिरात प्रवेश मिळण्यासाठी आंदोलन उभारले. परंतु अंबादेवी देवस्थानचे ट्रस्टी श्री. दादासाहेब खापर्डे यांनी मध्यस्थी करून सामोपचाराने मंदिर प्रवेशाचा निर्णय घेण्यासाठी म्हणून एक महिन्याची मुदत मागून घेऊन हुषारीने आंदोलनातील हवा काढून घेतली, ही गोष्ट अलाहिदा. ज्या काळात मंदिर प्रवेशाची देशव्यापी चळवळ सुरू व्हायचीच होती, त्या स्वातंत्र्यपूर्व काळातील भाऊसाहेबांचे हे धाडसी पाऊल होते.

भाऊसाहेबांचा अल्पकाळ सहवास लाभलेल्या काही व्यक्ती आजही हयात आहेत. भाऊसाहेबांच्या सहवासातील आठवणींचे कण त्यांनी हृदयात अजूनही जपून ठेवलेले आहेत. योग्य वेळी भाऊसाहेबांनी समोर येऊन आपणास कशाप्रकारे मदत केली व त्यामुळे आपल्या जीवनाचे सोने कसे झाले याचा ते जिवंत पुरावाच होत. उदाहरणार्थ स्वतःच्या डोळ्यासमोर घडलेला प्रसंग कथन करताना श्री. यशवंतराव कुकडे सांगतात, ''एकदा भाऊसाहेब कृषिमंत्री असताना अमरावती जिल्ह्याचे दौऱ्यावर भेट देण्यास आले असता त्यांना चांदूर बाजारला कार्यक्रमासाठी जावे लागले. त्यांच्यासमोर पोलीस संरक्षणाचा व राजकीय पुढाऱ्यांचा फार मोठा ताफा होता. चांदूरबाजारकडे जात असताना वलगाव-शिराळा फाटा ओलांडल्यावर भाऊसाहेबांचे लक्ष एका बैलगाडीकडे गेले. त्यांनी लगेच ड्रायव्हरला गाडी थांबवायला लावली व ते खाली उतरले. पोलीस

संरक्षक व राजकारणी व्यक्तींचा इतका मोठा ताफा पाहून तो बैलगाडीवाला घाबरला. 'आपलं काही चुकलं तर नाही?' असा प्रश्न त्याच्या मनाला स्पर्शून गेला व त्याने आपली बैलगाडी मागे वळवली. हे पाहून भाऊसाहेब त्या बैलगाडीवाल्याकडे धावत गेले व गाडी अडवीत त्याला म्हणाले, "गोपाळा! अरे गोपाळा, तू गाडी थांबव. मी पंजाब आहे. मला तू ओळखलं नाहीस? आपण शिराळा येथे चवथ्या वर्गात सोबतच शिकलो होतो. तू असा घाबरू नकोस." राजकीय पोषाखातील हा पुढारी आपला लंगोटी मित्र पंजाब असल्याचे कळताच गोपाळ बैलगाडीवरून लगबगीने खाली उतरला व त्याने भाऊसाहेबांना कडकडून मिठी मारली. बालपणीचा सोबती भेटल्याच्या आनंदात दोघांचेही डोळे पाणावले होते. उच्चपदावर विराजमान असतानाही आपला शाळकरी मित्र दीर्घकाळानंतर भेटल्यावर भाऊसाहेब गहिवरले होते. कालमहिम्याच्या लाटेवर आरूढ होऊनही ते आपल्या सवंगड्यांना विसरले नाहीत.

समाजातील अनेक होतकरू व गरजू विद्यार्थ्यांना स्कॉलरशिप मिळवून देण्यापासून तर त्यांना नोकरीत सामावून घेण्यापर्यंतचे भाऊसाहेबांचे प्रयत्न पाहिले म्हणजे त्यांच्या सेवाभावी वृत्तीची साक्ष पटते. संस्थेच्या व राजकारणाच्या कामात व्यस्त असूनही ते गरजू व्यक्तींना मदत करीत. त्यांच्या अडीअडचणी विचारीत. त्यांच्या जीवनसंबद्ध प्रश्नांकडे जातीने लक्ष देत. श्री. वासुदेव चौधरी आपल्या जीवनातील व भाऊसाहेबांच्या सहवासातील एक प्रसंग सांगतात. त्यावेळी श्री. चौधरी हे अमरावतीच्या शिवाजी मराठा हायस्कूल या शाळेत सहाय्यक शिक्षक होते. दसऱ्याच्या दिवशी भाऊसाहेबांना सोने देऊन ते घरी जाण्यास निघाले असता भाऊसाहेबांनी त्यांना विचारले, "वासुदेव, तुझा लहान भाऊ विदर्भ महाविद्यालयात शिकतो ना?" त्यांनी भाऊसाहेबांना 'बी.एस्‌सी.च्या पहिल्या वर्गात शिकत आहे'-असे सांगताच त्यांनी त्याचे पूर्ण नाव, कॉलेज, वर्ष व जन्मतारीख एका कागदावर लिहून मागितली. त्यावेळी ही माहिती भाऊसाहेबांना कशासाठी हवी आहे याचा विचार करीतच श्री. चौधरी घरी गेले. परंतु जानेवारी महिन्यात त्यांच्या लहान भावाच्या नावाने जेव्हा केंद्र सरकारकडून स्कॉलरशिप मंजूर झाल्याचे पत्र आले तेव्हा कुठे सर्व उलगडा झाला; आणि भाऊसाहेबांच्या या उपकारामुळे ते उपकृत झाले. अशा अनेक गरजू व्यक्तींना भाऊसाहेबांनी विविध प्रकारची मदत करून त्यांच्या जीवनाला प्रकाशमान केले होते.

श्री शिवाजी शिक्षण संस्थेच्या विकासासाठी भाऊसाहेबांनी जशी प्रयत्नांची पराकाष्ठा करून प्रगतीच्या सर्वोच्च ठिकाणी संस्थेस नेऊन पोहोचविले, तसेच इतर शिक्षण संस्थांनाही भाऊसाहेबांनी मदतीचा हात देऊन शिक्षणाची गंगा खेडोपाडी पोहोचविली. संस्था कुणाची का असेना, परंतु आपल्या शेतकरी बांधवांस शिक्षण मिळत राहो, ही भावना त्यांच्या ठिकाणी होती. हिराबाई बोके यांनी जिजामाता स्त्री मंडळाची स्थापना

करून वरखेडला हायस्कूल काढले. तेव्हा भाऊसाहेबांनी शाळा बांधण्यासाठी स्वत:चे शेत देऊन शाळेसाठी लागणारे साहित्यही हिराबाईंना दिले व आवश्यकता भासल्यास आणखीही मदत करण्याचे आश्वासन दिले. कृषकांच्या मुलांना गावातच शिक्षण मिळून त्यांचा विकास व्हावा हाच त्यामागील उद्देश होता.

स्वत:चा बंगला व गाडी असताना भाऊसाहेबांनी आपला एकुलता एक मुलगा अनंत याला हिंदु हायस्कूल (सध्याचे ॲकॅडेमिक हायस्कूल) येथे ठेवून तेथील वसतिगृहातच त्याची राहाण्याची व्यवस्था केली. अनंताच्या अभ्यासाचा व प्रगतीचा आढावा घेण्यासाठी भाऊसाहेब स्वत: आपल्या पत्नी विमलाबाईंना घेऊन अनंताचे भेटीसाठी येत. डॉ. पी. एस्. राऊत हे विद्यार्थी दशेत असताना अनंताबरोबर शिकत होते. अनंताकरिता आणलेला खाऊ भाऊसाहेबांसवे वसतिगृहातील हिरवळीवर बसून ते सर्वजण खात असत. त्यामुळे भाऊसाहेबांशी राऊत यांची जवळीक साधली गेली. एकदा हिंमत करून श्री राऊत यांनी विचारलेच, ''काका, स्वत:ची संस्था व बंगला असताना आपण अनंताला ब्राह्मणांच्या शाळेत व वसतिगृहात का टाकले?'' त्यावेळी भाऊसाहेब म्हणाले, ''अडाणी बहुजन समाजाची शैक्षणिक पात्रता उंचावावी म्हणून मी शाळा काढली. मात्र या शाळेत मुले पाठविणाऱ्या पालकांचे उद्‌गार होते की, 'मुलाला घरी रिकामे ठेवून काय करायचे? तो लग्नाचा होईपावेतो किंवा शेती सांभाळण्याजोगा होईपावेतो ठेवू पंजाबरावाच्या शाळेत!'' हे आपल्या अडाणी शेतकरी बांधवांचे उद्गार ऐकून थोडी उद्विग्नता येई. पण शिकतात हे काय थोडे आहे? अशी मनोमन समजूत घालून मी शांत राही. या सर्वांतून अध्ययन व अध्यापन या वृत्ती रक्तातच हव्यात हे मी जाणले. अशा वृत्तीची जोपासना योग्य प्रमाणात ह्या शाळेत होते म्हणून मी अनंताला येथे पाठविले... आमच्या ठिकाणी ती प्रेरणा येण्यास काही काळ लागेल. पूर्वीच्या ऋषिमुनींच्या गुरुकुलाची अंशत: भरपाई व्हावी ही अपेक्षा बाळगून व जनसामान्यास संस्कारांचे धडे मिळावे म्हणून अनंताला घरापासून आम्ही दूर ठेवले.''

एक जागृत पालक म्हणून त्यांची ही भूमिका योग्यच आहे. या भूमिकेत त्यांना ऋषिमुनींच्या गुरुकुलांचा पारंपरिक आदर्श अधिक स्वीकरणीय वाटला. मात्र त्याच वेळी बहुजन समाजातील पालकांची भूमिका त्यांना उद्वेगजनक वाटली, हे लक्षणीय आहे. अध्यापन व अध्ययनाच्या बाबतीत आपण स्वत: काढलेल्या संस्थांचा दर्जा समाधानकारक नसल्याचीही त्यांची खंत यातच समाविष्ट आहे. अर्थात अन्यत्र त्यांनी याचीही कारणमीमांसा केली आहेच.

भाऊसाहेबांच्या जीवन कार्याचा आढावा घेताना त्यांनी योजनाबद्ध पद्धतीने कार्यान्वित केलेल्या बाबी, शिक्षण क्षेत्रातील त्यांचे अलौकिक योगदान, कृषिविषयक धोरण, समानतेच्या तत्त्वावर आधारित समाजरचना निर्मितीचे त्यांचे कार्य व संविधानातील

त्यांचा भरीव सहयोग – या सर्व बाबी ठळकपणे नजरेसमोर उभ्या राहातात. भाऊसाहेब कर्ते सुधारक असल्यामुळे विविध योजना आखून त्या पूर्णत्वाकडे नेण्याची त्यांची सदैव धडपड असायची. त्यांचे प्रत्येक कार्य समाजाच्या उत्थानाचे असल्यामुळे ते कार्य पूर्णत्वास नेण्यासाठी भाऊसाहेब नेहमी क्रियाशील असत. आपल्या व्यस्त कार्यक्रमातूनही ते सर्वसामान्यांसाठी वेळ काढून त्यांची चौकशी करीत. कुणी भेटायला आल्यास त्याला योग्य मार्गदर्शन करून कुटुंबातील व्यक्तीसारखी त्याची विचारपूस करीत. यातून भाऊसाहेबांची लोकाभिमुखता व जनसामान्यांबद्दलची आत्मीयता दिसून येते. राजकारणातील उच्च पदावर विराजमान असतानाही त्यांच्या ठिकाणी असलेली नम्रता व दीन-दुबळ्यांप्रति त्यांचे प्रेम हे प्रकर्षाने जाणवते.

भाऊसाहेबांनी आपल्या शिवाजी शिक्षण संस्थेची दारे जात-पात न पाहाता सर्वांना प्रवेशाकरिता खुली ठेवली होती. "जिथे कुणाला एक अक्षर वाचता येत नाही, त्यांचा मुलगा कमीत कमी मॅट्रिकपर्यंत तरी जाईल व त्याला शिक्षणाचे महत्त्व कळेल. मॅट्रिकपर्यंत गेलेला हा दलितपीडित आपल्या मुलाला आणि मुलीला पदवीधर करील. आमची योजना एका पिढीची नसून सात पिढ्यांची आहे." – असे भाऊसाहेब नेहमी म्हणत. विद्यार्थ्यांच्या शिक्षणाबरोबरच समाज-प्रबोधन घडावे या उद्देशाने 'तट्टा हायस्कूल'मध्ये त्या काळातील तळमळीचे समाज सुधारक व विद्वान कायकर्ते ब्रिजलाल बियाणी, संत गाडगेबाबा, राष्ट्रसंत तुकडोजी महाराज, कर्मवीर भाऊराव पाटील यांना आमंत्रित करून त्यांचे विचार विद्यार्थ्यांना ऐकविण्याचा पायंडाच त्यांनी घातला.

सार्वजनिक जीवनात भाऊसाहेबांचे विविध क्षेत्रातील योगदान लक्षणीय आहे. विविध क्षेत्रांतील कार्यप्रणालीस भाऊसाहेबांचा परीसस्पर्श होऊन त्या त्या क्षेत्रांचे सोने झाले आहे. राजकारणात राहूनही भाऊसाहेबांना 'राजकारणी' होता आले नाही. त्यांनी सदैव रंजल्या-गांजल्यांना संकटकाळी मदत करण्याचे कंकण बांधल्यामुळे राजकीय क्षेत्राचा वापर त्यांनी सरळ समाजकार्यासाठी करून घेतला. शासनाच्या ज्या योजना शेतकरी बांधवांसाठी उपयुक्त आहेत त्या खेडोपाडी आणण्याचा त्यांचा सदैव प्रयत्न असायचा. जनसामान्यांचा हितचिंतक असलेल्या भाऊसाहेबांची साधी सामान्य राहाणी व मानवतेने ओथंबलेली सखोल समृद्ध विचारसरणी लक्षात घेता ते राजकारणी असूनही सर्वसामान्यांचे खरेखुरे नेता होते हे सहज लक्षात येते.

सदैव प्रेमळ व दयाळू असणारे भाऊसाहेब प्रसंगी कठोर पवित्रासुद्धा निष्ठेने घेत असत. एक प्रसंग असा – श्री शिवाजी मराठा हायस्कूल या शाळेत जे. डी. एन्. सी. सी. मध्ये सिनीयर ट्रूप कमांडर असलेले श्री. शं. सु. सुपे यांना भाऊसाहेबांचा काही काळ सहवास लाभला. एन्. सी. सी.च्या कार्यानिमित्त त्यांचा भाऊसाहेबांशी संबंध येत होता. भाऊसाहेबांनी भारताचे पहिले राष्ट्रपती डॉ. राजेंद्रप्रसाद यांना १९५० मध्ये

लोकविद्यापीठाच्या उद्घाटनासाठी अमरावतीस आणले होते. त्यावेळी राष्ट्रपतींना मानवंदना देण्यासाठी श्री. सुपे यांची नियुक्ती झाली होती. मानवंदनेचा सराव घेण्यासाठी नागपूरहून आलेले छात्रसेनेचे कॅ. महालसिंग हे टूपच्या यशाबद्दल व शिवाजी संस्थेबद्दल नेहमी द्वेषाची व मत्सराची भावना बाळगून असत. एकदा त्यांनी कामठीच्या कॅम्पमध्ये या छात्रांविषयी, ''मरठ्ठे जब मार्च करते हैं, तो शेर के मुताबिक सूं सूंऽ ऽ क्यों करते है!''- असे जातिवाचक उद्‌गार काढल्यामुळे छात्रांनी बेल्टस्‌च्या साहाय्याने संपूर्ण बॅरॅकच्या खिडक्यांची तावदाने फोडली. या प्रकरणासंबंधीचा व अधिकाऱ्यांच्या वागणुकीचा लेखी रिपोर्ट श्री. सुपे यांनी भाऊसाहेबांकडे केला. भाऊसाहेबांनी त्या अधिकाऱ्याला संस्थेच्या कार्यालयात बोलावून त्याची चांगलीच कानउघडणी केली, तेव्हा कुठे त्याच्या वर्तनात बदल झाला.

एकदा यावली येथे स्थानिक राजकारण आणि गावठी गुंडगिरीमुळे भाऊसाहेबांचे विरोधक विवेक सोडून वागले. त्यांनी भाऊसाहेबांवर प्राणघातक हल्ला करण्याचा प्रयत्न केला. त्यातून ते सुदैवाने बचावले. त्यावेळी श्री. न. शे. देशमुख यांनी त्यांचे भोवती संरक्षण कवच उभे करून स्वतःच्या रक्ताचा अभिषेक केला. तेव्हा अमरावतीचे इर्विन दवाखान्यात त्यांना भरती करून भाऊसाहेबांनी त्यांचे मन:पूर्वक आभार मानले व तोंडभरून कौतुकही केले. भाऊसाहेबांनी त्यांच्या औषधोपचाराची सर्वतोपरी काळजी घेतली, हे ओघाने आले.

भाऊसाहेबांना लहानसान कामे करण्याबद्दल कधीही कमीपणा वाटला नाही. एकदा रफी अहमद किडवाई हे कॉलेजला भेट देण्यासाठी येणार होते. त्यांची मोटार येण्यापूर्वी भाऊसाहेब व त्यांचे सहकारी स्वागतासाठी उभे होते. रस्त्याच्या दुतर्फा दगडांना पांढरा चुना लावून व्यवस्थित ठेवलेले होते. मात्र एक-दोन ठिकाणचे दगड ओळीत नव्हते. भाऊसाहेबांच्या सूक्ष्म नजरेतून ही गोष्ट सुटली नाही. त्यांनी कुणालाही न सांगता स्वतःच ते दगड उचलून नीट केले. कार्यक्रमाच्या वेळी ते कधीकधी खुर्च्यासुद्धा उचलून ठेवत. उच्च पदावर विराजमान असतानाही सामान्य कार्यकर्त्यांच्या धर्माला ते कधी पारखे झाले नाहीत.

ब्रिटिशांच्या शासनकाळात भाऊसाहेबांनी डॉ. वि. भि. कोलते यांची ते एम.ए. प्रथम श्रेणीत उत्तीर्ण होताच अमरावतीच्या विदर्भ महाविद्यालयात स्वतःचे मंत्रिपद पणास लावून प्राध्यापकपदी नेमणूक करवून घेतली व त्यांच्यावरील अन्याय दूर केला. डॉ. भाऊसाहेबांप्रति आपला आदर व्यक्त करताना डॉ. कोलते यांनी ''डॉ. पंजाबराव नसते तर डॉ. वि. भि. कोलते केवळ विष्णू भिकाजीच राहिला असता -'' अशा शब्दात आपली कृतज्ञता व्यक्त केली होती. भाऊसाहेब गुणवान शिक्षकांची कदर करीत. तसेच सामान्य मुलांच्या शिक्षणाकडे, त्यांच्या अडचणींकडे जातीने लक्ष

घालीत. ते अटीतटीच्या वेळी दोन्ही बाजू ऐकून विवेकबुद्धीने निर्णय घेत. राजकारण हे वेळ जात नाही म्हणून निष्ठा नसतानाही करावे हे त्यांना कदापि मान्य नव्हते. त्यांची दूरदृष्टी, प्रयत्नांची पराकाष्ठा व जागृत वैचारिक मानसिकता अनन्यसाधारण होती.

ज्ञानगंगा खेडोपाडी पोहोचविण्याच्या हेतूने भाऊसाहेबांनी अनेक गावांतून महाविद्यालये काढली. त्यांनी शिक्षण संस्थेला वटवृक्षासारखे तर वाढविलेच, त्याचप्रमाणे अनेक ग्रामीण स्थानिक संस्थांनाही शाळा-कॉलेजेस काढण्यासाठी पुढे सरसावण्याची प्रेरणा दिली. स्वातंत्र्यापूर्वी शाळा चालविणे ही गोष्ट फार कठीण होती. श्री. सरदेशपांडे यांनी चांदूररेल्वे जवळील कारला या गावी हायस्कूल चालविले. परंतु आर्थिक अडचणींमुळे ते बंद पडण्याच्या मार्गात होते. श्री. सरदेशपांडे यांनी भाऊसाहेबांना विनंती केल्याबरोबर त्यांनी ती शाळा कसलाही विलंब न लावता आपल्या शिवाजी शिक्षण संस्थेत समाविष्ट करून त्यांनाही संस्थेच्या नोकरीत सामावून घेतले. शिक्षणक्षेत्रात कुणालाही मदतीचा हात देण्यास भाऊसाहेब नेहमीच तत्पर असत.

त्यांचे ठिकाणी गुणग्राहकता व माणसाला पारखण्याची शक्ती होती. ते कोठेही दौऱ्यावर असले तरी त्यांची स्नेहदृष्टी ही आकाशात उंच उडत असतानाही आपल्या पिलांवर लक्ष देणाऱ्या घारीसारखी सदैव आपल्या संस्थेवरच असायची. त्यांचे अंत:करण विशाल होते. त्यांचे निवासस्थानी कुणालाही मुक्त प्रवेश होता. द्वेषरहित राजकारण करणाऱ्या पुढाऱ्यांपैकी ते अग्रगण्य होते. विरोधी लोकांचे बोलणे ऐकून घेणारे व अहंकाराचा लवलेश नसलेले असे ते सच्चे कर्मवीर होते. प्रबळ इच्छाशक्ती, दृढसंकल्प, चिकाटी व विपरित परिस्थितीवर मात करण्याची वृत्ती असलेले महत्त्वाकांक्षी भाऊसाहेब भारतीय शेतकरी ज्ञानसंपन्न व्हावा आणि स्वयंपूर्ण व्हावा. यासाठी सदैव धडपडले. उपेक्षितांना ज्ञानगंगेचा लाभ करून देणाऱ्या या आधुनिक भगीरथाच्या शैक्षणिक, सामाजिक व कृषक-कल्याण विषयक कार्याची विस्मृती समाजाला कधीच होणार नाही.



# आमचे भाऊसाहेब : खाजगी जीवनात

– प्रा. सौ. कल्पना देशमुख

---

महाराष्ट्राला पुरोगामी विचारांचा व कार्याचा वसा ज्या ज्या समाज सुधारकांपासून मिळाला त्यांत डॉ. पंजाबराव उर्फ भाऊसाहेब देशमुख यांच्या नावाचा उल्लेख अग्रक्रमाने करावा लागेल.

डॉ. पंजाबराव देशमुखांनी शैक्षणिक व कृषिक्षेत्रात केलेली क्रांती महाराष्ट्रातच नव्हे तर संपूर्ण देशात एक इतिहास घडवून गेली. आज महाराष्ट्रातील बहुजन समाजाचा झालेला विकास हे डॉ. पंजाबराव देशमुख यांच्या कार्याचे यश मानावे लागेल. विदर्भाच्या घराघरात शिक्षणाची ज्ञानगंगा घेऊन जाणारे डॉ. पंजाबराव देशमुख हे खऱ्या अर्थाने शिक्षण महर्षी आहेत.

जिल्हा कौन्सिलचे अध्यक्ष, वऱ्हाडप्रांताचे शिक्षणमंत्री, भारतीय संविधान परिषदेचे सभासद, भारताचे पहिले कृषिमंत्री–अशी विविध महत्त्वाची पदे भूषविणारे आणि त्या पदांचा व सत्तेचा वापर समाजाच्या विकासासाठी करणारे डॉ. पंजाबराव देशमुख यांचे कार्य हिमालयाएवढे उत्तुंग आहे.

उच्च विद्याविभूषित असणाऱ्या डॉ. पंजाबरावांनी आपल्या शिक्षणाचा उपयोग केवळ स्वत:च्या उदरनिर्वाहासाठी न करता समाजाच्या उन्नतीसाठी व उपेक्षित घटकांना न्याय मिळवून देण्यासाठी केला.

असे हे थोर व्यक्तिमत्व आयुष्यभर उपेक्षित, दलित व बहुजनसमाजाच्या विकासासाठी सतत झिजत राहिले. बहुजनांच्या विकासाचा ध्यास घेऊन जीवन जगणाऱ्या डॉ. पंजाबराव देशमुखांच्या जीवनातील काही खाजगी आठवणींचा आढावा घेतल्यास त्यातूनही त्यांच्या समाजाभिमुखतेचे व 'माणुसपणाचे' उदात्त दर्शनच घडते आणि म्हणून त्यांच्या ह्या खाजगी आठवणीसुद्धा समाजासाठी प्रेरणास्रोत ठरतात.

राजर्षी शाहू महाराज आणि महात्मा जोतिबा फुले ह्यांच्या विचारांचा वसा घेऊन वाटचाल करणारे भाऊसाहेब भारताच्या सामाजिक परिवर्तनाचा विधायक विचार

करीत होते. त्यासाठी शिक्षणाशिवाय तरणोपाय नाही, हे त्यांनाही जाणवले. इतर देशांच्या तुलनेत आपला भारत देश मागे का? ह्या प्रश्नाचा शोध त्यांनी घेतला. भारतातील शिक्षण संपवून अत्यंत प्रतिकूल परिस्थितीत ते विलायतेला गेले. त्यांना विलायतेला पाठविताना त्यांच्या माता-पित्यांना अत्यंत बिकट परिस्थितीला तोंड द्यावे लागले असले तरी त्यांच्या मनात एक वेडी आशा बागडत होती की आपला मुलगा शिकून मोठा झाल्यावर त्याला बड्या पगाराची नोकरी मिळेल. आपले कष्ट संपतील, पांग फिटतील. पण व्यर्थ! कारण भाऊसाहेबांच्या वृत्तीला हे मानवणारे नव्हते. पैशांची जुळवाजुळव करून जेव्हा ते विलायतेला पुन्हा गेले तेव्हा त्यांनी आपल्या आईवडिलांच्या स्वप्नपूर्तीसाठी आपण खूप शिकून, नोकरी करून आईवडिलांना सुखी करावे या विचाराने प्रयत्न सुरू केले. परंतु त्यांची वृत्ती मानेना. त्यांच्या समोर होता भारतातील अज्ञानग्रस्त समाज! आणि त्याच्या उन्नतीसाठी काय करता येईल याचा ध्यासच त्यांना लागलेला होता. सरकारी नोकरी मिळविणे हे भाऊसाहेबांचे ध्येय कधीच होऊ शकले नाही. त्यामुळे आईवडिलांचे स्वप्न की अज्ञानी समाजाचा विकास? अशा द्विधा मन:स्थितीत असतानाच त्यांची नेताजी सुभाषचंद्र बोस यांच्याशी भेट झाली. विलायतेला असताना भाऊसाहेब जिथे वास्तव्याला होते त्याच्या वरच्या मजल्यावर सुभाषबाबू राहात असत. त्यामुळे नेहमीच आपसात त्यांच्या चर्चा होत असत. सुभाषबाबूंनी आय्.सी.एस्. ची पदवी प्राप्त करून सुद्धा बड्या पगाराची नोकरी नाकारली होती. इतकेच नव्हे तर त्यांनी आय्.सी.एस्. ची पदवी सुद्धा विद्यापीठाला परत केली होती. हे भाऊसाहेबांना कळल्यावर त्यांना आश्चर्य तर वाटलेच परंतु त्यांनी जाणीवपूर्वक सुभाषबाबूंना विचारले - "आपल्याला आय. सी. एस्.ची पदवी मिळाली असताना ती नाकारण्याचे कारण काय?" त्यावर सुभाषबाबू म्हणाले - "अरे, आपण शिकायचे, पदवी प्राप्त करायची, ती आपल्या देशातील अज्ञान दूर करण्यासाठी की ज्यांनी आपले रक्त शोषले त्यांची गुलामगिरी करण्यासाठी? आपला देश पारतंत्र्यात असताना पैसा मिळवून चैन करणे हे कितपत योग्य आहे? परतंत्र राष्ट्रातील युवकांचे एकच कर्तव्य असावे आणि ते म्हणजे आपल्या राष्ट्राचे दास्यविमोचन! देशमुख, आयुष्य म्हणजे महान संग्राम आहे हे लक्षात असू द्या."

एकाग्रतेने श्रवण करणाऱ्या भाऊसाहेबांची संवादी तार झंकारली. पुन्हा आई-अण्णांची स्वप्ने की राष्ट्रप्रेम? हा विचार त्यांना भेडसावू लागला आणि त्या वैचारिक मंथनातून एक शुद्ध विवेक बाहेर पडला तो राष्ट्रहिताचा!

भाऊसाहेबांनी ताबडतोब वडिलांना पत्र लिहून आपला हा निर्धार कळवून देखील टाकला. सुभाषबाबूंची देशहिताची तळमळ भाऊसाहेबांच्या हृदयाचा ठाव घेऊ लागली. केवळ स्वत:ची ज्ञानात्मक उंची वाढविण्यासाठी शिक्षण न घेता त्याचा उपयोग

राष्ट्रसेवेसाठी करण्याकरिता भाऊसाहेबांनी आय्.सी.एस्. ची पदवी घेण्याचा आपला मोह आवरून बॅरिस्टर होण्याचे ठरविले.

वरील प्रसंगामुळे भाऊसाहेबांच्या शैक्षणिक जीवनाला एक वेगळे वळण मिळाले. नि:स्वार्थी स्वतंत्र बाण्याच्या माणसांची आज देशाला गरज आहे ह्या जाणिवेतून त्यांनी कायद्याचा अभ्यास केला आणि भारतात येऊन वकिली सुरू केली.

अज्ञानी, अशिक्षित लोकांवर होणाऱ्या अन्यायाविरुद्ध लढा देण्यासाठी मिळविलेल्या या पदवीचा उपयोग भाऊसाहेबांनी ज्या तळागाळातील लोकांसाठी केला तेच लोक पुढे त्यांचे खरे निष्ठावान सहकारी बनले. इतकेच नव्हे, तर प्रसंगी जिवास जीव देण्यासही त्यांनी मागेपुढे पाहिले नव्हते. अशाच कार्यकर्त्यांपैकी एक होता हमालपुऱ्यातील परसराम न्हावी. भाऊसाहेबांप्रति आत्यंतिक निष्ठा अन् तशीच आत्यंतिक गरिबी! तरीसुद्धा भाऊसाहेबांनी आपल्यावर केलेल्या उपकाराचे उत्तरदायित्व म्हणून भाऊसाहेब मायदेशी परतल्यावर इतरांनी केला तसा एकदा मानपत्र देऊन सत्कार करण्याचे त्यांनी ठरविले. प्रो. कृष्णमूर्तीकडून मानपत्र लिहवून घेतले. ते छापण्यासाठी पैसे लागणार म्हणून परसरामने आपली धोपटी आणि आरसा वीस रुपयांना गहाण ठेवला. भाऊसाहेबांचा कार्यक्रम चांगला व्हावा ही त्याची हार्दिक इच्छा होती, आणि त्यासाठी काय वाटेल ते करण्याची त्याची तयारीही होती. पूर्वी एकदा तो आजारी असताना भाऊसाहेबांनी त्याला केलेली मदत त्याने नाकारली होती. म्हणाला होता "पैसे देऊन भाऊसाहेब आपला परचार करतेत असं लोकं म्हन्तीन् ना जी!" याही वेळी कृष्णमूर्तींनी त्याला पैशाबद्दल विचारले तेव्हा म्हणाला, "सारेच पोटवाले झाले तं कलीजेवाले कोन होईन भूसाहेब?" ह्या त्याच्या कळकळीच्या उद्गारांनी कृष्णमूर्तीदेखील गहिवरले होते आणि हा कार्यक्रम पार पडल्यावर ही गोष्ट कृष्णमूर्तींकडून भाऊसाहेबांना कळली तेव्हा त्यांचेही डोळे पाणावले होते. भाऊसाहेबांनी कृष्णमूर्तींजवळ पैसे देऊन त्याचे सामान (धोपटी) नंतर सोडवून आणले व त्याला परत केले.

भाऊसाहेबांनी अशा तळागाळातल्या लोकांसाठी आपले जीवन कष्टविले होते त्यामुळेच असे जिवापाड प्रेम करणारे सहकारी त्यांना लाभले होते. परसरामने केलेला सत्कार हा खऱ्या अर्थाने सत्कार होता. कोणतीही औपचारिकता त्यात नव्हती. ह्या सत्काराने भाऊसाहेबांचे अंत:करण हेलावले होते. ते विमलाबाईंना गहिवरून म्हणाले – "विमल, ही अशी नि:स्वार्थी माणसं माझ्यावर जेव्हा प्रेमाचा वर्षाव करतात ना, तेव्हा मला आभाळ ठेंगणं झाल्यासारखं वाटतं. त्यांच्याहून वेगळं असं अस्तित्व मला नसतंच बघ!"

ही आठवण भाऊसाहेबांच्या अंत:करणात दलितांबद्दल, दु:खी लोकांबद्दल असलेल्या करुणेचंच दर्शन घडविणारी आहे. परंतु केवळ त्यांच्याबद्दल आस्था व प्रेम एवढ्यावरच

भाऊसाहेब स्थिरावले नाहीत; तर त्यांच्या मृदु अंत:करणात अनाथ मुले, परित्यक्ता स्त्रिया यांच्या विषयीची चिंता सुद्धा दृढ झाली होती. धर्म, जात, पंथ ह्यांपलिकडे जाऊन 'हे विश्वचि माझे घर' ही भावना त्यांनी जोपासली. त्यांच्या या मृदु अंत:करणाला पाझर फोडणारी अशीच एक घटना ते बिकानेरच्या दौऱ्यावर असताना घडली. बिकानेरच्या डॉ. मेहता यांनी सांगितली. –"भाऊसाहेब, पाकिस्तानच्या सरहद्दीतून तीन मुली भारताच्या सरहद्दीवर फेकल्या गेल्या आणि पोलिसांनी त्या रुग्णालयात आणून ठेवल्या. त्यांना कसे अन् कुठे ठेवावे ह्याची चिंता मला भेडसावीत आहे. आता या चिमण्या जीवांना कोण आश्रय देणार? फार बिकट समस्या निर्माण झाली आहे." त्यावर क्षणार्धात भाऊसाहेब म्हणाले, "डॉक्टर, त्यांना कुणी आश्रय देणार नाही असे तुम्हास कसे वाटले? मी देतो त्यांना आश्रय. आमच्या 'श्रद्धानंद' अनाथालयात पाठवून द्या त्यांना." भाऊसाहेबांनी वात्सल्याने स्नेहाचे-मायेचे पांघरूण घालून त्या तीन चिमण्या बालिकांची नागपूरच्या अनाथालयात पाठवणी केली.

नागपूरचे 'श्रद्धानंद अनाथालय' आणि अमरावतीचे 'श्रद्धानंद छात्रालय' हे स्वामी श्रद्धानंदांच्या स्मृतिप्रीत्यर्थ बांधले गेले होते. २३ डिसेंबर १९२६ ला एका धर्मवेड्या मुसलमानाने स्वामी श्रद्धानंदांचा दिवसाढवळ्या खून केला. ह्या वार्तेने भाऊसाहेबांचे अंत:करण विदीर्ण झाले. त्यांना श्रद्धानंदाच्या जुन्या भाषणातील काही ओळी आठवल्या. ते म्हणाले होते, "आपल्या अस्पृश्य बांधवांच्या मुलांना तुमच्या मुलांबरोबर शिक्षण घेऊ द्या." ह्या वचनाचाच परिणाम म्हणून भाऊसाहेबांनी नागपूर व अमरावती येथे त्यांच्या स्मृतिप्रीत्यर्थ श्रद्धानंद अनाथालय आणि छात्रालये काढली होती.

संत गाडगेबाबांना भाऊसाहेबांच्या कार्याबद्दल अतिशय आस्था होती. ते नेहमी भाऊसाहेबांच्या कार्याचे कौतुक करीत असत. एकदा गाडगेबाबा छात्रालयात गेले तर त्यांना मुले हातावर भाकरी घेऊन खाताना दिसली. त्यांचे हृदय द्रवले. भाऊसाहेबांच्या कार्याला हातभार लावण्याच्या हेतूने त्यांनी ही गोष्ट वलगावच्या रामनाथ बियाणींना सांगितली. आणि काय, दुसऱ्याच दिवशी बियाणींजी स्वत: रिक्षात ६० ताटे, ६० वाट्या, ६० पेले घेऊन हजर झाले. ही गोष्ट भाऊसाहेबांना कळल्यावर त्यांना अतिशय आनंद झाला. सर्व जातीधर्माच्या मुलांना एकत्र आणून नवा मानवसमाज आकारास आणण्याचा त्यांचा संकल्पित प्रयोग सफल झाल्याचाच तो आनंद असावा. गाडगेबाबा आपल्या कीर्तनात भाऊसाहेबांचा उल्लेख करताना आवर्जून सांगत असत – "बापं हो! वऱ्हाडातनी एक डाक्टर पंजाबराव हाये. तो गरीबाचा कनवाळू आनं बुडाचा आधार हाये. त्याची सर येनार नाही कोनाले! वऱ्हाडच्या काया मातीत गावलेला हिराच हाय जनू."

ही माणसं जरी दोन असली, दोघांची क्षेत्रे जरी वेगळी असली तरी दोहोंच्या

कार्याचे स्वरूप व दिशा एकच होती. दोघेही एकाच ध्येयाने प्रेरित झालेले आणि दोघेही अद्वैत तत्त्वज्ञानाचे पुजारी. भाऊसाहेबांनी आपले सर्वस्व श्री शिवाजी शिक्षण संस्थेला अर्पण केले होते. त्यामुळे कोणतेही कार्य करीत असताना त्यांच्या समोर त्यांच्या अपत्याप्रमाणे उभी ठाकायची ती शिवाजी शिक्षण संस्थाच!

श्री शिवाजी शिक्षण संस्थेच्या अध्यक्षपदाची सूत्रे हाती घेतल्यानंतर भाऊसाहेबांनी एक जाहीर आवाहन केले की "कार्यकारी मंडळातील सभासदांनी प्रत्येकी एक हजार रुपये संस्थेसाठी जमा करून द्यावे. तसेच वऱ्हाडातील धनिकांकडूनही वर्गणी गोळा करण्यास आरंभ करावा." नेमकी त्याच वेळची ही आठवण! भाऊसाहेबांनी स्वत:पासूनच कामाला सुरुवात केली. सर्वप्रथम ते वरखेडचे दादासाहेब बोके यांचेकडे गेले. वरखेडचे दादासाहेब म्हणजे एक प्रतिष्ठाप्राप्त व्यक्तिमत्त्व. या सर्वांना भाऊसाहेब चांगलेच ओळखून होते. बोकेंच्या आवारात शिरल्यावर "दादासाहेब घरी आहेत काय?" अशी त्यांनी हाक दिली. घरातून लागलीच निरोप आला - "दादासाहेब घरी नाहीत. ते बाहेरून एक दीड तासाने परततील." ह्या निरोपामागचा उद्देश भाऊसाहेबांना कळला नाही असे नाही. पण तरीही त्यांनी दीड तास वाट बघण्याचा निर्धार केला आणि जी बैठक मारली ती कायमच. घरात मात्र आता कुजबूज सुरू झाली - आणि पुन्हा भाऊसाहेबांच्या स्वागतासाठी चहा आला. तसा एक निरोपही आला - "दादासाहेबांची प्रकृती ठीक नाही ते अंथरुणातच आहेत त्यामुळे त्यांची भेट होणार नाही." त्यावर क्षणार्धात भाऊसाहेब उत्तरले - "अरे, मग तर मीच त्यांची भेट घ्यायला पाहिजे. चला मी आत येतो." हे ऐकून घरातील मंडळी अस्वस्थ झाली पण श्री. दादासाहेब बोके मात्र भाऊसाहेबांच्या पुढ्यात येऊन उभे ठाकले. भाऊसाहेबांना नमस्कार करून म्हणाले - "भाऊसाहेब क्षमा करा, मी आपल्याशी खोटे बोललो. थांबा मी आलोच" म्हणून ते आत गेले आतून परत आल्यावर भाऊसाहेब त्यांना म्हणाले - "दादासाहेब, बहुजन समाजासाठी मी हाती झोळी घेतली आहे, म्हणून हा फकीर प्रथम आपल्या हक्काच्या घरी आला आहे." दादासाहेबांनी लागलीच त्यांना एक हजार रुपये दिले. भाऊसाहेबांनी मुहूर्ताची पहिली बोहणी लागली म्हणून त्यांचे आभार मानले. अशी चिकाटी भाऊसाहेबांजवळ नसती तर... शेकडो शाखा-उपशाखा वाढून शिवाजी शिक्षण संस्थेचा वटवृक्ष झालेला आज दिसला नसता. 'दाता सुखी तर भोक्ता सुखी'- या उक्तीप्रमाणे त्यांनी दोहोंनाही संतुष्ट केले होते. कार्यासाठी लागणारी निष्ठा, संयम, सहनशीलता त्यांच्याजवळ होती, आणि म्हणूनच ते शिक्षणाची ज्ञानगंगा घरोघरी पोहोचवू शकले. त्यांच्याशी कुणी कितीही वाईट वागले तरी त्यांनी संयम सोडला नाही आणि माणुसकीचा तोल ढळू दिला नाही. अमरावती जिल्ह्यातील सारे विरोधक त्यांच्या विरोधात उभे झाले तरी ते कधी डगमगले नाहीत. आपल्या विरोधकांचे

त्यांनी कधी वाईट चिंतिलेही नाही, मग वाईट करणे दूरच! त्यांच्या विरोधकांवर मात्र आपल्याच कृत्यांमुळे शरमिंदे होण्याची पाळी येत असे.

१९३७ सालच्या प्रांतिक कायदेमंडळाच्या निवडणूक संदर्भातला एक प्रसंग! अमरावती मतदार संघातून डॉ. पंजाबराव देशमुखांनी आपले नामांकनपत्र दाखल केले होते. त्यांच्या विरोधात श्री गणेशराव देशमुख आसरेकर यांनीही आपले नामांकन पत्र दाखल केले होते. वीर वामनराव जोशी आणि डॉ. शिवाजीराव पटवर्धन यांनी आपली सर्व शक्ती गणेशरावांच्या पाठीशी उभी केली होती. शेतकरी संघाच्या सभेचे आष्टी येथे आयोजन केले गेले. संध्याकाळची सभा आटोपून भाऊसाहेब परत यायला निघाले. वलगावजवळ त्यांना काँग्रेस उमेदवार श्री गणेशराव देशमुख यांची मोटर नादुरुस्त असल्याचे दिसले. त्यात डॉ. शिवाजीराव पटवर्धन व त्यांचे मित्र होते. त्यांची सभाही आष्टीलाच होती, परंतु गाडी नादुरुस्त झाल्यामुळे ते वेळेवर पोहोचू शकत नव्हते. तेव्हा अगदी सहजपणे त्यांना स्वत:ची गाडी देऊन भाऊसाहेब अमरावतीला पायी निघाले. डॉ. पटवर्धन भाऊसाहेबांची गाडी घेऊन आष्टीला गेले. डॉ. भाऊसाहेब व डॉ. पटवर्धन ही दोघेही सारख्याच योग्यतेची माणसे. राजकारणात परस्पर विरोध, तरीसुद्धा विरोधकालाही मदत करून त्यांच्याशी सभ्यतेने वागण्याचा मोठेपणा व कौशल्य भाऊसाहेबांच्या अंगी होते असेच म्हणावे लागेल. संयमातून आलेली वैचारिक स्थिरता ती हीच!

भाऊसाहेबांचे राजकारण हे समाजकारणासाठी होते. एक माध्यम म्हणून राजकारणाचा उपयोग त्यांनी केला. राजकारण करण्यामागे त्यांचा वैयक्तिक स्वार्थ कधीच नव्हता. पदाची हाव तर मुळीच नव्हती. प्रसंग विशेषी ते आपल्या पदांचा राजीनामा फेकून मोकळेही झाले होते, आपल्या पदाचा उपयोग आपल्या बहुजन समाजासाठी व श्री शिवाजी शिक्षण संस्थेसाठी कसा करता येईल ह्याचाच ते नेहमी विचार करीत असत.

१९५२ सालचा प्रसंग! स्वातंत्र्यानंतर नव्या घटनेनुसार देशभर गाजलेल्या सत्तारूढ पक्षाने सार्वत्रिक निवडणुकांची तयारी सुरू केली होती. भाऊसाहेबांच्याच विरोधात प्रत्यक्ष त्यांच्या पत्नी सौ. विमलाबाई यांनी असेंब्लीच्या तिकिटासाठी काँग्रेसकडे दोन अर्ज़ केले होते. एक अमरावती जिल्ह्यासाठी व एक यवतमाळ जिल्ह्यासाठी. काँग्रेसमधल्या दोन्ही गटांच्या श्रेष्ठी त्यामुळे विमलाबाईंवर व पर्यायाने भाऊसाहेबांवर नाराज होणे स्वाभाविकच होते. कारण तिसऱ्याच एखाद्या बाईने काँग्रेस पक्षात जाऊन आपला हक्क शाबित करावा हे दोन्ही गटांतील लोकांना मान्य होणारे नव्हते आणि या मुद्यावर दोन्ही गटांचे एकमत होते. दोन्ही गटांना डॉ. पंजाबराव देशमुख जवळचे नव्हतेच. त्यामुळे त्यांचे तिकीट कसेही करून कटवलेच पाहिजे यासाठी दोनही गट

क्रियाशील होते. भाऊसाहेबांचे तिकीट बाजूलाच राहिले आणि त्यांच्या पत्नीच्या तिकिटाची एक नवीनच समस्या उपस्थित झाली होती. आणि त्याचा त्रास भाऊसाहेबांनाच होत होता.

निवडणुकीसंबंधी झालेल्या अकोल्याच्या बैठकीत प्रत्येक गट आपापल्या उमेदवाराच्याच सामर्थ्याचे समर्थन करीत होता. या बैठकीत भाऊसाहेबांच्या उमेदवारीसाठी जबरदस्त विरोध झाला. श्री. बियाणी आणि इतर सर्वांचा एकच सूर होता की भाऊसाहेबांना जर तिकीट हवे असेल तर त्यांनी विमलाबाईंचा अर्ज मागे घ्यावा. त्या इथे हजर नसल्या तरी स्वत: भाऊसाहेबांनी त्यांच्या वतीने सही करावी. परन्तु भाऊसाहेबांना हे मान्य नव्हते. शिवाय त्यांनी आपला अर्ज मागे घ्यावा असे त्यांना सांगणार कोण ? हाही प्रश्नच होता. श्री. बाबासाहेब घारफळकर त्याठिकाणी उपस्थित होते. त्यांनी भाऊसाहेबांबरोबर या संदर्भात बोलावे अशी सर्वांची अपेक्षाही होती. त्यांनी मोठी हिंमत करून भाऊसाहेबांना म्हटले - "भाऊसाहेब, आपण विमलाबाईंचा अर्ज मागे घेतला नाही तर आपल्याला तिकीट मिळणार नाही." त्यावर भाऊसाहेब एकाएकी उसळून बोलले- "तू त्यांचा भाट म्हणून बोलतोस ? आणि ते कोण आहेत तिकीट नाकारणारे? इथे फक्त तिकिटांची शिफारस आहे, फायनल आहे दिल्लीला!" थोडा विचार करून बाबासाहेब हळूच म्हणाले "दिल्लीत तुमच्या तिकिटाचा विचार होईलच कशावरून!" हे ऐकताच भाऊसाहेब भडकले - "मला काय समजताहेत ते लोक? नका देऊ म्हणावं तिकीट. मी कॉंग्रेसच्या तिकिटाशिवाय उभा राहीन." हें ऐकून घारफळकरांनी विचार केला की भाऊसाहेबांना कॉंग्रेसशी विरोध घेणं परवडणार नाही. भाऊसाहेब प्रचंड बहुमताने निवडून येतीलही; पण त्यांना त्यांची कामे बाहेर राहूनच करावी लागतील. त्यामुळे भाऊसाहेबांचे नुकसानच अधिक होणार. शिवाय मंत्रीपदही जाणार. पण वैयक्तिक नसले तरी एक फार मोठे नुकसान होणार आहे हे लक्षात आल्यावर बाबासाहेब घारफळकर त्यांना म्हणाले, "भाऊसाहेब मंत्रिपद गेल्यामुळे तुमचे काहीच नुकसान होणार नाही ?" "त्यावर ते रागानेच बोलले - "होईल ते सोशीन. राहातील बायका पोरं उपाशी." बाबासाहेब त्यांचा राग शांत करण्यासाठी हळूच त्यांना म्हणाले, "तसं नव्हे भाऊसाहेब, आपण सर्व गोष्टी सहन करण्यास समर्थ आहात, पण मला म्हणायचे आहे, आपली लाडकी शिवाजी शिक्षण संस्था कशी जगेल ? आपण सत्ताधारी पक्षाबरोबर राहिलात तर आपल्या संस्थेचा जरूर फायदा होईल, इतकंच."

भाऊसाहेबांनी हे सर्व शांतपणे ऐकून घेतले आणि एकाएकी जादूची कांडी फिरल्यागत त्यांच्यात बदल झाला. ताबडतोब त्यांनी विमलाबाईंच्या वतीने सही करून अर्ज मागे घेतला व तसे लिहून दिले.

श्री शिवाजी शिक्षण संस्था हा भाऊसाहेबांचा अत्यंत जिव्हाळ्याचा विषय! स्वतःच्या कुटुंबापेक्षा, इतकेच काय पण स्वतःच्या जिवापेक्षाही त्यांनी आपल्या या संस्थेवर वत्सल प्रेम केले होते. त्यांच्या प्रेमाचे असे प्रवाह वाढत जाऊन ज्ञानगंगेला मिळाले आणि त्यामुळेच या ज्ञानगंगेचे रूपांतर ज्ञानसागरात होऊ शकले.

भाऊसाहेबांच्या जीवनात अशा प्रकारच्या व्यक्तिगत आठवणी अनेक आहेत. परंतु भाऊसाहेबांच्या जीवनाचे सामाजिक व व्यक्तिगत असे विभाग करताच येत नाहीत. त्यांचे व्यक्तिगत जीवन देखील समाजाभिमुख झालेले होते, हे वरील प्रसंगांवरून दिसून येते. त्यांच्या जीवनातील प्रत्येक आठवण ही समाजाला एक नवीन दिशा देणारी, तत्त्व सांगणारी व आदर्श जोपासणारी होती. भारतात महाराष्ट्र राज्य अधिक प्रगत व पुरोगामी बनविण्यामध्ये ज्या ज्या समाजसुधारकांचा व विचारवंतांचा सहभाग राहिला आहे, त्यांमध्ये डॉ. भाऊसाहेब देशमुख यांचा क्रमांक वरचा ठरतो. त्यांच्या व्यक्तिगत जीवनाचा अभ्यास करीत असताना असे लक्षात येते की भाऊसाहेब आपले व्यक्तिगत जीवन देखील समाजाच्या विकासासाठीच जगले. त्यामुळे ते समाजसुधारक असले तरी खऱ्या अर्थाने विदर्भाच्या मातीत जन्मलेले एक पुरोगामी संत होते, असे म्हणता येईल.



# जनसंस्कृतीचा पोशिंदा

–सुधाकर गायधनी

---

हे महानायका,
शतकापूर्वी तू शेतकऱ्याच्या घरी
राधेश्यामाच्या उदरी जन्माला आला
आणि मातीचा धर्म उद्धारून गेला
तेव्हा असहाय शेतकऱ्यांच्या
शेतातील कणसांचे दाणे
आनंदाने डबडबून आले
वखर-नांगरांनी परस्परांना
गच्च आलिंगन दिले
कापसाच्या चांदी म्होरं
झुकली चंदन झाडे
आशेने मासाळली
किसानांची हाडे

हे महानायका,
तू भाकरीवर जगला
आणि भाकरीला जागला
किसानांच्या हक्कासाठी
शिवरायांप्रमाणे वागला
तू अपार शिकलास
आणि शिकविली बहुजनांची लेकुरे
जातपात धर्म बंधन थिटे पडे तुझ्यापुढे
तुझ्या प्रज्ञेचे कोणते गावे गाणे!

तुझ्या शर्थीपुढे आकाशही ठेंगणे
किती गावे तुझ्या कीर्तीचे पोवाडे
तूच सताड उघडून दिलीत बापा
आम्हा उपेक्षितांना सर्व विद्येची कवाडे
तू पांडित्य, पंडितांना लाजविले
संस्कृतविद्येचे पांढरपीठ गाजविले
तू जिंकले शिक्षणाचे
अनेक महागड
आयुष्यभर केली वंचितांसाठी
अहोरात्र धडपड
आणि अखेर तूच झाला
त्यांचा सावली वड
घटना शिल्पकाराच्या पाठीशी
प्रसंगी तूच धैर्याने उभा ठाकला
तू अनेक मातब्बरांना वाकविले
पण हे धीरोदात्त नायका...
तू मात्र कधी नाही वाकला!
तू येईस्तो...
इथे नव्हता कुणी
अन्नदात्याचा वाली
'खेड्यातले लेडे' म्हणून
मंडळी हिणवत गेली
तू आला-संचारला, माती धन्य झाली
कास्तकारांच्या हाती आल्या क्रांतीच्या मशाली
भारतवर्षात तुझ्यामुळेच हिरवी क्रांती झाली
भाऊसाहेबाविना दुजा कोण झाला वाली ?
हे महानायका,
तूच खरा आमच्या जनसंस्कृतीचा पोशिंदा!
तू नेत्यांचा नेता अन् देशभक्त खंदा!!
शेतातील पिके तुझे
सदा गातात गाणे
मायमाऊली-शेतमाऊलीची

गहिवरतात मने
शेतकऱ्यांचा-कष्टकऱ्यांचा
तू जातिवंत सन्मान
तुझ्यामुळेच ताठ झाली
भूमिपुत्रांची मान

बळीराजा अन् शिवाजी
प्रत्यक्ष पाहिले नाहीत आम्ही
पण अनुभवले खात्रीने
दोन्ही रूपात तुम्ही



# परिशिष्टे :

१. *लोकविद्यापीठाची भूमिका*

२. *भाऊसाहेबांचा एक स्फुट अभंग*

३. *पुत्र अनंताच्या दृष्टीतून भाऊसाहेब*

४. *राष्ट्रसंतांची शब्दसुमनांजली*

# CO-OPERATION

"We are not prepared to sacrifice freedom
and equality in the pursuit of wealth.
To us the manner of producing is as much
important as the product itself.
Further,
there is the very material consideration: if all
do not participate in the work and,
therefore, in wealth, those who are left
out will constitute social threat which might
well prove the ruin of all....
To an agricultural producer, Co-operation is
a necessity..."

**-Dr. P. S. Deshmukh**
Circular Letter, Vol. XXVII - D/5 - 11 - 55.



# लोकविद्यापीठाची भूमिका

## राष्ट्रपतींचे आशीर्वाद



Government House,
New Delhi,

19th January, 1951.

It gave me much pleasure to be associated with the inauguration of the Shri Shivaji Loka Vidyapitha, Amravati. As I said there in my public speech, we need institutions of the type envisaged there and I wish the institution and all its branches all success.

Sd/- Rajendra Prasad
PRESIDENT

---

**Loka Vidyapitha for Vidarbha**

30th December, 1950

(दि. ३० डिसेंबर १९५० रोजी भारताचे राष्ट्रपती डॉ. राजेन्द्रप्रसाद यांचे हस्ते श्री शिवाजी लोकविद्यापीठाचे उद्‌घाटन संपन्न झाले. त्या प्रसंगी लोकविद्यापीठ या महान क्रांतिकारी संकल्पनेचे जनक डॉ. भाऊसाहेब पंजाबराव देशमुख यांनी केलेले स्वागतपर प्रास्ताविक :)

**Mr. PRESIDENT**

The members of the Shri Shivaji Education Society, Amravati, the promoters of the Shri Shivaji Loka Vidyapitha, the people of

Berar and especially the students, who are all deeply interested not only in the Shri Shivaji Education Society but also in the Shri Shivaji Loka Vidyapitha offer to you a respectful and cordial welcome to this ancient capital of Berar. That you have taken all this trouble in the cause of advancement of education and culture is proof of the fact that you attach the highest importance to this question. I would like to state for the information of all that I wanted to familiarize you with the activities of my Society by inviting you here even before you ascended the high pedestal of the Presidentship of the Indian Union. It is impossible for me to express my gratitude to you that inspite of this elevation you have not hesitated to honour this small place and the humble efforts of my Society by your august presence inspite of exacting engagements and none too perfect a health.

**2.** In 1913, Lenin wrote, "About four-fifths of all children and young people in Russia are deprived of educational opportunities. With the exception of Russia, there is no other such savage country in Europe in which the masses of the people have been so robbed of education, enlightenment and knowledge." What was true of Russia in 1913 is more than true of India in 1950. India today is more savage than was Russia in 1913.

**3.** Moved by this condition of the masses of our people and the difficulties of the students coming to our institutions from the rural areas we had planned our Vidyapitha now nearly two years back. We had then proposed to call it an Academy. About March, 1949 the scheme was ready in an almost finalized form. This was discussed with some chosen educationists and others and they all welcomed the idea. Not sure of adequate financial support and being still occupied by problems of consolidation of the institutions under our management, we deliberately decided to postpone action by a year.

In the mean time came the Report of the University Commission and what could gladden our heart more than the fact that the Commission's recommendations were on all fours with what we had already planned. The Commission recognised the inevitability of the Indian Universities being influenced by conditions of Indian

life and government under which they originated and developed and suggested 'necessary adaptation to the changed conditions of a free people.' The Commission went boldly further and suggested "new, free beginnings unhampered by the recent historic past." Secondly taking stock of the fact that 85% of the people live in Villages who have scarcely been touched by secondary or higher education except by the permanent withdrawal from village life of those able young people who have left the villages for the universities, "recommended creation of the types of educational opportunities appropriate to Indian rural life so as to give it a quality and range to that life which will remove the disparity which is now a reality". The Commission also pointed out that the pattern and spirit of existing universities was distinctly urban-centred and it was therefore a matter of practical necessity that new universities aiming at extending educational opportunity to the great mass of rural India and to give vitality and quality to rural life should have their own independent design and programme.

**4.** How our present day education is one-sided and how limited the scope for completing the education available in such small measure is a matter of common knowledge and does not require emphasising. Suffice it to say that hardly 5% of our population receives any education at the present time and out of those who receive it only an infinitesimal number gets anywhere. The proportion of matriculates to the number of school going children works out at 5 to every 4,000 children of school going age. Secondly, there is only one type of education in existence and that is the present university education. Considering that 3,500 children out of every 4,000 do not go to any school and taking into account that out of 500 for every 4,000 children that go to school only 5 pass Matriculation, it is easily understandable how our education is restrictive and one-sided. Can anybody suggest that there is no talent in the 495 that fail to pass the Matriculation? I am sure, nobody will suggest this and still we have yet to start making any effort to utilize the intelligence, industry and initiative of these people and to provide some chance of better life and better knowledge for them. In essence, this is the purpose of the Shri

Shivaji Loka Vidyapitha.

**5.** It is only through such an organization that we could raise the cultural standard of our people as a whole. We could not expect this to happen during the time of the British rule. A Ruler can never be expected to be interested in educating the masses because a downtrodden and ignorant people can be more easily kept in subjection than those who are enlightened. All that the Rulers were interested in having and creating mere survile hirelings and competent workers. It is time, therefore, we realize that education and training of people was one of the key functions of the State and that education must be brought within the reach of the entire people and in all respects must be made to serve the interests of the people. Not only the people who are leaders of society but even the State must interest itself vitally in bringing culture and knowledge to the widest sections of the population. We have to build a new Nation and in order to build such a nation our people must have knowledge of Science, Art and Literature. In order to acquire knowledge one must study and study presistently and painstakingly. But how can any one study? How can any one increase his knowledge when no facilities of any sort are available? Therefore it is up to us to make every facility available to those who want to study and if there are any difficulties and impediments they must be ruthlessly demolished. Our present day differences of opinion and disharmony are to a large extent due to our totally conservative and hopelessly out of date system of education. People must be taught and educated to be staunch optimistic men and women, who fear no obstacles, who understand self-interest as well as national interests. They must have lofty ideals with high cultural and moral standards, supreme devotion to the State and supreme loyalty to the interests of the people. The Shri Shivaji Loka Vidyapitha wishes to make such facilities available to the people at large and wishes to lauch a fivefold attack on illiteracy and ignorance, superstition and cowardice, immorality and lack of character. Firstly, we wish to create larger number of schools so that more children will have a chance of receiving education. This will be done by opening new schools on more liberal and

efficient lines. Secondly, we want to help the education and opportunities of those children who have not been able to complete their education in the ordinary course. This will be done by grouping these people and arranging courses so as to bring them either to the Matriculation level or teach them some art, craft or industry or afford facilities for study of any subject of his or her choice. Thirdly, we want to educate illiterate young men who were not fortunate enough to receive any education when they were of school going age. This will be done by starting adult education schools or attaching morning, night, vacation or Sunday courses to our existing institutions. Fourthly, we want to help those young men and adults and other people-farmers or labourers, clerks or teachers- who have the desire to study & are prepared to come and receive instruction at the various centres that the Vidyapitha will create, in any courses of their choice which the Vidyapitha can arrange. Fifthly, we want to help all those who wish to study courses of Practical utility including those particularly useful to the rural population. In doing so, we wish to lay special emphasis on the education of women because we want them to benefit from our institutions in an ever increasing scale.

**6.** I do not wish to repeat what has already been said in the introduction to the Vidyapitha or what forms part of the rules and regulations. I believe those who wish to have more detailed information will get it from the booklet already published.

**7.** The work of the Shri Shivaji Education Society is gradually becoming familiar to most people. I have taken the liberty of giving a few facts even with the invitation that has been issued. It will, therefore, be admitted that with 37 institutions conducted by the Society, we have a solid foundation to build upon. In our colleges we not only teach all the Arts subjects but Commerce and Law also. All the staff,- and I am happy to say that it is a highly competent staff that we have in our colleges,- is itself capable of helping the Vidyapitha in many branches of education. There is, of course, a technical side on which we wish to lay considerable stress. But even there we have arrangements ready for good deal of agricultural education and it is only an expansion of those

facilities which will enable us to start at least half a dozen courses useful to the agriculturists forthwith. Since ours is an endeavour of its own kind, we may have to have our own text books as well as special literature which will cater for the requirements of the students of our Vidyapitha. Here also the society has a printing press in which we have invested nearly Rs. 75,000/-

**8.** Thanks to the last war, we have ample buildings in the staging camp, which could temporarily, at any rate, be useful for purposes of the Vidyapitha provided of course the Government of Madhya Pradesh is prepared to hand them over to us not only temporarily as they have done at present but permanently as we hope and expect them to do along with the site upon which they stand. On consideration of the whole scheme, it would be found that on the one hand we wish to give an opportunity to as many people as possible to complete their education and on the other we wish to start definite courses for imparting instruction in the various arts and vocations. We are also framing a compact course which could be completed within two years after passing our matriculation which will be intended for the social or political workers and leaders. We propose to include study of History, political Science, Economics, Law as well as elocution to be included in this course. The aim would be to equip a social worker with adequate knowledge of the present world and develop his capacity to be more useful to himself and to the people. Development of a proper national perspective and character would receive the greatest possible attention.

**9.** I hope, therefore, that it will be admitted that we are in a position to undertake the task we have begun and that we have arrangements upon which we can build. That there is need of such a plan, I do not think, any one will dispute. It is beyond question that the present situation of our country from the point of view especially of educating the masses requires a big attempt on a large scale so that the problem could be tackled within a measureable length of time. Given some financial support and encouragement by both the State and the Central Governments we are confident that we will achieve outstanding results. We have

done so in the case of the Shri Shivaji Education Society and its activities and there is no reason why it should not be possible for us to repeat our performance once again.

**10.** In the beginning the work of the Vidyapitha will be carried out through the institutions of the Society. Gradually additional instruction in various courses according to popular demand, and according as the public and Government support becomes availble, would be organized at the various centres. Practical instruction in various subjects of practical utility would be imparted at a Polytechnical Institute that we porpose to establish.

**11.** In drafting the scheme of the Shri Shivaji Loka Vidyapitha we have derived considerable help from the recommendations of the University Commission and I am glad to announce that some of the authors of the Report have greatly appreciated the scheme adumberated by us. Although the existing Vidyapithas are quite a few, it is not incorrect to say that the activities of most of them are confined to a specified field which is limited to certain definite courses of study. The plan of our Vidyapitha on the other hand is to establish genuine and lasting contact with the masses in a more liberal way and on a more comprehensive basis. It is a well known fact that the Examinations sponsored by the various Sahitya Sammelans in different languages and especially Hindi are popular. We do not see any reason why similar examinations by a body which is intent upon maintaining certain definite standards should not be equally popular. We are also looking forward to obtaining recognition not only by government but by even Universities of the examinations that we would be holding, making it in due course possible for those who pass out from our Vidyapitha to obtain posts and appointments according to their qualifications. In fact it is no exaggeration to say that with the practical bias that the Shri Shivaji Loka Vidyapitha would insist upon a qualified candidate coming out of the Vidyapitha should be better fitted for executive work.

**12.** We have not conceived our scheme of the Vidyapitha in any spirit of conflict with, or opposition of the existing Universities. What we in fact intend doing is to supplement their works and

take up those fields which they are reluctant to take up because of a well founded fear that standards set by them may be lowered and the basic considerations upon which they are founded may be vitiated. It is for this reason that the existing structure of pur institutions will not be premitted to be impaired. Our purpose is to enhance their utility by making them serve a larger public who are anxious to welcome the facilities. I have no hesitation in saying that we have placed the "Workers' Educational Association" of England as a model worthy of imitation. We have purposely chosen this in order that people should understand the humbleness of our beginnings as well as our resources, as has been stated in the preamble to the Vidyapitha. The Workers' Educational Association of England which is bigger than any University in Great Britain has neither roof nor walls of its own. It has neither colleges nor common rooms, quadrangles nor lecture theatres; aAnd yet the number of students is 1,03,000. I am happy to say that the Shri Shivaji Loka Vidyapitha is not so poor in its resources even at the commencement and therefore hopeful of still greater results. We have an organization and we can spare a fair amount of funds. We are hopeful that large contributions both from Government and non-Government bodies and other generous donors and trusts would be forthcoming to bring within the purview of our Loka Vidyapitha a large number of people comparable with the number which the Workers' Educational Association of England has at the present moment. I believe with the University Commission that a "Cultural renaissance is in progress today" and there is a keen thirst for knowledge and advancement. Only means and opportunities remain to be provided.

**13.** Berar is well-knit unit which deserves an independent University of its own. If we compare the number of colleges that exist in Berar with those with which the Nagpur University started 25 years back, it can be safely said that Berar is in a position to have an independent University. But for the present we wish to cover a wider field than the ordinary University course, and yet want to leave the existing institutions attached and affiliated to the Nagpur University as they are. In the time to come it should be

within easy bounds of possibilities to affiliate all the existing colleges to the Shri Shivaji Loka Vidyapitha without any harm to them, in fact with immense possibilities of their utility increasing manifold than under the present circumstances. We have therefore taken a line of least resistance keeping the present instruction in our schools as well as colleges intact but by sheer dint of well regulated and beneficial effort we feel fully hopeful that the Shri Shivaji Loka Vidyapitha will flower into an ideal university to which every college in Berar would be too willing to be affiliated.

Paras 14 & 15 deleted.

**16.** We are very proud and our joy knows no bounds that while we are about to place these facilities at the command of the people, and are embarking upon this great, solemn & secred mission, your blessings are with us. We are sure of our aims, certain of the purity of our motives and therefore equally confident that we shall achieve within a period much shorter than any one has calculated, a great awakening which shall go forth in this backward nation as a real ray of hope and advancement. If even a part of our expectation succeeds, which we have no doubt it will, the 30th December, 1950 should be reckoned as day of an educational revolution in India. What is confined to a small section of people and to the pages of printed books would be made available to the people at large in various ways. The citadels of learning confined and crammed and guarded by vested interests shall no longer be citadels but shall be public property to be owned, used, benefitted from at the will of the people at large.

**17.** This is in short the aim and the ideal with which we have set out. We feel sure, all those who have the good of the country at heart will co-operate with us. Those who do not will be left behind. We are sure of this. You, sir, have come to a part of India famous for its traditional hospitality. In this strange world this virtue has only resulted in our own impoverishment. Yet we shall not give up what our forefathers believed in, although little is left to enable us to achieve the satisfaction we always aspire to obtain. I hope sir, you will generously forgive the many deficiencies in our Reception and arrangements for your stay.By this visit of yours,

however hurried, you have placed the whole of Berar under a great debt of gratitude. I have no doubt whatever that we shall all cherish the sweet memory of this great occasion for years to come. The occasion is great becuase it initiates at your hands a big endeavour. Extending a warm welcome to all our other friends who have honoured us by their presence and expressions of sympathy and support, I beg to conclude this speech of mine.



# भाऊसाहेबांचा एक स्फुट अभंग

## म्हणोनि आदर्श तुका माझा

ठेवुन मस्तक । तुकोबाचरणी
करण्या अभंग । सरसावलो ।।
महाकवि श्रेष्ठ । ह्यासमान हाच
तयासम जगी । अन्य नाही ।।
त्याची सुहृदता । त्याची शुद्ध वाणी
ठाव अंतरीचा । घेत राही ।।
हा हो लोककवी । ज्ञान पाजी जनां
अहंकारा तेथे । जागा नाही ।।
दावा अन्य कोणी । पतितोद्धारक
कुंभडा मारक । बाण ज्याचे ।।
गर्विष्ठांचा गर्व । मुर्खांची मूर्खता
सत्तेची अंधता । हरियेली ।।
श्रद्धेची श्रेष्ठता । धर्माचे पावित्र्य
सत्याचेही मर्म । पटविले ।।
''बरे झाले देवा । कुणबीच झालो
ना तरी असतो । गर्व मेलो ।।'' -
दावा कोण अन्य । कवि हे वदला
एवढी नम्रता । कोणाअंगी ।।
ढोंगियांचे ढोंग । असत्य प्रचार

दिखाऊ संतास हाणी निष्ठुर प्रहार ।।
म्हणुनी आदर्श । तुका माझा संत
कारणे दाविली । तो कां माझा ।।
अभंग या वृत्ती । सोय मराठीची
भंग नच कधी । मात्रा-प्रासां ।।
संतांची उच्छिष्टे । बोलिलो उत्तरे
दांभिकां बडगे । शिरावरी ।।

□ □ □

# पुत्र अनन्त च्या दृष्टीतून भाऊसाहेब

(भाऊसाहेबांच्या मृत्यूनंतर लवकरच भारताचे तत्कालीन पंतप्रधान श्री. लालबहादुर शास्त्री यांना भाऊसाहेबांचे चिरंजीव श्री. अनन्त यांनी लिहिलेले एक मूल्यवान पत्र)

**...April 1965**

**"Respected Shastriji,**

It is with the utmost reluctance that I encroach upon your time and seek your indulgence and if I err, I hope you would forgive me.

Grief which has fallen on me, I have not the strength to bear and for that strength I pray to God. It is this utmost grief that compels me to write as also my sense of duty to the nation and to you as its leader. It is no doubt selfish of me to unburden myself thus, but still weighing everything I feel that I must write.

I am indeed most grateful to you for the heartfelt sympathy you have expressed in deeds as much as in words in the nation's loss, I would say-humanity's loss-my own, though it is great in Comparison, it is immaterial.

My estimation of my Late father is bound to be subjective. Therefore I humbly request you to believe that I am Sincerely trying to leave his smile on as many faces as was within his capacity.

Respected sir, if we do not cherish his memory how can We strengthen this country and unify the world for the betterment of mankind.

Respected Sir, I never believed in God until I saw His smile in the peace and serenity on my father's lifeless face.

I seek your forgiveness once again if I have been unpertinent,

as my father did. I was in many ways unfortunate in my life time. I could not give him any physical comforts not that he craved them. The Sun does not ask for comfort from this earth. The sun never stops. It is labour to which he was committed and with his smile at the highest of his glory I had to light his pyre so that I may pay my debt to him, or at least try to.

I crave for your guidance and I await your commands. Often realization comes late. But it is never that late. My father never believed my best to view things as impersonally as is possible. It is my wish that his memory be cherished, that his life's work, which was completely dedicated to the people, the small people, be preserved so that it remains a source of inspiration to generations to come, a source of strength to the nation.

My father worked until life could not remain with him in his body with the knowledge and the confidence that his life, his energy and his extreme good fortune, all that nature had endowed him with, would pass on to the people who like him started out with so little and whom he held most dear-dearer than me - to him.

I hate to make comparisons but one comparison I cannot help myself making. Selfless leaders the country has produced, yourself is probably the finest example and believing that and asking for forgiveness if I err, I would like to say that fortune smiled as sweetly on my father so that he may never commit any error. I, too should not, I will not.

In his lifetime he never asked anyone for anything for himself. What he had he gave. What he gave bore fruit. He was a farmer's son with his simplicity, his sense of devotion. He loved the land. He did his duty by the source which gave him...He outwardly did not believe in God. Why should he, when he never stinked God's duties, whilst he never misused what fortune had bestowed him.

Respectfully,

Sd/ Anant Panjabrao Deshmukh"



# ज्ञानदीप

## पंजाबराव देशमुख

(लोकमहर्षी डॉ. पंजाबराव देशमुखांच्या मृत्यूनंतर 'ग्रामगीता'कार राष्ट्रसंत तुकडो महाराज यांनी त्या 'विदर्भहृदयसम्राटा'ला वाहिलेली शब्दसुमनांजली-)

ज्ञानदीप हा विद्यार्थ्यांचा, वऱ्हाडचा हरपला ।
अरे हा थोर पुरुष लोपला ।। धृ।।
अखिल विश्वकृषकांचा योजक आम्हास का विसरला
समाजातूनी ध्वनि गर्जला ।।
जनसाधारण-लोकहिताचा प्राण पणा लागला।
अजुनि नच ग्रंथ पूर्ण वाचला ।।
*ज्या लोकहिताची आकांक्षा बावरी ।*
*शिक्षणास सारी वेळचि अर्पण करी ।*
*पक्ष्यासम सेवेसाठी घिरट्या भरी ।*
छत्रपतीची ध्वजा घेऊनी नंदादिप उजळला ।
हजारो ग्रामासी चमकला ।। १ ।।

वऱ्हाडात का भारतातही, परदेशी जाउनी ।
शिकविली तरुण मुले धावुनी ।।
दारिद्रयाचे पांग फेडले शिक्षणास देउनी ।
गर्व हा तुमचा सगळ्या मनी ।।
*साथीस घेउनी मित्र सत्र वाढवी ।*
*ज्ञानार्जन-यज्ञे गावगाव चालवी ।*
*सर्वांवर करूनी प्रेम, पक्ष मालवी ।*
निर्भयतेने विद्यापीठा स्थापन करण्या खुला
विनंती अर्ज तुझा धडकला ।। २ ।।

अमरावती नगरास शिवाजी शिक्षास्थळ बनवुनी ।
दाविले परमधाम सजवुनी ।।
भूवैकुण्ठापरी दिसतसे संस्था पाहताक्षणी ।
कलेने भरली चहुबाजुंनी ।।
*अति थोर-थोर तरुणांस अडवुनी धरी ।*
*धन-धान्य मागुनी करि संस्था साजिरी ।*
*सेवेस लावली तरुण पिढी ही बरी ।*
कोण विसरि या तुझ्या गुणांना, धर्मपत्नि अन् मुला ।
याचि सेवेला तू वाहिला ।।३।।

अतिकष्टाने जीवन जगुनी त्याग तपस्या करी ।
बहूजन हित ह्रदयाशी धरी ।।
घरदाराला विसरुनि सगळी वेळ यातची धरी ।
वऱ्हाडी जनता उन्नत करी ।।
*शासनात बसुनी शेतकरी जगविला ।*
*कृषकांचा मेळा दिल्लीला भरविला ।*
*तू मुलामुलांच्या ह्रदयस्थी चमकला ।*
तुकड्या म्हणे पंजाबरावश्री यश-कीर्ती पावला ।
विसरि ना भारत तव शक्तिला ।।४।।

ज्ञानदीप हा विद्यार्थ्यांचा वऱ्हाडचा हरपला ।
अरे हा थोर पुरुष लोपला ।।

**तुकड्यादास**

❑ ❑ ❑

# सहयोगी लेखकांचा परिचय

---

**( कै. ) 'सुदाम' उर्फ दामोदर तुकाराम सावरकर :** संतचरित्रसंशोधक, कवी, लेखक व वक्ते. जन्म - २८ मार्च १९१६. शिरजगाव (मोझरी - जि. अमरावती) साहित्य रत्न, हिंदी शिक्षक सनद. अध्यापक-श्री शिवाजी शिक्षण संस्था संचालित जनता कॉलेज, शिवाजी हायस्कूल (विषय - मराठी, हिन्दी, सांस्कृतिक इतिहास). भूतपूर्व संपादक (१९४३ ते ५८) 'श्रीगुरुदेव' मासिक, गुरुकुंज मोझरी. संपादक - संकलक : 'ग्रामगीता'(१९५६), अनुवादक 'राष्ट्रभाषा में ग्रामगीता' (१९६०). राष्ट्रसंत तुकडोजी महाराजांच्या २६ गद्य-पद्य ग्रंथांचे संपादक (१९३७ ते १९८८). साहित्यनिर्मिती - (धार्मिक) : अष्टश्लोकी भागवत, श्रीनामदेव चरितामृत, श्रीगुरु वाल्मीकि गीतांजली, राष्ट्रसंत स्तवनांजली, श्रीआडकोजी गौरवांजली, गुरुमहिमाष्टक, रहस्यामृत, प्रेममंजिरी, वैराग्यबोधमंजूषा, श्रीकृष्णगीत. (वाङ्मयीन) - संतश्रेष्ठ तुकाराम : वैकुण्ठगमन की खून ?, आद्यसंत श्री सावता महाराज, (चरित्रसंशोधने) - भाऊसाहेब डॉ. पंजाबराव देशमुख : जीवन व कार्य, तपोमूर्ती श्री गाडगेबाबा, जीवनयोगी राष्ट्रसंत (११ खंडांत बृहद् चरित्र, १९८२ ते ९०) तथा शेकडो निरूपणात्मक व सृजनशील लेखनकृतींचे निर्माते. मृत्यू - ९ नोव्हेंबर १९९०.

**( कै. ) मधुकर बाबुरावजी केचे** - जन्म - १७-१-१९३२ अंतोरा (जि. वर्धा) एम्. ए. (मराठी). प्राध्यापक, केशरबाई लाहोटी महाविद्यालय - अमरावती. कवी, ललित लेखक आणि वक्ता.

प्रकाशित पुस्तके - दिंडी गेली पुढे, पुनवेचा थेंब, आसवांचा ठेवा (काव्य.)- तिहींना महाराष्ट्र शासनाचा पुरस्कार. मोती ज्याच्या पोटी (कादंबरी). आखर- आंगण, एक घोडचूक, वंदे वंदनम् (ललित लेख). मायमंजुळा, राष्ट्रसंत तुकडोजी, श्रीसंत गाडगे महाराज, डॉ. पंजाबराव देशमुख (चरित्र). चेहरे-मोहरे, वेगळी कुटुंब,

वऱ्हाडी मंडळी (व्यक्तिचित्रे), पालखीच्या संगे, एक भटकन्ती, माझी काही गावे, झोपलेले गाव, गांधी परिसर (स्थलचित्रे) देवकीनंदन गोपाला (पटकथा) नागपूर तथा अमरावती विद्यापीठांतील ५ क्रमिकांचे संपादन. चिपळूणकर सम्यक् दर्शन (समीक्षा, १९५६)

घाटंजींच्या वि. सा. संमेलनाचे अध्यक्ष (१९८५). आदर्श शिक्षक राज्य पुरस्कार (१९८४) म. रा. साहित्य आणि संस्कृती मंडळाचे भूतपूर्व सदस्य, म. रा. पाठ्यपुस्तक निर्मिती मंडळ सदस्य, म. रा. प्रौढ शिक्षण मंडळ सदस्य, अमरावती व नागपूर विद्यापीठांच्या विधिसभा, अभ्यासमंडळ व विद्वत् परिषदेवर कार्य. मृत्यू - २५ मार्च १९९३, पत्ता - राठी नगर, अमरावती ४४४६०३.

**प्रा. कृष्णकान्त ज्ञानदेव पराते** - कवी, कथाकार, कादंबरीकार, वास्तुशिल्पज्ञ, लेखक. जन्म - ११ सप्टेंबर १९५६. करमाळा (जि. यवतमाळ). बी. ई. (स्थापत्य), प्राध्यापक, डॉ. पंजाबराव देशमुख तंत्रनिकेतन अमरावती. प्राचीन व आधुनिक वास्तुशिल्पांचे विज्ञाननिष्ठ अभ्यासक व उपयोजक. वाङ्मयीन नियतकालिकांमधून अनेक कविता, कथा व समीक्षालेख प्रसिध्द. आकाशवाणी नागपूर वरून 'अनिकेत' कादंबरी प्रकरणश: प्रसारित. प्रकाशित पुस्तके - अबोली, तृषा, आक्रंदन व अनिकेत (कादंबऱ्या), अर्घ्य, युगसंकेत (काव्य), सहसंपादक :अक्षर वैदर्भी मासिक. अध्यक्ष - जनसाहित्य साधना, सरचिटणीस - मराठी जनसाहित्य परिषद. समाजसेवी संघटनांमध्ये क्रियाशील. पत्ता - 'ज्ञानकौशल', आशियाड कॉलनी, शेगाव नाका, - अमरावती ४४४६०३.

**डॉ. सुभाष दामोदर सावरकर** - कथाकार, कादंबरीकार, काव्यसमीक्षक, साहित्य मीमांसक, जन्म - २३ जानेवारी १९४६. अमरावती. बी. ई., एम्. टेक्. (विद्युत अभियांत्रिकी), एम्. ए., पीएच्. डी. (मराठी). प्राध्यापक - शा. अभियांत्रिकी महाविद्यालय, अमरावती.

संपादक - 'अक्षर वैदर्भी' (मराठी मासिक), संस्थापक - जनसाहित्य साधना, मराठी जनसाहित्य परिषद, उपाध्यक्ष - दलित - आदिवासी - ग्रामीण - स्त्री दास्यान्तक संयुक्त साहित्य महासभा (धुळे). 'जनसाहित्य' या समकालीन वाङ्मयीन विचारप्रणाली चे उद्गाते व अधिष्ठाते. प्रकाशित साहित्य : व्हायरस, सूर्यसूक्त, आत्मा, आहुती, आटपाट (कादंबऱ्या). भूलभुलैया, कमळकळा, जजमेन्ट, अज्ञाताचा वेध (कथासंग्रह), रूपायन (नाटक). जनसाहित्य, वैदर्भी रीती (समीक्षा).

शोधप्रबंध - 'अस्तित्ववाद आणि मराठी कादंबरी' १९७३. नागपूर तथा अमरावती

विद्यापीठांत पीएच्. डी. (मराठी) चे मार्गदर्शक. म. रा. साहित्य आणि संस्कृती मंडळाचे १९९५ पासून सदस्य. सहसंपादक – 'क्रांतिज्योती सावित्रीबाई फुले : काळ आणि कर्तृत्व' तथा 'लोकशाहीर अण्णाभाऊ साठे : निवडक साहित्य'. संपादक – 'लोकमहर्षी भाऊसाहेब डॉ. पंजाबराव देशमुख गौरवग्रंथ.'

पत्ता – जनसाहित्य भवन, गणेश कॉलनी, अमरावती – ४४४६०५.

**प्रा. सौ. अनुप्रीता महेन्द्र देशमुख** – शिक्षणशास्त्रातील संशोधक – अभ्यासक, प्राध्यापक. जन्म – ७ जून १९६६. अमरावती. एम.ए. (मानसशास्त्र), एम.ए. (राज्यशास्त्र) एम्. एड्. शिक्षण विद्याशाखेत संशोधन सुरू – 'डॉ. पंजाबराव देशमुख यांच्या शैक्षणिक कार्याचा चिकित्सक अभ्यास'. प्राध्यापिका – अमरावती विद्यापीठ शिक्षण विभाग. शिक्षणविषयक मासिके व नियतकालिके यांमधून शिक्षणविषयक लेखन प्रसिध्द. लोकमहर्षी भाऊसाहेबांच्या धाकट्या भावाची नात. पत्ता : एस्.टी. डिव्हिजनल ऑफीस समोर, शिवाजी नगर, अमरावती – ४४४६०२.

**डॉ. श्रीकान्त भगवंतराव तिडके**– मराठी साहित्याचे अभ्यासक, समीक्षक, लेखक, वक्ता. जन्म – ४ जानेवारी १९५५. मुर्तिजापूर (जि. अकोला). एम्.ए., पीएच्.डी. (मराठी), गेल्या वीस वर्षांपासून श्री गाडगे महाराज महाविद्यालय मुर्तिजापूर येथे मराठीचे अध्यापन. गेल्या ३ वर्षांपासून ह्याच महाविद्यालयाचे प्राचार्यपदी कार्यरत. विविध व्याख्यानमाला, चर्चासत्रे, साहित्यसंमेलने यांत सहभाग. दूरदर्शन, आकाशवाणी वरील कार्यक्रमांमध्ये विशेष सहभाग. वि. सा. संघ, अ. भा. मराठी साहित्य महामंडळ यांवर प्रतिनिधित्व. उच्च माध्यमिक अभ्यासमंडळ व विद्यापीठ अभ्यासमंडळ तथा पाठ्यपुस्तक मंडळांवर प्रतिनिधित्व. प्रकाशित पुस्तके – आभाळवेडी, प्रवाहाचे पाणी (समीक्षणपर लेखसंग्रह). वि. सा. संघ आयोजित दुसऱ्या जनसाहित्य संमेलनाचे अध्यक्ष (१९९५). अमरावती विद्यापीठ मराठी प्राध्यापक परिषदेचे अध्यक्ष (१९९८) पत्ता – प्राचार्य, श्रीसंत गाडगे महाराज, मुर्तिजापूर (जि. अकोला) ४४४ १०७.

**(कै.) हिरोजी बळीरामजी उलेमाले** – कृषितज्ञ, कृषिसंशोधक व मार्गदर्शक. जन्म– २ नोव्हेंबर १९३१. मृत्यू– १३ एप्रिल १९९९. कृषी क्षेत्रातील राष्ट्रीय पातळीवरील नामवंत तज्ञ. माजी कुलगुरू– डॉ. पंजाबराव देशमुख कृषी विद्यापीठ, अकोला (१९८६–९०). माध्यमिक शिक्षक ते कुलगुरू व शासनाचे सल्लागार म्हणून कृषी प्रांतातील लक्षणीय वाटचाल. 'विदर्भ वैधानिक विकास महामंडळ' आदि २० संस्थांचे सल्लागार सदस्य. 'महात्मा फुले कृषी ॲकॅडेमी' सारख्या अनेक कृषककल्याणकारी

संस्थांचे संस्थापक. अटप योजना, आमराई, हिशेबी वृत्ती आदि १७ कृषिसंबध्द पुस्तके प्रकाशित. कृषिसंशोधन मार्गदर्शक. रॉम मशीनबद्दल हैद्राबाद कृषी प्रदर्शन (१९८२) मध्ये पारितोषिक. राज्यशासनाचा कृषिभूषण (१९८५) पुरस्कार. वसंतराव नाईक पारितोषिक (१९८६), निजामाबाद (आंध्र) चा कृषिमित्र पुरस्कार. वर्ध्याचा 'गांधी पुरस्कार' प्राप्त.

अनेक कृषिविषयक शैक्षणिक प्रकल्पांचे आयोजन. ६९ अभ्यासक्रमांची निर्मिती. पाणलोट विकास, कृषिसिंचन, पाटबंधारे या क्षेत्रांत मौलिक कार्य.

पत्ता - २६, सुयोग कॉलनी, राठीनगर, अमरावती-४४४६०३.

**श्री. सुरेन्द्र छत्रपाल भुयार**- जन्म १६जून १९४८, शा. तंत्रनिकेतन व श्री शिवाजी महाविद्यालय अमरावती येथे महाविद्यालयीन शिक्षण, अमरावती जिल्हा फॉरवर्ड ब्लॉकचे भूतपूर्व अध्यक्ष, महाराष्ट्र प्रदेश युवक काँग्रेसचे माजी सचिव, आमदार तथा वयाच्या २७ व्या वर्षी राज्यमंत्री (१९७८ ते १९८०) अन्न व नागरी पुरवठा आणि वने, सामाजिक वनीकरण (१९८२-८५), विविध सामाजिक-सांस्कृतिक-शैक्षणिक व सहकारी संस्थांशी निगडित : (नेताजी शिक्षण संस्था अम; गाडगेबाबा क्रिडामंडळ अमरावती). कृषि विद्यापीठ आंदोलन, बहिरम सत्यग्रह आणि वेगळ्या विदर्भासाठी आंदोलन-यांमध्ये सक्रिय सहभाग, मंत्रीपदावर असताना वनखात्यात अनेक मूलभूत सुधारणा घडवून आणल्या. विधानसभेअंतर्गत सहाय्यक विधिसभेचे अध्यक्ष व मूल्यनिर्धारण समिती, आश्वासन समिती, विशेषाधिकार समिती तथा तक्रारनिवारण समितीचे सदस्य. विदर्भवीर जांबुवंतराव धोटे यांचे सोबत काँग्रेस पक्ष सोडण्याचा निर्णय घेतल्यामुळे मंत्रीपदाचा तसेच महाराष्ट्र विधानसभेचा राजीनामा. मे १९९९ मध्ये त्यांचेसोबतच शिवसेनेत प्रवेश. विविध वाङ्मयीन चर्चासत्रे व साहित्यसंमेलनांत सक्रिय सहभाग. पत्ता : 'इंद्रप्रस्थ', संभाजी नगर (राठी नगर जवळ) अमरावती.

**श्री. दौलतराव तुकाराम गोळे**- जन्म - १९ डिसें. १९१४, पाथ्रट (गोळे) ता. दारव्हा, जि. यवतमाळ. सत्यशोधक चळवळीचे विदर्भातील म्होरके, शिक्षण ४थी पर्यंत शिवनी, ७ वी पर्यंत नांदगाव खंडेश्वर, १२ वी पर्यंत अमरावती (तट्टा हाय.). अटेंडन्ट, प्राथमिक शिक्षक, क्लार्क, लोकल सेल्फ गव्ह. डिप्लोमा, १९४१ पर्यंत यवतमाळ जिल्हा कौन्सिलमध्ये तालुका बोर्ड सेक्रेटरी, १९४३ पासून डॉ. भाऊसाहेबांच्या कार्याला वाहून घेतले. देवास संस्थानला १९४८ पर्यंत भाऊसाहेबांचे पी.ए., १९४८ पासून सार्वजनिक काका म्हणून विदर्भात प्रसिध्द. (१९४८-६०) शिवाजी कॉलेज (अम.) व (१९६०-७०) नॅशनल कॉलेज (नाग), (१९७०-७६) शिवाजी सायन्स

कॉलेज, विदर्भ यूथ वेल्फेअर सोसायटी अम. (१९७८-८०) कलाविभाग, (१९८०-८३) समाजकार्य, (१९८३-८७) इंजिनियरिंग. अ.भा.शेकाप चे सदस्य, मराठा विज्ञान मंदिरचे अध्यक्ष (१९६२- आजतागायत), श्रध्दानंद अनाथालय नागपूरचे मानद सचिव (१९६०-७०), १९६८ च्या विदर्भ कृषी विद्यापीठ आंदोलनाचे मुख्य प्रवर्तक, अ. भा. मराठा शिक्षण परिषद (१९६२-६८) चे कार्यकारी, अ. भा. सत्यशोधक परिषद मुंबई (१९७१) चे कार्यकारी सदस्य, अ. भा. सत्यशोधक परिषद औरंगाबादचे उपाध्यक्ष, श्रीशिवाजी शिक्षण संस्था अमरावती, म. फुले विचारमंच अमरावती, बहुजन संघर्ष समिती नागपूर, सत्यशोधक बहुजन नागपूर, बहुजन-नायक नागपूर, भारत कृषक समाज दिल्ली चे आजीव सभासद. संघटक - डॉ. पंजाबराव देशमुख वैज्ञनिक संस्कृतिपीठ अमरावती, सत्यशोधक समाज विदर्भ विभाग, यशवंतराव चव्हाण प्रतिष्ठान मुंबई, बृहन्महाराष्ट्र परिषद मुंबई. 'राष्ट्रमाता जिजाऊ लोकविद्यापीठ' त्या विद्यापीठाच्या स्थापना कार्याबद्दल पहिल्या डि. लिट्. पदवीचे मानकरी.

पत्ता - श्री दौलतराव गोळे, गोळे निवास, गाडगेनगर, अमरावती ४४४६०३.

**डॉ. रामदास गो. चवरे**- जन्म २० फेब्रु. १९५२ मुऱ्हा. (ता. अंजनगाव जि. अमरावती) एम्.ए., पीएच्.डी. (मराठी)-१९८९, अमरावती विद्यापीठ. जे. डी. पाटील सांगळूदकर महाविद्यालय दर्यापूर येथे स्नातकोत्तर मराठी विभागात अधिव्याख्याता. पीएच्.डी. चे मार्गदर्शक. प्रकाशित पुस्तके - अनुबंध, दव आणि तुषार (काव्यसंग्रह), ऋतुरंग (ललितबंध), कर्मयोगी डॉ. पंजाबराव देशमुख (चरित्र सहनिर्मिती), अक्षरलेणी (समीक्षा), मराठी कथा : प्रवृत्ती आणि प्रवाह (संशोधन)

संपादन - 'अध्यक्षीय भाषणे : अमरावती विद्यापीठ मराठी प्राध्यापक परिषद', विविध वाङ्मयीन नियतकालिकांमधून सुमारे १५० समीक्षणात्मक, ललित, चरित्रात्मक, संशोधनपर लेख प्रसिध्द. उपाध्यक्ष - अमरावती विद्यापीठ मराठी प्राध्यापक परिषद, मराठी जनसाहित्य परिषद अमरावती. आकाशवाणी नागपूर, जळगाव व अकोला येथून व्याख्यानांचे प्रसारण. अ. भा. मराठी साहित्य संमेलनांमधील परिसंवाद, चर्चासत्रे यांत सहभाग. पत्ता - जे.डी.सांगळूदकर महाविद्यालय, दर्यापूर (जि. अमरावती).

**गिरीश रामभाऊ खारकर**- जन्म- ३ फेब्रुवारी १९७३ (अमरावती.) बी.पी.एड., डी.वाय्.एड्. (योग), एन्.डी., एम्.ए. (मराठी). अध्यापन व्यवसाय. हिंदी व मराठी काव्यरचनांमध्ये सारखेच प्रावीण्य. नागपूर आकाशवाणीवरून अनेक रचनांचे प्रसारण, विविध नियतकालिकांमधून कथा, कविता आणि स्फुट लेखन प्रसिध्द.

मराठी जनसाहित्य परिषदेच्या विविध उपक्रमांत सक्रिय सहभाग. विविध सामाजिक-सांस्कृतिक व शैक्षणिक उपक्रमांचे आयोजन.

प्रकाशित पुस्तके – 'चंद्राला फुटले पाय' तथा म. रा. साहित्य आणि संस्कृती मंडळातर्फे 'माझ्यातला मी' या काव्यसंग्रहाला अनुदान प्राप्त. सहसंपादन – क्रांतिज्योती सावित्रीबाई फुले – 'शब्दसुमनांजली' पत्ता – खोलापुरी गेट पोलीस स्टेशन जवळ, अमरावती ४४४६०१.

**प्रा. सौ. कल्पना पुंडलिकराव देशमुख** - जन्म -२० एप्रिल १९४४. एम्.ए. (मराठी), बी.एड्., श्री शिवाजी विज्ञान महाविद्यालय अमरावती येथे मराठीच्या प्राध्यापिका, अंधअपंग-कुष्टरोग्यांचे पुनर्वसन कार्यात सक्रिय. बालसाहित्य, काव्य व ललित लेखनात विशेष रुची व गती. प्रकाशित पुस्तके – सत्यदेव स्तवनांजली पुस्तिका (१९९६), – डॉ. पंजाबराव देशमुख यांचे सामाजिक योगदान -ऋचा प्रकाशन, नागपूर (१९९७), समाज सुधारक डॉ. पंजाबराव देशमुख (१९९७) प्रकाशित लेख - ३०, कथा - ५, चिंतने - १०, लघुनाटिका -२, राज्यस्तरीय शिक्षण परिषदेत शोधनिबंध सादर. अपंगसेवा पुरस्कार (१९९८). पत्ता- 'कल्पना' – टोपे नगर अमरावती – ४४४६०२.

**प्रा. सतीश तराळ** - जन्म १९ नोव्हें, १९५४, दर्यापूर. शिक्षण – एम्.ए, एम्.फिल्. (मराठी). प्राध्यापक – प्रबोधन महाविद्यालय (कनिष्ठ) दर्यापूर व गाडगे महाराज महाविद्यालय मुर्तिजापूर. विभागीय वृत्तपत्रांचे उपसंपादक, प्रतिनिधी तथा स्तंभलेखक. क्रिडानैपुण्य व शारीरिक क्षमता ही वैशिष्ट्ये. प्रकाशित पुस्तके – 'आग', 'आळ' (कथासंग्रह), 'जीवनव्रती दाजीसाहेब', 'चैतन्यमूर्ती' (चरित्र). संपादक – 'बहिष्कृत भारत मधील ११ लेख', 'श्री गोविंद कासट यांची पत्रे'. पुरस्कार- श्रमिक पत्रकार संघ नाशिक तर्फे वृत्तकथालेखनाकरिता १९८३ चा पुरस्कार, अनेक साहित्यसंमेलनांमधून सहभाग, महाराष्ट्रभर कथाकथनाचे कार्यक्रम. आयोजन -५ वे वऱ्हाडी साहित्य संमेलन दर्यापूर (१९८१), ३ रे बाल साहित्यसंमेलन दर्यापूर (१९९८).
पत्ता – सदानंद कॉलनी, दर्यापूर (जि. अमरावती).

**प्रा. अनिल नारायणराव प्रांजळे**- जन्म – ९ जून १९६३, एम्.एस्सी., बी.एड्., एम्.ए. (मराठी). प्राचार्य, दीपशिखा सैनिक शाळा चिखलदरा (जि. अमरावती). मराठी जनसाहित्य संमेलन (भंडारा) चे आमंत्रक (१९९०), अ. भा. मराठी अभ्यास परिषदेच्या यवतमाळ अधिवेशनात शोधनिबंध सादर. वाङ्मयीन नियतकालिकांमधून

कथा, कविता, वाङ्मय विषयक लेख/चर्चा प्रसिध्द. वाङ्मयीन मासिक 'अक्षरवैदर्भी'च्या संपादक मंडळात १९८५ पासून कार्यरत. म.ज.सा.परिषेदेचे कोषाध्यक्ष. नागपूर आकाशवाणीवरून नभोनाटये व कविता-कथा प्रसारित. प्रकाशित पुस्तक - 'अंतर्नाद' (कथासंग्रह) अप्रकाशित कवितासंग्रह, लेखसंग्रह.

पत्ता - नीळकण्ठ मंदिराजवळ, बुधवारा, अमरावती ४४४६०१.

**प्रा. त्रिवेणी श्यामराव फरकाडे** - जन्म १५ जानेवारी १९४२, बेनोडा शहीद (ता. वरूड जि. अमरावती). एम्.ए. (मराठी, गृहअर्थशास्त्र), एम्.एड्., एम्.फिल्. (गृहविज्ञान विस्तार). ज्येष्ठ प्राध्यापिका, महिला महाविद्यालय, अमरावती. १९८६ पासून राष्ट्रीय सेवा योजनेत कार्यक्रम अधिकारी म्हणून भरीव योगदान. महिला चळवळीमध्ये सक्रिय सहभाग. उपाध्यक्ष - महिला कल्याण समिती, अमरावती. प्रकाशित पुस्तके -'विवाह आणि कौटुंबिक संबंध'. आगामी - 'गृहविज्ञानविस्तार', 'स्वातंत्र्यसेनानी संग्रामगाथा' (बेनोडा, यावली, आष्टी, चिमूर येथील ४२ची क्रांती) महिला तथा बालकल्याण, शिक्षण, आरोग्य व स्त्रीपुरुष-समानता या विषयांवर विद्यापीठ पातळीवरील अनेक शोधनिबंधांचे वाचन.

पत्ता- 'द्वारका', पत्रकार कॉलनी, विलास नगर (शिवाजी नगर), अमरावती.

**कृष्णा मोतीरामजी उर्फ बाबा मोहोड** - जन्म - १ जुलै १९३०,व्यवसाय - शेती, लेखन, समाजप्रबोधन. प्रकाशित पुस्तके - पायवाट, पाचोळा,विराम (काव्यसंग्रह), यमुनी, अरुणा (कथासं.), लाटेवरचे शिंपले (कादं.), नवा प्रकाश (नाटक), नवा धर्म-नवी पूजा, ग्रामजयंती यात्रा, चिंतनप्रभा, सहवासगंध, अक्षररेखा, आसवांच्या रेषा, माझी यात्रा, मातीची हाक (वैचारिक व ललित), भूमिदान यज्ञाची गाणी (गीते) व बालवाङ्मय पुस्तके. संपादक - मराठा मार्ग (मासिक), गुलाबवाटिका (वार्षिक). अध्यक्ष, वऱ्हाडी साहित्य संमेलन वणी, जिल्हा साहित्य संमेलन परतवाडा, ४९वे विदर्भ साहित्य संमेलन (१९९७) यवतमाळ. संतधर्म संमेलन थेऊर (१९७२).

पत्ता - ३६६ पायवाट, मोतीनगर, अमरावती ४४४६०६.

**(कै.) प्रा. के. एल. महाले** - जन्म - सोनखास (ता. दारव्हा. जि. यवतमाळ), एम्.ए., बी.टी., हिंदी साहित्य विशारद, भाषारत्न, शासकीय कला महाविद्यालय अमरावती व औरंगाबाद येथे इतिहासाचे भूतपूर्व प्राध्यापक, पुरोगामी दृष्टीचे इतिहास-अध्यापन व इतिहास संशोधनपर लेखन.

**कॉ. शरद पाटील** – जन्म १७ सप्टेंबर १९२५, धुळे. बडोदा येथील कलाभवनात व नंतर मुंबईच्या जे. जे. स्कूल ऑफ आर्ट येथे पेंटिंगचे शिक्षण, १९४५ पासून शिक्षण सोडून जीवनदानी कम्युनिस्ट. १९६४ मध्ये मा.क.प. मध्ये प्रवेश. पुढे जातिप्रथेविरुध्द लढा देण्यास मा.क.प. ने नकार दिल्यामुळे राजीनामा व मार्क्स-फुले-आंबेडकर तत्त्वज्ञानाधिष्ठित 'सत्यशोधक कम्युनिस्ट पक्षा'ची स्थापना. 'सत्यशोधक मार्क्सवादी' मासिकाचे संपादक (१९८२-९३). ऑक्टो. १९८७ अखेर साक्रीस (जि. धुळे) दलित-आदिवासी-ग्रामीण संयुक्त साहित्य संमेलन भरवून नव्या साहित्य-सांस्कृतिक चळवळीची मुहूर्तमेढ व नव्या सौंदर्यशास्त्राचे सूतोऽवाच. संस्कृत, इंग्रजी व पाली भाषा तथा प्राचीन भारतीय तत्त्वज्ञानाचे महापंडित.

प्रकाशित पुस्तके – 'दास-शूद्रांची गुलामगिरी', 'अब्राह्मणी साहित्यांचे सौंदर्यशास्त्र', 'म. फुले-आंबेडकर वाद', 'भारतीय तत्त्वज्ञान व नास्तिकमत', 'रामायण महाभारतातील वर्णसंघर्ष', 'जातिव्यवस्थाक समिंती सेवकत्व' (वैचारिक - संशोधने प्राच्यविद्याक्षेत्रीची), 'स्त्रीशूद्रांचा राजा' (नाटक) १९९९.

पत्ता – 'असंतोष', वाडीभोकर मार्ग, देवपूर – धुळे ४२४००२.

**प्रकाश श्रीरामजी आमले** – जन्म २६ फेब्रु. १९६४. धामणगाव (काटपूर) जि. अमरावती. डिप्लोमा (इलेक्ट्रिकल), एम्.ए. (राज्यशास्त्र, मराठी). सहायक अभियंता-दूरदर्शन केन्द्र गोंदिया, वर्धा, अमरावती, आर्वी. काव्य व नाट्य लेखन-निर्मिती-दिग्दर्शन-अभिनय यांत रुची व गती. विविध सामाजिक-सांस्कृतिक व शैक्षणिक चळवळींच्या उपक्रमांचे आयोजन तथा कार्यान्वयन. अनेक कर्मचारी संघटनांचे पदाधिकारी व क्रियाशील कार्यकर्ते. 'नामदेव प्रभावळीतील संतांच्या साहित्यनिर्मितीचा जनसाहित्य दृष्टिकोनातून चिकित्सक अभ्यास' या विषयावर अमरावती विद्यापीठात संशोधन सुरू. प्रकाशित पुस्तक – 'उपेक्षित' (काव्यसंग्रह). 'अक्षरवैदर्भी' व 'मराठी जनसाहित्य परिषद'च्या उपक्रमांत विशेष क्रियाशील.

पत्ता-'श्रीकौशल' सेंट्रल एक्साईज परिसर, व्ही.एम्.व्ही-वलगाव मार्ग, अमरावती.

**प्रा. नीळकण्ठ गोपाळ मेंढे** – जन्म- लोणी (ता. वरूड जि. अमरावती). एम्.ए. (मराठी). म. फुले महाविद्यालय वरूड येथे कार्यरत. जनसाहित्य चळवळीचे सक्रिय कार्यकर्ते व प्रवक्ते. प्रकाशित पुस्तके – 'आकाशी आणि आक्रोश' (काव्यसंग्रह), 'उद्‌ध्वस्त धर्मशाळा' (कथासंग्रह). अनेक वाङ्‌मयीन नियतकालिकांमधून पुस्तक-परीक्षणे, वाङ्‌मयविषयक प्रश्नांची चर्चा तथा शोधनिबंध प्रसिध्द. आगामी : 'जनसहित्य : चिंतन आणि चर्चा'

पत्ता- पांदुर्णा नाक्यासमोर, वरुड (जि. अमरावती) ४४४९०६

**डॉ. मा. गो. माळी** – 'महात्मा फुले विश्वभारती' (गारगोटी) कोल्हापूरचे संस्थापक अध्यक्ष, पुणे विद्यापीठ व शिवाजी विद्यापीठ शिक्षणशास्त्र विभागांत पीएच्.डी. चे मार्गदर्शक. म.रा. माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ पुणे, म. रा. शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, पुणे व राष्ट्रीय शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, दिल्ली इ. राज्य व राष्ट्र पातळीवरील मंडळांवर दीर्घकाळ कार्यरत. लहानमोठी २० पुस्तके प्रकाशित. त्यांपैकी ६ ग्रंथांना विविध प्रतिष्ठानांकडून पारितोषिके. ३ ग्रंथांना राज्यशासनाचा उत्कृष्ट ग्रंथनिर्मिती पुरस्कार प्राप्त. मौलिक संशोधनाबद्दल राष्ट्रीय पातळीवरील पुरस्कार प्राप्त (काशी). अनेक शोधनिबंध सादर. जागतिक परिषदांत सहभाग. म. रा. साहित्य आणि संस्कृती मंडळाचे सदस्य तथा क्रांतिज्योती सावित्रीबाई फुले यांचे चरित्र संशोधक. दलितमित्र पुरस्काराचे मानकरी (१९९८)

पत्ता – 'मौनीछाया', सरोजिनी कॉलनी, गारगोटी (जि. कोल्हापूर).

**प्रा. सुभाष गवई** – जन्म २३ डिसें. १९६४. एम्.ए. (राज्यशास्त्र), एम्.फिल्., डी.जे.. प्राध्यापक व पत्रकार. राज्यशास्त्र विभाग प्रमुख, भारतीय महाविद्यालय अमरावती. गेल्या चार वर्षांपासून उपसंपादक– दै. हिन्दुस्थान अमरावती. प्रकाशित पुस्तके – पदचिन्ह (काव्य), दाजीसाहेबांच्या आठवणी, भारतीय राज्यव्यवस्था (बी.ए. भाग १) सामाजिक, सांस्कृतिक–राजकीय विषयांवर विविध मासिके/ वृत्तपत्रे यांतून १४० वर लेख प्रसिध्द. पुरस्कार – डॉ. आंबेडकर फेलोशिप (१९८९), कुष्ठमित्र पुरस्कार (१९९१), मानवमूर्ती पुरस्कार (१९९२), हरिजनमित्र पुरस्कार (१९९३), शोधसन्मान पत्र (१९९५), अपंगसेवा पुरस्कार (१९९९), सेवाभावी कार्यकर्ता पुरस्कार (१९९९).

पत्ता– १, अभिनव स्टेट बँक कॉलनी, चपराशी पुरा, कँप, अमरावती.

**प्राचार्य रामभाऊ शेवाळकर**– जन्म – दिनांक २ मार्च, १९३१, अचलपूर (जि. अमरावती). एम्.ए. (संस्कृत), एम्.ए. (मराठी) ना. के. बेहेरे सुवर्णपदकाचे मानकरी. महाराष्ट्राचे ख्यातनाम वक्ते. सुमारे २५ ग्रंथांचे लेखन, "विनोबांचे धर्मचिंतन" (संपादन), "त्रिदल" समीक्षा ग्रंथ, "सारस्वताचे झाड" (व्यक्तिचित्रसंग्रह) ही त्यांची गाजलेली पुस्तके; अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाचे पूर्वाध्यक्ष, विदर्भ साहित्य संघाचे पूर्वाध्यक्ष, आचार्य कुलाचे संघटक, सेवानिवृत्त प्राचार्य– लोकमान्य टिळक महाविद्यालय, वणी (जि. यवतमाळ). मराठीचे सन्माननीय प्राध्यापक, शिक्षणतज्ज्ञ, साहित्य अकादमी (नवी दिल्ली) चे भूतपूर्व सदस्य, अनेक शासकीय व लोकसेवी प्रतिष्ठानांचे सक्रिय सदस्य. मंगेशकर प्रतिष्ठानचा कुसुमाग्रज

पुरस्कार प्राप्त.

पत्ता : पर्णकुटीजवळ, डागा लेआऊट, उत्तर अंबाझरी मार्ग, नागपूर – ४४००१०.

**डॉ. मुरलीधर रामराव देशमुख**– जन्म– ११ नोव्हें. १९३३, आसेगाव (जि. अमरावती.), एम्.ए. (समाजकार्य) दिल्ली, एम्.ए. (समाजशास्त्र) नागपूर, पीएच्.डी. (नागपूर) पीएच्.डी. चे मार्गदर्शक. प्राध्यापक –विभागप्रमुख, शिवाजी विद्यापीठ कोल्हापूर (१९८७). प्राचार्य– फुलसिंग नाईक महाविद्यालय, पुसद. प्राचार्य–मुंगसाजी महाविद्यालय, दारव्हा. प्राचार्य–समाजकार्य महाविद्यालय अमरावती (१९९१). नागपूर विद्यापीठ विकास समिती. कुलसचिव–नागपूर विद्यापीठ (१९९०–९१), विभागप्रमुख समाजशास्त्र विभाग – अमरावती विद्यापीठ (१९९३–९६), विद्वत परिषद सदस्य व संघटक (समाजविज्ञान)– टाटा. इन्स्टि. मुंबई. (१९६४–६६). १९५७ पासून रूरल इन्स्टिट्यूट (अमरावती) येथे अध्यापन, गांधी विचार विभाग– नागपूर विद्यापीठ (१९७९) येथे अध्यापन. भारत सरकार शिक्षण मंत्रालयाद्वारे प्रायोजित १) ग्रामीण विद्यार्थ्यांच्या आर्थिक सामाजिक स्थिती व २) लहान शेतकऱ्यांचे जीवन व कष्ट – या विषयीचे प्रकल्प संपन्न (१९६३–६५).

आजीव सदस्य– IIPA नवी दिल्ली, श्रीशिवाजी शिक्षण संस्था, विदर्भ यूथ वेल्फेअर सोसायटी, भारतीय सेवक समाज अम., श्रध्दानंद छात्रालय, नागपूर विद्यापीठ विधिसभा, ना. वि. समाजकार्य विभाग, प्रौढ शिक्षण विभाग, राष्ट्रीय समाजकार्य समिती, अमरावती विद्यापीठ समाजशास्त्र विभाग अध्यक्ष, कार्यकर्ते व समाजकार्य विचारक, ग्रामीण नेतृत्व चर्चासत्रांचे निदेशक.

पत्ता– 'त्रिमूर्ती', सिव्हिल कोर्टाजवळ कँप, अमरावती–४४४६०२.

**प्रा. पुरुषोत्तम चंद्रभानजी नागपुरे**– जन्म ११ नोव्हें. १९३२, खडकी ता. आष्टी(शहीद) जि. वर्धा, वडील प्रसिध्द स्वातंत्र्य सेनानी(देहान्त शासन), चार काका व तीन भाऊ यांना बेनोडा संग्रामात कारावास.

शिक्षण क्षेत्रातील कारकीर्द–माध्यमिक शिक्षक ते वर्ग १ प्रशासकीय अधिकारी. प्राध्यापक, राज्यशिक्षण–संशोधन व प्रशिक्षण परिषद पुणे. प्रौढ शिक्षण अंतर्गत लेखनास राष्ट्रीय पारितोषिक. महानुभाव मौलिक साहित्य निर्मितीसाठी विश्वभारतीकडून तीनदा पुरस्कृत. महाराष्ट्र प्रदेश कांग्रेस (एस्.) कमिटीचे अध्यक्ष (१९९१–९३), भा. रा. काँग्रेसमध्ये विलीन (१९९३), उपाध्यक्ष नगर काँग्रेस कमिटी अमरावती, अध्यक्ष अ. भा. महानुभाव साहित्य महामंडळ पुणे. महासचिव श्रीप्रभू प्रबोधन संस्था,रिध्दपूर. हमालपुरा (अम.) येथे 'एकता शिक्षण संस्थेचे' संस्थापन. ग्रंथनिर्मिती – 'जय श्री

चक्रधरा' (कादं.), 'पुनर्शोध' (संशोधनात्मक)

पत्ता - 'बोके प्रिंटर्स' समोर, गांधीनगर, अमरावती ४४४६०६

**प्राचार्य पद्माकर सिध्दनाथ काणे** - विदर्भाच्या राजकीय विचाराचे व्यासंगी प्राध्यापक. जन्म - १७ ऑक्टो. १९३२- एम. ए. (राज्यशास्त्र). राज्यशास्त्र विषयाचे अधिव्याख्याता - अमोलकचंद महाविद्यालय यवतमाळ. (१९५६-५८). विदर्भ महाविद्यालय अमरावती येथे १९५८ ते १९९० दरम्यान प्राध्यापक व प्राचार्य. आदर्श शिक्षक राज्य-पुरस्कार- १९८५, १९९०-९२ दरम्यान भारतीय प्रशासकीय सेवापूर्व प्रशिक्षण केन्द्र (नागपूर)चे संचालक. प्रकाशित पुस्तके - 'राज्यशास्त्र', 'काही प्रमुख राज्यशास्त्रज्ञ', 'लोकप्रशासन', 'आधुनिक राजकीय विश्लेषण', 'राजकीय सिध्दान्त आणि राजकीय विचारक', 'दि राष्ट्रसंत' (इंग्रजी).

नागपूर व अमरावती विद्यापीठांच्या विविध प्राधिकरणांवर सदस्यत्व आणि कार्य; राज्य शास्त्र मंडळाचे सदस्य आणि अध्यक्ष म्हणून कार्य. म. रा. ग्रंथनिर्मिती मंडळ व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळावर अनेक वर्षे सदस्य. ३१-१०-९२ रोजी शासनसेवेतून निवृत्त. पत्ता - दुर्गा विहार कॉलनी, शिलांगण रोड, अमरावती - ४४४६०५.

**सुधाकर श्रावणजी गायधनी** - खापा (ता. सावनेर, जि. नागपूर). क्रांतिकारी जनकवी, समकालीन जाणिवांचा निर्वाह करणाऱ्या सामर्थ्यसंपन्न काव्यशैलीचा उद्गाता, दक्षिण मध्य सांस्कृतिक केंद्र नागपूरचे सन्मा. सदस्य. एम्.ए. (मराठी), एम्.एफ्.ए. नाट्यलेखन - नाट्यनिर्मिती - दिग्दर्शन - संगीत. रायबाई -भुलाबाई, प्रेषितांचे बेट इ. पुरस्कारप्राप्त नाटकांची यशस्वी निर्मिती व अनेक प्रयोग. प्रकाशित पुस्तके - 'कब्रीतला समाधिस्त', 'देवदूत'.

महाराष्ट्र शासनाचा उत्कृष्ट काव्यलेखनाचा केशवसुत पुरस्कार (१९८३)

पत्ता - ५७अ, तपोवन गृहनिर्माण, सोमलवाडा, नागपूर ४४००२५.



# हे लोकमहर्षी !

हे लोकमहर्षि! युगपथदर्शी!!
विजयी नाम अनोखा। लो प्रणाम कोटिजनों का।।
है अमर तुम्हारा नाम जहाँ में
बाग खिला सुमनों का। लो प्रणाम कोटिजनों का।।

घरबार जलाकर अपना तुमने जन को दिया उजाला
यह बहुजन का नव विश्व जपे पंजाबराव की माला
हर साल दिया लाखों कलियों को खिलने तुम ने मौका।
लो प्रणाम कोटिजनों का।।

पैरों से नवपथ चले बनाते नये क्षितिज आँखों से
ठुकराया था वित्तमंत्रिपद भी मुँह मोडा लाखों से
बस जन्म लुटाता चला गया तू सौदागर सपनों का।
लो प्रणाम कोटिजनों का।।

इस कंकर पत्थर को भी तुमने नव नेतृत्व सिखाया
कृषि विद्यापिठ भी उसने लाकर हमको आज दिखाया
सब दीन, किसान, अछूत, अपढ की तुम हो सुदृढ नौका
लो प्रणाम कोटिजनों का।।

अजि लंदनतक भी उडा दिया था शिवराया का घोडा
उन अमेरिका, जापान आदि में अमिट नाम कर छोडा
हर पहलू में थी पहल तुम्हारी, नाविक तूफानों का
लो प्रणाम कोटिजनों का।।

हे लोकमहर्षि ! युगपथदर्शी!!
विजयी नाम अनोखा ।लो प्रणाम कोटिजनों का
है अमर तुम्हारा नाम जहाँ में बाग खिला सुमनोंका ।
लो प्रणाम कोटिजनों का।।

*- सुदाम सावरकर -*